# आधुनिक मराठीचें उच्चतर व्याकरण.

महादेव पांडुरंग र.बनीस, बी. ए., एस. टी. सी. डी.

किंमत ६ रूपये.

ॐ

# आधुनिक मराठीचें उच्चतर व्याकरण.

लेखक

महादेव पांडुरंग सबनीस बी. ए., एस्. टी. सी. डी.

माजी असि. मास्तर, ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणे;
हेडमास्तर, बी. जे. गव्ह. हायस्कूल, ठाणे,
प्रिन्सिपॉल, ट्रेनिंग कॉलेज, धुळे.
'मुलांचे व्याकरण' (भाग १ ते ५),
'व्याकरण व प्रबंधन' यांचा कर्ता.

किंमत ६ रुपये.

# पुरस्कार.

" दुष्टान् शब्दान् मा प्रयुक्ष्महीत्यध्येयं व्याकरणम् " ॥

श्री. म. पां. सबनीस यांच्या " आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण " या ग्रंथास पुरस्कार लिहिण्याची त्याची विनती मीं आनंदानें पण भीतभीत मान्य केली. कारण मला या विषयाचा अवश्य तितका अभ्यास व ज्ञान दोन्हीं नाहींत

आम्ही दोघेही सहाध्यायी. त्यांनीं पदवी घेतल्यानंतर सेवानिवृत्त होईपर्यंत शिक्षणखात्यांतच सेवा केली व इतर विषयांबरोबर व्याकरण या विषयाचें अध्ययन व अध्यापन केलें विद्याव्यासंग अखंड चालू ठेवला त्यांचा विषय मला फारच महत्त्वाचा वाटतो. मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात जे अराजक माजले आहे, वृत्तपत्रांत व इतरत्रही मराठी लेख लिहिणाऱ्या बऱ्याच लेखकांनीं भाषेचे जे अशुद्ध, बेडौल, विकृत रूप बनविले आहे तें पाहून असंतोष वाटणारांपैकीं मी एक आहे. व्याकरणाचा पद्धतशीर अभ्यास हा या अराजकावरील सर्वोत्कृष्ट उपाय आहे असें मला वाटते.

ग्रंथाच्या प्रारंभीं ५१ पृष्ठांचे जें निवेदन श्री सबनीस यानीं लिहिले आहे तें फार विचारप्रवर्तक व विवाद्य सिद्धांतानीं भरलेले आहे श्री. सबनीस यांचीं बहुतेक महत्त्वाचीं विधाने मला पटत नाहींत. दादोबाची सुप्रसिद्ध व्याकरणाची व्याख्या सदोष आहे असे ते प्रतिपादन करतात आणि दादोबा म्हणतात तसा व्याकरणाचा खराच उपयोग नाहीं, असे म्हणण्याचा त्यांचा आशय आहे " शुद्धाशुद्ध बोलणें, लिहिणें या गोष्टी व्याकरणाने साध्य होत नाहींत " अशी पृष्ठ १५ वर ते टीका करतात, पण दादोबाही " साध्य होते " असें म्हणत नाहींत " समजते " एवढेच म्हणतात व ते खरें आहे असें मला वाटते.

व्याकरण हे उपयोजक किंवा कलात्मक शास्त्र नसून मात्र " ते शालेय दृष्टीनें म्हणजे विषयाचा अभ्यास व परीक्षा या दृष्टीनें उपयोगी असे शास्त्र आहे " हें त्यांचे विधानही मला योग्य वाटत नाहीं. आपल्या सहा वेदांगांपैकीं व्याकरण सर्वांत श्रेष्ठ, " वेदानां वेदः ", " मुख व्याकरण स्मृतम् " असे मानले जात असे. " यद्यापि बहुनाधीषे पठ पुत्र तथापि व्याकरणम् । सकल शकल न स्यात् सबल शबल सकृत शकृत् " ॥ या लोकोक्तींत बराच तथ्यांश आहे. हें कांहीं केवळ शालेय अभ्यास व परीक्षा या दृष्टीनें व्याकरण उपयोगी आहे म्हणून नव्हे प्राचीन काळीं व्याकरणाचा इतका कसून अभ्यास झाला नसता, त्याचे जीवनांतलें महत्त्व पटले नसते, तर आज जो एवढा वेदवाङ्मयसंग्रह आपणास उपलब्ध आहे तो अशा स्थितींत उपलब्ध झाला नसता.

" प्रयोगशरणा वैयाकरणा. " । हे तत्त्व कोठपर्यंत ताणावयाचे ? हा एक प्रश्नच आहे. कुणीही रेम्याडोक्या लेखकानें प्रयोग सुरू करावा, तशाच इतर कांहीं अविद्वान

लेखकांनीं अगर वक्त्यांनीं त्याचा पुनरुच्चार करावा म्हणजे झालें? वैयाकरणांनीं तो मान्य केलाच पाहिजे कीं काय? शिष्टसमत प्रयोग तेवढे मान्य म्हटलें, पण शिष्ट कसा ठरवायचा? इंग्रजीचा खूप अभ्यास करून पदवी मिळाली कीं आजपर्यंत मनुष्य सरकारमान्य होत असे, विद्वान मानला जात असे, पण त्याला मराठीचा मुळींच व्यासंग व अभ्यास नाहीं, तर तो मराठीचा शिष्ट कसा मानावा व त्याच्या प्रयोगाला का म्हणून वैयाकरणानीं शरण जावें?

पृष्ठ ३६ वर कै. वामनराव जोशी यानीं "अधिकारयुक्त व्याकरणावरील ग्रंथ लिहिणारास काय काय ज्ञान असणें अवश्य आहे" तें सांगितले, त्याचा उल्लेख आहे. अनेकभाषानैपुण्याविषयींचा श्री जोशी यांचा आग्रह योग्यच आहे असें मला वाटतें. त्यांतल्यात्यांत संस्कृतचा तर चांगलाच अभ्यास पाहिजे. आधुनिक मराठीवर पारशी भाषेचाही इतका गहरा परिणाम झाला आहे, (याचा उल्लेख कै. राजवाड्यानीं बऱ्याच विस्तारानें केला आहे हें वाचकास आठवेल) कीं तिचेंही ज्ञान असले पाहिजे. संस्कृत व्याकरणाचा व इंग्रजी व्याकरणाचा मराठी भाषेवर व व्याकरणरचनेवर काय परिणाम झाला आहे याचा सयुक्तिक उहापोह करण्यास या दोन्ही भाषाचे व त्याच्या व्याकरणाचें फारच चांगलें ज्ञान असले पाहिजे श्री प्रभातचंद्र चक्रवर्ती यांच्या "The Philosophy of Sanskrit Grammar" हा ग्रंथ वरवर चाळून पाहिला तरी संस्कृत भाषेचा नुसता साधारण परिचय पुरेसा नसून गाढ अभ्यास करणें अवश्य आहे हें वाचणाऱ्याच्या ध्यानात येईल. मराठीचे तर उत्तम ज्ञान पाहिजे हें उघड आहे.

श्री. सबनीस यांनीं 'सज्ञारूपी नोकरशाही' बद्दल व परिभाषेबद्दल लिहिले आहे तें सत्यच आहे. शब्दाच्या दुरुपयोगामुळे विचारांचा बराच गोंधळ उडतो.

**'Advancement of Learning'** (विद्यासवर्धन) या ग्रथांत बेकनने म्हटले आहे —

"Words are generally given according to vulgar conception and divide things by such differences as the common people are capable of, but when a more acute understanding, or a more careful observation would distinguish things, better words murmur against it. The remedy of this lies in **definitions**; but these themselves are in many respects irremediable, as consisting of words: for words generate words however men may imagine they have a command over words, and can easily say they will speak with the vulgar and think with the wise."

शब्दांचा अनर्थ व्याकरणाच्या उत्कृष्ट ज्ञानानेच उलगडणारा आहे.

प्राकृतेय (Accidence) व वाक्येय ( Syntax ) यांऐवजी श्री सबनीस यांनीं जर दुसरे अधिक सुघड शब्द व्याकरणाच्या व्याख्येसाठीं वापरले असते तर मला आनद झाला असता. असो.

हा पुरस्कार बराच लाबला. या अवघड परंतु अत्यत महत्त्वाच्या विषयावर ग्रथ लिहिण्याची अभिरुचि व अधिकार फारच थोडया विद्वानाना आहे. व त्यांपैकीं श्री. सबनीस हे एक आहेत त्यानीं केलेल्या या ग्रथात व्याकरणाचा इतिहास व त्याची अद्यावत् परिणति त्यानीं लोकासमोर ठेवली आहे. मी त्याचे हार्दिक अभिनदन करतो. मला नम्रपणें असे म्हणावेसे वाटते कीं निश्चयात्मक सागोपांग मराठी व्याकरणाची सध्यां आपणास फारच आवश्यकता आहे पचवीस वर्षांनीं हा प्रयत्न श्री सबनीसानीं केला हें तर स्तुत्यच आहे. पण हें काम उत्कृष्ट रीतीनें पार पाडण्यासाठीं एकाद्या विद्वानांच्या समितीने अगर साहित्यपरिषदेने ते हाती घेऊन पुरें केलें पाहिजे नाहींतर अराजक नष्ट होणार नाही.

शेवटीं, उत्तमप्रकारें व्याकरणाचा अभ्यास केल्याशिवाय लोकांत बोलणारा अगर लिहिणाराही कसा हास्यास्पद होतो हे सागणारें सुभाषित उद्धृत करून हा पुरस्कार पुरा करतो :—

**शब्दशास्त्रमनधीत्य यः पुमान् । वक्तुमिच्छति वचः सभान्तरे ॥**
**बद्धुमिच्छति वने मदोत्कटं । हस्तिनं कमलनालतन्तुना ॥ १ ॥**

अशापैकींच मीही एक आहे

मुबई, जुलै १९५१

३०

# अभ्यर्थना ।

**गुणदोषौ बुधो गृह्णन्निन्दुक्ष्वेडाविवेश्वरः।**
**शिरसा श्लाघते पूर्वं परं कण्ठे नियच्छति ॥ १ ॥**

—कुवलयानंद

विस्तरशः निवेदनांत एकावन पानें खर्ची घातल्यावर, पुन. या छोट्याशासुद्धां दिसणाऱ्या अभ्यर्थनेने वाचकाना शिणविण्यात दुसरा तिसरा हेतु नसून, हे पुस्तक समग्र लिहून झाल्यावर त्याच्या प्रकाशनाच्या कामीं ज्याची ज्याची मला मदत झाली त्यांचे जाहीर आभार मानणे हाच आहे.

ह्या माझ्या ऋणानुबध्यात आपल्या मुबई राज्याचे पतप्रधान श्री. **बाळासाहेब खेर** याचे नाव मी पहिल्यानं घ्यावें हे सहाजिकच आहे. या पुस्तकासाठीं 'पुरस्कार' देण्याची विनती करण्यासाठीं मीं त्याच्याकडे गेलो, तो साध्वसपूर्ण व थोड्याशा त्रस्त अन्तःकरणाने गेलो कारण सध्यांच्या राष्ट्राच्या आणीबाणीच्या काळांत अनेक घडामोडींत अहोरात्र गुतल्यामुळे, इच्छा असली तरी त्यांना वेळ मिळेल कीं काय हीच भ्रांति होती पधरा वीस ओळींचा मामुली 'पुरस्कार' मिळणारच ! त्याबद्दल कधींही शका नव्हती पण व्याकरणासारख्या क्लिष्ट विषयावर लिहिलेले पुस्तक वाचून झाल्यावर त्यावर गभीरपणें अभिप्राय देण्यास निवळ वेळेची सवड असेल काय ? असा प्रश्न होता. शिवाय अशा सकटात त्यांना त्याच्या सध्यांच्या नाजुक शरीरप्रकृतीच्या काळात घालणे हें एक प्रकारचें क्रौर्यच नाहीं काय ? असा विचारही मनात डाचत होता. मात्र 'बलवदपि शिक्षितानात्मन्यप्रत्ययं चेतः' या कव्युक्तिप्रमाणें पात्रापात्रते-सबधी **खेर**साहेबांनीं जी भीती प्रदर्शित केली तिचा स्पर्शही माझ्या मनास झाला नाहीं. आमच्यावेळीं **विल्सन कॉलेजां**त त्याच्या सर्वांगीण विशाल बुद्धिमत्तेची ख्याति होती. आजही अखिल भारताला जसे सर्वमत्रतत्रविशारद पडित **जवाहरलाल नेहरू** त्याप्रमाणें, आमच्या मुबई राज्यांत **खेर**साहेब आहेत ही गोष्ट सर्व विश्रुत आहे. आमच्या मुबई राज्यास अखिल भारतीय राज्यांत अग्रस्थान प्राप्त झालें आहे, त्याचे हे एक महत्त्वाचें कारण आहे.

**खेर**साहेबांनीं माझ्या विनतीचा अव्हेर केला नाहींच. छापील पुस्तकाचे सर्व फर्मे त्यांना दिल्यावर एक महिन्याच्या आंत सर्व पुस्तक काळजीपूर्वक वाचून केवळ मामुली गुळमुळित 'पुरस्कार' न लिहितां मला पसत असल्यास, थोडयाश्या विस्ताराने गुणदोषदर्शक म्हणजे विवेचक असा 'पुरस्कार' लिहिण्याची इच्छा आपण होऊन त्यांनीं

प्रदर्शित केलो व अवघ्या पंधरा दिवसांत तो मजकडे पाठविला. मला तो अत्यंत मोलाचा वाटतो. अतिशय आत्मीयतेच्या भावनेने व जिव्हाळ्याने, केवळ पुस्तकांत 'अधिक तें सरतें उणें तें पुरतें' करण्याच्या बुद्धीनेच तो लिहिला आहे, हे त्यातील प्रत्येक शब्दावरून दिसून येईल या पुरस्काराच्या द्वारें त्यांनीं 'विद्वत्व व नृपत्व' या दोहोचाही आश्रय एकसमयावच्छेदेकरून देऊन मला कृतार्थ केले आहे. त्याच्या या ऋणातून केवळ शब्दानीं उतराई होणें मला शक्य नाहीं

या पुस्तकातील माझे 'निवेदन' **विचारप्रवर्तक व विवाद्य सिद्धांतांनी भरलेलें आहे** हा त्याचा अभिप्राय मला फारच मानवला. कारण **दादोबांनी** आपलें 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हा ग्रंथ प्रसिद्ध केल्यावर **कृष्णशास्त्री चिपळूणकर** व **रामभाऊ गुंजीकर** या व्याकरण निबंधकारानीं व **गोडबोले, जोशी, खेर,** व **दामले** या व्याकरणकारानीं जो मार्ग स्वीकारला त्याचाच अवलंब मी हें पुस्तक लिहिताना केला आहे. **दामल्यांनीं** आपल्या 'शास्त्रीय' व्याकरणात **दादोबादि** सर्व वैयाकरणांचीं मतें खोडून काढून स्वतःचे नवे सिद्धांत स्थापन केले आहेत ते जवळजवळ सर्वच खोडून काढण्याचा प्रयत्न मी केला. तेव्हां **खेर**साहेबांनीं माझ्या पुस्तकाची जशी गय केली तशी, **दामल्यांचेच** अनुयायी असलेल्या आधुनिक व्याकरणकाराकडून होणार नाहीं, अशी खात्री असल्यामुळें **श्रीमदप्पय्या दीक्षितांनीं** शिरोभागीं उद्धृत केलेल्या श्लोकाच्या द्वारें जो शहाणपणाचा मार्ग उपदेशिला आहे, त्याचा अंगिकार मी केला आहे ह्या विध्वंसक दिसणाऱ्या कार्याबरोबर, छन्द, निरुक्त, ध्वनि, प्रवचन, पृथक्करण इ० भाषेच्या इतर शब्द अर्थ वाक्यशास्त्रात व्याकरणाचें क्षेत्र मर्यादित करून कै **कृष्णशास्त्री चिपळूणकर** व कै. **गुंजीकर** यांच्या आधारानें मी 'शब्द' व 'पद' या दोन संज्ञांच्या दृष्टीनीं एका नवीन पद्धतीची रचना करून विधायक कार्यही केलें आहे. ही गोष्ट तज्ज्ञ चिकित्सक लक्षात घेतील, अशी मला आशा आहे.

'आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोग विज्ञानम्' ही **कालिदासोक्ति** मला पूर्णपणें मान्य असल्यामुळे विद्वत्समितीच्या संबंधींच्या **खेर**साहेबांच्या सूचनेचें मी अन्त करणपूर्वक स्वागत करतो **भवभूतीनें** सांगितल्याप्रमाणे पूर्वकालीन मंत्रद्रष्ट्या ऋषींप्रमाणेंच आधुनिक मंत्रिश्रेष्ठांच्या बाबतींत 'वाचमर्थोऽनुधावति' असाच प्रकार असल्यामुळे अशी समिती लवकरच नेमण्यांत येईल, अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं

'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथा या सुभाषितोक्तिप्रमाणे हे पुस्तक लिहून झालें असताही प्रकाशनास लागणाऱ्या द्रव्याच्या अभावीं ते वाचकाच्या हातांत केव्हातरी पडणार, कीं धूळ खात पडून शेवटीं कसरीच्या भक्ष्यस्थानीं पडणार या विचाराने त्रस्त स्थितींत असतां, त्या प्रसंगांतून **सारस्वत बँकेच्या** कार्यकारी मंडळाने पुष्कळशा सवलतींनीं मला मोठा रक्कम कर्जाऊ देऊन माझी मुक्तता केली याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत बँकांच्या शास्त्रांत व व्यवहारांत निष्णात

अशा सुप्रसिद्ध **वामनराव वर्ध्यांच्या** स्फूर्तिदायक प्रेरणेने व सल्ल्याने या सहकारी सस्थेचे कार्य ज्ञाति व राष्ट्र या उभयतांस पोषक होईल असेच चाललेलें आहे. शिक्षण, गृहयोजना, लहानसहान घरगुती धदे यासबधीं कार्य करताना जी व्यापक दृष्टि, बँकेने आपल्यासमोर ठेवली, तीच या पुस्तकाच्या प्रकाशनास मदत देतांना ठेवली हें सहज दिसून येणार आहे हे ज्ञातिऋण मी मुक्तकठाने प्रकट करतो.

हें पुस्तक काळजीपूर्वक मेहनतीने शक्य तितके लवकर प्रसिद्ध केल्याबद्दल **श्रीलक्ष्मी-नारायण** प्रेसचे मालक श्री **रघुनाथराव मोरमकर** व त्याचे छापखान्यातील सहकारी याचे मन पूर्वक आभार मानतो न्या **तेलंगांच्या** फोटोचा ब्लॉक हा श्री. **मोरमकरांच्या** कृपेचेच फळ आहे, हे मुद्दाम येथे सांगितलें पाहिजे.

शितलादेवी टेंपल ट्रस्ट बिल्डिंगस्<br>
ब्लॉक न. २३, माहीम मुबई १६<br>
आषाढ शुद्ध ११ शके १८७३<br>
दिनाक १५-७-१९५१

**म. पां. सबनीस**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| मुखपृष्ठ | पान दोन |
| पुरस्कार | पान तीन |
| अभ्यर्थना | पान सहा |
| अनुक्रमणिका | पान नऊ |
| शुद्धिपत्र | पान अकरा |
| न्या. मू. का. त्रिं. तेलग ( चित्र व अर्पण पत्रिका ) | पानें बारा तेरा |

| | | पानें |
|---|---|---|
| निवेदन | | १–५१ |
| उपोद्घात | व्याकरण ( व्याख्या व व्याप्ति ) | ५४–५६ |


## भाग पहिला

### प्राकृतेय


| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | ५७—६४ |


### प्रकरण पहिलें
### अन्तर्घटना


| | | |
|---|---|---|
| अध्याय पहिला | वर्णविचार | ६५—७३ |
| अध्याय दुसरा | संधि | ७४—७८ |


### प्रकरण दुसरें
### बाह्यघटना


| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | ७८—८७ |
| अध्याय पहिला | प्रत्यय व प्रत्ययवजा शब्द | ८८—९६ |
| अध्याय दुसरा | साधित शब्द | ९७–११२ |


## भाग दुसरा

### वाक्येय


| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | ११३–११६ |


### प्रकरण पहिलें
### वर्गीकरण


| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | ११७–११८ |
| अध्याय पहिला | नाम, सर्वनाम व विशेषण | ११९–१२८ |

| | | |
|---|---|---|
| अध्याय दुसरा | क्रियापद | १२९–१३३ |
| अध्याय तिसरा | क्रियाविशेषण, उभयान्वयी व केवल प्रयोगी | १३४–१३८ |

**प्रकरण दुसरें**

**विकरण**

| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | १३९–१६५ |
| अध्याय पहिला | लिंग व वचन | १६६–१७५ |
| अध्याय दुसरा | विभक्ति | १७६–१९५ |
| अध्याय तिसरा | काळ व अर्थ | १९६–२१५ |

**प्रकरण तिसरें**

**पद्योजना**

| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | २१६–२१७ |
| अध्याय पहिला | पदसबध ( कारक ) | २२८–२२२ |
| अध्याय दुसरा | पदप्रयोग ( प्रयोग ) | २२३–२२७ |
| अध्याय तिसरा | पदान्तर | २२८–२३६ |

**प्रकरण तिसरें**

**परिस्फोट ( व्याकरणकथन )**

| | | |
|---|---|---|
| उपोद्घात | | २३७–२३८ |
| अध्याय पहिला | शब्दपरिस्फोट | २३९–२५५ |
| अध्याय दुसरा | पदपरिस्फोट | २५६–२७८ |
| अध्याय तिसरा | मिश्रपरिस्फोट | २७९–२८४ |

# शुद्धिपत्र

| पान. | परिच्छेद. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ३ | दुसरा | पहिली | गजीकर | गुजीकर |
| ११ | तिसरा | आठवी | इन्द्रशत्रु | इद्रशत्रु |
| १२ | पहिला | दुसरी | **लिंडसे** | **लिंडले** |
| २२ | दुसरा | दुसरी | बठक | बैठक |
| २५ | पहिला | सतरावी | ( usage ) | उपयोग (usage) |
| ४९ | पहिला | बारावी | **गोडबोल** | **गोडबोले** |
| ४९ | दुसरा | पहिली | **कालिदासान** | **कालिदासानें** |
| ७१ | पांचवा | पहिली | य, र्, ल् | य्, र्, ल्, व् |
| ७१ | पाचवा | दुसरी | श, स्, ष्, व् | श्, स्, ष् |
| ८९ | तिसरा (तक्ता) | दुसरी | ने, ए, शीं | ने, ए, हीं, ईं, शीं |
| ८९ | तिसरा (तक्ता) | दुसरी | नीं, हीं, शीं | नीं, हीं, ईं, शीं |
| ९४ | चौथा (तक्ता) | पहिली | असेल | असेन |
| १०१ | पहिला | सत्ताविसावी | रूप | रुच |
| १०७ | तिसरा | पहिली | द्वद्व चि | द्वद्व समासाचे |
| ११९ | चौथा | पहिली | **दादो ।** | **दादोबा** |
| १२८ | दुसरा | दुसरी | **जोशांचें** | **जोश्यांचें** |
| १४३ | पहिला | तिसरी | **चिपळूणकांनीं** | **चिपळूणकरांनीं** |
| १४८ | दुसरा | पहिली | तत्त्वाज्ञान | तत्त्वज्ञान |
| २१० | दुसरा | चौदावी | कादबऱ्यात | कादबऱ्यांत |

याशिवाय केवळ दुर्लक्षामुळे काना-मात्रा-वेलांटी-अनुस्वार इत्यादिकांच्या अनेक चुका झाल्या आहेत त्या सहज दिसून येण्यासारख्या असल्यामुळें दिल्या नाहींत.

ॐ

# अर्पणपत्रिका

कै. न्या. का. त्रिं. तेलंग

यांच्या

[ शतसांवत्सरिक श्राद्धानिमित्त ] .

पुण्यस्मृतीला हा ग्रंथ अर्पण केला आहे

**जन्म: ३० ऑगस्ट १८५०** **मृत्यु: १ सप्टेंबर १८९३**

# — निवेदन —

मान्यान्प्रणम्य, विहितांजलिरेष भूय: ।
भूयो निवेद्य विनयं विनिवेदयामि ॥
दूष्यं वचो मम परं निपुणं विभाव्य ।
भावाऽवबोधविहितो न दुनोति दोष: ॥ १ ॥

**श्री ज्ञानेश्वरांस** समकालीन असे महानुभावपंथीय **आनेराज व्यास, कवीश्वर व्यास,** पंडित **भीष्माचार्य,** पंडित **विश्वनाथ वर्धनस्थ** हेच मराठीचे आद्यव्याकरणकार होत हे सर्व **वऱ्हाडप्रांतीय** होते यांच्यापैकीं पंडित **भीष्माचार्य** यानीं लिहिलेले 'पंचवार्तिक' नावाचें छोटें व्याकरण सुमारें वीस वर्षांपूर्वी छापून प्रसिद्ध झालें आजकालच्या शोधाप्रमाणे हेंच मराठी भाषेचे सर्वांत जुने व्याकरण असे म्हणतां येईल

यानंतर सोळाव्या शतकांत **फादर स्टिफन्स** वगैरे युरोपियन व्याकरणकारांनीं मराठी व्याकरणग्रंथ लिहिले हीं सर्व पुस्तकें पोर्तुगीज भाषेंत आहेत अर्थात् त्या रचनेवर ल्याटीन व्याकरणाची छाप बसली हें सांगावयास नको. गोमंतकातील अशा प्रकारचें शेवटचें व्याकरण **सखाराम नारायण वाघ** यांनीं सन १८१९ त लिहिले. पण ते केव्हाच छापलें गेलें नाहीं.

मराठी भाषेचें पहिलें छापलेले व्याकरण बंगाल्यांतील सिरामपूर (श्रीरामपूर) येथें सन १८०५ सालीं प्रसिद्ध झालें. हें व्याकरण **कॅरे** या मिशनरी गृहस्थाने **नागपूर** येथील **वैजनाथ शर्मा** याच्या मदतीनें लिहिलें असें त्या पुस्तकात नमूद आहे. यावरून 'पंचवार्तिका' प्रमाणे या पुस्तकाचाही **वऱ्हाडाशीं** संबंध येतो अखेरीस **दामले** यानी आपले 'शास्त्रीय व्याकरण' **वऱ्हाडांतच** लिहिले हे लक्षात घेतलें तर व्याकरणाचा **वऱ्हाड** प्रांताशीं संबंध आरंभापासून आजतागायत अव्याहत चालू आहे हें दिसून येईल.

पहिले आणि खरेखुरे व्याकरणविषयक प्रयत्न पेशवाईनंतर इंग्रजी राजवटींत मुंबईस सुरू झाले. इ स. १८२५ च्या सुमारास इंग्रज अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनाने **जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके** इत्यादि शास्त्रीमंडळींनीं कांहीं छोटीं शालोपयोगी व्याकरणे लिहिलीं. त्यांच्यापैकीं कांहींच्या अनेक आवृत्ती झाल्या पण पुढील दहा वर्षांत त्यांना छापखान्याचे संस्करण झालेले दिसत नाहीं.

**गंगाधरशास्त्री फडके** यांनीं आपलें व्याकरण इ स. १८३६ त छापले याच वर्षी **दादोबा पांडुरंग** यांनीं त्यांना पुढे मराठी भाषेचे 'पाणिनी' अशी यथार्थ

पदवी देणारें आपलें ' मराठी भाषेचें व्याकरण ' छापून प्रसिद्ध केलें. हेंच पुस्तक बरेंचसें वाढवून त्याचें पुनः प्रसिद्धीकरण १८५० त केलें तत्पूर्वी **बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर** यांनीं ' बालबोध व्याकरण ' म्हणून छोटेसें पुस्तक लिहिलें. १८६७ त **कृष्णशास्त्री गोडबोले** यांनीं ' नवीन मराठी व्याकरण ' लिहिलें मराठी व्याकरण-रचनेच्या मराठींत झालेल्या पहिल्या छापी स्वरूपांतील प्रयत्नांची या वर्षी समाप्ति झाली.

या काळांत इंग्रजी भाषेंतही **स्टीव्हन्सन, बर्जेस, बेलेयर्स,** या युरोपियन व **नवलकर** या एतद्देशीय ग्रंथकारांनीं व्याकरणें लिहिलीं अर्थात् त्यांचा विशेषतः युरोपियन व्याकरणकाराच्या व्याकरणग्रंथांचा परिणाम व्याकरणग्रंथरचनेवर कायमचा झाला हें सांगावयास नको याच वेळीं **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांनीं **दादो-बांच्या** व्याकरणावर टीकात्मक निबंध लिहून व्याकरणग्रंथाच्या रचनेस नवीन कलाटणी दिली. त्यानंतर व्याकरणाचा अभ्यास प्राथमिक शाळांत मुख्यत **दादोबांच्या** ' लघुव्याकरणा ' च्या द्वारें होत होता. ट्रेनिंग कॉलेजांत **दादोबांचें** ' मोठें व्याकरण ' व ' पुरणिका ' व **गोडबोल्यांचें** ' मराठी भाषेचें नवीन व्याकरण ' हीं अभ्यासिलीं जात. पण मध्यंतरीं मराठीस विश्वविद्यालयांतून गचांडी मिळाल्यामुळें, तिच्या सर्वांगीण प्रगतीस चांगलाच खो बसला अर्थात् मराठीच्या इतर अंगांच्या प्रगतीबरोबरच व्याकरणविषयक प्रगतीही थांबली.

अशा स्थितींत **गोडबोल्यांच्या** ' नवीन व्याकरणानंतर ' सुमारें वीसबावीस वर्षांनीं **रामचंद्र भिकाजी जोशी** यांनीं आपलें ' प्रौढबोध मराठी व्याकरण ' हें पुस्तक रचलें. रा **जोशी** हे एक सामान्य शिक्षक होते. ते **दादोबां**प्रमाणें आधुनिक उच्च शिक्षण घेतलेले किंवा युनिव्हर्सिटी ग्रॅज्युएट तर नव्हतेच. पण **चिपळूणकर गोडबोल्यां**प्रमाणें पूर्वपरंपरेचे शास्त्रीही नव्हते. तथापी **दादोबां**प्रमाणेच **जोशी** यांचा हा व्याकरणविषयक प्रयत्न क्रांतिकारक झाला. **जोश्यांनीं** प्रथम मराठी व्याकरणास पृथक्करणाची पद्धतशीर जोड देण्याचा प्रयत्न केला. **दादोबांचें** अनु-करण करून त्यांनीं इयत्तावार शालेय पुस्तकेंही लिहिलीं त्यामुळें **दादोबांचें** ' लघु व्याकरण ' मागें पडून **जोश्यांचीं** मतें प्रचलित होण्यास फारच मदत झाली

**दादोबांच्या** व्याकरणावर ज्याप्रमाणें **कृष्णशास्त्री चिपळूणकर** या तत्कालीन अष्टपैलू विद्वानानें टीकात्मक निबंध लिहिले, त्याप्रमाणेच **जोश्यांच्या** व्याकरणाचें अतिशय मार्मिक व सूक्ष्म परीक्षण त्यांच्यावेळचे अद्वितीय भाषाशास्त्रज्ञ **रामचंद्र भिकाजी गुंजीकर** यांनीं आपल्या ' विविधज्ञान विस्तार ' या मासि-कांत आठ उत्कृष्ट निबंधांच्या द्वारें केलें. **गुंजीकर** हे युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट झाले नाहींत. पण कॉलेजांत त्यांनीं **तेलंगां**सारख्या त्रिखंडपंडिताबरोबर सहाध्यायी या नात्यानें दोनतीन वर्षें घालविलीं होतीं. मराठी भाषेच्या विविध अंगांत त्यांनीं

अधिकारयुक्त लिखाण केलें आहे. निबंधमालाकर्ते **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांनीं आपण मराठी भाषेचे **शिवाजी** आहों असे दर्पोक्तिपूर्ण विधान एका ठिकाणीं केले आहे. त्याला अनुसरून एका आधुनिक विद्वानानें **गुंजीकर** हे मराठी भाषेचे **रामदास** म्हणजे चिपळूणकरांस गुरुस्थानीं शोभणारे असें म्हटले आहे त्यासंबंधीं चर्चा करण्याचे हें स्थळ नव्हे. पण निव्वळ भाषेच्या व व्याकरणाच्या दृष्टीने पाहिलें तरी आद्य व्याकरणकार **बाळशास्त्री जांभेकर** यांच्याप्रमाणे **गुंजीकरांना** मराठी, इंग्रजी व संस्कृत या भाषांशिवाय उर्दू, गुजराती, बंगाली, कानडी या भाषांचा चांगला अभ्यास होता मराठीशिवाय बंगाली व कानडी या भाषांचीं व्याकरणपुस्तकेही त्यांनीं लिहिलीं आहेत संस्कृत व्याकरणाचाही त्यांचा गाढ अभ्यास होता, हें त्यांनीं **काशिनाथ पांडुरंग परब** यांच्या सहकार्यानें चालविलेल्या 'कौमुदीमहोत्साह' या मासिकावरून दिसून येईल. पण या सर्व गोष्टी बाजूस ठेवून केवळ हे निबंधच दृष्टीसमोर ठेवले तरी त्यांचा स्वयंसिद्ध असा व्याकरणविषयक अधिकार दिसून येतो प्रस्तुत लेखकास हें पुस्तक रचण्यास त्यांचे निबंधच स्फूर्तिप्रद झाले, ही गोष्ट प्रांजळपणे येथे सांगणे हें तो आपले कर्तव्य समजतो.

**गंजीकरांनीं** आपल्या अधिकारी वाणीने पूर्व वैयाकरणांच्या कार्याचें महत्त्वमापन पुढीलप्रमाणें केलें आहे' "गंगाधरशास्त्री फडके यांचे व्याकरण म्हटलें म्हणजे पहिलेच. त्यापक्षीं त्या वेळच्या मराठी लोकांच्या सामान्य अभ्यासाच्या इयत्तेला अनुसरून संस्कृत रूपावली, समासचक्र यांच्या धोरणाने ते बसविले होते याच्या पलिकडे त्यामध्यें फारसें कांहीं नव्हते. बाळशास्त्र्याची इंग्रजी व संस्कृत या दोन्हीं भाषांत चांगली प्रगति असल्यामुळे त्यांच्या व्याकरणात सोपेपणा पुष्कळ आला आहे. परंतु बोलूनचालून तें 'बालव्याकरण'. तेव्हां त्यांत विस्तारही तादृशच. तिसरें दादोबांचें. दादोबांना त्या समयीं संस्कृतापेक्षां इंग्रजीचेच ज्ञान अधिक होते त्यामुळें त्यांनीं आपल्या व्याकरणांतले मुख्य मुख्य नियम व व्याख्या इंग्रजींतील मरेज् व्याकरणांतून घेतल्या होत्या त्यानंतर अलिकडे जीं व्याकरणें झालीं त्यात बहुतेक प्रकार दादोबांचाच असून कांहीं नवीन विषयही आहेत. गोडबोल्यांच्या व्याकरणामध्यें हावर्डकृत इंग्रजी व्याकरणांतील बहुतेक लेखांचे पदशः भाषांतर आलेलें आहे. परंतु शब्दोत्पत्तीच्या संबंधानें त्यांनीं पुष्कळ चांगला परिश्रम केला आहे. चिपळूणकरांच्या निबंधांमध्यें तरी शब्दोत्पत्तीकडे बरेच लक्ष दिले आहे प्रस्तुत म्हणजे जोशीबोवांच्या व्याकरणामध्ये पाहिले तर स्वतंत्र विचार करण्याचा आपल्याकडून त्यांनीं होईल तितका प्रयत्न केला आहे, तथापि त्यामध्यें फारसे कांहीं नवीन आलेलें नाहीं व जें कांहीं नवीन आहे तेही प्रशस्त आहे असें म्हणवत नाहीं. याचें कारण काय असेल तें असो. मराठी ही तर त्यांची स्वभाषा आहेच व तिचा अभ्यासही त्यांनीं केला असलाच पाहिजे. संस्कृत व इंग्लिश यांचेंही ज्ञान बरेच असावें असें म्हणणें योग्य

दिसतें. पण ग्रथमुखावरच कालिदासोक्तीचे जे श्लोकार्ध त्यांनीं उतरून घेतलें आहे त्यांत ढळढळीत चुका पुन्हां आल्या आहेत ' मणौ वज्रसमुत्कीर्णे ' हा मूळचा चरण. पण जोशीबुवांनी त्याचे स्वरूप बदलून एकदां ' मणौ वज्रसमुत्किर्णौ ' व दुसऱ्या वेळेस ' मणौ वज्रसमुत्कीर्णौ ' असें णौला णौ जमविणारें नवीन रूप दिलें आहे. आतां ही चूक त्यांची नसावी, आणि त्यांच्या पुस्तकामध्यें आणखी जशा ऱ्हस्वदीर्घानुस्वाराच्या असख्य चुका छापण्यासाठीं केल्या आहेत. त्यांतलीच ही एक असावी असे अनुमान करणें बरे इग्लिश शाळेमध्ये ते शिक्षक आहेत, त्यावरून त्यांना इग्लिश व्याकरणांतील बहुतेक नियमांचे अनुकरण करण्याची इच्छा झाली हे साहजिक आहे. परतु कित्येक ठिकाणी त्यांनीं सस्कृत व्याकरणांत अमुक अमुक प्रकरणे अशीं अशीं आहेत असे म्हटलें आहे, तें पाहून थोडासा चमत्कार वाटतो. एकदरींत पाहतां शास्त्रीय भाषाशैली आणि स्पष्टपणा यांच्या दृष्टीनें दादोबांना मुख्य स्थान देणे, किंवा जोशीबुवांच्या म्हणण्याप्रमाणें ' पहिला नबर ' देणे योग्य आहे, असेंच आम्हास वाटते ''

यानतर कांहीं वर्षांनीं **खेर** यांनीं एक व्याकरण इग्रजींत रचलें त्यांत कांहीं गोष्टींचा त्यानीं स्वतत्रपणें विचार केला आहे हें पुस्तक हायस्कुलांत विशेषत त्यावेळीं असलेल्या युनिव्हर्सिटी स्कूलफायनल परीक्षेसाठीं वाचण्यांत येत असे पण **जोश्यां**-नतर नाव घेण्याजोगा प्रयत्न सुमारें वीसबावीस वर्षांनीं झाला हा प्रयत्न म्हणजे **मोरो कृष्ण दामले** यांचे ' शास्त्रीय मराठी व्याकरण ' हा होय. **दामल्यांची** भाषाभिज्ञतेबद्दल प्रसिद्धि नाहीं किंवा व्याकरणविषयक सातआठशे पानांच्या प्रचड पुस्तकाशिवाय नांव घेण्याजोगें मराठीत त्याचें लिखाणही नाहीं ते मुबई युनिव्हर्सिटीचे एम् ए होते. त्यामुळे सस्कृत व इग्रजी भाषेंत ते चांगलेच वाकब होते, असे म्हणतां येईल. त्यांच्याविषयीं महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे आधुनिक मराठी कवींत अग्रेसर असे ' केशवसुत ' किंवा **कृष्णाजी केशव दामले** यांचे ते बधु होते. पण त्यांच्या ग्रथाचा प्रचड आकार हाच सामान्य वाचकाचे डोळे दिपवून टाकण्यास पुरेसा होता व आहे **दामल्यांनी** पूर्वींच्या सर्व वैयाकरणांचे ग्रथ काळजीपूर्वक अभ्यासिले होते असे त्यांच्या ग्रथावरून दिसून येते

आपल्या प्रस्तावनेत **गुंजीकरां**चा ते **कृष्णशास्त्री चिपळूणकरां**च्या तोडीचे निबधकार होते एवढाच त्यानीं उल्लेख केला आहे पण **गुंजीकरां**च्या निबधाचा व **दामल्यां**च्या व्याकरणाचा वरवर अभ्यास केला तरी **दामल्यांनीं** आपलीं बहुतेक महत्त्वाचीं मते **गुंजीकरां**च्या निबधांतून घेतलीं आहेत असें स्पष्ट दिसून येते त्या सबधींचे प्रत्यतर मुख्य ग्रथात त्या त्या ठिकाणीं देण्यांत येईल.

एका दृष्टीनें तर **दामले** यांचे ' शास्त्रीय मराठी व्याकरण ' हें सर्व पूर्व वैयाकरणांविरुद्ध त्यांनीं पुकारलेले एक बड होते ' शास्त्रीय ' या शब्दांतच आपणांस या बडाची मेख दिसून येतें. खरें म्हटले तर व्याकरण हें एक शास्त्र असल्यामुळें

त्यासबंधीं 'शास्त्रीय' हा शब्द योजणें हा पुनरुक्ति दोष आहे. दुसरी गोष्ट म्हणजे **दामल्यांचें** व्याकरण जर 'शास्त्रीय' तर बाकीच्या **दादोबादि** सर्व व्याकरणकारांचीं पुस्तकें अशास्त्रीय असें आपाततः ठरतें आणि ते तसें ठरलें तर **दादोबांस** 'पाणिनी' ही त्यांनीं कबूल केलेली पदवी व **गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर** इत्यादिकांची त्यांनीं केलेली स्तुति केवळ तोंडदेखली ठरते. खुद्द **दामल्यांनीं** अन्य प्रसगीं, पूर्व वैयाकरणांनीं आपलीं पुस्तके लिहितांना अनुसरलेली पद्धति, ही बहुतांशीं अशास्त्रीय आहे, यामुळेंच 'शास्त्रीय' ह्या शब्दाची योजना पुस्तकाच्या नांवांत झाली आहे, अशी स्पष्ट कबुली दिली आहे शिवाय पूर्वीच्या व्याकरणकारांचे प्रत्येक मत व प्रत्येक व्याख्या यांची कसून तपासणी करून त्यांनीं त्या खोडून काढल्या आहेत आणि म्हणून आम्हीं **दामल्यांच्या** पुस्तकास पूर्व वैयाकरणांविरुद्ध उभारलेलें बड असे म्हटले आहे

**दामल्यांनीं** पूर्व वैयाकरणावर केलेला आरोप बहुतांशीं खरा आहे **गुंजीकरांनीं** तोच आरोप **जोश्यांवर** केला होता व **दादोबांची** शैली त्या मानाने अधिक शास्त्रीय आहे एवढेच सांगितले आहे. पण शास्त्रीय हा हमखास शिक्का मारलेले **दामल्यांचें** व्याकरणही त्याच प्रमाणांत त्या दोषास पात्र झालेले आहे असे सांगितले तर अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांनीं भाषेशीं व्याकरणाचा जोडलेला अन्यथा सबंध, त्याची व्याकरणाची व्याख्या, वाक्यपृथक्करणविषयक चर्चा या सर्वांवरच अशास्त्रीयतेचा शेरा मारता येईल. सयुक्त क्रियापद, विभक्ति, वाक्यपृथक्करण यांसबधीं त्यानीं दिलेले अखेरचे निर्णय जरी बहुतांशीं किंवा अल्पांशी बरोबर असले तरी ते काढतांना त्यांनीं योजलेली विचारसरणी तर्कदुष्ट अतएव भ्रामक अशी आढळते आणि ती तशी असणे यांत नवलही नाहीं. कोणतेही शास्त्र असो, त्यासबधींचे शोध, नियम व विवेचनपद्धति ही एकसारखी बदलत असतात व्याकरणासारख्या यथादर्श (Normative) शास्त्राची गोष्ट सोडा पण विज्ञान (Physics), रसायन, वैद्यक, शिल्प यांसारख्या यथातथ (Positive) शास्त्रावर लिहिलेलीं पुस्तकें वर्षावर्षानें रद्द ठरत आहेत खुद्द **दादोबांविषयी** बोलतांना मुलगा बापाच्या खांद्यावर बसला व अशा रीतीनें त्याला अधिक दूरचे दिसले म्हणून तो बापापेक्षां शहाणा ठरत नाहीं असे **दामल्यांनी** शालीनतेने म्हटलें आहे. पण पुढे स्वमतप्रतिपादनाच्या अभिनिवेशात त्यांना यासबधीं विसर पडलेला दिसतो **जोशी, खेर** इत्यादिकांचा ज्याप्रमाणे त्यांनीं खरपूस समाचार घेतला आहे, त्याप्रमाणे **दादोबांवरही** सणसणीत ताशेरे मारावयास ते चुकले नाहींत !

**दामल्यांच्या** 'शास्त्रीय व्याकरणाचे' फारसे चीज झाले नाहीं. सर्व शालेय व्याकरणें या व्याकरणाचा अभ्यास न करतांच लिहिलीं गेलीं. खुद्द **जोश्यांच्या** नांवाखालीं खपणाऱ्या शालेय व्याकरणपुस्तकांत **जोश्यांच्या** मताचा फारसा मागमूस राहिलेला दिसत नाहीं, तेथें **दामले** यांचीं मते त्यांच्याबरोबरच धूळ खात पडलीं यांत नवल नाहीं. कांहीं काळपर्यंत त्या व्याकरणग्रथाचे पुनर्मुद्रण झालें व ते व्याकरण

बी. ए च्या व एम्. ए च्या परीक्षांत अभ्यासपुस्तक म्हणूनही नेमण्यांत आलें. पण ह्या दोन्ही परीक्षांत या विषयास बेताचेच मार्क असल्यामुळें त्यांच्याकडे कोणी ढुकूनसुद्धां पाहत नाहीं. एम् ए. च्या आठ पेपरांपैकीं एकाच पेपरांत व्याकरणाचे दोन प्रश्न येतात आणि तेही ऐच्छिक असल्यामुळे सहज डावलतां येतात जी गोष्ट कॉलेजांत तीच गोष्ट प्राथमिक शाळात व हायस्कुलांत प्राथमिक शाळेच्या अखेरच्या परीक्षेंत व मॅट्रीक परीक्षेंत ज्या मानानें मार्क ठेवलेले असतात, त्या मानानें व्याकरणाचाच नव्हे तर सर्व विषयाचा अभ्यास होतो व्याकरणास सर्वच परीक्षांत वाटाण्याच्या अक्षता मिळाल्यामुळें या विषयाची शाळांत व कॉलेजांत फार आबाळ झाली आहे त्यामुळेंच **दादोबा, गुंजीकर, जोशी, दामले** वगैरे पूर्व वैयाकरणांचे श्रम अगदीं वाया गेलेले दिसतात. आमच्या मते या विषयास जरी एक सबध पेपर देतां आला नाहीं तरी पूर्वोक्त प्रत्येक परीक्षेत निदान निम्मे म्हणजे पन्नास मार्क या विषयाच्या वाटयांस आले पाहिजेत तरच या विषयाची धडगत आहे हे थोडे विषयांतर झालें

**दामल्यां**नतर व्याकरणविषयक ग्रथ लिहिण्याचा हा प्रयत्न पचवीस तीस वर्षांनीं म्हणजे मागचेच अन्तर ठेवून होत आहे. पूर्व व्याकरणकार **दादोबा** व **जोशी** यांच्याप्रमाणें आम्हींही शालेय व्याकरणाचीं पुस्तकें लिहिलीं मात्र त्यांनीं आपलीं मोठीं व्याकरणें आधीं लिहून मागाहून आपलीं शालेय छोटीं व्याकरण पुस्तकें लिहिलीं. आम्हीं आमचें शालेय पुस्तक मराठी तिसऱ्या इयत्तेसाठीं १९२९ त लिहिले व त्यानतर दोनतीन वर्षांत आणखी चार पुस्तकें लिहून ती मालिका १९३२ त पुरी केली. हीं पुस्तके लिहितांना आम्हीं व्याकरणाचा शास्त्र या दृष्टीने विचारच केला नाहीं कारण व्याकरण कमिटीनें तसा स्वतत्र विचार करण्यास सवडच ठेवली नव्हती. त्यावेळीं आमचा सारा भर पद्धतीवर होता. व्याकरणविषयक तत्वाचा हवाला व्याकरणकमिटीनें घेतल्यामुळें **दादोबा, जोशी, दामले,** यांचीच परपरा त्यांनीं चालविली आहे असें समजून चालणें भाग पडलें. **दादोबा, जोशी** यांचीं व्याकरण पुस्तकें पूर्वकाळीं आम्हीं वरवर वाचलीं. आमच्या 'मुलाचे व्याकरण' मालिकेंतील पांचवे पुस्तक रचतांना **गोडबोल्यांच्या** व्याकरणाचें आम्हीं बारकाईनें अध्ययन केलें. विशेषत' सधि वगैरे प्रकरणांत उदाहरणें देण्यांत या व्याकरणाचा आम्हांला चांगलाच उपयोग झाला.

तथापी मराठी व्याकरणाचा किंवा सामान्यतः सशास्त्र विचार करण्याची सधि पुढें पंधरा वर्षेपर्यंत आली नाहीं गेल्या दोनतीन वर्षांत एका विद्यार्थिनीबरोबर एम्. ए. च्या परीक्षेच्या इतर पेपरांच्या पुस्तकांबरोबरच त्या परिक्षांसाठीं नेमलेल्या व्याकरणपुस्तकाचा मदतीदाखल अभ्यास करण्याचा योग आला या परीक्षेस **दामल्यांचें** व्याकरण नेमलें आहे, पण प्राध्यापक किंवा विद्यार्थी यांपैकीं कोणीही हें पुस्तक अभ्यासण्याचीच नव्हे तर वाचण्याचीही तसदी घेत नाहींत असें दिसून आलें व म्हणून **दामल्यांचें** व्याकरण अभ्यासण्याचें ठरविलें व तो विचार अमलांतही आणला.

पण त्यावरून वर सांगितल्याप्रमाणे **दामल्यांनीं** 'शास्त्रीय' म्हटलेलें आपलें व्याकरणही अशास्त्रीयच अशी प्रतीति दिवसेंदिवस होऊं लागली व **दामल्यांच्याच** दिशेनें म्हणजे शास्त्रोक्त उच्चतर ( Higher ) व्याकरण लिहिण्याचा आणखी एक प्रयत्न करावा असें वाटूं लागले तितक्यांतच **गुंजीकरांचें** समग्र लिखाण विशेषतः व्याकरणविषयक लिखाण छापून प्रसिद्ध झाल्यामुळें पूर्व व्याकरणकारांविषयीं व व्याकरण पुस्तकांविषयीं बरीचशी सामग्री उपलब्ध झाली. नवीन व्याकरण रचावयाचें तर ज्यांत व्याकरणाची अद्यथावत् चर्चा आहे अशा व्याकरण ग्रथाचा अभ्यास करणे चांगलें. म्हणून सुप्रसिद्ध पाश्चात्य व्याकरणतत्त्वज्ञ **ऑटो जेस्पर्सन** याच्या "Philosophy of Grammar" या ग्रथाच्या कांहीं भागांवर नजर टाकावी लागली. इतके झाले तरी **दामल्यांनीं** आपल्या पुस्तकाच्या उपोद्घातांत चर्चिलेल्या मुख्य प्रश्नांचाच विचार आम्हासही करावयाचा असल्यामुळें ते प्रश्नच क्रमशः हातीं घेणे प्राप्त आहे

पहिला महत्त्वाचा प्रश्न म्हणजे व्याकरणाची व्याख्या. ही व्याख्या **दामल्यांनीं** व्याकरण हे भाषेचें शास्त्र आहे अशी केली आहे. पण भाषेचीं अनेक शास्त्रे आहेत. त्यांतलीं कांहीं व्यापक दृष्टीने भाषेचीं तर कांहीं वाक्य, शब्द यांचीं शास्त्रें असल्यामुळें त्याना केवळ पर्यायानें भाषाशास्त्र असें म्हणतां येईल. एकदरींत पाहिले तर "मनुष्य हा एक प्राणी आहे" ही मनुष्याची व्याख्या जशी अतिव्याप्त, तशीच 'व्याकरण हें भाषेचे शास्त्र आहे' ही व्याख्याही अतिव्याप्त आहे हें सहज लक्षांत येईल. पण 'भाषा' हा शब्द 'सामान्यजाति' ( Genera ) आहे. ज्याची 'व्याकरण' हा शब्द एक विशेषजाति ( Species )–दर्शविणारा आहे. ह्या दृष्टीने तो शब्द व्याख्येंत येणें अपरिहार्य आहे असें त्यांना वाटले, तर तो शब्द व्याख्येत घालून मागाहून त्याचे स्पष्टीकरण करण्यास हरकत नव्हती. पण तसें न करतां **गोडबोल्यांचें** अनुकरण करून **दामल्यांनीं** प्रारभीं भाषेचीच मीमांसा करण्यास सुरुवात केली आहे. अशा रीतीनें भाषेच्या व्याख्येने व विवेचनाने ग्रथास सुरुवात करणें म्हणजे तो सामान्यतः भाषेची सामान्यतः चर्चा करणारा ग्रथ आहे असें होते. पण हा ग्रथ धडधडीत व्याकरणविषयक आहे व व्याकरण हें भाषेच्या अनेक शास्त्रांपैकीं एक शास्त्र आहे. भाषेंत वाक्यें असतात. त्यांतील शब्दाचींही कोश, व्युत्पत्ति इत्यादि व्याकरणाशिवाय दुसरीं शास्त्रें आहेत. यावरून भाषाशास्त्र हें किती व्यापक आहे व व्याकरण हें त्या मानानें किती मर्यादित आहे तें दिसून येईल म्हणूनच भाषेसबधीं आरभीं त्यांनीं केलेली चर्चा अप्रस्तुत व अशास्त्रीय अशी आहे हें सहज पटेल.

भाषेची **दामल्यांनीं** केलेली व्याख्याही व्याकरणाच्या दृष्टीनेंच नव्हे तर व्युत्पत्ति वगैरे शास्त्राच्या दृष्टीनेंही समर्पक अशी नाहीं. भाषा म्हणजे मनुष्याचें मनांतील विचार करण्याचें साधन अशा अर्थाची व्याख्या त्यांनीं केली आहे. पण ही

भाषेची साधनात्मक व्याख्या व्याकरणविषयक किंवा व्युत्पत्तीविषयक चर्चेस अप्रस्तुतच आहे. व्याकरण कोणत्या तरी शब्दांची जात, विकारीरूप, वाक्यांतील शब्दांचा परस्परांशीं सबध इत्यादिकांविषयीं सांगतें. व्युत्पत्तिशास्त्रांत शब्द उत्पन्न कसे झाले याविषयींची चर्चा असते यांचा मनांतील विचार प्रकट करण्याशीं सबंध काय? असलाच तर अगदीं दूरचा व अन्यथा सिद्ध असा आहे. व्याकरणास सोयीची अशी भाषेची व्याख्या करावयाची म्हणजे जींत 'शब्द' असतात ती "भाषा" अशी साध्या शब्दांत करता येईल याहूनही प्रौढ व भारदस्त अशी व्याख्या हवी असल्यास "कोणत्याही प्रदेशांत व काळांत उपलब्ध असलेले लिखित वा अलिखित वाङमय." अशी करतां येईल कारण वाङ्मय हे शब्दांचे व वाक्याचे बनलेले असते व शब्द आणि वाक्य हीच व्याकरणादि भाषाविषयक शास्त्रास विषयभूत आहेत

**गोडबोल्यांचें** अनुकरण करून त्यानी भाषेचे जे अनेक प्रकार केले आहेत तेही अशास्त्रीय व तर्कदुष्ट आहेत हावभाव, चेहरा, खुणा इत्यादींस भाषा असे केवळ लाक्षणिक अर्थानेच म्हणता येईल. हातानीं, डोळ्यानीं वगैरे केलेल्या खुणा, तसेच शब्द असे ज्याना म्हणतात त्याच्याशिवाय तोंडाने व इतर पदार्थांच्या द्वारें केलेले आवाज यांनाही भाषा तशाच म्हणजे लाक्षणिक अर्थाने म्हणता येईल हावभाव, चेहरा, हसणे, रडणें, इत्यादि प्रकार स्वाभाविकपणे व अस्वाभाविकपणे माणसाकडून होतात. अर्थात् ह्या सर्व गोष्टी मानसशास्त्राच्या कक्षेतील आहेत भाषेचे कार्य माणसाकडून स्वाधीनपणें होते खुणा ह्या माणसाप्रमाणें पशु पक्ष्यादिकानाही योजतां येतात व त्यामध्ये स्वाभाविकपणे असलेला सकेतही असतो मात्र या सकेताचे कारण जी हेतुप्रेरणा ( Motivation ) ती पशुपक्ष्यादि तिरश्चात माणसाच्या मानाने कितीतरी पटीने कमी प्रमाणांत आढळून येते. अर्थात् अगदीं स्वाधीनपणे, सहेतुकपणे व सकेताचे ग्रहण होईल अशा शब्दांच्या खुणा केवळ माणसालाच करता येतात त्या शक्तीला **वाणी** किंवा **वैखरी** असें म्हणतात या शब्दांच्या असख्य खुणा करतां याव्या अशी तजवीज माणसाच्या कठात झाली आहे तेव्हां अशा शब्दाच्या खुणांनीं बनलेले जे मनांतील अभिप्राय करण्याचे साधन त्यालाच 'भाषा' असे म्हणतां येईल. यावरून हावभाव, चेहरा इत्यादिकांस भाषा असे का म्हणतां येत नाहीं हें स्पष्ट होईल. दुसरी गोष्ट अशी कीं सध्यां आपण भाषेची चर्चा व्याकरणाच्या दृष्टीने करीत आहो तेव्हां व्याकरणक्षम होणें हें भाषेचे एक महत्त्वाचे लक्षण आहे हें कोणीही कबूल करील. हावभाव, चेहरा व हात, डोळे व आवाज यांच्या द्वारें केलेल्या खुणा यांच्यामध्ये त्या लक्षणाचा पूर्णपणें अभाव आहे. अर्थात् त्या भाषाच नव्हेत.

भाषेचा व व्याकरणाचा कांहीं सबध आहे काय? असलाच तर तो कोणत्या प्रकारचा सबध आहे? आधीं भाषा कीं आधीं व्याकरण? अशा तऱ्हेचे प्रश्न कांहीं वैयाकरणांनीं उपस्थित केले आहेत. व्याकरणाचा भाषेशीं काय सबध आहे, ते आपण

पूर्वी पाहिलेंच आहे. भाषेच्या अनेक शास्त्रांपैकीं तें एक शास्त्र आहे. या दृष्टीने भाषेचा कांहीं विवक्षित बाबतीत विचार करून नियम बसविण्याचे व्याकरणाचे कार्य असल्यामुळें भाषा आधीं की व्याकरण आधीं असा पौर्वापर्याचा प्रश्न अगदीं नेमकाच सभवत नसला तरी एकीकडे भाषा व दुसरीकडे तिच्यांतील शब्दांसबधीं कांहीं ठराविक बाबतींत नियम बसविणारे व्याकरण या दोन गोष्टी सहज अभिप्रेत आहेत. यावेळीं भाषा म्हणजे काय ? कोणत्या स्वरूपांत भाषेला 'भाषा' हे नांव निदान व्याकरणाच्या दृष्टीने देणे योग्य आहे ते पाहिले पाहिजे. यासबधीं **जेस्पर्सननें** आपल्या 'फिलासफी ऑफ ग्रामर' ह्या पुस्तकात 'उक्त' व 'लिखित' भाषेसबधीं आरभींच जे विचार प्रदर्शित केले आहेत, त्याचा परामर्श घेणे अपरिहार्य आहे **जेस्पर्सन** आपल्या पुस्तकाची पुढीलप्रमाणें सुरुवात करतो:

"The essence of language is human activity—activity on the part of one individual to make himself understood by another and the activity on the part of the other to know what was in the mind of the first These two individuals the producer and the recipient of language or as we may more conveniently call them the speaker and the hearer and their relations to one another should never be lost sight of if we want to understand the nature of language and that part of language which is dealt with in Grammar" यानतर थोडेसें विवेचन करून **जेस्पर्सननें** पुढील निष्कर्ष काढला आहे "At any rate we shall never be able to understand what language is and how it develops if we do not continually take into consideration first and foremost the activity of speaking and hearing and if we forget for a moment that writing is only a substitute for speaking. A written word is mumified until some one imparts life to it."

ही **जेस्पर्सनचीं** विधानें व निष्कर्ष मूलतःच विवाद्य व चिंत्य अशीं आहेत व त्यांचा परामर्श एका स्वतत्र परिच्छेदांत घेणे जरुरीचें आहे.

येथें पहिल्याने निक्षून सांगितले पाहिजे कीं बोलणे व ते कोणी तरी ऐकणें हा भाषेचा अगदीं आरभींचा भाग आहे असे कबूल केले, तरी ते भाषेचें सारभूत तत्त्व (Essence) आहे हें कोणीही कबूल करणार नाहीं. मनांतील साध्या कल्पना आरभीं खुणांनीं सांगितल्या जात व एकादा दुसरा शब्दच उपयोगांत येई. बोलण्याला

**भाषा** हें नांव सार्थ होणें हें अर्थातच खुणांची संख्या कमी होऊन शब्दांची संख्या जशी जशी वाढत जाईल त्यावर अवलबून असते. ही शब्दसंख्या वाढावयाची असल्यास तर कल्पनांची व विचारांची व्याप्तिही वाढली पाहिजे म्हणजे नित्य व्यवहारास जरूर त्या कल्पनांपेक्षा अधिक कल्पना व विचार यांची पैदास झाला पाहिजे. हे विचार व कल्पना माणूस इतरांशीं बोलून व ऐकूनच करतो असें नाहीं, तर स्वतःशींच मनन निदिध्यसन करून त्या बनवितो व त्या कल्पना शब्द रूपात कायमच्या राहाव्या म्हणून ते लिहिण्याचा खटाटोप करतो लिहिण्याची कला यासाठीच जन्माला येते व त्यामुळे वाङ्मयाची अनेक अगानीं वढ होऊन भाषेला **भाषा** हे नाव पूर्णत्वाने सार्थ होते यावरून रानटी लोकांच्या बोलींत जरी बोलणाराला व ऐकणाराला महत्त्व आहे तरी बोली जसजशी भाषा होत जाते, तसतसे तिच्यातील लिखित म्हणजे कोशात व वाङ्मयाच्या विविध शाखात संग्रहित झालेल्या शब्दाना अधिक महत्त्व येते शिवाय अगदीं आरभींच्या काळात व आजच्या काळात रानटी लोकात प्रचलित असलेली भाषा कोणी तरी लिखित शब्दात संग्रहित केल्याशिवाय किंवा **जेस्पर्सन** सागतो त्याप्रमाणे ममिफाय् करयाशिवाय गत्यतरच नसते. यामुळेच भाषा तिच्या परिपूर्ण स्वरूपात असताना बोलण्या-ऐकण्याचे महत्त्व जवळ जवळ नाहीसे होऊन तिच्या लिखित स्वरूपालाच पूर्णपणे प्राधान्य येते, ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

पण भाषेच्या बोलण्याऐकण्याच्या बाजूला व्युत्पत्तिशास्त्रासारख्या शास्त्रामध्ये बरेंचसें महत्त्व असते असे कबूल केले, तरी व्याकरणाच्या दृष्टीने **जेस्पर्सन** म्हणतो तसें महत्त्व येण्याचे मुळींच कारण नाहीं भाषा आरभी बोलीच्या स्वरूपात असते. तेव्हां कदाचित् त्या काळीं तींत सर्वच वस्तुदर्शक शब्द म्हणजे नाम शब्दच असणे शक्य आहे कारण कृतिविषयक भाग प्रत्यक्षत कृतीने किंवा कृतीच्या खुणानी दाखविणे सोपे असते वस्तू पुढ्यात असतांना खुणेने दाखविता येते पण अपरोक्षी केलेल्या खुणा तेवढ्याशा उपयोगी पडत नाहींत व म्हणूनच शब्द वापरावे लागतात फार तर आरभी वस्तुदर्शक व क्रियादर्शक एवढ्याच खुणा सारख्याच किंवा कमजास्त प्रमाणात होत्या असे म्हणतां येईल वस्तूच्या खुणेसही प्रथम माणसाच्या नांवानेच सुरुवात होण्याचा संभव जास्त कारण येथे प्रत्यक्ष पुढ्यात असलेल्या माणसाला 'ये' 'जा' 'खा' 'बस' या प्राथमिक क्रिया खुणांनींच दाखविण्यांत येत. बराच काळ झाल्यावर वस्तू व क्रिया दर्शक शब्दांची योजना होऊन साध्या वाक्याचा जन्म झाला वस्तू व क्रिया यांच्यासबधी माहिती सांगणारे विशेषण व क्रियाविशेषण हे शब्द मागाहून बऱ्याच काळानें येतात. शब्दयोगी, उभयान्वयी हे शब्दाला जोडून येणारे व वाक्यें जोडणारे शब्द त्याहीमागून भाषेंत येतात. या वेळी भाषा लिखित स्वरूपांत आलेली असते वाक्यांत येण्यास योग्य ते विकरण त्यानतर होते. व्याकरणाचा प्राकृतिक भाग तर अगदीं शेवटचा. तो व्याकरण, व्युत्पत्ति, उच्चार वगैरे शास्त्रानतर तयार होतो अशा स्थितीत ऐकणाराला व बोलणाराला किंवा उक्त भाषेला लिखित भाषेपेक्षां व्याकरण दृष्ट्या तरी महत्त्व येणें शक्य नाहीं:

इतकेंच नव्हे, तर भाषा केवळ बोलण्या–ऐकण्याच्या स्थितींत असली, तर तिचे खरेंखुरें व्याकरणच असणें शक्य नाहीं. किंबहुना तिला भाषा हें नांवही देतां येणार नाहीं. पूर्वकालीन भाषेची गोष्ट बाजूला ठेवली, तरी प्रचलित भाषेच्या दृष्टीने विचार केला असतांही व्याकरणाच्या दृष्टीने बोललेल्या भाषेपेक्षां लिहिलेल्या भाषेला, पद्यापेक्षा गद्याला व काव्य नाटकादि कलात्मक वाङ्मयात योजलेल्या भाषेपेक्षा इतिहास, तत्त्वज्ञान, शास्त्र इत्यादि वाङ्मयातील भाषेला अधिक महत्त्व असतें.

व्याकरण आधीं कीं भाषा आधीं या प्रश्नाचा विचार ऐतिहासिक दृष्ट्या करता येईल पण तो करताना भाषा म्हणजे काय तेही पाहिले पाहिजे ज्याप्रमाणे झरा किंवा ओहोळ हीं एखाद्या नदीचीं प्रारंभींचीं स्वरूपे असल्यामुळें साकल्याने त्यांनाही त्या नदीच नाव देता येईल आणि दुसऱ्या अर्थानें त्याना नदी असे म्हणता येणार नाहीं, त्याप्रमाणेच अगदी आरंभीं बोलीच्या स्वरूपात असून पुढे शब्दसंग्रह, सारस्वत इत्यादिकांची वृद्धि व व्याकरणाचे नियमन यांच्या योगाने ती भाषा हा भारदस्त सज्ञेस पात्र होते म्हणूनच एका अगदीं महत्त्वाच्या अर्थानें व्याकरण हे आधीं व मग अभिजात स्वरूपात भाषा असाच निर्णय द्यावा लागतो. यासबंधीं फलसवर्धन शास्त्रातूनही ( Horticulture ) एक दृष्टांत देता येईल. आंब्याचे झाड आधीं कीं कोय आधी याचा निर्णय करतां येणार नाहीं. पण कलमी आंबे बांधणे व सर्वसाधारणत फलसंवर्धनशास्त्राचा विकास ह्या गोष्टींनतर आधीं कलमी आंबा व फलसवर्धनशास्त्र आधी व नतर कलमी आंब्यासारखीं उत्तम फळे असे निश्चितपणे सागतां येईल व्याकरण व भाषा ह्याचा सबंध असाच आहे.

आपल्याकडे वेदकालात व्याकरण हें एक मुख्य वेदांग होते ह्यासंबधीं पुढील श्लोक विचार करण्यासारखा आहे "छंद: पादौतु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते। जोतिषामयन चक्षुर्निरुक्त श्रोत्रमुच्यते। शिक्षा घ्राणतु वेदस्य मुख व्याकरण स्मृतम्। तस्मात् सांगमधित्येव ब्रह्मलोके महीयते।" यावरून व्याकरणाचा हेतु सर्वस्वीं धार्मिक होता हें दिसून येते. वृत्रासुराच्या आख्यायिकेवरूनही हीच गोष्ट सिद्ध होते वृत्रासुराच्या बापाला इंद्राला मारणारा ( इंद्रशत्रु ) असा पुत्र पाहिजे होता पण यज्ञप्रसगीं इंद्रशत्रु असे म्हणून आहुति दिल्यामुळें इंद्र ज्याला मारील असा अर्थ होऊन तसा मुलगा झाला इंद्रशत्रु हा तत्पुरुष समास व इंद्रशत्रु हा बहुव्रीहि समास असे आरंभीं जरी होते, तरी पुढें पाणिनीय व्याकरणाची रचना झाल्यावर स्वराघाताचे महत्त्व नाहींसे झाले संस्कृत भाषेप्रमाणेंच ग्रीक व लॅटिन ह्या भाषांस व इंग्रजी, फ्रेंच वगैरे भाषांस त्याचे प्राथमिक स्वरूप धर्मदृष्ट्याच आलें, पण अखेरचे पूर्ण स्वरूप उत्कृष्ट व्याकरण–रचनेमुळेच आले सारांश, बोली ही व्याकरणापूर्वी असली, तरी खरी भाषा व्याकरणानतरच विकसित होते व व्याकरण हें तिच्या सुसगत विकासास कारणीभूत होते. पण ह्याचा भाषा कोणाला ही शुद्ध बोलतां किंवा लिहितां येण्याकडे काहीं संबध नाहीं. हेही येथे सांगितले पाहिजे.

इंग्रजी भाषेचें व्याकरण तर जॉनसननें लॅटिनला धरून लिहिले प्रथम इंग्रजी

भाषा सुधारण्यास त्याचा उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या भाषेशीं त्याचा फारसा संबंधच नव्हता. पुढे **लिंडसे मरे** यानें आपलें. शास्त्रोक्त इंग्रजी व्याकरण इ. स. १७९५ त लिहिलें त्याच्या व्याकरणावरून **दादोबांनीं** आपल्या व्याकरणास सुरवात केली त्यानंतर अनेक व्याकरणें झाली व त्यामुळें व्याकरणाप्रमाणें भाषेतही प्रगति झाली.

भाषेच्या विवेचनाचा व व्याख्येचा खटाटोप करून **गोडबोल्यांना** व **दामल्यांना** भाषेच्याच द्वारें यानंतर एक व्याकरणाची व्याख्या करावयाची होती. **दादोबा**प्रभृति इतर व्याकरणकारांनींही आपल्या व्याख्या अशाच भाषेच्या द्वारें केलेल्या आहेत. पण त्यांनीं भाषेची व्याख्या करण्याचा द्राविडी प्राणायाम केला नाहीं **गुंजीकरांच्या** मतें पूर्व वैयाकरणांनीं केलेल्या सर्व व्याख्या इंग्रजींत व्याकरण या अर्थी जो 'ग्रॅमर' शब्द त्याच्या व्युत्पत्तीस अनुसरून केल्या आहेत. **गुंजीकर** 'ग्रॅमर' या शब्दाची व्युत्पत्ति 'ग्रामा' म्हणजे अक्षर किंवा लिहिणें यावरून 'ग्रामर' म्हणजे लिहिण्याची किंवा तत्संबधीं बोलण्याची विद्या अशी करतात याप्रमाणें पहिली व्याख्या **बाळशास्त्री जांभेकर** यानीं व्याकरण म्हणजे 'शुद्ध रितीने बोलणे व लिहिणे याची विद्या' अशी केली. ही व्याख्या **बाळशास्त्री** यांनीं **गुंजीकरांनीं** म्हटल्याप्रमाणे ग्रॅमर या शब्दाच्या व्युत्पत्तीवर आधारलेली आहे. **दादोबांनीं** आपल्या लघुव्याकरणांत दिलेली 'शुद्ध कसे बोलावें आणि शुद्ध कसे लिहावे, तसेंच हे शुद्ध कां व ते अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्यानें समजते' ही व्याख्या **बाळशास्त्र्यांच्या** व्याख्येची एक जरा मोठी पुनरावृत्ति आहे. या दोन्ही व्याकरणांत व्याकरणाच्या तात्त्विक बाजूपेक्षां व्यावहारिक किंवा उपयोगी बाजूवरच भर दिलेला दिसतो. **दादोबांची** शब्दयोजनाच अशी आहे कीं, ते व्याख्या करीत नसून व्याकरणाचा उपयोगच सांगत आहेत असा भास होतो. तसा व्याकरणाचा खराच उपयोग आहे की काय ? हें आपण त्या व्याख्येची जरा बारकाईने छाननी करून पाहू

प्रथम व्याकरण शिकल्यानें शुद्ध बोलतां येते ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध होत नाहीं सामान्य मनुष्याची तर गोष्ट सोडा, पण मराठी भाषेच्या व्याकरणाचा उत्तम अभ्यास करून त्यासबंधीं ग्रंथरचना करणाऱ्या इंग्रज, फ्रेंच व जर्मन विद्वानांना धड मराठी बोलता येत नव्हते ही गोष्ट केकाच्या अनुभवाची आहे. हेच संस्कृतादि प्रचारांत नसलेल्या गीर्वाण किंवा अभिजात भाषांच्या व परभाषाच्या अभ्यासकांविषयीं म्हणतां येईल डॉ. **भांडारकरांसारखे** त्रिखंड संस्कृत भाषापंडित संस्कृत व्याकरणांत पूर्ण पारंगत असतांही त्यांना त्या भाषेत चांगलेसे बोलतां येत नव्हते. उलट पक्षीं संस्कृत व्याकरणाच्या अभ्यासाविषयीं अळंटळ करणारे त्यांचे एक विख्यात शिष्य **दादासाहेब खापर्डे** हे संस्कृतांत व ज्या भाषांच्या व्याकरणाचा त्यांना गंधही नव्हता अशा हिंदी, गुजराती वगैरे भाषांत प्रचारशुद्ध व अस्खलित बोलत असत. सामान्य जनाच्या दृष्टीनें पाहिलें तरी पुणें, अहमदाबाद, हैद्राबाद ( सिंध ) इत्यादि

मराठी, गुजराती, कानडी, सिंधी वगैरे भाषांच्या केंद्रस्थानांत राहणारे अशिक्षित व व्याकरणाचा लवलेशही नसलेले मजूरसुद्धां त्या भाषेच्या विकृत बोली बोलल्या जाणाऱ्या अपरांत भागांतील विद्वान व्याकरणज्ञांपेक्षां अधिक प्रचारशुद्ध अशा रितीने बोलतात परभाषेप्रमाणेच दूर झालेली स्वभाषा चांगली व शुद्ध बोलतां येणें ही एक प्रवणता ( Aptitude ) आहे एकीकडे निव्वळ कोकणी वगैरे बोली बोलणाऱ्या बायका व मुले हीं मराठीच्या केंद्रस्थानात थोडा वेळ राहिल्यानतर ती भाषा, स्वर व प्रचारशुद्ध बोलण्यांत जे नैपुण्य मिळवितात ते पाहिले व दुसरीकडे आपण भाषेच्या पाठ केलेल्या नियमांप्रमाणे काही चुकत तर नाहीं ना, अशा भितीनें पदोपदीं बाचरणाऱ्या व्याकरणजडाची बोलतांना होणारी तिरपीट पाहिली, म्हणजे भाषा बोलण्यास व्याकरणाच्या अभ्यासापेक्षां एका विशिष्ट प्रकारच्या प्रावण्याचीच अधिक जरूरी असते या म्हणण्याची सत्यता चागली पटेल

भाषा शुद्ध व चांगली लिहिता येणें हें ‘ गातां गळा व लिहिता हातवळा ’ या म्हणीप्रमाणे एक प्रकारचें निव्वळ सरावाने सुधारणारें कसब, कारागिरी किंवा कला आहे अशा कसबांत निव्वळ पढीक ज्ञानाचा फारसा उपयोग होत नाहीं केवळ शाळेंतील एका परिच्छेदाच्या शुद्धलेखनात ‘ बरोबर ’ येणारीं मुलें थोडी असतात. मग परीक्षेच्या नगाऱ्याच्या घाईंत शुद्धलेखनाच्या नियमांकडे कोण लक्ष देतो ? केवळ विमनस्कतेच्या दोषामुळें लिहिण्यात चुका होतात अगदीं जातिवत अस्सल विमनस्क जन्मण्याचे प्रखर दुर्भाग्य प्रस्तुत लेखकाचें आहे ! यामुळें विद्यालयांतील सर्वच परीक्षांत बराच भूर्दंड द्यावा लागला. अजूनही हीं पुस्तकें लिहिण्याच्या निमित्तानेच का होईना व्याकरणाचा अभ्यास बराच झाला असतां, पांचदहा वाक्यें लिहिली असतां त्यांत तितक्याच चुका होण्याचे टळत नाहीं ! सारांश शुद्ध बोलण्याप्रमाणेंच शुद्ध लिहिण्याचा व्याकरणाशीं काहींच सबंध नाहीं. मात्र शुद्धलेखनाची कला छापी पुस्तकांतील शब्दांचे ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार, विराम इत्यादिकांचे निरीक्षण करून लेखनाचा सराव ठेवला, तर सहज साध्य करतां येते प्रबधन म्हणजे विचार व कल्पना यानी युक्त असा मजकूर जुळवून लेखन करणें ही गोष्ट वेगळी. येथें मुळची स्वतत्र प्रतिभाशक्ति लागते पण अशा लेखनालासुद्धा व्याकरणाची मुळींच मदत लागत नाहीं हें सांगितलें तर आश्चर्य वाटेल. पण ती गोष्ट मात्र खरी आहे याला प्रत्यक्ष प्रत्यतर म्हणजे एकाद्या प्रबधनकाराला व्याकरणाविषयी कांहींही माहिती नसेल. ( शाळा सुटली म्हणजे सर्वांचेच व्याकरण व इतर सर्व विषयांचें ज्ञान नाहींसे होतें ) पण तो प्रबधनकार्य आपल्या प्रतिभेच्या मगदुराप्रमाणे चांगलें करूं शकेल. पण व्याकरणाचे नियम चागलेच घोकून काढले आहेत व त्यांना अनुसरून व्याकरणही उत्तम चालवितां येतें असे असले तरी हा विषय शिकवणाऱ्याला प्रतिभादेवीची अवकृपा असली तर साधा प्रबधसुद्धां रचतां येणार नाहीं. यावरून शुद्धलेखनाचा काय किंवा प्रबधलेखनाचा काय, व्याकरणाशीं तादृश संबध नाहीं असें स्पष्ट दिसून येतें.

आतां, **दादोबांच्या** व्याख्येचा दुसरा भाग जो ' तसेंच हें शुद्ध का व तें अशुद्ध का ?' यासंबधीं विचार करूं. येथें प्रथम कोणतें शुद्ध व कोणतें अशुद्ध बोलणें यासंबंधीचा पहिला प्रश्न आहे. शुद्ध बोलण्याचा व्याकरणाशीं मुळींच संबंध नाहीं. त्या त्या प्रदेशांतील शिष्टसंप्रदायाप्रमाणे शुद्धाशुद्धाचा निर्णय होतो. लिहिण्यांतही पद्यापेक्षा गद्यांत व गद्यांतसुद्धां वर्तमानपत्री व व्यावहारिक लिखाणांत व्याकरणाची फारशी कदर ठेवलेली दिसत नाहीं.

हा प्रश्न जसा त्या वेळीं होता तसाच पण अन्य स्वरूपांत आजही आहे. **गुंजीकरांचा** या प्रश्नासंबधाने पुढीलप्रमाणें अभिप्राय आहे. " सांप्रत काळीं ' शुद्ध कसें बोलावें आणि शुद्ध कसें लिहावें तसेंच हें शुद्ध का व हें अशुद्ध का हें व्याकरण शिकल्याने समजतें. ' अशा व्याख्येनें विद्यार्थ्यांचें समाधान होणार नाहीं, हें उघड दिसेल. कारण शुद्ध म्हणजे काय व अशुद्ध म्हणजे काय हेंच त्यांना कळत नाहीं. कित्येक म्हणतात की व्याकरणाप्रमाणे आहे तें शुद्ध आणि त्यापासून वेगळें तें अशुद्ध. कित्येक व्याकरणकारही ह्याविषयीं चमत्कारिक मताचे आहेत. तें लाडवास, लाटवाला इत्यादि रूपें प्रचारांत आहेत खरीं, पण व्याकरणदृष्ट्या लाड्वास, लाडवाला इत्यादि रूपें शुद्ध होत. अशा प्रकारचे विचार लिहून शिकणाराला भ्रांतींत टाकतात. यामुळें प्रचार खरा की व्याकरण खरें याचा विचार करतां करतां शिकणाराला वाटूं लागतें कीं, प्रचारापेक्षा व्याकरण शुद्ध खरें. सर्वांना मान्य जी भाषा ती शुद्ध, बाकीची अशुद्ध, याशिवाय शुद्ध आणि अशुद्ध चांगली आणि वाईट असें म्हणण्यास दुसरा कांहीं आधार नाहीं. एकाच भाषेतील निरनिराळे प्रकार त्या त्या लोकांच्या कर्माजारत वजनाप्रमाणें कालांतरानें शुद्ध किंवा अशुद्ध ठरण्याचा संभव आहे. अशा ठरलेल्या भाषेत जे नियम दिसतील, ते लिहून ठेविले असतां त्या पुस्तकास व्याकरण म्हणतात. सारांश व्याकरणदृष्ट्या अमुक प्रचार शुद्ध व अमुक प्रचार अशुद्ध असें म्हणण्याचा व्याकरणकर्त्यास अधिकार नाहीं." त्या त्या कालांतील व भाषेतील वजनदार किंवा शिष्ट माणसांच्या अनुमतीनेच शुद्ध-अशुद्ध ठरतें. व्याकरणकार फार तर व्याकरणाच्या दृष्टीनें तें शुद्ध किंवा अशुद्ध एवढेंच सांगूं शकतील. ' आणि ' च्या ठिकाणीं ' ना ' ' अन् ' घालण्याचे प्रयत्न विद्वानांनी कितीही धडपड केली तरी शिष्टसंमत होण्याच्या मार्गास लागले आहेत. कांहीं प्रयोग बोलभाषेंत स्थलपरत्वें शिष्ट समजले जातात. उदा० देशावरील मंडळी ' जावा ' ' कर्तानी ' यासारखे प्रयोग बोलतांना करतात. त्यांना त्यासंबधीं कोणी दोष देत नाहीं. पण लिहून त्या दोषास ते आपणास पात्र करून घेत नाहींत. काल दृष्ट्या पाहिलें तरीही दादोबांच्या कालांत ' मी ' हें सर्वनाम ' म्यां ' असें वापरीत असत. **दादोबांनीं** त्याच्या तृतीयांत रूपावर एक अनुस्वारही दिला होता. आज तें कुणबाऊ भाषेत वापरण्यांत येतें. वऱ्हाडांत प्राध्यापक **कोलत्यांनीं** याच रूपाचें ' मीनें ' असें रूपांतर करून प्रांतिक अभिनिवेशानें तेंच प्रचलित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचें शिष्टत्व अखिल महाराष्ट्रास पटलें तर तेंही रूप

बोलभाषेंत समाविष्ट होईल. मध्यतरीं लिंग, वचन, पुरुष, प्रयोग इत्यादींच्या व्याकरण-विषयक मागण्या धाब्यावर बसवून अनुस्वाराचें उच्चाटन करावें, 'अ' ची बाराखडी बदलावी किंवा जोडाक्षराची मोडतोड करावी, केवळ धर्मद्वेषानें आरबी, फारसी शब्दांना बहिष्कार घालावा, असे शिष्ट तऱ्हाचे घाट फसलेच आहेत. **गुंजीकरांनीं** व **दामल्यांनीं** कोणत्याच व्याकरणकारास अधिकार नाहीं असें म्हटलें आहे. तें मात्र मुळींच खरें नाहीं. शिष्टांच्या वजनाचें त्यानींच घालून दिलेलें प्रमाण अंगिकारलें तर धर्म, पंथ, जाती, प्रांत किंवा देश इत्यादि अभिनिवेशानीं पछाडलेल्या शिष्टापेक्षा भाषा शास्त्राच्या-आणि व्याकरण हें एक भाषाशास्त्र आहे-अध्ययनानें अधिकारयुक्त अशा वैयाकरण व व्युत्पत्तिशास्त्रज्ञ इत्यादि शिष्टाचा निर्णय अधिक ग्राह्य आहे हें कोणीही कबूल करील. पण हा एक स्वतंत्र प्रश्न आहे त्याविषयींचा विचार अधिक बारकाईनें पुढें करूं.

व्याकरणाच्या उपयुक्ततेसंबधीं **लोकहितवादी** यांचा सडेतोड अभिप्राय पाहण्यासारखा आहे ते म्हणतात, "व्याकरणाचे पधरा वर्षे अध्ययन केलें, त्यापासून अमुक उपयोग होतो असें मला दाखवून द्यावें, म्हणजे मी वास्तविक म्हणेन परंतु मीं शोध केला आहे, त्यावरून मनुष्यास लाकडें तोडावयाचें शिकविलें तर बरें, पण हें व्याकरण नको यांत कांहींच अर्थ नाहीं केवळ मूर्ख होण्याची विद्या आहे" **विष्णु-शास्त्री चिपळूणकर** यानीं यावर जोरदार हल्ला केला आहे. पण तो हल्ला **लोक-हितवादीच्या** इतर मतावरील हल्ल्यासारखा निरर्थक ठरला आहे व्याकरणाच्या उपयोगासंबधीं **आगरकर** व **दामले** यानीही हात टेकले आहेत **आगरकरांनीं** व्याकरणाला उपयुक्ततेच्या व करमणुकीच्या दृष्टीनें दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रतीचा नीरस विषय असें म्हटलें, तर **दामल्यांनीं** इतकें लिहिल्यावांचून माझ्यानें राहवेना म्हणून तें लिहिण्यांत आलें अशी शरणचिठ्ठी दिली आहे व्याकरणाच्या भाषेस होणाऱ्या एका उपयोगाविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. पुढें कांहीं अन्य उपयोगाविषयीं सांगूं

पण या व्याख्येचें किंवा एतद्सदृश सर्व व्याख्यांचें मरण तिच्या शब्दींत म्हणजे 'हें व्याकरण शिकल्यानें समजतें' या शब्दांत आहे. कारण शुद्धाशुद्ध बोलणें, लिहिणें या गोष्टी व्याकरणानें साध्य होत नाहींत शुद्ध बोलतां आलें पाहिजे तर भाषेच्या केंद्रस्थानांत राहून भाषा बोलण्याचा सराव केला पाहिजे भाषा चांगली लिहितां आली पाहिजे तर पुष्कळसें लिहिलें पाहिजे व माहितीच पाहिजे असली तर **गुंजीकरांच्या** 'लेखन शुद्धि' सारखीं पुस्तकें वाचलीं पाहिजेत. शब्दांचीं शुद्ध व साहित रूपें, इ. व्युत्पत्तीसंबधानें माहिती हवी असली तर ती संपूर्णतः त्या भाषेच्या कोशांत सांपडेल, व्याकरणांत दिलेल्या प्रत्येक नियमाची उदाहरणें म्हणून दिलेल्या दोनचार शब्दांनीं हें कार्य भागणार नाहीं शब्दाच्या व्युत्पत्तीची तौलनिक दृष्टीनें समग्र माहिती पाहिजे असल्यास डा **भांडारकर** किंवा डॉ **कत्रे** यांच्यासारख्या निबंधांत व व्याख्यानांत भरपूर मिळेल, पण व्याकरण ग्रंथांत ह्यापैकीं कोणतीही माहिती मिळणें कठीणच, व

मिळालीच तर ती अगदीं तुटपुंजी. व्याकरणांत जी माहितो मिळते, ती शब्दाची घटना, जाती, विकार व वाक्यांत परस्परांशीं संबंध या विषयींची असते. ही माहिती केवळ शब्दांविषयीं असते वाक्याविषयीं व्याकरणांत आढळणारी माहिती ही केवळ शब्दांची वाक्यांत रचना या स्वरूपांत मिळेल वाक्यासंबंधीं विचार कांहीं 'पृथक्करणांत' तर कांहीं 'प्रबंधन' (Composition) इत्यादि ग्रथांत होईल. अर्थात वाक्यापेक्षां किती तरी व्यापक अशी जी 'भाषा' ती शब्दैक विषय जें व्याकरण त्यापासून किती दूर आहे हें दिसून येईल पाहिजे तर व्याकरण हें भाषेच्या अनेक शास्त्रांपैकीं एक शास्त्र आहे असें म्हणतां येईल. पण दामले यांच्या व्याख्येप्रमाणे त्यांत लोकव्यवहारासंबधीं नियम आहेत व ती एक बोलण्यालिहिण्याची कला आहे असें कदापि म्हणता येणार नाहीं.

याप्रमाणे सर्व व्याकरणकारांनी आपली व्याकरणाची व्याख्या भाषेच्या अनुरोधाने व शुद्धाशुद्ध दृष्टीने केली, तर गुंजीकरांनीं भाषानिरपेक्ष आणि उपयोग निरपेक्ष व्याख्या करण्याचा प्रथमच प्रयत्न केला यासंबधीं त्यांचें विवेचन पुढील प्रमाणें आहे "व्याकरण शब्दाचा अर्थ म्हटला म्हणजे-" व्युत्पद्यन्ते प्रकृति-प्रत्ययादिभिः प्रदर्श्यन्तेच शब्दा अनेन इति व्याकरणम्'-भाषेमध्यें जे शब्द त्याची व्युत्पत्ति कशी म्हणजे त्याची प्रकृति काय, त्याना प्रत्यय कोणते लागले, आगम, आदेश इत्यादि विकार काय काय झाले, हें ज्या शास्त्राच्या अभ्यासानें समजते, तें व्याकरण. हा मूळ अर्थ-पदयोजना, प्रयोग, विचार इत्यादिकांचा संग्रह हा यामध्ये अधिक अर्थ घेतला आहे म्हणून 'व्याकरण' या शब्दाचें आम्ही महाराष्ट्रजनानीं जें लक्षण द्यावयाचं तें 'ग्रामर' शब्दाचें न देतां 'व्याकरण' शब्दाचेंच दिले पाहिजे सारांश 'भाषेतील शब्दांची व्युत्पत्ति आणि योजना यांचे ज्ञान ज्या शास्त्राकडून होतें तें व्याकरण' ही किंवा अशा अर्थाची दुसरी एकादी व्याख्या असली पाहिजे होती." दादोबा व गुंजीकरांचे लेख व चरित्र लिहिणारे एक आधुनिक सुप्रसिद्ध संशोधक अनंतराव प्रियोळकर यांनीं गुंजीकरांचीं व्याकरणविषयक मतें आधुनिक व्याकरणाचार्य जेस्पर्सन यांच्या मताप्रमाणे होतीं असे म्हटलें आहे, ते अक्षरशः खरें आहे. पण व्युत्पत्ति याचा अर्थ जेस्पर्सनप्रमाणे Morphology व योजना याचा अर्थ 'Syntax' असा घेतला पाहिजे आम्हीं गुंजीकरांनीं सुचविलेल्या 'प्रकृति' या शब्दावरून व Syntax या शब्दाच्या दादोबादि पूर्व वैयाकरणांनीं वाक्यांत शब्दांची रचना या अर्थावरून ( १ ) प्राकृतेय (accidence) व ( २ ) वाक्येय (Syntax) अशा दोन शब्दांची योजना करून बाकीची व्याख्या गुंजीकरांच्या शब्दांतच केली आहे. यासंबधींचा विचार 'विभागणी' या प्रकरणांत पुढें अधिक कसोशानें होणार आहे.

आतां 'शास्त्र' या शब्दाचा विचार करूं. कारण दादोबांपासून गुंजीकर-दामल्यांपर्यंत सर्वच व्याकरणकारानीं या शब्दाची योजना आपल्या व्याकरणाच्या

व्याख्येंत केली आहे. 'व्याकरण म्हणून एक शास्त्र आहे. जेणें करून भाषेचे मर्मज्ञान होतें. म्हणजे तिचे आंतील नियम कळतात. जेणेकरून शुद्ध कोणतें व अशुद्ध कोणतें हें यथायोग्य समजतें' अशी व्याकरणाची व्याख्या दादोबांनीं आपल्या मोठ्या व्याकरणांत केली आहे. 'सुशिक्षित लोक कोणतीही भाषा कोणत्या रीतीनें बोलतात किंवा लिहितात हें ज्या शास्त्रानें सांगितलें असतें, त्यास त्या भाषेचे व्याकरण असें म्हणतात.' अशी जोश्यांची व्याख्या त्यांच्या प्रौढबोध व्याकरणाच्या प्रथमावृत्तींत दिसते दामल्यांनीं आपल्या व्याकरणास आव्हानपूर्वक 'शास्त्रीय' असे नाव दिलें आहे, हे पूर्वी सांगितलेंच आहे त्यांनीं दादोबासारखीच पण अधिक शास्त्रीय थाटांत व्याकरणाची "भाषेचा व्यवहार किंवा उपयोग कोणत्या नियमास अनुसरून होतो हें ज्या शास्त्रांत सांगितलेले असते त्या शास्त्रास व्याकरण शास्त्र असे म्हणतात." अशी व्याख्या केली आहे पण शास्त्र म्हणजे काय यासबंधी चर्चा दामल्यांशिवाय कोणीं केली नाहीं. आणि दामल्यांनीं केलेली चर्चा अगदींच तुटपुंजी आहे तिनें त्यांच्या 'शास्त्रीय' व 'शास्त्र' ह्या शब्दाचा काहींच उपराळा होत नाहीं त्यानीं व आगरकरांनीं आपल्या पृथक्करणविषयक "वाक्य मीमांसा" या ग्रंथांत या शास्त्राचा न्याय (Logic) या शास्त्राचा 'व्याकरण' व 'पृथक्करण' या शास्त्राशीं निकट संबध आहे, एवढेच सांगितले आहे. जॉन स्टुअर्ट मिल हा न्यायशास्त्रज्ञ 'व्याकरण' व "न्यायशास्त्र" ह्यांचे जवळ जवळ तादात्म्यच करतो, तर जेस्पर्सन हा 'व्याकरण' हे एक स्वतंत्र शास्त्र असें प्रतिपादून त्याचा न्यायशास्त्राशीं महत्त्वाचा संबध नाहीं असे सांगतो या मतमतांतराच्या अनिश्चिततेमुळे या प्रश्नाची चर्चा किती महत्त्वाची आहे हे दिसून येईल

येथे ध्यानांत ठेवण्यासारखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'शास्त्र' हा जरी संस्कृत शब्द आहे, तरी मराठींत तो केवळ (Science) या इंग्रजी शब्दाला पारिभाषिक असा प्रतिशब्द आहे. संस्कृत भाषेतील 'शास्त्र' या शब्दाचा वाच्य किंवा लाक्षणिक असा कोणताही अर्थ येथे अभिप्रेत नाहीं. तथापि ह्या पारिभाषिक शब्दाची निवड झाली तेव्हां त्याचा यौगिक अर्थ जो 'नियमन करणे' तो पूर्णपणे नजरेसमोर होता ही गोष्ट कबूल केली पाहिजे. हे नियम सृष्टि व मानव यासबधीं काढावयाचे असतात. एका दृष्टीने सृष्टीतील असंख्य प्राण्यांतील एक प्राणी म्हणून मानवाची गणना होऊन जीवनशास्त्र (Biology) इत्यादि शास्त्राचा तो विषय होऊ शकेल पण त्याच्या अखिल चराचर सृष्टीवर चालविणाऱ्या मानसिक व आत्मिक सामर्थ्यामुळें मानव हा शास्त्रीय ज्ञानाच्या दृष्टींने इतर सृष्टीपासून वेगळा झाला आहे व म्हणूनच सृष्ट किंवा भौतिकशास्त्रें व मानवी शास्त्रें असे शास्त्राचे दोन मुख्य प्रकार पडले आहेत. पहिल्या प्रकारात 'पदार्थविज्ञान' 'रसायन' 'भूगर्भ' इत्यादि शास्त्राचा समावेश होतो मानवासबधींचीं शास्त्रांत त्याच्या मनासबधीं मानसशास्त्र, अध्यात्मशास्त्र इ. शास्त्रें तो समाजशील प्राणी या दृष्टीनें त्याच्या व्यवहारापासून उद्भवणारीं कायदा, नीति, धर्म

इत्यादिकांची शास्त्रे याचा समावेश होतो त्याची खास शक्ति जी ज्ञान तिच्या उत्पादनासाठीं व वाढीसाठीं **वाणी** ही शक्ति मनुष्याला लाभली आहे. तिच्यामुळेच भाषा, तिची वाक्यें व शब्द यांसवधीं व्याकरण पृथक्करण इत्यादि शास्त्रे निर्माण झालीं.

सध्या Science हा शब्द एकेरी रीतानें भौतिक किंवा सृष्टशास्त्रासाठींच खास अर्थानें इंग्रजींत वापरलेला दिसतो. त्याचें दुहेरी कारण म्हणजे दोन्ही प्रकारच्या शास्त्रांतील नियमांचे स्वरूप व ते शोधून काढण्याची पद्धति यांचे भिन्न भिन्न स्वरूप हें होय. भौतिक शास्त्राचे नियम उद्गामी ( Inductive ) पद्धतीनें प्रयोगद्वारा काढलेले असतात ते शक्य तो निरपवाद असावे लागतात अपवाद निघालाच, तर पुनः प्रयोग करावे लागतात व त्याअनुसार हे सारखे बदलावे लागतात तथापि त्यांतलेही **न्यूटन, पास्कल** इ. नीं शोधून काढलेले काहीं नियम त्रिकालाबाधित असतात. काहीं नियमात **आईन्स्टीन**सारख्या महाशास्त्रज्ञांकडूनच दुरुस्ती होते. दुसऱ्या प्रकारच्या शास्त्रांची तशी गोष्ट नाहीं त्या शास्त्रांत अवगामी ( Deductive ) पद्धतीलाच प्राधान्य असते उद्गामी ( Inductive ) पद्धतीचें कार्य अगदीं बेतानें होते व प्रयोगाला तेथें मुळींच अवसर नसतो त्यामुळे गृहीत पक्ष ( Premises ) कम कच्चे असल्यामुळे सिद्धान्तही डळमळीतच राहतात अपवाद फार पण त्यामुळें नियम न बदलता अपवादच ठरावे लागतात देश काल, परिस्थितीप्रमाणे भाषा, कायदे, धर्म, पंथ इत्यादि सारखी बदलत असल्यामुळे संशोधनार्थ आवश्यक अशी सामग्री असंदिग्ध स्वरूपात शोधकापुढे केव्हाही नसते. शिवाय ही शास्त्रे माणसाच्या दृष्टीनें आत्मनिष्ठ ( Subjective ) आहेत म्हणून शोधकाचे अहगंड व अभिनिवेश त्यांनीं केलेल्या सिद्धान्ताला नेहमी बाधक ठरतात सृष्टिशास्त्रात नेहमी प्रयोगादि प्रत्यक्ष प्रमाणीच मातब्बरी असते अनुमानाला मग ते उद्गामी अनुमान असो वा अवगामी असो, तेवढेसे महत्त्व नाहीं.

शास्त्राच्या आणखी एका दृष्टीनें दोन बाजू आहेत ( १ ) शुद्ध शास्त्र ( Pure Science ) ( २ ) उपयोजक शास्त्र ( Applied Science ) शुद्धशास्त्र हे केवळ शालेय ( academic ) महत्त्वाचे असते हे भौतिक किंवा सट असले तरी शाळेच्या आवारातही प्रयोगादि प्रयत्नतरेसुद्धां प्रमादपूर्ण असल्यामुळे नवीन शोधास मुळींच वाव नसतो व म्हणूनच शाळापाठशाळांतील अभ्यासात निष्णात असलेल्या विद्वानांकडून शास्त्रसंशोधनात फारशी भर पडलली दिसत नाही उलटपक्षीं बरेचसे शोध बाहेरच्या लोकांकडून झालेले दिसतात **रामानुजम्**सारख्या गणितज्ञाचा पाठशाळेत प्रवेशही झाला नाही, आणि तो केवळ प्रवेश परीक्षेत गणितात नापास झाल्यामुळे ! पण या शुद्ध शास्त्रांपैकीं, काही इतर शास्त्राच्या संशोधनाच्या कामी व व्यवहाराच्या दृष्टीनें काहीं फळ देणारीं अशीं असतात. अशा शास्त्रांना उपयोजक ( applied sciences ) शास्त्रें असे म्हणतात गणित, पदार्थविज्ञान, रसायन इत्यादि शास्त्र शुद्ध व

उपयोजक अशा उभयविध स्वरूपाचीं शास्त्रे आहेत उलट पक्षीं न्याय, व्याकरण, अर्थ इत्यादि शास्त्रे केवळ शुद्ध अशीं शास्त्रे आहेत त्याचा शाळा पाठशाळांत अभ्यासण्याच्या कामींच उपयोग होतो. येथे उपयोजक ( applied ) व उपयोगी ( utilitarian ) यांमधील फरक लक्षांत ठेवला पाहिजे उपयोग कोणत्या ना कोणत्या रीतीने प्रत्येक वस्तूचा आहेच तशांत शास्त्र हे प्रयत्नपूर्वक रचलेले असते. अर्थात् त्याचा उपयोग असल्याशिवाय ते रचण्याचा खटाटोप कोणीही करणार नाहीं हा उपयोग व्याकरणाच्या बाबतींत कोणता हें वर सांगितले आहे. पण सर्वच व्याकरणकारांनी व्याकरण हें भाषेचें शास्त्र व कलाही आहे असे प्रत्यक्षत किंवा अप्रत्यक्षत सांगितले आहे. त्यामुळे त्याच्या वास्तविक उपयोगाविषयींची यथार्थ कल्पना त्यांनाही झाली नाहीं असे म्हणावे लागते तसें पाहिले तर व्याकरणाशिवाय गणित, भूगोल, प्रवचन, रसायन, पदार्थविज्ञान इत्यादि उभयविध शास्त्रे त्यांच्या शुद्ध स्वरूपात शाळा पाठशाळात अभ्यासलीं जातात यांपैकीं काहीं शास्त्रांना प्रयोगाची जरूरी असते. पण प्रवेश परीक्षपर्यंत शाळेत झालेल्या यथातथा प्रयोगावरच निर्वाह होतो प्रवेश-परीक्षेत प्रयोगाची ( experiment ) जरूरी नसत व पुढे शास्त्रीय भागात थोड्याशा मार्कांची प्रायोगिक परीक्षा असत साराश, व्याकरण, गणित, भाषा इत्यादि सर्वच विषय शाळेत महत्त्वाच असतात. त्यांचा पुढे व्यवहारात मुळींच उपयोग होत नाहीं शाळेत शिकलेली बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार इत्यादि पूर्णांक-अपूर्णांकाचीं कृत्यें व त्यावरील उदाहरणे याचा व्यवहारात काहीच उपयोग होत नाहीं. भूगोल वगैरे विषयाची तीच गोष्ट यासबंधीच ज्ञान त्या त्या परीक्षेच्या नतर अल्पावकाशांत आम्हीं विसरतो. पुढे प्राथमिक शाळातील मुलानींसुद्धा काही प्रश्न केल्यास एका काळीं या विषयात पहिल्या दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण झालेल्या त्यान्या वडिलांना त्यांच्या अडचणींचे निराकरण करता येत नाहीं !

मात्र शाळेच्या उपयोगाच्या दृष्टीने या शास्त्राची प्रतवारी लावली, तर इतरांपेक्षा व्याकरण, प्रबधन, व्युत्पत्ति इत्यादि शास्त्रास वरचा क्रमांक देता येईल त्याचें कारण सामान्य विद्यार्थ्यास शाळात ज्या पद्धतीने शिकवावयाचे त्या पद्धतींसही इतर शास्त्रापेक्षां व विषयांपेक्षा अधिक योग्य असतात शाळेत दोन प्रकारच्या पद्धति योजण्यात येतात ( १ ) प्रत्यक्ष ( २ ) अप्रत्यक्ष ( १ ) प्रत्यक्ष पद्धतीत इंद्रियद्वारा व कृति-प्रयोगादि द्वारा ज्ञान देण्यात येते. ही पद्धति जरी अतिशय महत्त्वाची असली, तरी जे प्रत्यक्ष तेही शाळेच्या चार भिंतीत व तो विषय जितक्या वेळात शिकवावयाचा त्या कालखंडात ( period ) मर्यादित झालेलें असते ( २ ) अप्रत्यक्ष पद्धतीचे ( अ ) अनुमान ( ब ) व्याख्यान किंवा सरळ सांगून टाकणे यांपैकीं दुसरी म्हणजे व्याख्यानपद्धतीच त्या काळात **दादोबांदकांच्या** काळापासून चालत होती व आजही जरी पहिलीचा बोलबाला असला तरी दुसरी पद्धतीच शाळांत उजळ माथ्यानें वावरत आहे. कारण सर्वसमर्थ जी परीक्षा ती तिच्या बाजूची आहे.

अप्रत्यक्ष पद्धतींपैकीं अनुमानपद्धति हीच शाळांत वापरण्यास योग्य असें अनेक कारणांनीं दिसून येईल. ही न्यायशास्त्रावर ( Logic ) आधारलेली आहे. न्यायशास्त्रांत या पद्धतीचे (१) उद्गामी अनुमान ( Inductive ) व अवगामी अनुमान ( Deductive ) असें दोन प्रकार सांगितलेले आहेत. यापैकी पहिल्या प्रकारच्या अनुमानपद्धतीचा सृष्टिशास्त्रांत अवलंब करण्यांत येतो, तर व्याकरणासारख्या शास्त्रांत दुसरीच पद्धति वापरण्यांत येते पूर्वोक्त व्याख्यानपद्धति पूर्वी सर्व शाळांत सरळ कथन स्वरूपाची होती पण आतां शाळांत व पाठशाळांत या पद्धतीलासुद्धां दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे अवगामी पद्धतीचा पाठपुरावा भरपूर प्रमाणांत असावा लागतो

येथें हें पद्धतीच्या दृष्टीनें विवेचन करण्याचें कारण हेंच कीं व्याकरण हें उपयोजक ( applied ) किंवा कलात्मक शास्त्र अशा अर्थाची व्याख्या बहुतेक व्याकरणकारांनीं केली आहे ती बरोबर नाहीं. मात्र तें शालेय दृष्टीनें म्हणजे विषयाचा अभ्यास व परीक्षा या दृष्टीनें उपयोगी असें शास्त्र आहे या दृष्टीनें त्याचा भौतिक शास्त्रापेक्षांही वरचा नंबर लागेल. गणित शास्त्र हें निश्चित् रीत व उत्तर या दृष्टींनीं शाळेंतील अभ्यासक्रमास अनुकूल असे आहे पण तेथें सारेच आकडे जो थोडा व्यवहार--अ, ब, क चीं कामें, चोर-शिपाई, पाणी मिसळणारा गवळी किंवा कलाल, वाढतीं कुरणें--तो जवळ जवळ व्यवहारशून्यच असतो. शिवाय उदाहरणे सोडविण्यास सामान्य बुद्धीशिवाय गणिताची अशी खास बुद्धि लागते. शास्त्रीय विषयांत प्रयोग असले, तरी शाळांत ते फारसे कोणीही करीत नाहींत व केले तर बरेचसे चुकतात शास्त्रांतील जे नियम असतात, तहीं कांटेकोर असले तरी शाळेतील इतर विषयांशीं व व्यवहाराशीं त्यांचा फारसा संबंध येत नाहीं. भूगोल, इतिहास इत्यादि विषयांत उद्गामीपेक्षां अवगामी अनुमानें हीं जास्त प्रमाणांत असल्यामुळें व त्यांचा इतर विषयांशीं व व्यवहाराशीं बराच संबंध असतो व्याकरण ह्या विषयाचा भाषा ह्या सर्वगामी व सर्वच विषयांचें मुख असलेल्या व परीक्षेचें मुख्य साधन असलेल्या विषयांशीं संबंध असल्यामुळें प्राथमिक, दुय्यम व उच्च पाठशाळांत अत्यंत सोयीस्कर असा विषय झाला आहे इंग्लंडांत व्याकरण ह्या विषयास एका काळीं इतके महत्त्व होते कीं, शाळांना व्याकरण शाळा ( Grammar schools ) असेंच नांव पडलें व तें नांव आजमितीसही चालू आहे. व्याकरणाच्या शिक्षणाने अर्थातच अनेक फायदे झालेले आहेत पहिला फायदा म्हणजे त्या अभ्यासानें व्युत्पन्नतेचा ( Scholarship ) दर्जा वाढतो. आपल्याकडे तर पाणिनीय कालापासून चालत आलेली कांटेकोर, ततोतंत व शिस्तवार पद्धतीची परंपरा व्याकरणाच्या अभ्यासामुळेंच अक्षय्य चालू राहिली आहे. हा विषय शाळा पाठशाळांत, अशा रीतानें शिकविला गेला पाहिजे कीं विद्यार्थ्यांचें अवधान धारेवर राहिले पाहिजे. त्यायोगें विद्यार्थ्यांमध्यें अगदीं योग्य प्रश्न उपस्थित करण्याची व येणाऱ्या उत्तरावरून नेमके व बिनचूक सिद्धांत काढण्याच्या सवयी व आकांक्षा उत्पन्न होतात. प्रत्येक विषय व त्यांत उद्भवणारा प्रत्येक प्रश्न निःपक्षपाती शास्त्रीय

चौकशीच्या भट्टींत तावून सुलाखून काढावयाचा, निघणारीं प्रमेयें स्वतःस किंवा समकालिनास अप्रिय व पूर्वपरंपरेच्या विरुद्ध असलो तरी स्वतःची खात्री पटली तर बंडरवृत्तीने त्याचा त्याग करावयाचा, अशी वृत्ति विद्यार्थ्यांत निर्माण झाली पाहिजे. हीच वृत्ति **पाणिनी, इंद्र, वररुचि, सारस्वत** इत्यादि पूर्व व्याकरणकारात होती व अलीकडील **दादोबा, कृष्णशास्त्री, आगरकर, गुजोकर, दामले** यामध्येंही ती तशीच प्रतीत होते

व्याकरणाच्या व्याख्येची याप्रमाणें कसून चर्चा झाली तदनुसार तिच्यामध्यें फरक होऊन, या विषयास अगदीं क्रांतिकारक असे नवे स्वरूप देणारी एक निराळीच व्याख्या असली पाहिजे हेही क्रमप्राप्तच झाले ही व्याख्या पुढे रीतसर पुस्तकाच्या आरंभीं येईलच. पण तीही होईल तितकी बिनचूक व शास्त्रोक्त अशी झाली पाहिजे तर व्याकरण ह्या विषयाची व्याप्ति, विषय विभागणी, पद्धति व अंतर्भूततत्त्वे यांसबंधीं सविस्तर चर्चा होऊन बरेचसे ठाम निर्णय घेतले पाहिजेत या निवेदनाचा बहुतेक पुढील भाग याच कामीं खर्ची पडेल

व्याकरणाच्या व्याप्तीसंबंधी एक महत्त्वाचा प्रश्न **दामले** व **जेस्पर्सन** इत्यादि व्याकरणकारांनी उपस्थित केला आहे 'व्याकरण हे सर्वसामान्य शास्त्र ( Universal Science ) कीं प्रत्येक भाषेचें व्याकरण वेगळे' असा तो प्रश्न आहे. हा प्रश्न **दामल्यांनीं** पुढीलप्रमाणे सोडविला आहे. 'तथापि वर्णविचार, शब्द-विचार व वाक्यविचार हे जरी साधारणपणे सर्व भाषात असावयाचे, तरी त्यातील वर्णभिन्नत्व व वाक्याभिन्नत्व यांबरोबर व्याकरणांतील नियमभिन्नत्व आले पाहिजे. यानंतर निरनिराळ्या काळीं, निरनिराळ्या स्थळीं व समाजाच्या निरनिराळ्या भागांत शब्दाची रूपे निरनिराळीं असतात हे सांगून अखेरीस ते म्हणतात "ह्यावरून हें उघड आहे कीं जरी इंग्रजी संस्कृत, फारशी इत्यादि सर्व भाषांना सामान्य असे सर्वसाधारण ठोकळ व्याकरण असणें जरी शक्य आहे तरी त्या भाषा ज्या मानाने परस्परांपासून भिन्न आहेत, त्या मानाने त्यांचीं व्याकरणें परस्परांपासून भिन्न असलींच पाहिजेत येथे सर्वसाधारण व्याकरण तात्विक दृष्ट्या शक्य असले, तरी प्रत्यक्षतः ते नाहीच असें म्हटले पाहिजे." पण **दामले** म्हणतात तशी ती गोष्ट उघड नाहीं. **दामले** व इतर सर्वच वैयाकरणांच्या ध्यानांत दोन गोष्टी आलेल्या दिसत नाहींत. पहिली गोष्ट म्हणजे भाषेचे शास्त्र अशी व्याकरणाची त्यांनीं केलेली अतिव्याप्त व्याख्या. त्यामुळें भाषा जर एक, तर सर्वसाधारण व्याकरणही एक असू शकेल, अशी पुसट कल्पना त्यांना झाली. उलटपक्षीं व्याकरण म्हणजे व्याकरणाचीं रूपें असे तादात्म्य करून निरनिराळ्या भाषांचीं रूपें निश्चितपणें भिन्न असल्यामुळे व्याकरणेही भिन्न असा निश्चित सिद्धांत त्यांनीं काढला थोडासा विचार केला असता, तर त्यांना असें दिसून आले असते कीं, व्याकरणांत रूपें नियमसिद्धीसाठीं असतात; रूपसिद्धीसाठीं नियम नाहींत म्हणजे कोणतींही रूपे न देतां व्याकरण लिहितां येईल; पण कोणत्याही भाषेच्या शब्दरूपांचीच ज्या पुस्तकांत चर्चा

केलो आहे, त्यास व्याकरण हें नांव सहसा देतां येणार नाहीं. यासबंधीं दुर्लक्ष झाल्या-मुळे भिन्न भिन्न काळच्या स्थळांतील इ. शब्दयोजनेप्रमाणेंही व्याकरणे भिन्न होतील असे त्यांनीं प्रतिपादिले आहे. ते म्हणतात, 'फार तर काय, व्याकरण मराठी गद्याचें पद्याहून जरा निराळे, पुरुषांच्या मराठीहून स्त्रियांचे वेगळे व लहान मुलाच्या भाषेचें मोठ्या माणसाच्या भाषेहून जरासे भिन्न होईल. पण असे फरक तात्त्विक दृष्ट्या जरी मानले, तरी त्याचे महत्त्व सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें विकसित होतें. तसें ते वास्तविक आहे असें मानण्याचें कारण नाहीं' पण हें म्हणणे बरोबर नाही. तत्त्व म्हटले की, त्यात कमीअधिक, सूक्ष्म-ठळक असा भेद करता येत नाही. काळ, दश, लिंग, वय ह्या गोष्टी जर व्याकरणाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत, तर कमीअधिक प्रमाणांत सर्वांचाच विचार व्याकरणात झाला पाहिजे. केवळ काळस्थळाचाच विचार करून भागणार नाही.

पण ग्रंथ दामले प्रथमच घसरले आहेत. वर्णविचार, शब्दविचार, वाक्यविचार एवढ्याचपुरते व्याकरण, ही बैठक त्यांनी घट्ट धरली असती, तर अशी विसंगत विचार-सरणी त्यांच्याकडून झाली नसती, कारण हे भाग सर्व भाषांत सामान्य असतात. वर्णविचार म्हणजे स्वर, व्यंजनें, संधि, प्रत्यय इत्यादिकांचा विचार. हे प्रकार सर्व भाषांत आहेत. वर्गीकरण म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण इत्यादि शब्दांच्या जातीही सर्व भाषांतील शब्दांविषयी सांगता येतील. विकरण म्हणजे विभक्ति, काळ, अर्थ हेही सर्व भाषांत सामान्य असतात आणि ह्या भाषा स्थळकाळपरत्वें भिन्न असल्या किंवा लिंग, वचन याप्रमाणें भिन्न असल्या, तरी त्यांचे व्याकरण एकच. श्रीज्ञानेश्वरांनीं 'मिया' दादोबांनीं 'म्या' व कोलत्यांनीं 'मीनें' असें म्हटले, तरी व्याकरण दृष्ट्या ते तृतीयांत 'मी' हे प्रथम पुरुषवाचक सर्वनाम एवढेंच उत्तर देता येईल. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे व्याकरणाचे नियम सर्व भाषांस व कालींस सामान्य आहेत. भाषेच्या शब्दांशी किंवा रूपांशी त्यांचा तसा नियत संबंध नाहीं. व्याकरण ग्रंथांत ती रूपें केवळ पूर्वी सांगितल्याप्रमाणें नियमांच्या स्पष्टीकरणार्थ उदाहरणें म्हणून देतात.

जेस्पर्सनचें सर्वसाधारण व्याकरणा (Universal Grammar) संबंधींचे मत यापेक्षांही धरसोडीचें आहे. मात्र त्यानें ते निराळ्याच रीतीनें प्रस्थापित केले आहे. त्यानें या प्रश्नास पुढीलप्रमाणें सुरुवात केली आहे. 'Our question then is the old one. can there be such a thing as Universal (or general) Grammar?' जेस्पर्सनच्या मतें ही सार्वत्रिक व्याक-रणाची कल्पना व्याकरण हे न्यायशास्त्राचे उपयोजक (applied) स्वरूप या तत्कालीन कल्पनेवरून निघाली. अर्थात् ह्या कल्पनेच्या जोडीला लॅटिन भाषेचे व्याकरणही अशा उपयोजक न्यायशास्त्राचा उत्कृष्ट नमुना आहे अशी, जी कल्पना होती तिचाही सार्वत्रिक व्याकरणाला दुजोरा मिळाला. पहिली कल्पना प्रचलित होती, याविषयींच्या आधारा-

साठीं **जेस्पर्सननें मिलचें** पुढील वाक्य उद्धृत केलें आहे. " Consider for a moment what a grammar is It is the most elementary part of logic, it is the beginning of the analysis of the thinking process the principles and rules of grammar are the means by which the form of language are to correspond with the universal forms of thought The distinction between the various forms of speech between the cases of names, moods, tenses of verbs are distinctions in thought and not merely in words. " असलें हे **मिल्लचें** विधान, तौलनिक भाषाशास्त्रज्ञांकडून येणें शक्य नाही असें सांगून **जेस्पर्सननें** ते उडवून देण्याचा प्रयत्न केला आहे पण हा व्याकरणाचा प्रश्न आहे येथे भाषेच्या किंवा शब्दांच्या कोश, व्युत्पत्ति, छंद वगैरे दुसऱ्या शास्त्रज्ञांचीं मतें जमेस का धरावी हें समजत नाहीं सरळ मार्ग म्हणजे **मिल्लचें** मतच चुकीचें असें त्यानें सकारण दाखवावयास पाहिजे होतें खुद्द **जेस्पर्सननें मिल्लचेंच** अशात' अनुकरण केलें आहे. वर आरंभीच सार्वत्रिक व्याकरणाचा प्रश्न उपस्थित करताना जें प्रश्नरूपी वाक्य दिलें, त्याच्यापूर्वी पुढील मजकूर आहे " With regard to the catagories we have to establish in the synthetic part of our Grammatical system, we must first raise the important question namely, are these catagories purely logical catagories or are they purely linguistic catagories? If the former then it is evident they are universal as they belong to all the languages in common, if the latter then they are, at any rate some of them are peculiar to one or more languages as distinct from them " ( यापुढे उपरिनिर्दिष्ट " our question...Grammar ? " हा प्रश्न आहे ) येथे **जेस्पर्सननें** व्याकरण हें तार्किक ( Logical ) कीं भाषिक ( Linguistic ) असा प्रश्न उपस्थित करून त्याचें उत्तर मात्र सफाईच्या हातचलाखीनें डावललें आहे

**जेस्पर्सन**ची गल्लत दोन प्रकारांनीं झालेली दिसते. पहिली गोष्ट आत्यंतिक विभाग ( Catagories ) कोणते ते त्यानें ठरविले नाहीं. **जेस्पर्सन**च्या मताप्रमाणें व्याकरणाचे दोनच ( १ ) Morphology आणि ( २ ) Syntax असे आत्यंतिक विभाग आहेत. व्याकरणाच्या पूर्वोक्त प्रश्नासंबंधीं विचार करतांना हे दोन्ही भाग त्यानें जमेस धरावयास पाहिजे होते. पण तसें न करतां एक भागाचा म्हणजे Syntax

चाच विचार त्यानें केला. दोन्ही भागांचा विचार केला असता तर साकल्यानें व्याकरणाचा विचार होऊन शिवाय हे दोन्ही भाग सर्व भाषांस सामान्य असे असल्यामुळे जेस्पर्सननें उपस्थित कलेल्या प्रश्नांपैकी पहिला पक्ष सिद्ध झाला असता दुसऱ्या भागातील विभाग हे आत्यंतिक विभाग नाहींतच, तर आत्यंतिक पोट विभागसुद्धां नाहींत त्याने दिलेल्या उदाहरणावरून तो विभक्ति, लिंग आणि वचन इत्यादिकाविषयी बोलतो हे स्पष्ट आहे ह्या गोष्टी प्रत्येक भाषात कमीअधिक प्रमाणात असतात जसे —संस्कृतात व मराठींत आठ विभक्ति आहेत. इंग्रजींत दोनतीनच आहेत. लिंग मराठत आहे, तर हिंदुस्तानींत त्याहून कमी प्रमाणात आहे. संस्कृतात व इंग्रजींत क्रियापदास लिंग नाहीं, पण मराठी व तत्सम भाषांत ते आढळते व त्यामुळेच प्रयोग हा विशेष त्या भाषात आढळून येतो येथे प्राणी-शरीराचा दृष्टांत देतां येईल शरीराचे शीर, धड व अवयव हे तीन आत्यंतिक विभाग ( Catagories ) ह्या अवयवांपैकीं एकाद्या विभागाचे काही भाग एकाद्या प्राण्यात असतील नसतील. कांहीं प्राण्यांस शिंग शेपट्यासारखे असतील नसतील तसेच दाढीमिशासारखे भाग पुरुषास असतील, स्त्रियास नसतील व पुरुषांतही पूर्ववयांत नसतील. त्याचप्रमाणे भाषेचे व व्याकरणाचे आहे व्याकरणाचे आत्यंतिक भाग जेस्पर्सनप्रमाणें दोनच आहेत. कदाचित् ते दामले म्हणतात त्याप्रमाणें वर्ण, शब्द व वाक्य हेही सर्व भाषांत सामान्य असल्यामुळें आत्यंतिक विभाग होऊ शकतील, पण विभक्ति, वचन, लिंग, प्रयोग हे आगतुक स्वरूपाचे असल्यामुळे ते काहीं व्याकरणांत असतील, अगर नसतील. त्यामुळें व्याकरणाच्या सार्वत्रिकत्वास बाधा येत नाहीं

दुसरी गल्लत म्हणजे व्याकरणाचें एकापक्षीं न्यायशास्त्राशी ( Logic ) व दुसऱ्यापक्षीं भाषेशीं तादात्म्य करणें ही होय म्हणजे व्याकरण हे ( Logical ) किंवा ( Linguistic ) असे म्हणता येईल, पण त्याला ( Logic ) किंवा ( Languages ) असें म्हणता येणार नाहीं. मिलनें व्याकरण हे न्यायशास्त्राचा एक प्राथमिक भाग असे म्हणून व्याकरणाचें व न्यायाचे ऐक्य प्रतिपादिलें आहे. व्याकरण व न्याय ह्या पद्धतीही आहेत. त्या दृष्टीने मिलचे विधान क्षम्य आहे, पण व्याकरणाला 'पद्धति' असे म्हणतां येणार नाहीं ते शास्त्र आहे. तेंही भाषेच्या अनेक शास्त्रांपैकीं एक म्हणून त्याचा भाषेशीं तादात्म्य संबध जोडता येत नाहीं जेस्पर्सननें असा संबध जोडताना भाषा म्हणजे शब्दाचीं निराळीं रूपें अशीच आमच्या व्याकरणकारांसारखी कल्पना करून हें व्याकरणाचे भाषेशीं तादात्म्य केले व्याकरणांत वाजवीपेक्षां फाजील व्युत्पत्तिशास्त्राची भेसळ केल्यामुळें ही भ्रांति त्याला झालेली दिसते. न्यायशास्त्राचा व व्याकरणाचा काय संबध आहे, ते आम्हीं पूर्वी सांगितलेच आहे. न्याय हें शास्त्र म्हणण्यापेक्षां पद्धति म्हणणें अधिक बरोबर होईल. या दृष्टीने उद्गामी व अवगामी ह्या दोन स्वरूपांत विचारास चालना देण्याचें सामर्थ्य न्यायशास्त्रांत असल्यामुळें व्याकरणाचा भाषेपेक्षां न्यायशास्त्राशीं अधिक निकट संबध येतो ही गोष्ट खरी आहे.

सार्वत्रिक व्याकरणाच्या कल्पनेला दुसरेही एक कारण होतें असें **जेस्पर्सन** म्हणतो पूर्वी सांगितल्याप्रमाणें ते व्याकरणकार न्यायशास्त्राचे पक्षपाती होते व त्यांच्या मते लॅटिन भाषेचें व्याकरण हें उपयोजक ( applied ) न्यायशास्त्राचा एक उत्कृष्ट नमुना होता. ह्यामुळें सार्वत्रिक व्याकरण असलें पाहिजे व तेंच लॅटिन ग्रामर ही कल्पना आली ह्यासबंधीं **सेसी** ( Sayse ) ह्या व्याकरणकाराच्या ब्रिटिश साक्लोपिडीयाच्या नवव्या भागांत प्रसिद्ध झालेल्या लेखांतून **जेस्पर्सन**ने पुढील उतारा दिला आहे " The endeavour to find distinctions of Latin grammar in that of English has only resulted in grotesque errors and a total misapprehension of the usage of English language." पुढें **जेस्पर्सन** हे शब्द लक्षांत ठेवण्यास प्रत्येक व्याकरणकारास बजावतो. पण सार्वत्रिक व्याकरणाचा त्याच्याशीं सबध काय हें सांगत नाही. आपल्या इकडेही **गुंजीकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गोडबोले, दामले** इत्यादि व्याकरणकार मराठी व्याकरणावर सस्कृत व्याकरणाचा पगडा असावा असें म्हणतात व त्याप्रमाणें त्यांची प्रत्यक्ष कृतिहि झालेली आहे यामुळें फार तर कोणत्याही एका भाषेचा दुसऱ्या व्याकरणावर पगडा असू नये असे सिद्ध होईल. पण व्याकरण हें न्यायशास्त्राचे एक उपयोजक ( applied ) स्वरूप हे जें न्यायशास्त्राचे म्हणणें, त्याला कशी बाधा येते ? येथे ( Usage ) ह्या **सेसी**च्या शब्दाचाही विचार केला पाहिजे खरें म्हटलें तर भाषेच्या वहिवाटीचा व्याकरणांत विचार करण्याचें कारण नाही **प्रयोगशरणा वैयाकरणाः** हे तत्त्व सर्वास मान्य असलें पाहिजे पण **सेसी**च्या व **जेस्पर्सन**च्या लक्षांतून तें गेलेले दिसते आणि याचें कारण त्यांनीं भाषेचें व्याकरणाशीं केलेलें तादात्म्य हे होय साराश, व्याकरणशास्त्र हें सार्वत्रिक नाहीं, हें सिद्ध करण्याचा **जेस्पर्सन**चा प्रयत्न साधला नाहीं हें स्पष्ट आहे. आमच्या मतें आत्यतिक विभागांच्या दृष्टीनें व्याकरण हें एक सार्वत्रिक शास्त्र आहे. त्या त्या भाषेंतील कांहीं विशेषांच्या दृष्टीनें त्या त्या भाषेचे शास्त्र असेही म्हणतां येईल.

आतापर्यंतच्या विवेचनावरून व्याकरण हें केवळ भाषेचेंच एकमेव एक शास्त्र नसून तें भाषेच्या अनेक शास्त्रांपैकीं एक शास्त्र आहे भाषेंत शब्द व वाक्यें असतात व त्यांचींही स्वतत्र शास्त्रे आहेत कोश व्युत्पत्ति इत्यादि हीं निव्वळ शब्दशास्त्रें आहेत; पृथक्करण हें वाक्यशास्त्र आहे असें दिसून येईल. या दृष्टीनीं पाहिलें तर व्याकरण हें एक शब्दशास्त्र आहे, पण वर सांगितल्याप्रमाणें दुसरींही अनेक शब्द–शास्त्रें आहेत, तीं व्याकरणापासून वेगळीं कशीं आहेत तें दाखविलें पाहिजे. तरच आपणांस निर्भेळ व्याकरणाचा ग्रथ लिहितां येईल

दुसरी गोष्ट अशी आहे कीं, ह्यांपैकीं सर्वांस भाषेची व कांहींस शब्दांची सर्वसामान्य भूमि असल्यामुळें ह्या शास्त्रांचीं क्षेत्रवर्तुळे क्वचित् ठिकाणीं स्पर्श करतात तर, क्वचित् प्रसगीं भेदूनही जातात. व्याकरणातही स्पष्टीकरणार्थ किंवा मूलभूत म्हणून

व्युत्पत्तिशास्त्र, छंदःशास्त्र, उच्चारशास्त्र इत्यादिकांचा कांहीं भाग येथें अपरिहार्य आहे, पण त्या त्या ठिकाणीं त्यांना असलेले गौणत्व व्याकरणकाराच्या लक्षात आलेले दिसत नाहीं. त्यामुळें कुंपणाने शेत खावे त्याप्रमाणें ह्या शास्त्रांचे व्याकरणावर आक्रमण झालेलें आहे. उदाहरणार्थ बिंदु हा अनुस्वार व अनुनासिक ह्या दोन्ही स्वरूपात 'वर्ण' आहे व वर्ण असला तर स्वर आहे की व्यंजन आहे याचा व्याकरणाच्या प्राकृतेय ह्या भागांत विचार अवश्य व्हावा. पण **दादोबा, चिपळूणकर, गुंजीकर** व **दामले** यांनी केल्याप्रमाणे बिंदु कोणत्या शब्दावर असावा याची चर्चा व्याकरणात करण्याची मुळीच जरूरी नाही. बिंदूचा व व्याकरणाचा संबंध आणखी दिकरण या प्रकरणात येतो. म्हणजे नामाच्या व क्रियापदाच्या लिंग, वचन व विभक्तिरूपांत व क्रियापदाच्या लिंग, वचन, काळाच्या रूपात तो बिंदु येतो. समजा उद्या शिष्टमताप्रमाणे 'वासरू' या शब्दावरील बिंदू काढावयाचा ठरलें, तर तो खुशाल जाईल. पण तेव्हांही व्याकरण ते नपुंसक लिंगी नाम असेच सांगेल. तसेंच द्वितीया, तृतीया, षष्ठी इत्यादि विभक्तींचे प्रत्यय कसे झाले या चर्चेला व्याकरणांत स्थान नाही. तो व्युत्पत्तिशास्त्राचा विषय आहे. **चिपळूणकर, गुंजीकर** व **दामले** यांनीं याविषयी पानेच्या पाने खर्ची घातली आहेत. या दृष्टीने पाहिलें तर **राजवाड्यांचें** 'ज्ञानेश्वरीचे व्याकरण' हा व्याकरणग्रंथ असे म्हणताच येणार नाहीं. **राजवाडे** हे इतिहासाचार्य म्हणून प्रसिद्ध होते. तेव्हा त्यांनी त्यातील प्रकरणास (१) वर्णेतिहास (२) आदेशेतिहास (३) आदेश-विभक्ति प्रत्यय-इतिहास अशीं नावे दिली आहेत. अर्थात् हा धडधडीत व्युत्पत्तिशास्त्रावरील ग्रंथ आहे, तथापि ह्या ग्रंथाने व्याकरणविषयक वाङ्मयात एक महत्त्वाची भर पडली, असे **दामले** गंभीरपणाने सांगतात !

पण व्याकरणकार व्याकरणाशी निव्वळ दुसऱ्या शब्दशास्त्राचा, अशा प्रकारचा अन्यथा सिद्ध संबंध जोडूनच थांबले असे नाही. पृथक्करणासारख्या वाक्यशास्त्रालाही त्यांनी व्याकरणात कोंबून टाकलें आहे ! पूर्वकाळांत जीं इंग्रजी व्याकरणाचीं पुस्तकें आपल्याकडे उपयोगात होती त्यावर Grammar and Analysis असें नांव लिहिलेले असे. म्हणजे व्याकरणाबरोबर पृथक्करणही शिकता यावे अशी ती योजना होती. व्याकरणाच्या गळ्यात पृथक्करणाचे लोढणे बांधावे असा तिचा उद्देश नव्हता. **दादो-बांनीं** ही गोष्ट लक्षांत ठेवून आपल्या छोट्या व मोठ्या व्याकरणास पृथक्करणाचा संपर्क लागू दिला नाही. पण पुढे **जोश्यांनी आगरकरांच्या** वाक्यमीमांसेने मराठीस परिचित झालेल्या पृथक्करणास मराठी व्याकरणात कायमचे गुरफटून टाकले व जरी **गुंजीकर** व **दामले** यांनी **जोश्यांस** काही व्याकरणविषयक गोष्टींचा पृथक्करणाशीं नाहक संबंध जोडल्याचा दोष दिला, तरी सामान्यत व्याकरण पृथक्करणाच्या स्वाग-तेस बराचसा हुजोरा दिला. व्याकरण व पृथक्करण हीं स्वभावतःच भिन्न असल्या-मुळे आमच्या नवीन योजनेप्रमाणें लिहिलेल्या व्याकरणात पृथक्करणास मुळीच थारा नाही. पण **दामल्यांनी** उच्च परीक्षात अभ्यासल्या जाणाऱ्या आपल्या व्याकरणात

पृथक्करणाचा बारकाईने विचार केला आहे. म्हणून येथे पृथक्करणाचा त्याच्या व्याकरणविषयक संबंधाने बऱ्याच विस्तारानें विचार करणें भाग आहे यासंबंधी पहिली ध्यानांत ठेवावयाची गोष्ट म्हणजे व्याकरण हें शब्दांचा 'शब्द' या दृष्टीने विचार करते तर पृथक्करण वाक्याच्या 'भागां'चा विचार करते अर्थात् हे भाग शब्दांचेच असतात व्याकरणात शब्दाचे घटक जे वर्ण त्याचा, शब्दाच्या नाम वगैरे जातीचा, लिंग, वचन, पुरुष, काळ, अर्थ वगैरे विकाराचा किंवा शब्दाच्या कर्ता, कर्म यासारख्या परस्पर संबंधाचा बोध होतो पृथक्करणात हे प्रश्न मुळीच संभवत नाहींत पृथक्करणांत अर्थावरून उद्देश्य व विधेय हे दोन मुख्य भाग व उद्देश्यविस्तार, विधेयविस्तार, पूरक इत्यादि वाक्यभागाचा विचार होतो यावरून व्याकरण व पृथक्करण हे किती वेगळे विषय आहेत ते दिसून येईल.

यासंबधीं रा **वामन मल्हार जोशी** यांचे पुढील उद्गार विचार करण्यासारखे आहेत "मराठीत 'वाक्यपृथक्करण' हें एक नवीन 'प्रकरण'च आले आहे हे तर व्याह्याच्या घोड्यासारखे फार अडचणीचें झाले आहे 'रामा आंबे खातो' यात रामा विषयींच मला बोलावयाचे आहे असे गृहीत धरण्यांत येते पण याला आधार काय? खरें म्हटलें तर मला 'रामा आंबे खातो' हे सांगावयाचे आहे केवळ रामाविषयी किंवा आंब्याविषयी किंवा केवळ खातो याविषयी मला बोलावयाचे नाही. यावरून खालच्या पायरीवरचे तर्कदृष्ट्या शुद्ध विचारपृथक्करण केले तर रामा हे उद्देश्य समजून आंबे खातो आहे, हे विधान व आहे हा संयोजक शब्द असे पृथक्करण होईल. पण आपण खातो हें क्रियापद व आंबे हे कर्म असे पृथक्करण करतो! 'त्याने काम केले' यात घोटाळ्यात घोटाळा असा कीं, विद्वान लोक यांतील 'उद्देश्य' काय याविषयीं भांडत आहेत भावे प्रयोगांत उद्देश्यच नाही, असे रामभाऊ जोशी यांनीं वेडेपणा पत्करून जें लिहिलें आहे, त्याचें कारण त्याना इंग्रजीवरून वाक्यपृथक्करण करण्याचे ठाऊक होते, पण ही पद्धति मराठीला कितपत लागू पडेल याचा त्यानी खोलवर विचार केला नाहीं, शिवाय वाक्यपृथक्करण हे तर्कदृष्ट्याच शास्त्रशुद्ध विचारपृथक्करण नव्हे. किंवा व्याकरण-दृष्ट्या पदसंबंध दाखविणारेंही पृथक्करण नव्हे तर आधलें मधलें व्यावहारिक स्वरूपाचें पृथक्करण आहे. अर्थात् यांत कांटेतोल शास्त्रशुद्धतेपेक्षां सामान्य व्यावहारिक सोईकडे अधिक लक्ष दिले जाते, हीही गोष्ट पुष्कळ लोक विसरतात व त्याच्या उपयुक्ततेच्या व शुद्धतेच्या मर्यादांकडे दुर्लक्ष करून शब्दाकरतां भांडतात"

(पुस्तकपरीक्षण—मराठी व्याकरणकार. मार्च १९२८ **विविधज्ञान विस्तार**)

येथें मराठी पृथक्करणाचा इतिहास थोडक्यांत देणे युक्त होईल 'पृथक्करण' हा प्रकार इंग्रजीतून मराठीत आला. **दादोबांनी** आपल्या व्याकरणात त्याचा समावेश केला नव्हता. पुढें **गोडबोल्यांनी** आपल्या व्याकरणात त्याची थोडीशी चर्चा केलेली दिसते. पण ती बेताचीच. **दादोबांनीं** ज्या व्याकरणाच्या आधाराने आपले व्याकरण रचल, त्या **मरे**प्रभृति व्याकरणकारांनी पृथक्करणाचा आपल्या व्याकरणांत

विचार न केल्यामुळें **दादोबांनींही** तिकडे लक्ष दिले नसावे. पुढे **डेव्हिडसन**सारख्याच्या व्याकरणात व्याकरणाबरोबरच पृथक्करणाचाही विचार केलेला दिसतो किंबहुना आपल्या पुस्तकास नुसते 'ग्रामर' हें नांव न देता 'ग्रामर व ॲनलिसिस्' असेंच नांव त्यांनीं दिलें यावरून हें दोन विषय निराळे आहेत, पण दोन्ही भाषाविषयक असल्यामुळे शालेय अभ्यासाच्या सोयीकरताच त्याचा एकत्र समावेश करण्यांत आला असे दिसून येते या विषयाचा स्वतंत्र रीतीने विचार मराठीत पहिल्यानें **आगरकरांनीं** आपल्या 'वाक्यमीमांसा' या ग्रथांत केला. पुढें **जोश्यांनीं** तत्कालीन इंग्रजी व्याकरणास अनुसरून 'व्याकरण' व 'पृथक्करण' यांचा सांधा जुळविण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्याना मुळीच यश आले नाहीं. उलट **दामले, वामनराव जोशी**—सारख्याकडून वरीलप्रमाणे कडक टीकेस ते पात्र झाले आमच्या मतें या बाबतींत **आगरकर**च बरेचसे जबाबदार आहेत. यासबधींचे त्याचे पुढील उद्गार पाहा ''

''वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चालले पाहिजे व चालेल तितके बरें. ज्या ठिकाणीं उभयतात अपरिहार्य तेढ पडेल, त्या ठिकाणीं दोघांनीं दोन वाटा धरल्या तरी हरकत नाहीं. पण जर तशी स्थिति नसेल तर एकमेकानीं एकमेकाच्या सलोख्यानें असावें हेच योग्य आहे. अशानें व्याकरणापासून वाक्यमीमांसेला व वाक्यमीमांसेपासून व्याकरणाला मदत मिळण्याचा व बळकटी येण्याचा सभव आहे. या दृष्टीने विचार करतां, प्रथमा, तृतीया व चतुर्थी या विभक्तींशिवाय इतर विभक्ति उद्देश्यस्थानीं फार वेळ येतील असें वाटत नाहीं यासाठीं पुढील वाक्यपृथक्करणांत प्रस्तुत व्याकरणास धरून प्रथमा, तृतीया किंवा क्वचित् प्रसगीं चतुर्थी या विभक्तींहून इतर विभक्तींत असलेले शब्द बहुशः विधेय क्रियाविशेषणांसारखे मानले आहेत '' या ठिकाणीं वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चाललें पाहिजे हा जो दडक **आगरकरांनीं** घातला, तोच चुकीचा आहे. व्याकरण हें निव्वळ शब्दशास्त्र आहे व पृथक्करण हें एकप्रकारचें वाक्यशास्त्र आहे. पृथक्करणांत शब्दांचा शब्द म्हणून नव्हे तर वाक्यभाग म्हणून विचार होतो. अर्थात् तेथें शब्दशास्त्र जें व्याकरण त्याचा कांहीच सबध नाहीं. तेव्हां त्यांनीं पृथक्करणातील उद्देश्याशीं विभक्तीचा व पर्यायाने व्याकरणाशीं सबध उगाच जोडला आहे पण पृथक्करणाचा व्याकरणाशीं दूरतः का होईना, थोडासा सबध असू शकेल व पृथक्करणास व्याकरणाची थोडीशी मदत होईल पृथक्करणांतील शब्द वाक्य भाग असतात. पण व्याकरणांतील शब्द हे वाक्यभाग नसल्यामुळें व्याकरणात पृथक्करणाचा उल्लेख करणें अगदीच चुकीचे होईल. व्याकरणाला पृथक्करणाच्या मदतीची मुळींच अपेक्षा नाहीं. **आगरकरां**च्या शब्दांचा फायदा **जोश्यांनीं** घेऊन उद्देश्य प्रथमेतच असावा असा हट्ट धरला व अशा रीतीनें व्याकरणाचा पृथक्करणांत विभक्तिद्वारें चचूप्रवेश झाल्यामुळे पुढें प्रयोगादि घटनांद्वारे मुसलप्रवेश करण्याची सधि **जोशी, दामले** वगैरे व्याकरणकारास मिळाली !

व्याकरणाचा पृथक्करणाशीं जो थोडा संबध आहे असें वर सांगितले, तो 'कर्ता' व 'क्रियापद' या व्याकरणांतील पदसंज्ञाच्या द्वारें उत्पन्न झाला आहे 'उद्देश्य' व 'विधेय' असे वाक्याचे दोन भाग पृथक्करणांत पडतात, त्यांना अनुक्रमें 'कर्ता' व 'क्रियापद' हे पायाभूत शब्द आहेत. यासबधीं मूळ इंग्रजींतच एक संज्ञाविषयक चूक झाली ती अशी कीं 'विधेयाला व्याकरणनिरपेक्ष' 'प्रेडिकेट' असें नांव दिलें. पण 'उद्देश्या'ला व्याकरणांतील कर्त्याला प्रतिशब्द जो 'सब्जेक्ट' तेच नांव दिलें मराठींत हा घोटाळा **आगरकरांनीं** 'उद्देश्य' व 'विधेय' ह्या संज्ञा निर्माण करून दूर केला आहे. यानतर पुढें खडवाक्याना (clauses) नामवाक्य, विशेषणवाक्य व क्रियाविशेषणवाक्य अशा व्याकरणविषयक संज्ञा मूळ इंग्रजींतच उत्पन्न होऊन मराठींतही भाषांतरित होऊन आल्या पण मराठींत यानतर विभक्ति व प्रयोग याच्याद्वारें वर सांगितल्याप्रमाणे पृथक्करणाशीं सबध जोडण्यांत आला तो शुद्ध 'अव्यापारेषु व्यापार' झाला ! कारण क्रियापदास लिंग नसल्यामुळे प्रयोग इंग्रजींत नाहींच व विभक्तिही तीनच असल्यामुळे आणि षष्ठीशिवाय बाकीच्यांना प्रत्यय नसल्यामुळे विभक्तीला जवळ जवळ पृथक्करणांत महत्त्वच नाहीं तेव्हा येथे **वामनराव जोशी** म्हणतात त्याप्रमाणे चूक, पृथक्करण मराठी भाषेस अनुकूल नसतां ते मराठींत आणले, ही नसून, मराठींत ते आल्यावर त्याचा व्याकरणाशीं बादरायण सबध जोडून देण्यांत आला ही होय

दुसरी मोठी चूक म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें व्याकरण हे शब्दशास्त्र व पृथक्करण हे वाक्यशास्त्र तेव्हां दोन्ही शास्त्रांचा अर्थाअर्थी काहींच सबध नाही ही गोष्ट **आगरकर** पृथक्करणविषयक स्वतंत्र ग्रंथ लिहित असतां त्यांच्या लक्षांत आली नाहीं वाक्यपृथक्करण हे तर्कदृष्टीचें शास्त्रशुद्ध विचारपृथक्करण नव्हे, किंवा व्याकरणदृष्ट्या पदसबध दाखविणारें पृथक्करण नव्हे, असें **वामनराव जोशी** म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. पण हा आधला मधला व्यवहार कोणता हे ते सांगत नाहींत व त्यासबधी त्यांना स्वतःला कांहीं कल्पना होती की काय याविषयीं संशयच आहे ! हा व्यवहार म्हणजे निव्वळ शाळेपुरता आहे, ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेवली पाहिजे. बाकीचे गणित, भाषा, इतिहास, भूगोल त्याप्रमाणेंच व्याकरण विषयाशी वर सांगितल्याप्रमाणे सबंध असलेला हा विषय आहे. तेव्हां उद्देश्य या पृथक्करण भागांत व्याकरणांतील कर्ता व विधेय ह्या भागात व्याकरणांतील क्रियापद हीं आलीच पाहिजेत एवढी गोष्ट लक्षात ठेवली, म्हणजे मग पृथक्करणाचा व व्याकरणाचा कोणताही सबध नाहीं. पृथक्करण मराठी भाषेस कितपत योग्य आहे ह्याविषयीं आपणास येथें कर्तव्य नाहीं. येथे आपणास एवढेच पाहावयाचें आहे कीं व्याकरण व पृथक्करण हीं शास्त्रे वेगळीं असल्यामुळे व्याकरणांत पृथक्करणाचा समावेश करावयाचा नाहीं.

याप्रमाणें महानुभावांच्या भाषेंत सांगावयाचे म्हटले म्हणजे व्याकरणाच्या अस्तिपरी (सामान्य स्वरूप) व अन्यव्यावृत्ति यांचा विचार केल्यावर आतां त्याच्या तात्त्विक स्वरूपाची विशेष बारकाईनें चिकित्सा करणे युक्त होईल ही चिकित्सा त्यांतील विषय-

विभागणी, ग्रथरचना, विषयविवेचन इत्यादिकांच्या अनुरोधाने झाली पाहिजे हें उघड आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें **जेस्पर्सन**ने पहिल्या विषयाचा चागलाच खल केला आहे. तो व्याकरणाच्या विभागणीचे ( १ ) जुना म्हणजे मागच्या वैयाकरणानीं तिकडे स्वीकारलेला, ( २ ) नवा म्हणजे त्यानें स्वतः सुचविलेला, असे दोन प्रकार सांगतो. पहिल्या पद्धती-प्रमाणें व्याकरणाचे ( १ ) प्राकृतेय ( accidence ), ( २ ) शब्दघटना (Word formation ) व ( ३ ) वाक्येय ( Syntax ) असे तीन भाग पडतात.

आपल्याकडील सर्व वैयाकरणानीं या पाश्चात्य विभागणींचेंच अनुकरण केले आहे व व्याकरणाचे ( १ ) वर्णविचार ( २ ) शब्दविचार व ( ३ ) वाक्यविचार असे तीन भाग पाडले आहेत ही जुनी विभागणी अनेक कारणानी अशास्त्रीय आहे, असें **जेस्पर्सन** म्हणतो. आपल्या समर्थनार्थ इग्रजी व्याकरणांतील काहीं गोष्टींचा त्याने आधार दिला आहे वर **दामल्यांनी** अखेरीस ठरविलेले विभाग आम्हीं दिलेले आहेत. हे वरवर पाहिले तरी कसे अशास्त्रीय आहेत हे सहज दिसेल पहिल्यानें व्याकरण हें शब्दशास्त्र असल्याने त्याच्या एकाच प्रकारांत शब्दाचा विचार होतो हे म्हणणे बरोबर नाहीं वर्णविचार ह्या भागांत केवळ वर्णाचाच विचार होतो असे नाहीं तर अक्षरें म्हणजे प्रत्यय, उपसर्ग यांचा व अन्य शब्दसाधित शब्दांचा विचार होतो तसेंच व्याकरणांत पृथक्करणाचा तें वाक्यशास्त्र नसल्यामुळें विचार होत नाही **दादोबांनीं** ( Syntax ) वाक्यरचना म्हणजे शब्दाची वाक्यांत रचना, हा शब्द योजला आहे. या भागांतही शब्दाचाच विचार होतो. पण तो प्रातिपदिक व पद या नात्यांनीं पण या सबधींच्या अडचणीचा त्या त्या प्रसगीं मुख्य व्याकरणग्रथात विचार करू सध्या **जेस्पर्सन** आपल्या नव्या पद्धतीविषयी काय सागतो ते पाहू. त्यानतर आपलाही मार्ग चोखाळावयास ठीक पडेल

**जेस्पर्सन** व्याकरणाचे ( १ ) Morphology ( व्यौत्पतिक्य ) व ( २ ) Syntax ( वाक्येय ) असे दोन भाग करतो. Morphology या शब्दाच्या नेहमींच्या व्युत्पत्तिविषयक अर्थाशिवाय निराळ्याच अर्थाने आपण योजला आहे, असें **जेस्पर्सन** कबूल करतो. आपल्या समर्थनार्थ **जेस्पर्सन**ने, **स्वीट** या वैयाकरणाचें पुढील मत उद्धृत केलें आहे. " That part of grammar which concerns itself specially with forms and ignores their meaning as much as possible is called accidence. That part of grammar which ignores distinction of forms and concentrates on their meaning is called syntax." **जेस्पर्सन**ची 'ignores as much as possible' या शब्दात दोन्ही म्हणजे रूप ( form ) व अर्थ ( meaning ) या दृष्टींनीं हरकत आहे. किंबहुना तो शब्दापेक्षां अर्थालाच महत्त्व देतो. त्यानें पुढें **ब्रूनो** या फ्रेंच व्याकरणकाराच्या केवळ अर्थालाच प्राधान्य देणाऱ्या मताचा उल्लेख केला आहे. मात्र हें मत त्याला पसत

नाहीं. आमच्या मते तिहींत **स्वॅटचें** मतच अधिक ग्राह्य ठरते. यासबधीं कोश, व्युत्पत्ति, व व्याकरण हीं तिन्हीं शास्त्रें जमेस धरून विचार केला पाहिजे. कोशात शब्दाच्या अर्थालाच महत्त्व असतें त्याचें रूप आहे तसे दिलेले असते व्युत्पत्ति दिलेली असते पण तिची चर्चा नसते व व्याकरण तर नसतेच व्युत्पत्तिशास्त्रांत अर्थ व रूप याना सारखेच महत्त्व असते तेथे कोशशास्त्राला अवसर आहे. पण व्याकरणात अर्थाला अगदी बेताचे महत्त्व असते त्याच्या पहिल्या म्हणजे प्राकृतेय ( Accidence ) या भागात थोडीशी व्युत्पत्ति असते दोन्ही भागांत रूपाला महत्त्व आहे, पण दोन्ही भागात अर्थाकडे जेमतेमच लक्ष द्यावयाचे असते पहिल्या भागात रूपाला प्राधान्य आहे व दुसऱ्या भागात त्याच्या अर्थाला प्राधान्य आहे अर्थात् **ब्रूनोचें** अर्थाला सर्वस्वी प्राधान्य देण्याचे मत जसे चुकीचे तसेच **जेस्पर्सनचें** अर्थाला अवास्तव प्राधान्य देणारें मतही चुकीचे आहे वस्तुस्थिति अशी आहे की, पहिल्या भागात अर्थाकडे प्रारभी अगदी दुर्लक्ष करावयाचें असते वर्ण, अक्षरे, सधि इत्यादि प्रकरणात अर्थाची अपेक्षाच नसते पुढे प्रत्यय, उपसर्ग वगैरेची चर्चा करताना अर्थाचा थोडासा सबध येतो व सयुक्त, सामासिक, धातुसाधित या दृष्टीनी तो शक्य तितका पुरा होतो दुसऱ्या भागात वर्गीकरणाच्या निमित्तानें अर्थापासून सुरवात होते व मध्ये विकरण या भागात अर्थाला व रूपाला सारखेच महत्त्व मिळून अखेरीस वाक्यरचनेच्या प्रसगानें अर्थासच प्राधान्य येतें

आम्ही ( १ ) **प्राकृतेय** व ( २ ) **वाक्येय** असे **जेस्पर्सन**प्रमाणें दोन विभाग केले आहेत. **गुंजीकरांना**ही हे समत आहे हे मागे दिलेल्या त्यांच्या शब्दाच्या व्याख्येवरून दिसून येईल पहिल्या भागात शब्द हीच सज्ञा घेतली आहे अर्थात् येथे शब्दाचे प्राकृतिक स्वरूपच अभिप्रेत आहे व तदनुसार शब्दाचे वर्गीकरण केले आहे प्राकृतेयाचे ( १ ) अन्तर्घटणा ( २ ) बाह्यघटणा असे दोन भाग कल्पिले आहेत पहिल्या भागात जुन्या व्याकरणकाराच्या वर्णविचाराचाच समावेश होतो ( २ ) बाह्यघटणा ( अ ) प्रत्ययानी व ( ब ) शब्दानीं आरभीच ज्यांची बाह्यघटणा होते तेच शब्द दृष्टीसमोर ठेऊन पूर्वोक्त वर्गीकरण केले आहे त्याप्रमाणेच शब्दाचे ( १ ) पूर्णार्थ शब्द ( २ ) अर्धार्थ शब्द ( ३ ) इषदर्थ शब्द व ( ४ ) निरर्थक शब्द असे चार प्रकार केले आहेत अर्थात् येथे अर्थराहित्य हेच भेदक लक्षण आहे अर्धार्थ शब्दात ( १ ) सर्वनाम ( २ ) उभयान्वयी ( ३ ) केवलप्रयोगी हे शब्द येतात. ( २ ) इषदर्थ शब्दात ( १ ) धातु, क्रिया व ( २ ) उपसर्ग याचा समावेश होतो. ( ३ ) निरर्थक शब्दात ( १ ) शब्दयोगी व ( २ ) सयुक्त शब्दांत येणारे साह्य कृदत व अन्य शब्द येतात यानतर प्रत्ययघटणेच्या प्रकारात प्रत्ययाचे ( १ ) साधक ( २ ) दर्शक व ( ३ ) विशिष्ट अर्थप्रतिपादक असे तीन प्रकार आहेत पहिल्यात ळू ( लाजाळू ) पणा ( थोरपणा ) इत्यादि निव्वळ अर्थसाधक प्रत्ययाचा समावेश होतो. या दृष्टीनें खुद्द शब्दांचे ( १ ) सिद्ध आणि ( २ ) साधित असे प्रकार होतात.

( २ ) विकरणार्थ प्रातिपदिक प्रत्यय म्हणजे विभक्ति, काळ, अर्थ इत्यादि विकार दाखविणारे प्रत्यय. ( ३ ) तादात्म्य, मर्यादा इत्यादि अर्थ दाखविणारे च, ही, ना, मात्र, देखील, सुद्धां हे प्रत्यय ( ह्यांना आजपर्यंत शुद्ध शब्दयोगी अव्ययें मानीत आले आहेत. ) याशिवाय ( १ ) **आदिम** म्हणजे ज्यांच्यापुढें दुसरे प्रत्यय येतात ते व ( २ ) **अंतिम** म्हणजे ज्यांच्यापुढे दुसरे प्रत्यय येत नाहींत ते. पण हा भेद महत्त्वाचा नाही. शब्द सर्वच साधक असतात म्हणून सयोगाने बनलेल्या सर्व शब्दांस साधित शब्द म्हणतात ह्याचे दोन प्रकार आहेत ( १ ) सयुक्त ( २ ) सामासिक येथे **प्राकृतेय** हा भाग पुरा होतो

**वाक्येय** हा व्याकरणाचा दुसरा भाग होय. उपोद्घातानतर याचे ( १ ) पद-सिद्धि ( विकरण ) ( २ ) पदयोजना व ( ३ ) पदसबध असे पोटभाग पडतात. येथे शब्द अशी संज्ञा न योजतां प्रातिपदिक व पद अशा दोन सज्ञा आम्ही योजिल्या आहेत. प्रातिपदिक याचा अर्थ पद होण्यास योग्य असा शब्द. ' पद ' म्हणजे पूर्णपणे विकरणावस्थेत पोहोचलेला शब्द यासबधीं अधिक खुलासा पुढे होईल. प्रातिपदिकांचे विकारी व अविकारी असे दोन प्रकार आहेत. विकारी प्रातिपदिकाचा विचार विकरण या प्रकरणात होईल. विकारी प्रातिपदिकाचे ( १ ) वास्तविक ( Substantives ) व ( २ ) कैयिक असे मुख्य दोन प्रकार पडून या दोहोंपैकी पहिल्याचे ( १ ) नाम, सर्वनाम व विशेषण व दुसऱ्याचे क्रियापद व क्रियाविशेषण असे दोन प्रकार पडतील विकार हे दुसरे भेदक तत्त्व घेतलें, तर यापैकी क्रियाविशेषणाचे क्रियाविशेषण व क्रिया-विशेषण अव्यय असे दोन प्रकार पडतात. यावरून वर्गीकरण हा सर्व पूर्व वैयाकरणानी ठरविल्याप्रमाणे व्याकरणाचा एक स्वतत्र भाग नसून इतर शास्त्राप्रमाणे कार्यवशात् व्याकरणाच्या दोन्ही भागांत योजलेली पद्धति आहे असे दिसून येईल. पहिल्या भागात घटणेच्या सोयीसाठी शब्दाचे वर्गीकरण केले आहे तर दुसऱ्या भागात प्रातिपादिकांच्या विकरणाच्या सोयीसाठीच त्याचा अवलब करण्यात आला आहे याशिवाय या दुसऱ्या भागांत विकरण व पदरचना याचा समावेश झाला आहे विकरण या भागात प्रत्ययानी व शब्दानी, प्रातिपादिकांना लिग, वचन, विभक्ति, काळ, पुरुष, अर्थ इत्यादि विकार कसे होतात यासबधीची चर्चा होईल. पदरचना ह्या भागात शब्द वाक्यांत योग्य अनुक्रमाने निरनिराळ्या प्रतिपादिकाची रूपें जुळून किंवा निराळ्या रचनांनीं कसें येतात याविषयी विचार होतो. अर्थात् याही प्रकरणात विकरणालाच महत्त्व आहे

येथे वर्गीकरणासबधी जरा विस्ताराने विचार करणे जरूरीचे आहे **जेस्पर्सननें** या बाबतीत पुढील मत प्रदर्शित केले आहे. तो म्हणतोः-

It is customary to begin the teaching of grammar by dividing into certain classes generally called "Parts of speech," substantives, adjectives, verbs etc., and by giving definitions of these classes. The

division in the main goes back to the Greek and Latin Grammarians with a few additions and modifications. But the definitions are very far from having attended the degree of exactitude found in the Euclidian Geometry Most of the definitions given in the recent books are little better than sham definitions in which it is extremely easy to pick holes Nor has it been possible to come to a general arrangement as on what, the distinction is to be based, whether on form and form changes or meaning or function in the sentence or on these combined ( Page 58 )

आमचीं व्याकरणे अगदीं आरभापासून इग्रजी व्याकरणावरूनच लिहिली गेल्यामुळे वर्गीकरण व व्याख्या यासबधी **जेस्पर्सननें** केलेली टीका त्यांना पूर्णपणे लागू पडते **कृष्णशास्त्र्यां**पासून **दामल्यांपर्यंत**च्या सर्व व्याकरणकारानीं मागील व्याकरणकारांच्या व्याख्याची छिद्रें काढून दाखविली आहेत पण त्यांच्या स्वत.च्या व्याख्या तेवढयाच प्रमाणात सदोष राहिल्या आहेत स्वत **जेस्पर्सननें** या बाबतींत पूर्व वैयाकरणांचे दोष दाखविण्या पलीकडे फारसे काही केलें नाहीं थोडेसे दोष दाखविल्यावर आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणे आडवळण घेऊन प्राथमिक व्याकरण कसे शिकवावे यासबधीची चर्चा त्याने केली आहे ! व शेवटी प्राथमिक व्याकरणाची चर्चा करण्याचा आपला हेतु नाही असे सांगून या प्रश्नाचा कांहीही निकाल न देतां तो तेथेच सोडून दिला आहे ! आमच्या मते वर्गीकरण व व्याख्या ह्याना व्याकरणातच नव्हे, तर सर्व शास्त्रात महत्त्व आहे किंबहुना वर्गीकरण व व्याख्या हाच आधुनिक शास्त्रीय ग्रथरचनेचा मुख्य विशेष आहे तसेच हे वर्गीकरण व व्याख्या आरभीच व्याकरणाचा एक स्वतत्र भाग म्हणून असाव्यात असें नाहीं, तर अथपासून इतिपर्यंत सर्वत्र असल्या पाहिजेत. जुन्या वर्गीकरणासबधाच्या व्याख्यात अनेक भेदक तत्त्वाचा अवलब झाल्यामुळे त्या अतिशय तर्कदुष्ट झाल्या आहेत हा **जेस्पर्सनचा** आरोप खरा आहे आम्ही आमचे वर्गीकरण व्याख्या प्रसगपरत्वे एकाच भेदक तत्त्वाचा अवलब करून केल्या आहेत प्राकृतेय या भागांत आम्हीं शब्द, वर्ण, प्रत्यय त्यांचें वर्गीकरण यांच्या व्याख्या केल्या आहेत येथें रूपाला ( form ) प्राधान्य दिले आहे व तेच भेदक तत्त्व आहे. शेवटीं शेवटीं क्वचित् अर्थ व रूप असें दुहेरी भेदक व तत्त्वही स्वीकारले आहे दुसऱ्या म्हणजे वाक्येय या भागांत प्रथम म्हणजे विकरणाच्या भागात अर्थ व रूप हे सयुक्त भेदक योजले आहे. वस्तु व क्रिया यासबधाचे भेद अर्थाचे आहेत. तर विकारी व अविकारी हे भेद रूपाचे आहेत. या भागांत रूपालाच महत्त्व देणारी ‘ शब्द ’ ही सज्ञा न वापरतां ‘ प्रातिपदिक ’ व

'पद' या अर्थाला प्राधान्य देणाऱ्या संज्ञा योजल्या आहेत. अर्थात् आतां वर्गीकरण किंवा व्याख्या करावयाच्या त्या 'शब्दा'च्या नसून 'प्रातिपदिका'च्या हें अभ्यासकाच्या सहज लक्षात येईल

'पद' हा शब्द पुढील पदसिद्धि व पदयोजना त्या भागांत सोयीचा म्हणून स्वीकारला आहे वास्तविक प्रातिपदिक व पद यामध्ये म्हणण्यासारखा फरक नाही. सारी प्रातिपदिके वाक्यात आली म्हणजे पदें होतातच 'पद' या संज्ञेचा फायदा एवढाच की दुसऱ्या भागाला जरी 'वाक्येय' असे नाव दिले आहे, तरी याच्या पोटभागांना, पदसिद्धी व पद योजना अशी नावे देता येतील व्याकरण सागणें या भागास व्याकरणकथन असे स्वतत्र नाव देता येईल. यामुळें 'वाक्याची' व्याख्या सुद्धां न करता व्याकरणाचा अगदी वाक्यनिरपेक्ष विचार करता येईल **दामल्यांनीं** व्याकरण सागणे याला 'पदपरिस्फोट' असे नाव दिले आहे आम्हीं व्याकरणकथनाचे तीन भाग करून त्याना ( १ ) शब्दपरिस्फोट ( २ ) पदपरिस्फोट व ( ३ ) मिश्र किंवा शब्द-पद-परिस्फोट अशीं नावे दिलीं आहेत.

यानतर पूर्वोक्त प्रश्नांपैकीं व्याकरण ग्रथरचनेच्या पद्धतीसबधी विचार करू या प्रश्नाकडे दोन दृष्टीनीं पाहता येईल. पहिली दृष्टि इतिहासाची येथे आपल्या जुन्या **पाणिन्यादि** व्याकरणकारांनीं अवलबिलेल्या पद्धतिनुसार व्याकरणग्रथाची रचन करावयाची कीं आधुनिक पाश्चात्य पद्धतीप्रमाणे करावयाची असा प्रश्न उद्भवतो याच प्रश्नात मराठी भाषा व तत्सम देशी भाषाचे व्याकरण सस्कृत भाषेच्या व्याकरणानुसार लिहावे कीं इंग्रजी व्याकरणानुसार लिहावे, या प्रश्नाचाही अन्तर्भाव होतो. दुसरी दृष्टि विवेचनाची, म्हणजे ऊहापोह करण्याची पद्धति अर्थात इंग्रजी पद्धतीचा स्वीकार झाला, तर व्याख्या, वर्गीकरण इत्यादिकाचा उपयोग करणे क्रमप्राप्त होते तसेच तर्क (Logic) हा इंग्रजी पद्धतीचा मुख्य विशेष असल्यामुळे त्याच्या दोन शाखा ज्या 'उद्गामी' (Inductive) व अवगामी (Deductive) याचाही योग्य प्रमाणांत अवलब झाला आहे हें पाहिले पाहिजे

पद्धतीसबधींचा प्रश्न व्याकरण शास्त्रापुरताच नसून, निरुक्त, कोश, छद इत्यादि इतर भाषाशास्त्रे व गणित, ज्योतिष, वैद्यक इत्यादि अन्य शास्त्रासबधीही आहे. आपली जुनी पद्धति म्हणजे सूत्रपद्धति सर्वनामाची व्याख्या सांगावयाची तर 'सर्व' आरभी आहे, अशा शब्दाची यादी करावयाची. हीच पद्धती कोशांत योजलेली दिसते या पद्धतीचे पुढे कारिका, वृत्ति, भाष्य इत्यादि पद्यगद्य प्रकारात रूपान्तर होऊन, विवेचनात अधिक तर्क, स्पष्टता व सुबोधता यांना वाव मिळाला समितीतील वादविवादप्रसगात व आश्रमात आचार्यांच्या व्याख्यानात पूर्वपक्ष, उत्तरपक्ष इत्यादि ठरीव रटाळ्यांच्या द्वारे काय तोंडी चर्चा होत असेल ती असो, पण पुढें वृत्ति, कारिकादि प्रकार जागच्या जागी राहून शेवटी शुष्क व निर्जीव अशी टीकापद्धतीच राहिली. दृष्टांताची पूर्व काळीं मार्मिक रीतीनें योजना होई. पण पुढे पुढें दृष्टांतही तेच तेच योजण्यांत आले. या बाबतींत

**पंडितरायांनीं** वैयाकरण, नैयायिक व वेदांतीयास दिलेले "वदतु कतिचिद्घटात् खफछठेति वर्णान्छटान् । घटःपट इतीतरे पटुरटतु वावपाटवात्" हे टोले किती समर्पक आहेत हे अभ्यासकास सहज कळून येण्यासारखे आहे

जुन्या व्याकरण पद्धतीचा दुसरा विशेष म्हणजे विकरणासबंधी योजलेल्या लिट्, लट्, इ या अर्थनिरपेक्ष सूत्र पद्धतीस अनुकूल अशा सज्ञा यान्या उलट आधुनिक पद्धतीचे मुख्य विशेष म्हणजे उद्गामी व अवगामी या तार्किक पद्धतींवर अवलबून तयार केलेल्या व्याख्यांच्या द्वारे सामान्य नियम बसविले पाहिजेत. उदाहरणे द्यावींत व अपवादही सागितले पाहिजेत व आपले म्हणणे कार्यकारणात्मक विवेचनानें सिद्ध केले पाहिजे सज्ञा या शब्दरूपीच असावयान्या पण त्या त्यान्या खास पारिभाषिक अर्थानें योजावयान्या त्यांचा यौगिक अर्थ करावयाचा नाही इत्यादि होत, अर्थात् या दोन पद्धतीपैकी कोणत्या पद्धतीचा स्वीकार व्याकरणकारानी करावयाचा ते **'पुराणमित्येव न साधु सर्वम् । न चापि सर्वं नवमित्यवद्यम् सन्तः परीक्ष्य अन्यतरद्भजन्ति '** हे **कालिदासाचें** वचन डोळ्यापुढे ठेवूनच केले पाहिजे आणि एकदा जी पद्धति स्वीकारली, ती निर्भेळ रीतीनें कायम ठेवली पाहिजे

खरे म्हटले तर मराठी भाषेच्या व्याकरणाच्या दृष्टीने हा निर्णय पूर्वीच म्हणजे **दादोबादिकांनीं मरे, बेन, हावर्ड** इत्यादिकान्या व्याकरणानुसारे आपआपली पुस्तके लिहिली, तेव्हाच झाला आहे **जोशी, दामले** वगैरे अलिकडील व्याकरणकारानी सरसकट याच पद्धतीचा अवलब केला आहे पण **जोश्यांनी** प्रातिपदिक सारख्या सज्ञा व **दामल्यांनी** लट, लिङ, लुङ्चे आधुनिक अवतार लाख्यात, ताख्यात इत्यादि जणो काय अभ्यासकाचा मार्ग अधिक खडकाळ करण्यासाठीच मराठी व्याकरणात घुसविलेले दिसतात **राजवाड्यांनीं** तर आपल्या तथाकथित 'ज्ञानेश्वरीच्या व्याकरणा'त ह्या लट्, लोटचा कडेलोट केलेला दिसतो पुढील मासला पहा "लट्मध्ये मराठीनें अपभ्रशाला सोडून महाराष्ट्रीचे जास्त अनुकरण केले आहे लिङ्, लोट व लङ् यात महाराष्ट्रीचेच मराठीनें अनुकरण केले" आपल्या पूर्वोक्त लेखांत **वामनराव जोशी** म्हणतात, "व्याकरण साम्राज्यातील सज्ञारूपी नोकरशाहीन्या ताब्यात आपण इतके गेलो आहो की आता एक वेळ राजकीय स्वातंत्र्य मिळेल पण व्याकरणात्मक मिळणे दुरापास्त, असे मला वाटते." याचे कारण वरील **राजवाड्यां**सारख्याचे प्रलाप ! अलिकडेही पुष्कळ लोक जुन्या व्याकरण पद्धतीचाच पुरस्कार करतात ! पण या जुन्या पद्धतीचे व्याकरण कसे लिहावें ते कोणी सोदाहरण दाखवून देत नाही !

व्याकरणकारास अनेक भाषाचे ज्ञान असावे लागते असा समज आहे हे ज्ञान व अभ्यास जितके जास्त तितका त्याने केलेला व्याकरण ग्रथ उत्तम ! **दादोबांना** फारशी माहित होतें, पण सस्कृतचा फारसा अभ्यास नव्हता **गोडबोल्यांना** संस्कृत चांगले येत होतें व फारशीचाही थोडाबहुत अभ्यास होता. इत्यादि गोष्टींवरून त्या त्या व्याकरणकारांच्या ग्रथाची महति ठरविण्यांत आली ! **वामनराव** जोश्यांची तशीच

समजूत असावीसें दिसतें. आपल्या उपरिनिर्दिष्ट लेखांत ते म्हणतात, " मराठी व्याकरणावर अधिकारवाणीनें लिहिलेला ग्रंथ अद्यापि व्हावयाचा आहे. असा ग्रंथ लिहिणाऱ्याला वैदिक संस्कृत, अभिजात सस्कृत, महाराष्ट्री, शौरसैनी इत्यादि प्राकृत भाषा, फारसी उर्दू, हिंदी, कानडी, गुजराती इत्यादि भाषा आल्या पाहिजेत निदान या सर्व भाषांची त्याला बेतापुरती जानपछान पाहिजे पण असा व्याकरणकार लाभेल तो सुदिन. तिथपर्यंत सज्ञारूपी नोकरशाहीचा जुलुम किंवा मधून मधून अराजकांची बडाळीच चालणार."
आमच्या मते **जोशीबुवांनी** भाषानैपुण्याविषयी जो आग्रह धरला आहे, तो बरोबर नाहीं. मराठीचे उत्तम ज्ञान असलें पाहिजे ही गोष्ट खरी आहे. पण सस्कृतचे बी ए. च्या परीक्षेपर्यंत झालेलें ज्ञान पुरेसं आहे असे वाटतें. इतर भाषांच्या प्रत्यक्ष अभ्यासाची मुळींच जरूर नाही इंग्रजी भाषेचें मात्र चागलेच ज्ञान पाहिजे कारण त्या भाषेच्या द्वारे **जोश्यांनीं** सांगितलेल्या सर्व भाषासबधी व्याकरण व इतर भाषाशास्त्रासबधीं पुस्तके वाचलीच पाहिजेत

इतर भाषाच्या अभ्यासामुळे इष्ट भाषेचे व्याकरण लिहिताना काही उलट अडचणीच उत्पन्न होतात पहिली गोष्ट म्हणजे आपल्या भाषेंत जे नाही ते इतर भाषातून आपल्या व्याकरणात घेण्याकडे प्रवृत्ति होते इंग्रजींतील पृथक्करणाचा मराठी व्याकरणाशीं कसा नाहक संबध जोडण्यांत आला, त्याविषयी पूर्वी सांगितलेंच आहे इंग्रजीत कारकापासून विभक्ति ठरते त्याप्रमाणेच मराठीत ठरविण्याचा मोह **दादोबांस** झाला पण दुसऱ्या बाजूने सस्कृताप्रमाणे आठही विभक्तिसख्या मराठींत ठेवावयाचा प्रश्न होता, यामुळे सस्कृताच्या **कृष्णशास्त्री चिपळुणकर, गुंजीकर** इत्यादि कैवाऱ्याना त्यांच्यावर हल्ला करण्यास सवड मिळाली पुढें विभक्ति प्रत्ययावरच अवलबून असाव्या असे ठरुन सस्कृताकडे बोट दाखवून कोणी द्वितिया, तर कोणी चतुर्थी या विभक्ति काढून टाकल्या आहेत! मात्र प्रत्ययप्राधान्य मानले तर प्रत्यय नसलेली एकच विभक्ति जी प्रथमा तीच काढावी लागणार हे कोणाच्याच लक्षांत आलें नाही केवळ मराठी भाषेतील एका विशिष्ट म्हणजे प्रत्ययापूर्वी सामान्यरूप झालेच पाहिजे या घटनेकडे त्यानी दुर्लक्ष केले प्रथमेशिवाय इतर सर्व विभक्तीत असें सामान्यरूप होते सबोधनांत असे सामान्यरूप होते म्हणून एक वचनांत 'रे' या प्रत्ययाचा लोप झाला असें म्हणतां येईल. पण तथाकथित 'प्रथमे त सामान्यरूपही नाहीं व प्रत्यय ही नाही मग मराठीत हिला विभक्ति म्हणून कां ठेवावी? समान प्रत्ययत्व हें सस्कृतातही आहे. मग मराठीत द्वितिया व चतुर्थी या समानप्रत्यय आहेत म्हणून त्यांतली एक काढून टाकावी, असा **गोडबोले, दामले** वगैरे व्याकरणकाराचा आग्रह कां? आम्हीं 'प्रथमा' व **कृष्णशास्त्री** यांच्या निर्णयाप्रमाणें 'षष्ठी' या दोन विभक्ति काढून सहाच विभक्ति ठेवल्या आहेत.

दुसरी प्रवृत्ति म्हणजे आपल्या भाषेंत जे तिच्या घटणेंप्रमाणें आहे, ते सस्कृतात नाहीं असे असतांही सस्कृतांतील नियम मराठीस लागू करणे. यासबधीं पहिले उदाहरण समासासबधीं देतां येईल. मराठींत मधील प्रत्यय किंवा शब्द यांचा लोप होऊन जो

एक जोड शब्द बनतो, त्याला सामासिक शब्द असे म्हणतात. या व्याख्येप्रमाणें **दादोबादिकांनीं** द्वद्वाच्या प्रकारात ' मीठभाकर ' ' भाजीपाला ' वगैरे शब्द घातले आहेत येथे मधल्या शब्दाचा किवा प्रत्ययाचा लोप होत नाहीं. कर्मधारय समासासबधींहीं असेंच सांगतां येईल. अव्ययीभाव समासही याच कारणास्तव मराठीत मानतां येत नाही. कारण त्यातही शब्दलोप किंवा प्रत्ययलोप दिसत नाहीं सस्कृतात प्रत्यय राहिला, तर त्या सयोगास ' अलुक् समास ' असे नांव देतात–'युधिष्ठिर' 'हृदयगम' इ. मराठी भाषेंत ' तोडींलावणें ' इ. कांहीं शब्द अशा प्रकारचे आहेत या सर्वांनाच मराठीत ' अलुक् ' समास असें म्हणतात पण प्रत्ययाचा लोप झाल्याशिवाय समासच होत नसल्यामुळे अशा सयोगास समास असें वरील समासाच्या व्याख्येप्रमाणे म्हणताच येणार नाहीं समासांत न पडणाऱ्या सर्व जोडशब्दांस आम्ही ' सयुक्त शब्द ' अशी सज्ञा दिली आहे सयुक्त शब्द (प्रातिपदिक) सर्व जातीचे असतात. त्यातील क्रियापद जातीच्या शब्दास सयुक्त क्रियापद म्हणावें अशी सयुक्त क्रियापदाची व्याख्या सांगितली आहे व अशा व्यवस्थेच्या द्वारें समास व सयुक्त क्रियापद यासबधीच्या अनेक भानगडीचा उलगडा केला आहे

पण मराठी भाषेच्या घटनेकडे लक्ष न देतां सस्कृत व इग्रजीवरच अवलबून राहिल्याने व्याकरणात गोधळ कसा माजतो याचा सध्याचा मराठी भाषेतील **'प्रयोग'** ह उत्तम उदाहरण आहे मराठी व्याकरणात लिग, वचन व पुरुष या तिन्ही बाबतींत कर्त्याप्रमाणे, कर्माप्रमाणे किंवा स्वतत्र म्हणजे तृतीय पुरुषी, नपुसकलिगी एकवचनी अशी क्रियापदाची व्यवस्था म्हणजे प्रयोग. अर्थात् अशा प्रकारचा प्रयोग मराठी, गुजराती, हिंदी वगैरे क्रियापदाला लिग असणाऱ्या भाषातच सभवतो सस्कृत, इग्रजी वगैरे भाषात क्रियापदाला लिग नाहीं. त्या भाषात प्रयोग असणे शक्यच नाही या सर्वच भाषात मुख ( Voice ) आहे मराठींत मुख व प्रयोग याची गल्लत करून प्रयोगाच्या कर्तरि, कर्मणी या सज्ञा सस्कृतातून घेतल्या आहेत मराठींत मुखाला प्रयोग समजून **दादोबा** त्याला कर्मकर्तरि तर **दामले** नवा कर्मणि असे म्हणतात ! यासबधी **राजवाड्यानीं** ' विधि लिङ् ' असे नाव आपल्या सुपीक मेंदूतून शोधून काटले आहे. ते म्हणतात, " वर्तमान मराठीत विधिलिङ् चागला राहिला आहे. उदा जाईनज्जा इ. अलीकडील **दादोबादि** मराठी वैयाकरण ' विधिलिङ्चा हा ' जा ' साहाय्य क्रियापद समजत. मराठी उच्चारात सदा द्वित्त 'जा' येतो हे त्यांनी लक्षात घेतले नाही वर्तमान मराठीच्या अनुकरणाने, जाइन, जातील अशी रूपें जी हा स्वतत्र धातू कल्पून होतात, त्यानेही **दादोबांची** दिशाभूल झाली. 'जाज्जा ' ' खाज्जा याचे उच्चार सध्या खात्जा, जात्जा असेही करतात. मध्यम पुरुषाच्या एकवचनी करीजस्, करी, देई, ठेवी, इ. रूपे ज्ञानेश्वरींत आढळतात. करिजे, जाणिजे, होइजे इत्यादि शेकडो रूपें ज्ञानेश्वरीत आहेत हा ' लिङ् ' बोम्स, होर्न्ले यांना ओळखता आला नाहीं "

या ठिकाणीं **राजवाड्यांनीं** किती तरी अपविधाने ( misstatements )

केली आहेत त्यांच्या नेहमीच्या स्वभावाप्रमाणें त्यांना **दादोबादिकांच्या** डोळ्यांतील कुसळें दिसलीं, पण त्यांच्या स्वतःच्या डोळ्यांत नेहमीच एक मुसळ वावरत होतें त्याचा त्यांना कधीही भाससुद्धां झालेला दिसत नाही ! ' मराठी उच्चारात सदा द्वित्त ' जा ' असतो असे म्हणण्यास काहीच आधार नाहीं अवज्ञेने, लाडिक हट्टाने कोणी मी करीत नाहीज्जा 'मी जाईन्ज्जा नाटकाला' अशी रूपे योजतात. पहिल्या उदाहरणात त् चा ज् होतो पण दुसऱ्या उदाहरणांत ज् चे द्वित्त जोर देण्यासाठी होते करीज्ज जा, ज्जा जा, हा रीति आज्ञार्थ आहे येथेही बोलताना द्वित्ताचा भास होतो लेखनांत तो दिसत नाही 'करी' 'ठेवा' ह्या रूपांत 'जा' कसा दिसतो ते **राजवाडेच** जाणत ' करीजे ' 'जाईजे' इत्यादि रूपात 'ज्' आहे पण त्याचा द्वित्त 'जा' रूपी विधिलिङ्गाचा त्याच्याशी काहीच सबंध नाहीं हा 'ज' सस्कृतातील कर्मणि व भावे यासबधीचा मुख (Voice) प्रत्यय, जो 'य' त्यापासून मराठीत आला आहे त्वां काय कर्म **करिजे** लघुलेकराने ' किंवा ' तरी श्रीहरी **पाविजे** तो स्वभावे ' 'या उदाहरणात तो ठळकपणे दिसून येईल. सध्याचे मुख रूप करणारा 'जा' धातु ही मराठीत हिंदींतील. लीजिये, कीजिये इत्यादि रूपावरून मराठीत आलेला दिसतो अर्थात साहाय्य धातू असें मानण्यात **दादोबांची** दिशाभूल झाली नाही तर तो मुख प्रकार असतां त्याला प्रयोग असे समजून ' कर्मकर्तरि ' असे नाव देणे हीच त्याची चूक होती मुख ही सज्ञा आम्ही नव्यानेच योजली आहे व तिचे **स्वाधीन मुख** ( Active Voice ) व **अस्वाधीन मुख** ( Passive Voice ) असे दोन प्रकार केले आहेत

भेद, रूप हे प्रकार मराठीत येण्यास व मागाहून त्याचे उच्चाटण होण्यास बहु-भाषाज्ञान हेंच बहुतांशीं कारणीभूत झाले आहे 'भेद' हा विशेष **दादोबांनी** मराठी व्याकरणात आणला **दादोबांनी** हें धातूसाधित असे न मानता, ते मूळ धातूचीच शक्य व प्रयोजक यांस अनुसरून विकृत रूपें होत असे ठरवले याच्या विरुद्ध **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यानी पुरुष, काळ, अर्थ, लिंग याप्रमाणे भेद म्हणून ' क्रियापदरूपक भेदक ' असे मानण्याची जरूरी नाहीं असें मत दिले आहे हा **कृष्णशास्त्र्यांचा** निकाल ' युक्ति, सोय, व्याकरण, व्युत्पत्ति व पूर्वपरपरा किंवा इतिहास या सर्वांच्या दृष्टीने निर्विवाद सिद्ध होतो ' असें मत **दामल्यांनी** दिले आहे. त्यासबधी विचार करणे प्राप्त आहे **पुरुष, काळ इत्यादिकांप्रमाणें** ही क्रियापदाची विकृत ( विकारी ) रूप मानण्यात **दादोबांची** चूक आहे. पण वाक्यरचनेच्या दृष्टीने म्हणजे मुख, रूप या प्रमाणे भेद करण्यासही स्वतत्र क्रियापद बनवावें लागते. सस्कृतात मुख रचना करताना ' य ' हा प्रत्यय लावून पुढे आत्मनेपदी प्रत्यय लावतात, प्रयोजक भेदी रचना करण्यासाठी ' अय ' हा प्रत्यय लावून परस्मैपदी प्रत्यय लागतात, यावरून सस्कृत-भाषेत मूळ धातूच मानतात, साधित धातू मानीत नाहीत, हे स्पष्ट दिसून येते; त्याचप्रमाणें त्यांना अनुक्रमे आत्मनेपदी व परस्मैपदी प्रत्यय लावल्यामुळे विकार दृष्टीही स्वीकारलेली दिसते. म्हणूनच व्याकरण, पूर्वपरपरा इ दृष्टीनी—पुरुष, काळ इ दृष्टीनी नव्हे, तर

स्वतंत्र व रूपांतर पावणाऱ्या वाक्यरचनाच्या दृष्टीने आम्ही 'भेद' म्हणून क्रियापद भेदरूपक मानले आहे व त्याप्रमाणे धातू, क्रियापद व रचना यासबंधी नियम सांगितलें आहेत

रूप हा प्रकार **दादोबांनी** इंग्रजीवरून आणला पण 'मुख' व 'भेद' याप्रमाणे हा प्रकारही वाक्यरचनात्मक आहे ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली नव्हती. संस्कृतात 'न' एवढेच अव्यय फार तर त्याला 'च' व 'हि' सारखी अव्ययें जोडून 'अकरण रूप' करता येते म्हणून संस्कृताकडेच दृष्टि असणाऱ्या **चिपळूणकर, गोडबोले, गुंजीकर, दामले** यांचे तिकडे लक्ष गेले नाही इंग्रजीत रूपविषयक महत्त्व असेल, पण मराठीत तसे असण्याचे कारण नाही असे त्याना वाटले मराठीची प्रत्यक्षत. या बाबतीत काय स्थिति आहे हे त्यानी पाहिलेच नाहीं 'कर-करू नको' 'करावे-करू नये' 'जाईन-जाणार नाही' गेलो होतो-गेलो नव्हतो 'असते-नसते' 'हवें-नको' इत्यादि वाक्यात जी **रूपा**ची अनेकरूपता दिसते, ते पाहिली तर इंग्रजीत इया मानानें रूपाविषयी फारशी भानगड नाही असे कोणीही कबूल करील आम्हीं भेदाप्रमाणे रूप ह्याही प्रकाराचे पुनरुज्जीवन केले आहे मात्र अर्थाचा 'स्वार्थ' हा प्रकार जसा कोणी आता सागत नाही, त्याप्रमाणेच मूळरूप भेद, स्वाधीन मुख व करणरूप हीं सांगावयाची नाहीत, असें ठरविले आहे.

व्याकरणामधील अराजकाचे कारण संज्ञारूपी नोकरशाही हे आहे, हे **जोश्यांचें** म्हणणें खरें आहे हा संज्ञेचा किंवा परिभाषेचा प्रश्न; या प्रश्नाचाही वरील भाषेच्या प्रश्नाशीं निकट संबंध आहे अलीकडे वाङ्मयाच्या सर्व शाखात परिभाषा एका विशिष्ट रीतीने ठरविली गेली तीतील बरेच शब्द संस्कृतांतून तत्सम स्वरूपांत मराठीत आले आहेत असे शब्द स्वीकारतांना त्याच्या वाच्य, लाक्षणिक, यौगिक, योगरूढ इत्यादि दृष्टीनीं अर्थाविषयीं काहीच विचार झाला नाही उदा शास्त्र ( Science ), इतिहास ( History ), निबंध ( Essay ), अश्लील ( Obscene ) इ. यांपैकी ( १ ) शास्त्र हा शब्द शास्-नियमन करणे या धातूपासून वरील अर्थानें मराठींत आला हा योगरूढ अर्थ आहे पण त्याची मूळ संस्कृत वाच्यार्थानेंच येणाऱ्या शास्त्र ( Scriptures ) या शब्दाशीं गल्लत करण्यात येते. ( २ ) इतिहास-या शब्दाची व्युत्पत्ति ( इति+ह+आस - ते असे झाले ) अशी आहे संस्कृतांत काव्यशास्त्रपुराणांनी युक्त असें व्याख्यान अशी इतिहास ग्रथाची व्याख्या आहे पण वरील इंग्रजी अर्थाप्रमाणे राजकीय घडामोडीच्या हकीकतीपुरतीच या शब्दाची व्याख्या आतां राहिली आहे मात्र संस्कृतांतील महाभारत हा ग्रंथ इतिहास मानण्यात आल्यामुळें आपल्याकडेही इतिहास होता असें प्रतिपादणारे लोक थोडे नाहींत ! ( ३ ) निबंध-Essay हा लेखन प्रकार इंग्रजीत **कौले, बेकन** यानी सुरू केला. त्यानंतर निराळ्या स्वरुपांत **ॲडिसन, स्टील, गोल्डस्मिथ** व त्यापेक्षाही सुधारलेल्या स्वरूपात **चेस्टर्टन, गार्डीनर, ल्युकास** इत्यादींनीं चालू ठेवला. आपल्याकडे 'निबंध' हा शब्द essay याला प्रतिशब्द

म्हणून घेण्यांत आला, पण प्रबधन ग्रथांत त्या सबधींचें स्पष्टीकरण करतांना ' नि+बध ' अशी केवळ यौगिक फोड करून दाखविण्यांत येते !

व्याकरणांत तर हा प्रकार सररहा चालू आहे खुद्द ' व्याकरण ' हा शब्द घ्या. हा शब्द पाणिनेय अष्टाध्यायी व इतर सस्कृत–व्याकरण ग्रथांस लावतात पण त्यांत व्युत्पत्ति, उच्चार, छद इत्यादि बऱ्याच दुसऱ्या शब्दशास्त्राचा समावेश होतो **दादोबांनीं** इग्रजींतील तत्कालिन व्याकरण ग्रथाच्या अनुकरणाने ' व्याकरण ' या विषयाची व्याप्ति मर्यादेतच ठेवली होती पण पुढें पुढें सस्कृत व्याकरणाच्या पक्षाभिनिवेशामुळे **कृष्ण-शास्त्री चिपळूणकर, गुंजीकर, दामले** इत्यादिकानीं त्यांत अनेक शास्त्रांचा समावेश केला. यामुळें या अन्य शास्त्रांचे अनेक ग्रथात व्याकरण शास्त्रावर आक्रमण झाल्याचे दिसून येते. व्याकरण हें अनेक शास्त्रापैकीं एक शास्त्र असल्यामुळे पूर्वी सागितल्याप्रमाणें इतर शास्त्राच्या क्षेत्राचीं वर्तुळे, व्याकरणाच्या क्षेत्राला काही ठिकाणी स्पर्श करतील, तर काही ठिकाणी किंचित् भेदून आत जातील. पण खुद्द व्याकरणाचा किती भाग त्यांनीं व्यापावा याविषयीं काही मर्यादा असली पाहिजे. व्याकरणाच्या साहाय्यास येणाऱ्या या शास्त्रानी व्याकरणासच आपल्या घरांत बसण्यास जागा ठेवली नाही ! उदा **दामल्यांच्या** एक हजार पानांच्या पुस्तकातून व्युत्पत्तिशास्त्र, ध्वनिशास्त्र, छदःशास्त्र, कोश, प्रबधनशास्त्र यासबधीच्या फाजील मजकुरावरील सात-आठशे पाने काढून टाकलीं, तर निव्वळ व्याकरणाविषयी शंदोनशे पाने राहतील की काय याची वानवाच आहे !

बरे, यामुळे त्या इतर शास्त्रांची प्रगति होते आहे असेही नाही. व्याकरणात पाय ताणण्यापुर्ती जागा मिळाल्यामुळे, आपली स्वतत्र रीतीने वाढ व्हावी अशी इच्छा सुद्धां त्यांना होत नाही असे तज्ज्ञ म्हणविणाऱ्या ग्रथकारानीं पचखाद्यरूपी भोपळसुतीं ग्रथ लिहिले आहेत, त्यावरून दिसून येते. याचेंच प्रत्यतर प्राथमिक व दुय्यम शाळांतून सध्याच्या नव्यात नव्या भाषेच्या अभ्यासक्रमात आढळते व्याकरण, छद, साहित्य, व्युत्पत्ति, प्रबधन, पृथक्करण हीं सर्वच शब्द व वाक्यशास्त्रें एका पोतडीत घातलेली आहेत ! अर्थात् आपल्या खोट्या तज्ज्ञतेच्या कीर्तीच्या द्वारेंच शालेय कमिटींत प्रवेश करून त्यांनीं भाषेचा अभ्यास गढूळ करून टाकला आहे ! **दादोबां**पासून **दामल्यां**-पर्यंतच्या व्याकरणविषयकाचे प्रयत्न अशा तोतया तज्ज्ञाच्या उपद्व्यापानीं कसे व्यर्थ झाले तें वर सागितलेच आहे. आता आमचेही प्रयत्न तसेच वाया जातील या भीतीने येथे थोडेसें विषयातर करावें लागलें. असो. आम्हीं ' व्याकरण ' ही सज्ञा एका विशिष्ट मर्यादित अर्थानें योजली आहे व हा ग्रथही तदनुसार मर्यादित क्षेत्रात लिहिला आहे;

सज्ञांसबधीचा हा धुडगुस अगदीं मुळापासून व्याकरणात सुरू आहे. पहिल्याने ' शब्द ' ' पद ' ' प्रातिपदिक ' व धातू या सज्ञाचा विचार करू ' शब्द ' व ' पद ' या सज्ञा **दादोबां**पासून **दामल्यां**पर्यंत सर्व व्याकरणकारांनीं एकाच अर्थानें वापरल्या आहेत **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यानीं सस्कृतांत ' शब्द ' व ' पद ' यांचा अर्थ

वेगळा आहे असे दाखविले, पण त्यासंबधींचा खोलवर विचार **गुंजीकरां**शिवाय कोणींच केला नाहीं 'पद' ही सज्ञा स्वतत्र अशी योजलेली मराठी व्याकरणात दिसत नाहीं. 'क्रियापद', 'कर्तृपद' या सयुक्त शब्दात भागरूप शब्द म्हणून दिसतो. 'कर्तृपद' ही सज्ञा **जोश्यांनीं** काही कारणास्तव नवीनच तयार केली हिचा व्याकरणात कांहींच उपयोग नाहीं हे **दामल्यांनी** दाखविलेच आहे 'क्रियापद' या शब्दांतील 'पद' या सज्ञेचा अर्थ 'शब्द' या सज्ञेच्या अर्थाहून वेगळा आहे ही गोष्ट **दामल्यांच्या** लक्षात आलेली दिसते 'धातु किंवा क्रिया' या अध्यायांत ते म्हणतात, 'ज्या **मूळ शब्दास** काहीं विकार होऊन म्हणजे त्यास काही प्रत्यय लागून क्रियापद बनतें, त्यास धातू किंवा क्रिया असे म्हणतात' पुढे 'धातूच्या विकृत रूपास म्हणजे धातूपासून तयार झालेल्या **वाक्यांतील पदास** क्रियापद असे म्हणतात.' अशीही क्रियापदाची व्याख्या त्यानी केली आहे येथे 'मूळ शब्द', 'शब्द', 'पद' एकमेकांपासून निराळ्याच अर्थाच्या सज्ञा आहेत असे **दामल्यांना** वाटत होते हें स्पष्ट दिसतें. पण त्याचा त्यानी कांहीं उपयोग केला नाहीं उलट दुरुपयोगच केला हें आम्ही पुढें दाखविणार आहो. 'प्रातिपदिक' ही सज्ञा सस्कृतात वस्तुदर्शक व धातूची (क्रियादर्शक) प्रतियोगी अशी मानली जाते मराठींत **जोश्यांनीं** ती सज्ञा सस्कृत अर्थानेंच म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण यांनाच लावली आहे **दामल्यांनीं** 'शब्द' व 'प्रातिपदिक' या सज्ञा एकाच अर्थानें वापरल्या आहेत

आम्ही वर विभागणींत सांगितल्याप्रमाणे 'शब्द' ही सज्ञा अर्थनिरपेक्ष प्राकृतिक शब्दास व 'पद' ही सज्ञा वाक्यात येणाऱ्या शब्दास लावली आहे व 'प्रातिपदिक' ही सज्ञा 'पद' होण्यास पात्र होणाऱ्या शब्दास साधारणत. 'मूळ शब्द' या अर्थानें योजली आहे यामुळे आम्हास 'प्राकृतेय' व 'वाक्येय' असे दोन भाग करून अगदीं नवीन धर्तीवर ग्रथरचना करता आली यानतर प्राकृतेयाच्या दृष्टीनें विचार करण्यासारख्या सज्ञा म्हणजे 'धातु,' 'उपसर्ग' 'समास' आणि 'सयुक्त शब्द' ह्या होत यांपैकीं 'समास' ह्या सज्ञेचा सस्कृतात व मराठींत कसा वेगळा अर्थ करण्यांत आला व त्याचा परिणाम काय झाला ते वर सांगितलेच आहे 'सयुक्त शब्द' ही सज्ञा काहीं व्याकरणकारांनीं समासाला प्रतिशब्द म्हणून, तर कांहींनी अनिश्चित अर्थात योजलेली दिसते या दोन्ही 'सज्ञाचा' विचार वर झाला आहे तेव्हा 'धातु' व 'उपसर्ग' यासबधीं पाहू

धातूच्या स्वरूपाविषयी **दादोबांनीं** निश्चित असे काहीं सांगितलें नाहीं. **दामल्यांनीं** धातु, क्रिया व क्रियापद या सज्ञा कोठें एकाच अर्थी व पुनः वेगळ्या अर्थी दाखवून घोटाळा उडवून दिला आहे नाम, सर्वनाम, विशेषण ह्यांविषयींचे स्वतत्र अध्याय लिहून, 'क्रियापद' ह्या पुढच्या शब्दाचा विचार करतांना त्या अध्यायास त्यानी 'क्रियापद' असे न म्हणता 'धातु किंवा क्रिया' असे नांव दिलें आहे, यावरून क्रियापद, धातु व क्रिया हे शब्द त्यानीं एकाच अर्थानें योजले आहेत हें सहज दिसून

येईल. पण पुढें वर सांगितलेल्या व्याख्येंत धातूस प्रत्यय लावून क्रियापद होते असें सांगितलें आहे यावरून धातु, व क्रियापद हीं त्यांच्या मतेंसुद्धां वेगळीं आहेत हें स्पष्ट दिसतें पण शब्द आठ प्रकारचेच असल्यामुळे धातु हा तरी शब्द मानावयाचा किंवा क्रियापद हा शब्द मानावयाचा किंवा धातु क्रियापद समजावयाचें असे प्रश्न **दामल्यांच्या** पुढें उभे राहिले ते त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणे उलट सुलट कोलांट्या घेऊन सोडविले " धातु व क्रिया एकच व कोशात धातु 'णे' प्रत्यय लावून सांगतात " या **दामल्यांच्या** म्हणण्यास कांहीच आधार नाही 'धातूला अर्थ नसतो धातूला 'णे' प्रत्यय लावून क्रियापदातील 'क्रिया' दर्शवितात 'णे' प्रत्यय धातुसा०ित नामार्थींही असतो म्हणूनच 'णे' प्रत्ययाने दाखविलेली 'क्रिया' ही संज्ञा 'धातु' ह्या संज्ञेपासून वेगळी आहे हें स्पष्ट होते

संस्कृतात सर्व शब्दाचे प्रकृति व अर्थ या दृष्टींनी (१) प्रातिपदिक व (२) धातु असे दोन प्रकार केले आहेत यापैकी धातु हें क्रियादर्शक व प्रातिपदिक हे वस्तुदर्शक असें मानलें जाते क्रिया ह्या शब्दाचा अर्थ केवळ कृतीपुरता नसून स्थिति, गति या अर्थांचाही त्यात समावेश होतो **दामल्यांनी** मराठीत 'क्रिया' या संज्ञेचा अर्थ कृतीपुरताच मर्यादित मानून 'धातु हा नेहमी क्रियाच दर्शवितो असे नाहीं' असें मूळ संस्कृत अर्थाला विरोधी विधान केले आहे. संस्कृतात धातूला अर्थ असतो असें समजत नाहींत. त्यापासून झालेल्या कृदंतास किंवा क्रियापदास अर्थ असतो असेच मानलें जातें आम्हीं हा इषदर्थ शब्द कल्पून त्याचा विचार प्राकृतेयातच केला आहे यासाठीच धातूचे सकर्मक, अकर्मक, अकर्तृक वगैरे प्रकार आम्हीं सांगितले नाहीत कारण कर्ता, कर्म हे शब्द नसून पदे आहेत म्हणून सकर्मक अकर्मक इत्यादि प्रकार क्रियापदाविषयीं म्हणजे वाक्येय या भागात सांगितले पाहिजेत. व्याकरण सांगतानाही पदपरिस्फोटात धातूविषयीं सांगावयास नको. शब्दपरिस्फोटांत, तशी कांहीं विशेष गोष्ट असली तरच धातूचा निर्देश होईल यामुळे संयुक्त क्रियापदांच्या धातूविषयीं **दामल्यांस** जी पंचाईत पडली, ती आतां पडणार नाहीं संयुक्त क्रियापदांच्या धातूचा संयुक्त धातु हा प्रकार आम्हीं प्राकृतेयात धातूसंबंधींच्या विवेचनात सांगितला आहे यामुळें या 'धातु' संज्ञेने केलेलें अराजक बरेच मोडले आहे

धातूप्रमाणेंच उपसर्ग ही संज्ञा वादग्रस्त आहे उपसर्गाला थोडासा अर्थ असतो, पण तो शब्द वाक्यांत पद म्हणून येत नसतो तथापि त्याला थोडासा अर्थ असतो व समासाचा व संयुक्त शब्दाचा तो भाग असतो. म्हणून त्याला शब्दाच्या आमच्या नव्या व्याख्येप्रमाणें इषदर्थ शब्द असें म्हटले पाहिजे **दामले** व इतर बहुतेक व्याकरणकार उपसर्गाला प्रत्ययाप्रमाणे अक्षरें, पण शब्दांच्या मागे लागणारीं अक्षरें असें समजतात

याप्रमाणे प्राकृतेयासंबधीं बहुतेक संज्ञांचा खुलासा झाला वाक्यांत, वर्गीकरणासंबधीं येणाऱ्या 'नाम,' 'सर्वनाम,' 'विशेषण,' 'क्रियाविशेषण' (विधिविशेषण) 'क्रियापद' या संज्ञांचा व 'लिंग', 'वचन,' 'विभक्ति,' 'काळ,' 'अर्थ,' विभक्तीच्या अनुषंगानें

'कारक,' प्रयोग व त्यांसबधीं 'कर्ता' व 'कर्म' या सज्ञा, यासबधीं विचार झाला पाहिजे

यांपैकी **नाम** ही सज्ञा सस्कृतांतील नामन् (नांव) या शब्दापासून घेतली इग्रजीतून **दादोबांनीं** 'नाम म्हणजे प्रत्येक पदार्थाचे नांव' ही व्याख्या घेतली पण मुळांतील इग्रजी व्याख्याच चुकीची आहे नाम म्हणजे वस्तूचे नाव नव्हे उदाहरणार्थ 'घर' हें काहीं 'घर' या शब्दानें दाखविलेल्या वस्तूचे नाव नव्हे घराला 'आनद भुवन' 'लक्ष्मी विलास,' अशीं नावे देतात वस्तूचे नांव असलेला शब्द विशेषनाम असतो तथापि **बाळशास्त्री जांभेकर** व **दामले** याशिवाय सर्वांनी नामाची व्याख्या इग्रजीवरूनच घेतली आहे **सर्वनाम** ही सज्ञा इग्रजीतील प्रोनाऊनवरून व बाकीच्या विशेषणादि सर्व सज्ञा इग्रजीतून घेतल्या आहेत. तरीही सर्व व्याकरणकार या सज्ञाचा यौगिक अर्थ करून जणो काय त्या सस्कृत व्याकरणानुसार आहेत असे भासवीत आहेत प्रत्यक्षतः मात्र एका 'विधिविशेषण' किंवा 'क्रियाविशेषण' या शब्दाशिवाय बाकीच्या बाबतीत निव्वळ सज्ञाच्या दृष्टीने घोटाळा झालेला दिसत नाही या एका सज्ञेविषयीं येथे विचार करणे जरूरीचे आहे

'विधिविशेषण' ही सज्ञा इग्रजीतून पृथक्करणांतील प्रेडिकेट या शब्दाऐवजी मराठींत वापरलेल्या 'विधेय' या शब्दावरून आलेली दिसते हे क्रियाविशेषण विधेयाचे पूरक या स्वरूपात येते इग्रजीत to be आणि to make या धातूच्या क्रियापदाचे पूरक असले म्हणजे त्याला Complement असे म्हणतात मराठीत याला 'क्रियाविशेषण' अशाच सज्ञा देता येईल. पण वर सागितल्याप्रमाणें 'विधिविशेषण' हा शब्द **दामल्यांपर्यंत** सर्व व्याकरणकार त्याला विशेषण समजून योजित आले आहेत. मराठी वैयाकरणाची दुसरी मोठी गल्लत म्हणजे 'क्रियाविशेषण' व 'क्रियाविशेषण अव्यय' हीं एकच मानणे ही होय. इग्रजीत या दोघाना ॲडव्हर्ब हा एकच शब्द आहे आणि कार्यदृष्ट्या मराठीतही त्याला क्रियाविशेषण म्हणणें गैर नाही पण मराठींत काहीं क्रियाविशेषणे लिगवचनदृष्ट्या विकारी आहेत. उदा.—दांडी तिरपी बसली. दांडा तिरपा बसला. दाडकें तिरपे बसलें या ठिकाणीं लिग व विकार होत असल्यामुळे त्या शब्दास अव्यय (अविकारी शब्द) मानणे केव्हाही योग्य होणार नाही. क्रियाविशेषण अव्ययांसबधीं चर्चा करणे बरेच अवघड आहे, असे **दामले** म्हणतात. याचे कारण त्यांनीं साधणूक, अर्थ, विकार या सर्वच गोष्टींचा एकसमयावच्छेदेंकरून विचार केला आहे विकारासबधीं नुकतेच सांगितले आहे. साधणुकेसबधी **दामल्यांनीं** उपस्थित केलेला प्रश्न म्हणजे विभक्त्यत नामे व क्रियाविशेषण अव्यये यांमधील फरकाचा हा प्रश्न कांहींसा साधणुकेचा व कांहीसा अर्थाचा आहे. साधणुकेसबधी आम्ही प्राकृतेयांतच खुलासा केला आहे उदा 'रस्त्याने,' 'दिवसाचा' इत्यादि शब्दांतील प्रत्यय विभक्ति प्रत्यय नसून एक प्रकारचे तद्धित प्रत्यय आहेत. म्हणजेच ते शब्द नामें नसून क्रियाविशेषण अव्यये आहेत. **दामल्यांना** या गोष्टी मान्य आहेत पण अखेर निर्णय देताना त्यानी एक प्रश्न उपस्थित

केला आहे ते विचारतात, "तो त्या रात्रीं घरीं नव्हता' या वाक्यात 'रात्रीं' हें सप्तम्यत नाम आहे, तसेंच तें 'तो रात्रीं जागतो' या वाक्यात का समजू नये?' या दुसऱ्या ठिकाणी तो शब्द क्रियाविशेषण अव्यय कां मानावा? **दामले** या बाबतीत तो शब्द विभक्त्यत नाम मानावा असाच सामान्य निर्णय देतात आमच्या मते हा निर्णय चुकीचा आहे अशा ठिकाणी वाक्यातील त्या शब्दाच्या अर्थावरूनच त्याच्या जातीचा निर्णय झाला पाहिजे. वरील पहिल्या वाक्यांत 'रात्रीं' हा शब्द विभक्त्यत नाम आहे हे स्पष्ट आहे. कारण त्याच्या मागे 'त्या' हे सार्वनामिक विशेषण आहे पण दुसऱ्या वाक्यात केवळ क्रियेच्या काळाचा निर्देश असल्याकारणाने तें कालवाचक क्रियाविशेषण अव्यय आहे याविषयीं सशयच राहत नाहीं. **दामल्यांनीं** या बाबतींत दिलेल्या इतर उदाहरणांसबधी असेंच आढळून येईल

वचन ( Number ), लिंग ( Gender ), विभक्ति ( Case ) हे शब्द इग्रजीतून त्या त्या पारिभाषिक सज्ञाचे प्रतिशब्द म्हणून मराठी व्याकरणात आले आहेत. तथापि त्या सस्कृत व्याकरणातीलच सज्ञा आहेत, असे बहुतेक व्याकरणकार धरून चालतात, असे त्याच्या विवेचनावरून दिसून येतें वचनाच्या बाबतीत फारसा घोटाळा नाहीं मराठीत माणसासबधी बहुमानार्थी अनेकवचन वापरतात. त्या प्रसगी रूपही तसेच असल्यामुळे कांहीं भानगडीचें कारण नाहीं पण कोणी 'बहुवचन' ही आणखी एक सज्ञा वचनासबधीं मराठी व्याकरणात घुसडण्याचा प्रयत्न केला आहे! लिंग ( gender ) ही सज्ञा खास सस्कृत भाषेत—सस्कृत व्याकरणांतसुद्धा आहे पण तिचें कांहीं सोवळ्या चिकित्सकाना वावडें वाटत असते! गुजराती व्याकरणाने ही सज्ञा अट्टाहासाने वर्जिली आहे! त्याचे भवभूतीच्या '**गुणाः पूजास्थानं गुणिषु नच लिंगं न वयः।**' या वाक्याकडे त्यांचें लक्ष गेलेले दिसत नाहीं. खरें पाहिले तर लिंगविषयक विचारास व्याकरणांत तेवढेसे स्थान नाही कारण लिगनिर्णायक नियम व्याकरणांत नाहोत. अर्थात् हा प्रश्न व्युत्पत्तिशास्त्र व कोश यांच्या कक्षेतला आहे. मराठीच्या दृष्टीने एका बाबतींत मात्र 'लिगा'स महत्त्व आहे ही बाब म्हणजे क्रियापदाचे लिग ही होय सस्कृत, इग्रजी इत्यादि भाषात क्रियापदाला लिग नसते. मराठी व तत्सम हिंदी, गुजराती इ भाषांत क्रियापदाला लिंग असते व त्यामुळेंच प्रयोग ही घटना त्या भाषात सभवते, हें पूर्वी सांगितलेंच आहे वास्तविक पाहिले तर क्रियापदाला स्वतत्र असे लिंग नाही जें नामाचे किवा त्याच्याऐवजीं येणाऱ्या सर्वनामाचें लिग तेच क्रियापदाचें. अर्थात् नाम कर्ता असले तर त्याप्रमाण क्रियापदाचे लिंग फिरतें कर्म असेल तर त्याप्रमाणें क्रियापदाचे रूप होते दोहोप्रमाणे बदलले नाहीं, तर क्रियापद स्वतत्र रीतीनें सामान्य व अनिश्चित अशा नपुसकलिगात असते.

'विभक्ति' ही सज्ञा मराठींत 'केस' या इग्रजी सज्ञेदाखल व्याकरणांत योजण्यांत आली तथापि व्याकरणकारानीं तिच्या अर्थासबधी बराच घोटाळा करून ठेवला आहे! सस्कृतांत 'विभक्तीं'त, आख्याताचा म्हणजे क्रियापदाच्या कालादि विकारां-

चाही समावेश होतो. संस्कृतांतील विभक्तीचा मराठीशी कांहींच सबध नाहीं, पण विभक्तींची सख्या ठरवितांना व कारकसबंध निश्चित करतांना व्याकरणकारांनीं बराच घोटाळा केला आहे सख्येच्या प्रश्नाचा विचार वर झालाच आहे. कारकासबधींचा विचार अधिक साक्षेपानें झाला पाहिजे पहिली गोष्ट म्हणजे कारक हा एक सबंध, तेव्हा आतां पूर्वीप्रमाणें व्याकरण सांगतांना 'अर्थ' असे न म्हणतां फक्त 'सबध' हाच शब्द जोडला म्हणजे झाले याप्रमाणे कर्ता, कर्म, करण असे एकेरी शब्द न योजता 'कर्तृसबध,' 'कर्मसबध,' 'करणसबध' असें सांगावयाचे आहे. व्याकरण सांगतांना नुसते 'कारक' म्हटले म्हणजे झालें दुसरा प्रश्न विभक्ति कारकावरून कीं प्रत्ययावरून हा होय मुख्यत. ती प्रत्ययावर अवलबून आहे हे आतां ठरले आहे यासबधीं पूर्व व्याकरणकारापुढें असलेली द्वितीया व चतुर्थी यांची समान प्रत्ययतेची अडचणही होती ती आता दूर झाली आहे कारण प्रथमा विभक्ति नाहींशी झाल्यामुळें 'कर्तृसबध' फक्त तृतीयेपुरताच राहिला आहे आतां प्रत्येक विभक्तीची ठरीव अशींच कारके निश्चित झाल्यामुळें समानप्रत्यय अशा दोन विभक्तींतील द्वितीया कोणती व चतुर्थी कोणती हें कारकावरून ठरविता येईल अर्थात् प्रत्ययाप्रमाणें कारक हेंही आता विभक्ति ठरविण्याचे एक नियत कारण असे मानावयास हरकत नाही. **कृष्णशास्त्री चिपळूणकरां**च्या दाव्याप्रमाणें षष्ठी विभक्तीही आता गाळून टाकण्यात आली आहे त्यामुळें कांही सबंध कारकसबध नाहीत, अशा **दादोबां**विरुद्ध त्यांनी केलेल्या तक्रारीस जागा राहिली नाहीं

'आख्यात' ही नवीनच सज्ञा मराठी व्याकरणात रूढ करण्याचा प्रयत्न प्रथम **गुंजीकरां**नी व मग **दामल्यां**नी केला. **गुंजीकरांनी** विभक्ति या सज्ञेंत सस्कृतात आख्याताचाही समावेश होतो असे सागितलें पण मराठी व्याकरणांत विभक्तीला एक निश्चित अर्थ (sense) आला असता 'विभक्ती' चाच पर्याय अशा 'आख्यात' शब्दाचा मराठी उपयोग करण्याचे त्यांना कारण नव्हते पण **दामल्यां**नीं यापुढे जाऊन सस्कृत व्याकरणांतील 'लट्', 'लुङ्' या सांकेतिक सज्ञांस अनुसरून 'लाख्यात' 'ताख्यात' अशा सज्ञा वापरल्या आहेत! याविषयींचा विचार पूर्वी झालाच आहे. सुदैवानें **दामल्यां**च्या एतद्विषयक सूचना त्यांच्या पुस्तकात तशाच पडून राहिल्या. पण काळ, अर्थ इत्यादि इग्रजींतून आलेल्या सज्ञा रद्द करण्याच्या कामी **दामल्यांनीं** या आख्यात सज्ञांचा उपयोग केल्यामुळे त्या कोणत्याही रीतीने उपयुक्त तर नाहींतच, पण उलट घोटाळा उत्पन्न करणाऱ्या आहेत, असे दाखवावे लागले

या बाबतींत काळ (Tense) व अर्थ (Mood) यांचा वेळ (Time) व अर्थ (Sense) असा अर्थ करून **दामल्यांनीं** बरीच निरर्थक चर्चा केली आहे सूक्ष्म विचारान्तीं **दादोबांनीं** सांगितलेल्या कालविषयक कांही सज्ञा सोडून द्याव्या लागल्या, तरी मुख्य तीन काळ, यांचे प्रत्येकीं अपूर्ण, पूर्ण व रीति असे पोटकाळ मिळून बारा काळ ठरतात. **दामल्यां**नीं हे काळ रद्द करून वर सांगितलेल्या 'लाख्यात'

इ सज्ञा योजल्या आहेत. पण पुढें 'सन्निहित भविष्य' वगैरे पुष्कळसे काळ आख्यातार्थ म्हणून व्याकरणाच्या माथीं मारले आहेत ! याविषयींच्या मुख्य ग्रथातील आम्हीं केलेल्या विवेचनाकडे बारकाईनें लक्ष देण्याची अभ्यासकांस विनती करून दुसरी महत्त्वाची आख्यात सज्ञा जी 'अर्थ' तिच्याकडे वळू 'अर्थ' या सज्ञेचा मुख्य अर्थ, 'अर्थ' ( sense किंवा meaning ) असा आहे, हें सागावयास नको. पण व्याकरणांत ही सज्ञा दोन खास पारिभाषिक अर्थांनीं आजवर योजण्यांत आली आहे. कारक व षष्ठीच्या सबधाचें व्याकरण सांगताना 'अर्थ' ही सज्ञा योजण्याचा प्रघात आहे उदा–'चतुर्थीचा अर्थ सप्रदान' पूर्वी सांगितल्याप्रमाणे हा प्रघात बद करून, 'कर्तृसबध', 'कर्मसबध,' 'सप्रदानसबध,' अशाप्रकारेच व्याकरण सांगावे असे आम्हीं ठरविलें आहे. आता ही सज्ञा फक्त इग्रजीतील 'मूड' या अर्थीं वापरावयाची

अखेरीस मराठी व्याकरणांत नाहक महत्त्व पावलेल्या 'प्रयोग' या सज्ञेचा विचार करावयाचा ही सज्ञा सर्व व्याकरणकारानीं तीन निरनिराळ्या अर्थांनीं योजिली आहे ! पहिल्या अर्थानें ती निव्वळ व्याकरणविषयक घटनेची वाचक अशी आहे. तिचा दुसरा अर्थ 'उपयोग' ( Usage ) असा आहे या अर्थानें तो व्याकरणांत उपयोजिताना तिची प्रयोगाच्या पहिल्या अर्थाशीं गल्लत होणार नाहीं अशी काळजी घ्यावयास पाहिजे होती पण कोणी तशी काळजी घेतलेली दिसत नाही यामुळें बराच घोटाळा उडाला आहे 'प्रयोग' या सज्ञेचा तिसरा उपयोग मुख ( Voice ) अशा अर्थी झालेला आहे **दादोबांनीं** या घटनेस 'कर्मकर्तरी प्रयोग' व **दामल्यांनीं** 'नवा कर्मणि प्रयोग' अशीं नावे दिलीं ! या शेवटच्या घटनेसबधी बराच ऊहापोह झाला आहे तेव्हां त्यासबधी अधिक चर्चा करण्याची जरूरी नाहीं पहिल्या दोन घटनांचा मात्र थोडासा पुनरुक्तीचा दोष पत्करूनही बारकाईने विचार होणे आवश्यक आहे

'प्रयोग' ह्या सज्ञेची पहिल्या अर्थानें झालेली योजना, अगदींच चुकीची होती ही गोष्ट कबूल केली पाहिजे त्याऐवजीं 'जुळणी' अशा अर्थाची 'योग' हीच सज्ञा योजून या 'योग' घटनेचे 'कर्तृयोग', 'कर्मयोग' व 'स्वतत्रयोग' असे तीन प्रकार, अनुक्रमें 'कर्तरि प्रयोग', 'कर्मणि प्रयोग' व 'भावे प्रयोग' यांच्याबद्दल कल्पिले असते तर सर्व कार्य सुयत्र व बिनबोभाट पार पडलें असते. इतकेही झाले तरी आतां यासबधीं ढवळाढवळ करणें वाडसाचेंच आहे ही गोष्ट कबूल केली पाहिजे प्रयोगासबधीं महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती घटना, ज्या भाषेत क्रियापदाला लिंग असते, त्या भाषेतच होणें शक्य आहे. सस्कृत, इग्रजी वगैरे भाषात क्रियापदास लिंग नाहीं म्हणून त्या भाषेत प्रयोग नाहीं पण तो आहे असे कल्पून सर्व भाषात असलेल्या 'मुख' या घटनेशीं ह्या घटनेची गल्लत मराठी व्याकरणकारांनीं केली. सस्कृतातील 'कर्तरि', 'कर्मणि', 'भावे' इत्यादि मुखविषयक सज्ञा त्यानीं मराठींत प्रयोगासबधी योजल्या.

प्रयोगासबधीं दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती घटना कर्ता किंवा कर्म यांची लिंग, वचन व पुरुष या तिन्ही बाबतींत क्रियापदाशीं जुळणी हे तिचे मुख्य लक्षण आहे. यासबधीं 'कर्ता' व कर्म' या सज्ञाचाही जरा कसोशीने विचार झाला पाहिजे कारण कर्माविषयीं जरी फारशी चर्चा करण्याची जरूरी नाहीं, तरी 'कर्ता' म्हणजे काय हा प्रश्न बराच वादग्रस्त आहे यासबधीं पहिली ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे 'कर्ता व 'कर्म' हे निव्वळ 'शब्द' नसून पदे आहेत. कारण वाक्य तयार झाले म्हणजेच 'कर्ता' व 'कर्म' या गोष्टी सभवतात म्हणूनच 'कर्ता' व 'कर्म' याचा प्राकृतेयांत फलाणा 'धातु' सकर्मक, अकर्मक किंवा फलाणी क्रिया 'सकर्मक', 'अकर्मक' असा विचार न होता, वाक्येयातच व तोंही क्रियापदाच्या दृष्टीने व केवळ 'प्रयोग' या घटनेस अनुसरूनच झाला पाहिजे 'कर्ता' व 'कर्म' या सज्ञा त्या प्रकारच्या कारक सबधासही आजपर्यंत लावीत आले आहेत आता आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे या कारक सबधास 'कर्तृसबध' व 'कर्मसबध' अशी स्वतत्र नावे दिली आहेत यामुळे कर्ता व कर्म हे सबध आहेत अशी चुकीची कल्पना आता होणार नाहीं याप्रमाणे आतां प्रयोग हा एक मराठीतील साधी घटना असून तिचे मोठेसे स्तोम माजविण्यात काहीच अर्थ नाही असे दिसून येईल

वर सांगितल्याप्रमाणे 'योग' किंवा त्यासारखा दुसरा नवा एखादा 'प्रयोग' ही 'उपयोग' ( usage ) या वान्यार्थाची सज्ञा वापरल्यामुळे बराच घोटाळा झाला आहे 'प्रयोग शरणा वैयाकरणा' या व इतर उक्तीचा राळ उडवून, **गुंजीकर, दामले** इत्यादिकानी यासबधी **दादोबादि** पूर्ववैयाकरणावर निकराचा हल्ला चढविला पूर्वोक्त वचनाप्रमाणे वैयाकरणांनीं प्रचलित प्रयोगांना निमूटपणे शरणचिठ्ठी दिली पाहिजे, हा त्याचा आग्रह क्षणभर मान्य केला, तरी त्याबरोबर प्रयोग शिष्टमान्य असला पाहिजे हा मुख्य अट त्यानीही दृष्टिआड करता कामा नये. तसेच शिष्ट म्हणजे 'घट भिद्यात्पट छिन्द्यात् कुर्यात् रासभरोदनम्' अशा रीतीने 'येनकेनप्रकारे ।' प्रसिद्धीची हाव धरणारा पुरुष नव्हे, तर सस्कृत न्यायशास्त्रांत ज्याला 'आप्त' म्हणजे 'यथार्थ वक्ता पुरुष' असे म्हटले आहे, तो होय व्यवहारात ज्यान्या त्याच्या क्षेत्रांत जो तो शिष्ट असतो बोलण्यात व साध्या व्यवहाराच्या लेखनांत किंवा गोष्ट, श्रुतिका, नाट्यछटा इत्यादि हलुवार ( Light ) वाङ्मयात काळ, स्थळ, धदा, लिंग, जाति इत्यादिकामुळे उद्भवलेले 'प्रयोग' थोड्याशा प्रमाणांत खपतील पण प्रौढ भाषेत लिहिताना, **दादोबां**सारख्या भाषाशास्त्रज्ञ शिष्टांना समत असलेले प्रयोगच स्वीकारणे योग्य होईल **गुंजीकर, दामले** इत्यादिकानी या बाबतींत **दादोबां**वर टीकास्त्रे सोडलीं आहेत तीं अस्थानीं आहेत असे स्पष्ट म्हणावे लागते त्याचप्रमाणे **दामल्यांनी** 'सकर प्रयोग' म्हणून जो प्रकार सांगितला, त्यांतही काहीं तथ्य नाहीं हे याविषयीं आम्ही केलेल्या विवेचनावरून दिसून येईल

प्रयोगासबधी व्याकरणदृष्ट्या शुद्धाशुद्धतेच्या वादासबधी आम्हास एवढेच

सागावयाचे आहे की प्रयोगाच्या शुद्धाशुद्धतेविषयीं सांगण्याचा व्याकरणकारास अधिकार नाहीं, असे म्हणणाऱ्यांच्या दृष्टीपुढें 'प्रयोग' ह्या शब्दाचा 'उपयोग' ( Usage ) हा अर्थ असतो व व्याकरणकर्ते जेव्हां फलाणा प्रयोग अशुद्ध म्हणून म्हणतात, त्यावेळी त्याच्यापुढे लिग, वचन, पुरुषानुसार, कर्त्याची, कर्माची क्रियापदाची जुळणी किंवा स्वतत्र तृतीय पुरुषीं एकवचनी क्रियापदाची स्थिति ही घटना असते यांतून सरळ तडजोडीचा मार्ग हाच कीं शिष्टसमत प्रयोग ( Usage ) कोणीं करीत असता व्याकरणकारानें त्या बाबतींत ढवळाढवळ करू नये उलटपक्षीं व्याकरण सांगताना प्रयोग ( Usage ) काहींही असो, व्याकरणाच्या नियमाप्रमाणे सिद्ध होणारे प्रयोगरूप गृहीत धरून 'कर्तरि', 'कर्मणि' अगर 'भावे प्रयोग' सांगावा उदा 'त्याने मुलीस निजविली' येथे 'निजविली' हा प्रयोग ( Usage ) शुद्ध किंवा अशुद्ध न पाहता व्याकरण सागताना 'निजविलें' हेंच रूप धरून 'भावे प्रयोग' म्हणून सागावे सज्ञाच्या सबधाने एवढा विस्तार करण्याचे कारण हेच कीं या बाबतीत **वामनराव जोशी** यानी सागितल्याप्रमाणे अराजक माजले आहे ही गोष्ट खरी आहे ते अराजक नाहींसे करण्यासाठीं आम्हीं काय केले तेही सांगितले आहे त्याना त्या काळीं अशक्य वाटणारे स्वराज्य आता मिळालेच आहे आमच्या या प्रयत्नामुळे सज्ञांच्या साम्राज्यशाहीपासून व्याकरणाचीही आता सुटका झाली आहे अशी उमेद आम्ही बाळगतो व्याकरण ग्रथ लिहिण्यासाठीं अनेक भाषाच्या विशेषत सस्कृत भाषेच्या गाढ अभ्यासाची जरुरी नाहीं, असेही आम्ही दाखविले आहे तत्पूर्वी जुन्या सस्कृत सूत्र-वृत्ति-भाष्यादि पद्धतीचे व्याकरण लिहिण्याच्या कामीं पुनरुज्जीवन करणे चुकीचे कसे आहे तेही दाखविले यावरून सस्कृत व्याकरणाचा मराठी व्याकरणाशी कांहींच सबध नाहीं असे आमचे म्हणणे आहे अशी कोणी समजूत करून घेऊ नये आमच्या व्याकरण ग्रथाची रचना मुख्यत संस्कृत व्याकरणाच्या आधारानेच झाली आहे 'शब्द' व 'पद' यामधील सस्कृत व्याकरणाने केलेल्या भेदाच्या आधारावरच आम्ही 'प्राकृतेय' व 'वाक्येय' हे दोन भाग केले आहेत त्यापैकी 'प्राकृतेय' हा भाग तर जुन्या सस्कृत व्याकरणावरच आधारला आहे 'वाक्येय' हा भाग लिहिताना **दादो**बादि व्याकरणकारास अनुसरून इग्रजी व्याकरणाची बहुताशी मदत घ्यावी लागली सस्कृत किंवा इग्रजी व्याकरणाचे महत्त्व केवढेही असो आम्हाला मराठी भाषेचे व्याकरण रचावयाचे असल्यामुळे त्या दृष्टीलाच आम्हीं प्राधान्य दिलें आहे, ही गोष्ट सुज्ञाच्या लक्षात येईल

आद्य व्याकरणकार **बाळशास्त्री जांभेकरां**पासून तो **मोरो कृष्ण दामल्यां**-पर्यंत सर्व व्याकरणकारानीं अपरिमित श्रम करून मराठी भाषेला आधुनिक व्याकरणाची लेणीं चढविली या व्याकरण सूरींमध्येही कै **दादोबा पांडुरंग तर्खडकर** हे या शास्त्राचे केवळ पाणिनीतुल्य पितामह आहेत ही गोष्ट सर्वमान्य आहे. त्यांनीं आपला 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हा मोठा ग्रथ इ. स. १८५० त प्रसिद्ध केला, हें पूर्वी

सांगितलेंच आहे या व्याकरण ग्रंथाच्या शतसांवत्सरिक प्रसंगीं आमचा हा व्याकरण ग्रंथ प्रसिद्ध व्हावा हा आम्ही एक अपूर्व योगच समजतो. **दादोबांचें** इतर सर्व व्याकरणकारांप्रमाणे आमच्यावरही मोठेंच ऋण आहे त्यांतून अल्प प्रमाणातही या प्रयत्नाच्या द्वारें आम्हीं उत्तीर्ण झालो, तर आमच्या श्रमाचे सार्थक झाले असे आम्ही समजू. व्याकरण टीकाकार **कृष्णशास्त्री चिपळूणकर** व **रामभाऊ गुंजीकर** यांची मराठी व्याकरण क्षेत्रांतील कामगिरी अविस्मरणीय अशी आहे. पाश्चात्य व्याकरण तत्त्ववेत्ता **जेस्पर्सन** याच्या बहुमोल मदतीचा उल्लेख पूर्वी झालाच आहे पण या सर्वांत **गुंजीकर** व **दामले** यांचा या बाबतींतील श्रेयाचा वांटा फारच मोठा आहे त्यांतही **गुंजीकरांच्या** विधायक साहाय्यापेक्षा किती तरी अधिक प्रमाणांत **दामल्यांचे** विरोधी कार्य आम्हास उपकारक झाले आहे ही गोष्ट अत्यंत कृतज्ञतापूर्वक येथे नमूद करणें हे आम्ही आमचें कर्तव्य समजतो. **गुंजीकरांचे** निबंध आम्हाला मुळांत वाचावयास मिळाले पण **दादोबा, गोडबोल, जोशी, खेर** इत्यादिकांची मतें आम्हाला **दामल्यांच्या** व्याकरणाच्या द्वारेंच कळलीं त्यांनी परस्परच यांपैकी चुकीच्या मताचा निरास केला होता म्हणून 'प्रधानमल्लनिबर्हण' न्यायानें **दामल्यांशींच** मुकाबला पडल्यामुळे आमचें कार्य फारच सोपें झालें

या ग्रंथासंबधीं आमचें कार्य म्हणजे निव्वळ जुळवाजुळवीचें **कालिदासानें** केवळ शालीनतेने 'मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः' असे आपल्या रघुवंशाच्या रचनाप्रसंगानें म्हटलें आहे यथार्थानें तेवढ्याच श्रेयाची या ग्रंथासंबधीं आमची आकांक्षा आहे इंग्रजी अमदानींतील व्याकरणविषयक बहुतेक कार्य शिक्षणव्यवसायी विद्वानांनींच केलें आहे **बाळशास्त्री, दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गुंजीकर, कृष्णशास्त्री** व **रावजीशास्त्री गोडबोले** या सर्वांनींच **एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट** नंतरचे **एल्फिन्स्टन हायस्कूल, पुणें ट्रेनिंग कॉलेज,** या संस्थांत अध्यापनकार्य करीत असतानाच आपलें व्याकरणविषयक लिखाण केलें आम्हीही या संस्थांत व अन्य संस्थांत शिक्षणाचें कार्य करीत असतांच या पिढींत तीस-चाळीस वर्षे या विषयाची उपासना केली तेव्हा थोर विद्वानांच्या पंक्तींत निदान शेवटचे स्थान मिळविण्याची आकांक्षा बाळगणें अगदीच उपहासास्पद नाही असें वाटतें अर्थात सुज्ञांच्या कृपेनेंच ही गोष्ट साध्य होणार आहे

हे निवेदन पुरें करण्यापूर्वी वैयक्तिक ऋणानुबंधाचे दोन शब्द येथे सांगण्याची परवानगी घेतो सर्व ऋणांत मातेचें ऋण मोठें आहे माझ्या बाबतींत तें फारच मोठें आहे माझी माता ती सौ. **रखमाबाई** उर्फ **आतेबाई सबनीस** ही एका भाविक वारकऱ्याची मुलगी होती वडिलांनी तिला लहानपणींच **नामदेव, तुकाराम** यांचे अभंग व **सोहिरोबा**दि साधुसंतांची पद्ये वाचून पाठ करण्यासाठीं अक्षरओळख करून दिली. तिलाच **रामविजया**दि ग्रंथ वाचून दाखवितांना मराठी वाङ्मयाशीं माझी बालपणींच ओळख झाली माझे वडील ती. **पांडुरंग विठ्ठल सबनीस** यांचेंही

ऋण माझ्यावर मोठेंच आहे. सावतवाडी संस्थानचे पहिले शाळापरीक्षक म्हणून ते त्यांच्याकाळीं त्या प्रांतात आबालवृद्धास परिचित होते त्यांच्या योगानेच माझी शाळाखात्यातील **सहस्रबुद्धे, नाडकर्णी, सावरकर, पाणंदीकर** वगैरे थोर विद्वानांची ओळख झाली व त्यामुळे आरभीं त्यांच्या या मित्रमडळीकडून मला फारच उत्तेजन मिळालें. शिक्षणविष क कार्याचें तर बाळकडू मला त्यांच्याकडूनच मिळालें हरिजनासाठी स्वतन्त्र वर्ग, हिंदुस्तानी शाळा, उद्योगशाळा इत्यादि शिक्षणाचे सर्व आधुनिक प्रकार त्यांनीं त्या काळींही संस्थानात सुरू केले होते '**पांडुरंगबापू**' हें नाव त्यावेळीं संस्थानात इतकें गाजलें होतें कीं, त्यांच्यानतर काही काळपर्यंत त्यांच्या जागीं काम करणाऱ्या इन्स्पेक्टराना नवे '**पांडुरंगबापू** या नावानेच ओळखीत असत. आमच्या कुटुंबातील माझ्याविषयी व माझ्या कार्याविषयी जिव्हाळ्याची कळकळ बाळगणारे माझे चुलतबंधु के ती स्व **रामकृष्ण वासुदेव** ऊर्फ **बाजीराव सबनीस** याचाही उल्लेख या प्रसगीं कृतज्ञतापूर्वक करणे मी माझे कर्तव्य समजतो त्यांचा मुंबई युनिव्हर्सिटीचे लायब्रेरियन म्हणून गल्या पिढींतील कॉलेजातील विद्यार्थ्यांस परिचय असेलच मलाही महत्त्वाच्या ग्रंथांचे अवलोकन करण्याची संधि त्यांच्या द्वारे मिळाली

कुटुंबाबाहेरच्या माझ्या ऋणानुबंधात पहिले नाव मी माझे प्राथमिक शाळेंतील गुरु **बळवंतराव सावंत** यांचे घेतो त्या काळचे ते एक आदर्श शिक्षक होते मी माझ्या सर्व आयुष्यात शिक्षकाचें काम केलें व शिक्षकाचा शिक्षकही झालों पण आमच्या '**बाळा** मास्तराचा' एक श्रेष्ठ शिक्षक म्हणून बाळपणीं उमटलेला ठसा आजवर कायम आहे व्याकरणासारख्या रुक्ष विषयाकडे सुद्धा त्यांनीच माझा ओढा लावला. शेवटीं एक उल्लेख केल्याशिवाय माझ्याने राहवत नाहीं. माझे परम मित्र **पुरुषोत्तमराव गोपाळ काणेकर** (शारदाश्रमवासी) यांचे प्रेम व मार्गदर्शक व हीं मला विद्यार्थीदशेपासून लाभलीं हा माझ्या आयुष्यातील एक महत्त्वाचा योग असे मी समजतो त्यांचा मराठी भाषेचा व्यासग व अधिकार यासबधी चर्चा करण्याचे हे स्थळ नव्हे. वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांत त्यांचें लिखाण झालें आहे यांहीपेक्षा भरीव लाभ त्यांच्यापासून झाला नाहीं, हें मराठी भाषेचे दुर्दैव होय हे माझ्यासारखे त्यांचे दुसरे स्नेही सागू शकतील वयाच्या चौसष्टाव्या वर्षींही त्यांच्याशी केलेल्या सभाषणाअन्तीं विद्यार्थीदशेतील उत्साह जागृत होतो व त्यांना पसत पडलेले कोणतेंही मत निर्भिडपणे माडण्याचा आत्मविश्वास वाटतो प्रकृति बरीच अस्वस्थ असताही हा ग्रंथ काळजीपूर्वक वाचून त्यांनीं अनेक सूचना दिल्या प्रसिद्धिविन्मुख मितस्त स्वभावामुळे हा उल्लेख त्यांना आवडणार नाहीं हे मी जाणून आहे तथापि स्वत च्या मनाच्या समाधानासाठीं केवळ स्वार्थबुद्धीने हा थोडासा मित्रद्रोह मी पत्करला आहे.

हें पुस्तक आम्हीं कै. न्यायमूर्ति **काशीनाथ त्र्यंबक तेलंग** यांच्या शतवार्षिक जन्मदिन समारभानिमित्त चालू असलेल्या महोत्सवांत आमचे एक फूल

म्हणून त्यांच्या यशस्तनूवर वाहिले आहे त्यांचा जन्म इ. स. १८५० त झाला व इ. स १८९३ त वयाच्या अवघ्या त्रेचाळिसाव्या वर्षी त्यांनीं इहलोकची यात्रा सपविली. 'शैशवेऽभ्यस्त विद्यानाम् योगेनान्ते तनुत्यजाम्' असे कवि कुलगुरूनीं रघुकुलांतील पुरुषांविषयी म्हटलें आहे, तें या थोर पुरषाच्या चरित्रासही पूर्णपणे लागू पडणारें आहे. सपूर्ण शिक्षणक्रम अवघ्या बावीस वर्षांत सपवून त्यांनीं सार्वजनिक कार्यात पदार्पण केले या कार्यासाठीं अवघीं एकवीस वर्षे त्याच्या वांट्यास आलीं. तेवढ्या अल्पावधींत अपूर्व अशी वाङ्मयसेवा, जनसेवा व देशसेवा त्यांच्या हातून घडली. पुराण सशोधन, सस्कृत वाङ्मय, अध्यात्म, इतिहास, अर्थशास्त्र, नीति इत्यादि सर्व विषयात त्याची सर्वंकष बुद्धि अकुटित चालत असे मराठी व इतर प्रादेशिक भाषांच्या विकासाच्या बाबतींतही त्यांनीं बरें व मार्गदर्शन केले. **जॉन्सननें गोल्डस्मिथ** या आग्ल वाङ्मयोपसकाविषयीं असे म्हटले आहे कीं "वाङ्मयाचे असे एकही दालन नाहीं कीं ज्याला त्याचा हस्तस्पर्श नाही. आणि ज्याला ज्याला त्याचा स्पर्श झाला त्याला शोभाच आली." हें **जॉन्सनचें** वचन **तेलंगांना** सपूर्णपणे लागू पडते सासून मेकॅनिकल इन्स्टिटयूट, प्रेसिडेन्सी असोसिएशन, राष्ट्रीय सभा इत्यादि मोठ्या सस्थांच्या स्थापनांत त्यांचा हात प्रामुख्यानें होता. 'हिंदु युनियन' ही सस्था **तेलंगांनीं** स्वतः स्थापिली. इ. स १८८९ त वयाच्या छत्तीसाव्या वर्षी ते हायकोर्टचे जज्ज झाले. सन १८८२ मध्ये नेमलेल्या **हंटर एज्युकेशन कमिटी**मध्यें ते एकटेच हिंदी सभासद होते मुबई युनिव्हर्सिटीचे ते पहिले हिंदी व्हाइस चान्सेलर व रॉयल एशियाटिक सोसाइटीचे पहिले हिंदी प्रसिडेंट होते. त्याच्या अकालीं झालेल्या मृत्युप्रसगाने त्यावेळी 'सृजत्यशेष गुणाकरम् । पुरुष रत्नमलकरण भुवः । तदपि क्षणभगी करोति चेत् । अहह कष्टमपण्डितता विधे: ।' असे शोकोद्गार चोहींकडे काढण्यात आले अशा थोर पुरुषास हा ग्रथ अर्पण केल्यामुळें त्याचा गौरव करण्यापेक्षा आमच्या ग्रथाचीच महती आम्हीं वाढविली आहे याची जाणीव आम्हास पूर्णपणे आहे.

सावतवाडी,
शके १८७२
श्रावण वद्य ८, कृष्णजन्माष्टमी
ता. ४ सप्टेंबर १९५०

**म. पां. सबनीस.**

# आधुनिक मराठीचें उच्चतर व्याकरण.

## उपोद्घात.

### व्याकरण : व्याख्या व व्याप्ति.

१ ज्या शास्त्रांत **प्राकृतेय** व **वाक्येय** या दोन भागांत **शब्दाची** चर्चा होते, त्या शास्त्रास **व्याकरण** असे म्हणावें.

[ ही व्याकरणाची व्याख्या सर्व पूर्व मराठी वैयाकरणांच्या व्याख्यांहून अगदीं भिन्न आहे तिच्या साधकबाधकतेचा विचार **निवेदनांत** सपूर्णतः झालेला असल्यमुळे, 'शब्द,' 'प्राकृतेय' आणि 'वाक्येय' या तीन सज्ञांचेंच स्पष्टीकरण येथे आपणास करून भागेल ]

२ **शब्द** :—शब्द म्हणजे एका विशिष्ट प्रकारच्या कंठ व मुख-रचनेच्या द्वारे बोलतांना केलेली आवाजाची खूण. भाषेत ही खूण लिहून दाखवितात, तिलाही **शब्द** असे म्हणतात. [ शब्द ( संस्कृत ) = आवाज. ]

[ खूण म्हणजे शरीराच्या काहीं भागांच्या हालचालींनीं किंवा कशानें तरी आवाज करून मनातील अभिप्राय प्रकट करण्याचे साधन प्रत्येक **खुणेला** सकेतानुसार अर्थ असतो **संकेत** म्हणजे ज्या लोकात ती खूण प्रचलित असते, त्याची तिच्या अर्था-विषयीं समति शब्दासारख्या आवाजाच्या खुणा शरीराच्या भागांच्या हालचालींनीं व तोंडावाटे आवाज काढूनही मनुष्याना व इतर प्राण्याना करता येतात. पण त्या खुणा स्वाभाविक व अस्वाधीनपणें होतात त्याविषयीं स्पष्ट असा सकेत नसतो. मानवी प्राण्या-लाच स्वतत्र अशा कठाच्या व मुखरचनेच्या आवाजाच्या असख्य खुणा करता येतात. अशा खुणा करण्याचे जे सामर्थ्य किंवा शक्ति तिला **वाणी** किंवा **वैखरी** असे म्हणतात ]

३ **प्राकृतेय** :—व्याकरणाच्या ज्या भागांत शब्दाचा प्रकृतिदृष्ट्या विचार होतो, त्या भागास **प्राकृतेय** असे म्हणतात.

[ प्रकृति म्हणजे शब्दाचे मूलभूत धटनात्मक स्वरूप. प्रकृतीविषयी **गुंजीकरांनीं** आपल्या एका निबधात पुढील मार्मिक विचार प्रदर्शित केले आहेत. "प्रकृतीपासून सर्व शब्दसृष्टीचा प्रारभ प्रकृतीचा विस्तार म्हणजे मुख्यत्वे प्रत्यय लागून होतो. आणि शब्दाना शब्द मिळून सयुक्त म्हणजे ( व ? ) सामासिक शब्दही होतात." ]

४ **वाक्येय** :—शब्दाच्या वाक्यांत योजनेविषयीं ज्या भागांत विचार होतो त्यास **वाक्येय** असे म्हणावें.

[ पूर्ववैयाकरणांनीं व्याकरणाचे ( १ ) वर्णविचार, ( २ ) शब्दविचार व ( ३ ) वाक्यरचना असे तीन भाग केले आहेत 'वर्णविचार' या भागात प्रकृतेयान्या अन्तर्घटणा या भागाचाच समावेश झाला आहे. दुसरा भाग जो बाह्यघटना तो शब्दविचारांत घातला जात असे व्याकरणशास्त्र शब्दांचाच विचार करीत असल्यामुळे त्यान्या एका भागासच 'शब्दविचार' हे नांव देणें सयुक्तिक नाहीं, हे सहज दिसेल. पण ही गोष्ट आतांपर्यंत कोणाच्या फारशी लक्षांत आली नाहीं यांविषयीं **गुंजीकरांनी** पुढील विचार प्रदर्शित केले आहेत " व्याकरणाचे विभाग **दादोबांनीं** वर्णविचार, शब्दविचार आणि वाक्यरचना असे तीन केले आहेत. कित्येकांनीं शब्दविचार व वाक्यविचार असे दोनच केले आहेत विभाग दोनच करावे कीं तीन करावे याविषयीं आमचा मोठासा आग्रह नाहीं तथापि त्या विभागापैकीं 'शब्दविचार' असा जो भाग आहे त्याच्या नांवाविषयीं आम्हांस मोठी अडचण वाटते मराठीमध्ये 'शब्द' आणि 'पद' अशा भिन्नभिन्न सज्ञा फार उत्तम असता 'शब्द' आणि 'पद' यांमध्यें अभेद मानून अथवा सर्वथा 'पद' या सज्ञेचा तिरस्कार करून 'शब्द' ही सज्ञाच सर्वत्र योजल्यामुळे उगाच गोधळ माजला आहे 'पद' म्हणजे विभक्तिप्रत्ययांत शब्द हे पूर्वीच सांगितले आहे शब्द म्हणजे कोणताही सार्थ शब्द हें जरी खरें तरी व्यवस्थेसाठीं 'शब्द' ही सज्ञा विभक्तिप्रत्यय ( **यांतच आख्यात प्रत्यय मोडतात** ) लागण्यापूर्वीं जें त्याचे रूप त्यालाच लावतात पदाला लावीत नाहींत. याप्रमाणे शब्द आणि पद या सज्ञांचा भेद स्पष्ट केल्यावर व्याकरणाचे शब्दसिद्धि, पदसिद्धि व पदयोजना असे विभाग होतात पदसिद्धि व शब्दसिद्धि यांना मिळून एक नाव द्यावयाचे असेल तर 'शब्दखड' किंवा 'शब्दप्रकरण' हे नाव द्यायला बाध नाहीं पण 'शब्दविचार' हे नाव प्रशस्त नाहीं, असें आम्हांस वाटते. कारण कीं यांत शब्दाचाच नुसता विचार आहे असे नाहीं तर शब्दांची सिद्धि आणि पदाची सिद्धि असे दोन विषय त्यांत आहेत 'वाक्यरचना' या नांवापेक्षां 'पदयोजना' हें नाव प्रशस्त आहे असे आम्हास वाटते. याप्रमाणें व्याकरणाचे 'शब्दप्रकरण' आणि 'पदयोजना' हे दोन मुख्य भाग शब्दप्रकरणाच्या पोटीं 'शब्दसिद्धि' व 'पदसिद्धि' हे दोन विभाग वर्णविचार हा विषय यातच घेतला किंवा वेगळा घेतला तरी चालेल "

याविषयीं अनेक आक्षेप घेण्यासारखे आहेत शेवटापासून म्हणजे वर्णविचारासबधींच्या प्रश्नापासूनच सुरुवात करू 'वर्णविचार' हा भाग घेतला तरी पाहिजे किंवा व्याकरणाचा त्याच्याशी कांहींही सबध नाहीं, म्हणून सोडून दिला पाहिजे **गुंजीकर** म्हणतात त्याप्रमाणे धरसोडीचा पक्ष घेऊन चालणार नाही अर्थात् घेतला तर **गुंजीकर** ज्यास 'शब्दप्रकरण' म्हणतात त्यांतच घातला पाहिजे कारण 'पदयोजने' शीं याचा कांहींच सबध नाहीं शब्दसिद्धींत घालणेही तेवढेसे सयुक्तिक नाहीं 'वर्णविचार' हा भाग शब्दाच्या अन्तर्घटणेसबधीं असल्यामुळे सर्वच व्याकरणकारानीं तो शब्दसिद्धीपासून वेगळा ठेवला आहे. 'शब्दविचार' ह्या नांवासबधीही **गुंजीकरांनीं** दाखविलेली कारण

पटण्यासारखीं नाहींत खरे म्हटलें तर 'विचार', 'खड' किंवा 'प्रकरण' या जोडावयाच्या शब्दांविषयीं वाद नाहीं त्यांचा आक्षेप आहे तो या भागात शब्दसिद्धि व पदसिद्धि असे दोन पोटभाग असताना त्याला 'शब्दविचार' असे नांव कां द्यावयाचे ? त्याला पदविचार कां म्हणू नये ? अर्थात् ह्या आक्षेपाचें 'विचार' या ऐवजीं 'खड' किंवा 'प्रकरण' हे शब्द घालून निरसन होणार नाही हें उघड आहे. यांतून सरळ एकच मार्ग होता व आहे तो हाच कीं शब्दसिद्धि व पदसिद्धि हे पोटभाग एका (अर्थात् दुसऱ्या) मुख्य विभागांत आणणे आतां या विभागांना (१) 'शब्दविचार' व (२) 'पदविचार' अशी नांवे देतां आलीं असतीं व 'वर्णविचार' या प्रकरणाची पचाईत करण्याचे कारण पटले नसते कारण शब्दाचा विचार करीत असता त्याचे घटक जे वर्ण त्याचाही विचार होणे साहजिक आहे

'शब्द' व 'पद' यासंबधींची **गुंजीकरां**ची मूलगामी सूचना अर्थातच सर्वस्वीं ग्राह्य अशी आहे व तिचा आम्हीं पूर्णपणें फायदा घेतला आहे पण **गुंजीकरां**नीं सांगितल्याप्रमाणें कोणत्याच व्याकरणकाराने हा भेद मानला नाहीं तेव्हां आम्हीं पूर्वी काढलेला, म्हणजे व्याकरण शब्दाचेच शास्त्र असल्यामुळें त्याच्या भागासच 'शब्दविचार' हें नांव योग्य नाहीं, हा आमचा मूळचा आक्षेप कायमच राहतो हे सर्वच पेंचप्रसग टाळण्यासाठीं व मुख्यतः निवेदनात विशद केलेल्या कारणासाटीं आम्हीं व्याकरणाचे (१) **प्राकृतेय** व (२) **वाक्येय** असे 'शब्द' व 'पद' या सज्ञांच्या निरपेक्ष असे भाग पाडले आहेत 'वाक्यरचना' या सज्ञेऐवजीं 'पदयोजना' ही **गुंजीकरां**नीं सुचविलेली सज्ञाही समर्पक आहे तिचा वाक्येयाचा एक पोटविभाग म्हणून आम्हीं स्वीकार केला आहे.

हें प्रकरण सपविण्यापूर्वी शास्त्रीय व्याकरणकार **दामले** यांनीं पूर्ववैयाकरणांस अनुसरून 'शब्द' व 'वाक्य' यासबधीं जी चर्चा केली आहे तिची जरा विस्तारानें छाननी करणें युक्त होईल **दामल्यां**ची शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे "बाह्य किंवा अंतःसृष्टींतील कोणतीही वस्तु दाखविणाऱ्या वर्णांस किंवा वर्णसमुच्चयास **शब्द** असें म्हणतात" या व्याख्येत आवाजाची खूण व सकेतानुसार अर्थ असणे या शब्दाच्या दोन्हीं मुख्य लक्षणांची दखलगिरी घेतलेली दिसत नाही 'वर्ण म्हणजे काय तर शब्दाचे मूलभूत ध्वनि' व 'शब्द म्हणजे काय तर वर्ण किंवा वर्णांचा समुच्चय' अशा तऱ्हेची व्याख्येची अन्योन्याश्रयि रीत **दामल्यांनीं** अवलंबिलेली आहे ! शब्दाच वर्ण असतात हा शास्त्रज्ञाचा शोध आहे व्याकरण, व्युत्पत्त्यादि शब्दशास्त्रे ज्याला माहित नाहीत त्यांना वर्ण म्हणजे काय ते या व्याख्येने कळणार नाही. शिवाय परिचित शब्दाच्या द्वारें अपरिचित शब्दाची ओळख करून देणें हे व्याख्येचें एक मुख्य कार्य आहे **दामल्यांनीं** आपल्या पुस्तकाच्या आरभींच हा दडक धाब्यावर बसविलेला दिसतो 'वस्तु दाखविणे' हेही शब्दाचे लक्षण चुकीचें आहे आधीं वस्तु म्हणजे काय ते **दामल्यांनी** ठरविले नाहीं शिवाय हेच लक्षण त्यांनीं नामाच्या व्याख्येसही लावले आहे. "वास्तविक अगर काल्पनिक सृष्टींतील कोणतीही वस्तु दाखविणारा विकारी शब्द तो नाम" याप्रमाणें

शब्दाचे व नामाचें त्यांनी एकच लक्षण सांगितलें आहे या लक्षणाप्रमाणें 'शब्द' आणि त्याचाच एक प्रकार जो 'नाम' ते एकच ठरतात! पण या शब्दाच्या व्याख्येचा मुख्य दोष म्हणजे पूर्वोक्त दोन लक्षणांच्या अभावी तीं व्याकरणादि शास्त्रांच्या चर्चेस यत्किंचित्सुद्धां उपकारक होत नाही हा होय 'शब्द' व 'पद' यांमधील भेदासबधीची **कृष्णशास्त्री चिपळूणकर** व **गुंजीकर** यांची सूचना **दामल्यांच्या** समोर होती. पण तिचा त्यानीं ही व्याख्या करताना विचार केलेला दिसत नाही.

शब्द व वाक्य याचा परस्परांशी सबध व व्याकरणात वाक्याचे स्थान याविषयींही **दामल्यांना** नीटशी कल्पना नव्हती, हे स्पष्ट दिसते. यासबधींचे त्याचे पुढील मत पाहा. "तात्त्विकदृष्ट्या भाषेचा विचार करणे म्हणजे वाक्यांचा विचार करणे होय कारण कीं, ज्या स्वतत्र वस्तूशी व्याकरणाचा सबध आहे, अशी स्वतत्रपणे अस्तित्वात असणारी वस्तु म्हणजे वाक्य होय" हीं दोन्ही कार्यकारणात्मक विधानें अयथार्थ आहेत भाषेच्या तात्त्विक अभ्यासास व्याकरण, व्युत्पत्ति इत्यादि शब्दशास्त्राचीच मदत होते प्रबधन, पृथक्करण इत्यादि वाक्यशास्त्राचा या कामीं फारसा उपयोग होत नाहीं. त्याचप्रमाणे ज्या स्वतत्र वस्तूशी व्याकरणाचा सबध असतो ती 'शब्द' असून, वाक्याचा व्याकरणाशीं बराच दूरतः सबध आहे, हें आम्हीं पूर्वीच दाखविले आहे वस्तुस्थिति अशी आहे कीं वाक्ये ही आरभीं निव्वळ शब्दरूपीच होतीं **आगरकरांच्या** मते सारींच वाक्ये मूळचे केवलप्रयोगी शब्द होत ही गोष्ट भाषेच्या बाल्यावस्थेसबधीं झाली माणसाच्या बाल्यावस्थेतील म्हणजे बालकाच्या भाषेसबधी हाच प्रकार आहे. लहान मुलाच्या बोलींत शब्दच वाक्ये म्हणून वापरण्यात येतात. 'तो' असे म्हणून लहान मूल आपल्या मोठ्या भावाकडे बोट दाखविते या 'तो' मध्ये "बघ आई, हा दादा मला कसा त्रास देतो" एवढे वाक्य सामावलेले असते पण बाल्यावस्थेचाच हा प्रकार आहे असे नाहीं उपनिषद्कालीन भाषेसारख्या पूर्ण स्वरूपास पोहोचल्यावरही भाषेत ल वाक्यार्थी एकाकी शब्दात सक्षेपित होण्याची प्रवृत्ति दिसते, हे सूत्र-कालीन वाङ्मयावरून दिसून येईल अलिकडे तार करण्यासाठी वाक्यातील शब्दाची छाटाछाट करावी लागते.

पूर्ववैयाकरणास अनुसरून **दामल्यांनीं** केलेली वाक्याची व्याख्याही व्याकरणाला अप्रस्तुत असून कार्यलक्षणाच्या दृष्टीने समर्पक नाही 'एक विचार पूर्णपणे व्यक्त करणाऱ्या स्वतत्र शब्दसमूहास वाक्य असे म्हणतात.' अशी त्याची व्याख्या आहे पण सपूर्ण विचार कधीं कधीं एकाच शब्दांत सागतां आला तरी कधीं कधीं त्या कार्यासाठीं एक परिच्छेद, प्रकरण किंबहुना एखादा ग्रथसुद्धा पुरा पडणार नाही यावरून ही वाक्याची व्याख्या अशास्त्रीय कशी आहे ते दिसून येईल. खरें म्हटले तर व्याकरणात वाक्याची व्याख्या करण्याची तादृश जरूरी नाहीं. **वाक्येय** हे एका भागास नांव दिल्यामुळें तशा व्याख्येची जरूरी भासल्यास "कोणता तरी पुरा अर्थ असलेल्या पदपक्तीस वाक्य म्हणावें" अशी करावी. म्हणजे ती तर्कशुद्ध होऊन व्याकरण-सापेक्षही होईल ]

---

# भाग पहिला.

## प्राकृतेय.

### उपोद्घात.

१ **शब्द ( प्रकृतिशब्द )** :—प्राकृतेयात म्हणजे केवळ प्रकृतीच्या दृष्टीने व अर्थनिरपेक्ष असा ज्याचा विचार करावयाचा असतो त्या शब्दास **प्रकृतिशब्द** किंवा **शब्द** असे म्हणावे.

[ येथें 'शब्द 'ही सज्ञा प्रांरभीं सागितलेल्या सामान्य अर्थानें घ्यावयाची नाहीं. तर केवळ प्रकृति किंवा घटणा या दृष्टीनें अर्थनिरपेक्ष आवाज म्हणजे **शब्द** असें समजावयाचे अर्थात् ही गोष्ट प्राकृतेयापुरती हें सांगावयास नको. यासबधी **गुंजीकरांचे** पुढील विचार मननीय आहेत "शब्दाला अर्थ असणे हें जरी अवश्य आहे, तरी व्याकरणांत केवळ अर्थशून्य ध्वनीलाही शब्द म्हणतच नाहीं असे समजू नये. इतकाच भेद की सार्थ शब्दापासून मात्र पदसिद्धि होऊ शकते तशी अर्थहीन शब्दापासून होऊ शकत नाहीं " अर्थहीन शब्दाची सार्थ शब्दापासून भिन्नता दाखविण्यासाठीं सार्थ शब्दाला पुढे वाक्येय प्रकरणात **प्रातिपदिक** हे नाव दिले आहे. त्यापासून पदसिद्धि होते. ]

### शब्दांचें वर्गीकरण.

२ शब्दांचे (१) पूर्णार्थशब्द, (२) अर्धार्थशब्द, (३) इषदर्थशब्द व (४) निरर्थक शब्द असे अर्थदृष्ट्या चार प्रकार आहेत.

[ येथं अर्थदृष्टि म्हणजे अर्थरहित दृष्टि हे लक्षांत ठेवले पाहिजे ]

### १ पूर्णार्थशब्द.

३ **पूर्णार्थशब्द** :—ज्या शब्दाला कांही निश्चित व पूर्ण अर्थ असतो त्याला **पूर्णार्थशब्द** असे म्हणावे.

[ हे शब्द प्रातिपदिकेही असतात व त्यांपासून पदसिद्धिही होते. ]

### २ अर्धार्थशब्द.

४ **अर्धार्थशब्द** :—ज्या शब्दास अर्धवट व मर्यादित स्वरूपाचा अर्थ असतो त्या शब्दास **अर्धार्थशब्द** असे म्हणावें. याचे ( १ ) सर्वनाम, ( २ ) उभयान्वयी व ( ३ ) केवलप्रयोगी, असे तीन प्रकार आहेत.

५

[ हे सर्व शब्द प्रातिपदिकें म्हणजेच पद होण्यास पात्र होतात. ]

५ **सर्वनाम** :—ज्या शब्दाला स्वतःचा कांहीं अर्थ नाहीं, पण जो दुसऱ्या एका शब्दाच्या म्हणजे नाम जातीच्या शब्दाच्या ऐवजीं येऊन त्याचें कार्य करतो त्याला **सर्वनाम** अर्धार्थशब्द असे म्हणावें.

[ **सर्वनाम** हें प्रातिपदिक असल्यामुळे **वाक्येय** भागांत त्या दृष्टीने त्याचा समग्र विचार होईल. ]

६ **उभयान्वयी** :—एक किंवा अनेक शब्द किंवा वाक्ये जोडण्याचे कार्य करण्याइतकाच ज्या अर्धार्थशब्दास अर्थ असतो त्याला **उभयान्वयी** अर्धार्थशब्द असे म्हणावें.

[ हाही शब्द प्रातिपदिक असल्यामुळे अर्थदृष्टया त्यासबधीं अधिक विचार वाक्येय भागांत होईल. ]

७ **केवलप्रयोगी** :—ज्या अर्धार्थशब्दास स्वतःचा कांहीं अर्थ नसतो पण तो अंतःकरणांतील विकारामुळें उत्पन्न झाल्यामुळे त्या विकाराचीच जाणीव करून देतो त्या अर्धार्थशब्दास **केवलप्रयोगी** असे म्हणावे.

[ ह्या जातीच्या शब्दाच्या अर्थासबधींचे हे स्पष्टीकरण आमच्या शालेय पुस्तका-शिवाय इतरत्र झालेलें नाहीं येथे ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की 'अबब म्हणजे 'आश्चर्य' किंवा 'अहाहा' म्हणजे आनद नव्हे आश्चर्य व आनद हे विकार त्याच किंवा त्या अर्थाच्या 'विस्मय' 'हर्ष' या शब्दानीं दाखविले जातात 'अबब', 'अहाहा' या उद्गारांनीं बोलणाऱ्याच्या मनांत हे विकार उत्पन्न झाले आहेत एवढेच ध्वनित होते हा शब्दही प्रातिपदिक असल्यामुळे पुढें वाक्येयात याचा अधिक विस्ताराने विचार होईल ]

## ३ इषदर्थशब्द.

८ **इषदर्थशब्द** :—ज्या शब्दाला थोडासा अर्थ असतो पण वाक्यांत येण्याइतका पूर्णार्थ नसतो त्याला **इषदर्थशब्द** असे म्हणावे. याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) धातु व ( २ ) उपसर्ग.

[ इषदर्थशब्द प्रातिपदिक किंवा पद होऊ शकत नाहीं. ]

### १ धातु.

९ **धातु** :—क्रियावाचक इषदर्थशब्दास **धातु** असें म्हणावें.

[ 'धातु ' ही संज्ञा अतिशय अनिश्चित स्वरूपाची आहे. पूर्ववैयाकरणांनीं तिच्या अर्थाविषयीं ठाम मत दिले नाहीं **गंजीकरांनीं** यासंबंधीं संस्कृत व्याकरणाच्या आधारानें पुढील विचार प्रदर्शित केले आहेत "जितके म्हणून भाषेंत शब्द आहेत तितके सर्व निवडून काढून, त्यांचीं अगदीं मुळचीं रूपें कोणतीं असावीं हे वैयाकरणांनी मोठ्या प्रयत्नाने ठरवून टाकलें आहे हीं जीं मूळचीं रूपें त्यांना **प्रकृति** अशी संज्ञा आहे. मूळच्या प्रकृतींची संख्या फार थोडी पण त्यांचा विस्तार फार होऊन शब्दसंख्या वाढली आहे. प्रकृति निवडून काढून त्याचे दोन वर्ग केले **धातु** आणि **प्रातिपदिक.** तथापि कांहींतरी क्रियार्थ दाखविणारी जी प्रकृति तो **धातु** आणि क्रियेहून कोणताही भिन्न अर्थ दाखविणारी जी प्रकृति ते **प्रातिपदिक** तथापि मूळची प्रातिपदिके फारच थोडीं. त्यापेक्षां धातूची संख्या मोठी कित्येकांचे मत तर असे आहे कीं मुळीं प्रकृति म्हटल्या म्हणजे सर्वच धातुरूप कित्येक प्रातिपदिकामध्ये त्याचा शोध लागत नाहीं इतकाच विशेष" यानंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें **पद** या संज्ञेचें महत्त्व सांगून ते म्हणतात, "व्याकरणाचे मुख्य विभाग करावयाचे ते पद या संज्ञेवर अवलंबून आहेत 'पद' संज्ञा प्राप्त झाल्याशिवाय कोणताही शब्द किंवा धातु भाषेमध्ये योजण्यास योग्य होतच नाहीं. वस्तुत' 'शब्द' संज्ञेमध्यें धातूचेंही ग्रहण होत नाही असे नाहीं. तथापि धातुवर्ज्य जे इतर शब्द अर्थात् प्रातिपदिकें त्यांना 'शब्द' म्हणण्याचा विशेष संप्रदाय पडला आहे धातूला बहुश 'शब्द' ही संज्ञा लावीत नाहीत' **गंजीकरांच्या** वरील खुलाशाने धातुप्रकरणावर बराच उजेड पडला आहे, यात संशय नाही व आम्हींही धातूची वरील व्याख्या करताना त्याचा भरपूर फायदा घेतला आहे पण स्वत त्यानींच सांगितल्याप्रमाणे ही संस्कृत व्याकरणकारांनीं केलेली व्यवस्था आहे मराठींत यासंबधीं निश्चित अशी कांहींच व्यवस्था लावलेली दिसत नाही त्याचे द्विधामत वरील उताऱ्यांतील शेवटच्या वाक्यावरूनच ध्यानांत येण्यासारखे आहे

मराठी व्याकरणातील कोणत्याही प्रश्नाचा, मागील सर्व मतांचा आढावा घेऊन निकाल लावण्याचा अखेरचा प्रयत्न **दामले** यानीं केला आहे, पण या बाबतीत त्यांच्या-कडून कांहींच झाले नाहीं उलट 'धातु, क्रिया व क्रियापद' ही सर्व एकच अशी विलक्षण गल्लत त्यांनीं केली आहे! आपल्या व्याकरणात व्युत्पत्ति किंवा सिद्धिप्रकरणात त्यानीं 'धातू' विषयीं काहींच सांगितले नाहीं पण क्रियापदप्रकरणांत पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे धातूची व्याख्या ते पुढीलप्रमाणें करतात. "ज्या मूळ शब्दास काहीं विकार होऊन म्हणजे त्यास कांही प्रत्यय लागून क्रियापद बनते, त्यास **धातु** किंवा **क्रिया** असें म्हणतात कोशामध्ये धातूचीं मूळरूपे वाच, कर, दे, जा अशी न देता त्यांचीं 'णें' प्रत्ययान्त रूपें देण्याचीही चाल आहे धातूच्या विकृत रूपास म्हणजे धातूपासून तयार झालेल्या वाक्यांतील पदास **क्रियापद** असें म्हणतात यावरून पुष्कळांचा असा समज होण्याचा संभव आहे कीं, धातु हा क्रियादर्शक शब्द आहे म्हणजे प्रत्येक धातूपासून कोणत्या ना कोणत्या तरी क्रियेचा बोध होतो. पण हें

सर्वस्वी खरें नाहीं. बरेच धातु क्रियादर्शक आहेत हें खरें. तथापि कांहीं धातु **सत्तादर्शक** किंवा **स्थितिदर्शक** तर कांहीं धातु **विकारदर्शक** आहेत हें विसरतां कामा नये." **दामल्यां**चीं हीं सारींच विधाने भ्रामक, परस्पर असबद्ध व चुकीचीं आहेत विकारी शब्दांत 'धातु' असा स्वतंत्र शब्द त्यांनी दिलाच नाहीं तो दिला असता तर शब्दांचे नऊ प्रकार झाले असते. शिवाय धातूंना प्रत्यय लागून धातुसाधितेंही होतात. मग धातुसाधितें व क्रियापदे एकच होतील, हे त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. 'पद' ही संज्ञा **दामल्यां**नीं या ठिकाणीं तद्विषयक स्पष्टीकरण करण्यापूर्वीच जवळ जवळ प्रथमच योजली आहे पण तिचा त्यांना कांहींच उपयोग झाला नाहीं कारण त्यांच्या अर्थानें धातूही पद होऊ शकतो कोशांत धातूला किंवा क्रियेला 'णे' प्रत्यय लावतात हे खरे नाहीं 'णे' धातूला लावून क्रिया—मग ती धातुसाधितांतील असो वा क्रियापदांतील असो—दाखविली जाते व म्हणूनच 'क्रिया' व 'धातु' या वेगवेगळ्या अर्थांच्या संज्ञा आहेत. तसेंच धातु हा सर्वस्वी क्रियादर्शक शब्द आहे. येथे समजुतीचा प्रश्नच नाहीं. 'क्रिया' ह्या शब्दाची व्युत्पत्ति निवळ योगानें 'कृ' धातूपासून **दामल्यां**नी केलेली दिसते पण तसें करणें चुकीचें आहे क्रिया ही संज्ञा सामान्य असून तीतच स्थिति, गति, कृति, सत्ता, विकृति इत्यादि सर्व अर्थांचा समावेश होतो. क्रियापदाच्या, अल्पावधींत तीन व्याख्या **दामल्यां**नीं या प्रकरणांत केल्या आहेत. त्याविषयीं पुढे विचार होईल. या प्रकरणाला **दामल्यां**नीं 'धातु व क्रिया' असे नांव दिलें आहे हे नांव अर्थातच त्यांनी क्रियापदाबद्दल येथें योजिलें आहे, हें सहज दिसून येईल. कारण यापूर्वीच्या प्रकरणास अनुक्रमें नाम, सर्वनाम, विशेषण व नंतरच्या प्रकरणांस क्रियाविशेषण, शब्दयोगी अशीं नावें त्यांनीं दिलीं आहेत व म्हणूनच क्रिया, धातु व क्रियापद हीं सर्व **दामले** एकच मानतात असें आम्हीं म्हटले आम्हीं धातूची वरीलप्रमाणे व्याख्या करून पुढील गोष्टी निश्चित केल्या आहेत धातु म्हणजे अर्थनिरपेक्ष शब्दाचा एक प्रकार येथे शब्द ही संज्ञा 'प्रातिपदिक' किंवा 'पद' या संज्ञेस प्रतियोगी अशी आहे यावरून धातूचा मुख्य संबंध व कार्य 'प्राकृतया'त असून 'वाक्ययां'त या संज्ञेचा उपयोग केवळ कारणपरत्वें अप्रत्यक्षरीतीनें होईल. म्हणून **दामल्यां**नीं सांगितल्याप्रमाणे धातूचे सकर्मक व अकर्मक असे प्रकार करणें चुकीचें होईल. हे प्रकार क्रियेचे आहेत. याप्रमाणें आम्हीं यासंबंधी व्यवस्था लावली आहे तज्ज्ञांनी याचा अधिक विचार केल्यास या प्रकरणाचा ठाम व कायमचा निकाल लागेल. ]

## २ उपसर्ग.

**१० उपसर्ग** :—अन्य शब्दांच्या मागे येऊन जो इषदर्थशब्द एक स्वतंत्र शब्द घडवितो त्या इषदर्थशब्दास **उपसर्ग** असे म्हणावें.

[ इतर सर्व व्याकरणकारांप्रमाणे **दामल्यां**नीं उपसर्गांची अक्षरांत गणना करून त्यांना एक प्रकारचे पण शब्दाच्या मागे लागणारे प्रत्यय असे म्हटले आहे.

पण उपसर्गाला थोडासा अर्थ असतो. व त्यापासून सामासिक शब्दही होतो. सामासिक शब्द हा दोन किंवा अधिक शब्दांचा होतो. तेव्हां त्यांपैकीं एक असणारा उपसर्ग हा शब्दच आहे हें सहज सिद्ध होतें 'व्युत्पत्तिप्रदीप' कर्ते **शंकरशास्त्री बापट** उपसर्गाला शब्दच मानतात ]

## ३ निरर्थक शब्द.

**११ निरर्थक शब्द** :—वाक्यांत दुसऱ्या शब्दास जोडून आल्याशिवाय ज्या शब्दास अर्थदृष्ट्या स्वतंत्र असे अस्तित्वच नसते त्या शब्दास **निरर्थक**शब्द असे म्हणावें. याचे दोन प्रकार आहेत ( १ ) शब्दयोगी व ( २ ) इतर.

[ निरर्थकशब्द हे केव्हांही प्रातिपदिकें व पदे होऊं शकत नाहीत कारण त्यांना स्वतंत्र असा अर्थ नसतोच उदा 'मी काम करीत आहें' या वाक्यांतील 'करीत' व 'आहें' हे दोन्ही शब्द निरर्थक आहेत. 'करीत आहे' या संयुक्त शब्दासच अर्थ आहे. ]

## १ शब्दयोगी.

**१२ शब्दयोगी** :—पूर्णार्थशब्दाशी सामान्यरूप हा फरक करून सामान्यतः जे निरर्थक शब्द जोडून येतात, त्या निरर्थक शब्दांस **शब्दयोगी** असे म्हणावे.

[ सामान्यरूप म्हणजे काय तें पुढे बाह्य घटणेच्या विवेचन प्रसंगाने सांगण्यात येईल. हें सामान्यरूप ज्यांत होते, ते शब्द नाम किंवा सर्वनाम जातीचे असतात असे पूर्वी समजत, पण आतां क्रियापदासही ते होते असे मानण्यास हरकत नाहीं. जसे झाल्यामुळें, झाल्यास इ. 'शब्दयोगी' ही संज्ञा अतिशय वादग्रस्त आहे शब्दांच्या ( अर्थात् प्रातिपदिकांच्या ) आठ जातींत यांना सर्व पूर्ववैयाकरणांनीं घातले आहे **दादोबांनीं** याचे **सामान्य रूप** होणे हें मुख्य लक्षण आरंभीच ठरविले आहे पण पुढें **च, ही, ना, मात्र, सुद्धां देखील** यांना शब्द कल्पून, 'शुद्ध शब्दयोगी' अशी संज्ञा त्यांनीं दिली. सामान्यरूप हेच जर शब्दयोगींचे मुख्य लक्षण, तर ज्यांत हे दिसत नाहीं त्यांना "अशुद्ध" म्हणावे. पण त्यांनाच शुद्ध ठरवून पर्यायाने इतरांस अशुद्ध ठरविले आहे ! हा विचित्र क्रम **चिपळूणकर, गोडबोले** व **दामले** यांपैकी कोणाच्याही लक्षांत आला नाहीं अर्थात् या सर्वांनीं आपापल्यापरी **दादोबांना** या शब्दाच्या बाबतीत शह देण्याचा प्रयत्न केला. पण त्यांची काहींच मात्रा न चालता, **दादोबांचेंच** मत सर्वस्वी अबाधित राहिलें ! **गोडबोल्यांनी** याला **अवधीरणाबोधक** असें म्हटलें आहे. ही अवधीरणा **दादोबांची** कीं सामान्यरूपाची ते कळत

नाहीं ! याविषयीं अधिक विचार प्रत्यय व घटकशब्द प्रकरणांत होईल. शब्दयोगी हा आम्हीं निरर्थक शब्द ठरविल्याने, यापुढें त्याला वाक्यांत प्रातिपदिक किंवा पद म्हणून मुळींच स्थान नाहीं, हें उघड आहे. ]

## २ इतर निरर्थक शब्द.

**१३ इतर निरर्थक शब्द :**—शब्दयोगीशिवाय दुसऱ्या शब्दास जोडून येणाऱ्या निरर्थक शब्दांस इतर **निरर्थक शब्द** म्हणावे. हे शब्द कांही जोडून पण बहुधा जोडल्याशिवाय लिहितात. उदा. काळ, अर्थ-विकार करण्यासाठीं योजण्यांत येणारी कृदंते व प्रचारांतील शब्द.

[ हे शब्द जोडले म्हणजेच एक पद होते ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे हे जोडलेले शब्द म्हणजेच सयुक्त व सामासिक शब्द. शब्दयोगीच्या योगाने सयुक्त शब्दच होतात व ते विशेषण किंवा क्रियाविशेषण या जातीचे असतात ]

**१४ अन्तर्घटना व बाह्यघटना:**—प्राकृतेयाचा दोन भागात विचार होतो. ( १ ) अन्तर्घटना व ( २ ) बाह्यघटना.

[ अन्तर्घटनेसाठीं शब्दाचें वर्गीकरण करण्याची जरूरी नाहीं पण बाह्यघटनेच्या अनुसारें शब्दाचे अनेक प्रकार पडतात हे प्रकार व्युत्पत्तिदृष्ट्या कितीही महत्त्वाचे असले तरी व्याकरणदृष्ट्या त्याची फारशी मातब्बरी नाही तथापी सर्व पूर्व वैयाकरणानी त्याचा विस्ताराने प्रपच केल्यामुळे आम्हींही येथें त्याचा केवळ नामनिर्देशच करीत आहो ]

## सिद्ध व साधित शब्द.

१५ शब्दाच्या साधणुकेवरून त्याचे व्युत्पत्तिशास्त्राने दोन प्रकार कल्पिले आहेत.

( १ ) सिद्ध व ( २ ) साधित.

१६ भाषेत कांही शब्द मूळचेच अस समजले जातात. त्याना **सिद्ध** शब्द असे म्हणतात. जसे :—झाड, माणूस, लाकूड इ.

१७ सिद्ध शब्दांपासून प्रत्यय किंवा इतर शब्द लागून जे शब्द होतात त्यांना **साधित शब्द** असे म्हणतात. जसे :—झाडी, माणुसकी, लांकडी, लांकुडतोड्या इ.

[ यांपैकीं सिद्ध शब्दाचे व्याकरणदृष्ट्या महत्त्वाचे असे प्रकार नाहीत. पण साधित शब्दांचे अनेकप्रकार व पोटप्रकार आहेत त्यापैकीं विशेष महत्त्वाचे प्रकार पुढे दिले आहेत ]

## साधित शब्दांचे प्रकार.

**१८** साधित शब्दांचे दोन मुख्य प्रकार आहेत :—

( १ ) प्रत्यय साधित. उदा. माधुर्य, महत्त्व इ. ( २ ) शब्द-साधित. उदा. घराबाहेर, करीत आहे, चक्रपाणी इ.

**१९** याशिवाय ज्या सिद्ध शब्दांपासून ते शब्द साधतात त्यावरून ( १ ) धातुसाधित किंवा कृदत व ( २ ) उपसर्ग साधित, असे दोन प्रकार होतात.

[ धातुसाधिताचे किंवा कृदताचे नाम, विशेषण, क्रियाविशेषण इत्यादि प्रकार होतात. त्यासबधीं जरूर तो विचार वाक्यीय प्रकरणांत होईल ]

**२०** शब्द साधिताचे दोन प्रकार आहेत ( १ ) संयुक्त व ( २ ) सामासिक.

**२१ संयुक्त शब्द** :—मधील लोप होण्यासारखे प्रत्यय किंवा शब्द नसल्यामुळे एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी एकदम सयोग होऊन जो शब्द बनतो त्याला **संयुक्त शब्द** असें म्हणावे. जसे :—कामधंदा, जो-कोणी, पाहण्याजोगा, करीत आहे, झाल्यामुळे इ.

[ सयुक्त शब्द ही सज्ञा जरी बहुतेक व्याकरणकारांनी विशेषतः सयुक्त क्रिया-पदाच्या अनुषगाने वापरली आहे, तरी त्याचे पद्धतशीर विवेचन कोणी केलें नाहीं. बहुतेक व्याकरणकार सयुक्त शब्द व सामासिक शब्द एकच मानतात. आमच्या शालेय व्याकरणांत प्रथमच यासबधीं पद्धतशीर स्पष्टीकरण केलेले आढळेल. ]

**२२ सामासिक शब्द** :—मधील प्रत्ययांचा अगर शब्दांचा लोप होऊन जेव्हां शब्दांचा संयोग होतो, तेव्हां त्या जोडून एक झालेल्या शब्दास **सामासिक शब्द** असे म्हणतात.

जसें :—रामकृष्ण, राजपुरुष, साखरभात इ.

[ सामासिक शब्दाचे एक लक्षण म्हणजे त्यात पदलोप किंवा प्रत्ययलोप झालाच पाहिजे तो लोप जेथे होत नाहीं, तेथे समासच होत नाहीं. अर्थात् अशा ठिकाणीं ' सयुक्त शब्द ' असा निराळाच प्रकार कल्पिणे प्राप्त आहे. या भागांतील शब्दाच्या वर्गीकरणांत सर्व प्रकारच्या शब्दाचा समावेश झाला आहे. याशिवाय **दामल्यांनीं अभ्यस्त** असा एक प्रकार सांगितला आहे त्याची व्याख्या त्यांनीं केली नाहीं पण त्याचे ( १ ) पूर्णाभ्यस्त, ( २ ) अंशाभ्यस्त आणि ( ३ ) अनुकरण-

वाचक, हे प्रकार करताना एकाच भेदक तत्त्वाचा स्वीकार केलेला दिसत नाहीं. व पुनरावृत्ति व अनुकरण हीं जीं भेदकें घेतलीं आहेत त्यांचाही व्याकरणापेक्षां प्रबंधन व व्युत्पत्ति शास्त्राकडेच जास्त संबंध आहे. यापैकीं कांहीं सामासिक शब्द आहेत असें स्वतः **दामलेच** सांगतात. आमच्या मतें यांतलें कांहीं संयुक्त, कांहीं सामासिक व कांहीं संस्कृतांत साधित पण मराठींत अपभ्रंश पावून जवळजवळ सिद्ध शब्द आहेत. उदा०:–'घरघर' 'कामधंदा' हे संयुक्त शब्द आहेत. यांपैकीं दुसऱ्याला पूर्वी **दादोबांनीं** समाहार द्वंद्व हें नांव दिलें होतें. 'वारंवार' हा 'वारम् वारम्' यापासून अपभ्रष्ट स्थितींत सिद्ध असा मराठी शब्द आहे. एकंदरीत **दामल्यांनीं** उपस्थित केलेला हा शब्दाचा प्रकार शास्त्रसिद्ध नाहीं. **दादोबांनीं** याना 'प्रातिशब्दिक' असें नांव दिलें आहे. त्यावर **दामल्यांनीं** पुढीलप्रमाणें टीका केली आहे. 'याशिवाय दादोबांनीं आणखी एक प्रकारच्या शब्दाचा याच वर्गांत समावेश केला आहे. चुकभूल, शेटसावकार, भाजीपाला, भागटिळा इ. मराठींतील उत्तम समाहार द्वंद्व समासास वरील अभ्यस्त शब्दांच्याच पंक्तीस बसवून सर्वांस सरसकट एकच 'प्रातिशब्दिक शब्द' असें नांव दिलें आहे. तें आमच्या मतें प्रशस्त नाहीं. चुकभूल, भागटिळा, भाजीपाला इ. प्राकृत शब्दांत पुनरुक्ति काय झाली ती त्यांची त्यानाच माहित.' **दामले** पुढें म्हणतात 'एवंच पूरगिकेमध्यें जरी त्यांनीं अशाच प्रकारच्या शब्दांचीं शेंकडो उदाहरणें देऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करून दाखविला आहे आणि एकंदर विषयास पन्नास पृष्ठें दिलीं आहेत, तरी तें सर्व विवेचन वाचल्यावर 'काय हा पसारा पडला आहे' असा वाचकाचा ग्रह झाल्यावाचून राहात नाहीं. म्हणजे त्यांच्या विवेचनपद्धतींत व्यवस्थेपेक्षां अव्यवस्थाच फार झाली आहे.' **दादोबांनीं** येथें केवळ पुनरुक्ति न करतां त्या शब्दाच्या 'अगाच्या स्थानीं रूपांतरानें नियत प्रतिशब्द कल्पून, त्यास तो जोडिल्यानें जे शब्द साधितात' त्यांना प्रातिशब्दिक म्हटलें आहे. **दामल्यांच्या** अभ्यस्ताप्रमाणें **दादोबांची** 'प्रातिशब्दिक' ही संज्ञा चुकीची आहे. पण स्वतःच्या विवेचनपद्धतीत शेंकडो पानांचा निरर्थक पसारा मांडून पृष्ठसंख्या जवळ जवळ हजारापर्यंत पोंचविणाऱ्या **दामल्यांनीं दादोबांस** दोष द्यावा हें मात्र विचित्र आहे.]

---

# प्रकरण १

# अन्तर्घटना.

## अध्याय पहिला.

## वर्णविचार.

### १ वर्णाची व्याख्या.

१ **वर्ण** :—भाषेतील शब्दांत असलेल्या मूलभूत ध्वनींना **वर्ण** असे म्हणतात.

[ हे ध्वनि तोंडावाटे काढून पुढे शब्द चांगल्या रीतीनें उच्चारण्याची तयारी मुलें चार-सहा महिन्याच्या वयाचीं असल्यापासून करतात. हे वर्ण म्हणजे **पाणिनी**-सारख्या शास्त्रज्ञाच्या संशोधनाचीं फळे होत सामान्य माणसास आजही भाषेत वर्ण असतात हें माहित नाहीं व भाषांचीं व्याकरणें होईपर्यंत त्या त्या भाषांच्या विद्वानां-नाही एतद्विषयक कल्पना नव्हती. शब्द, ते लिहून दाखविण्यासाठीं अक्षरें व नंतर त्यांपासून वर्ण. वर्ण-आणि त्यांपैकीं काहीं वर्ण-लिहून दाखविण्याची व्यवस्था संस्कृत भाषेंत आहे. तेथेंही स्वराला खूण नाहीं व्यंजनासच आहे हे पुढे समजेल "मुखावाटे स्पष्टपणें उच्चारले जाणारे मूळ ध्वनि ते वर्ण" ही **दामल्यांची** व्याख्या धडधडीत चुकीची आहे ही एका विशिष्ट जातीच्या वर्णाची म्हणजे स्वराची व्याख्या आहे. व्यंजनें अस्पष्ट उच्चारलीं जातात हे सांगावयास नको. ]

### २ वर्णसंख्या.

२ मराठींत पुढील पन्नास वर्ण आहेत :— अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ळ्, क्ष्, ज्ञ्.

[ वर्णांच्या संख्येचा प्रश्न बराच वादग्रस्त आहे **दादोबा**, **गुंजीकर**प्रभृति व्याकरणकारांनीं हीच संख्या मानलेली आहे. पण त्यांनीं '**क्ष्**' व '**ज्ञ्**' हे स्वतंत्र वर्ण मानले नाहींत. तथापि बिंदु व विसर्ग यांस वर्णमालिकेत स्थान दिलें आहे. उलट-पक्षीं आम्हीं '**क्ष्**' व '**ज्ञ्**' हे स्वतंत्र वर्ण मानले आहेत. पण बिंदु व विसर्ग यांना वर्णमालिकेंत जागा दिलेली नाहीं. **दामले** वर्ण हे अठ्ठेचाळीस आहेत असें पुष्कळशी घासाघीस करून मत देतात. पूर्व वैयाकरणाच्या मताविरुद्ध दीर्घ **ऋ** ( **ॠ** ) व दीर्घ ऌ ( **ॡ** ) हे वर्ण त्यांनीं वर्णमालिकेंतून काढले आहेत. यावरून यासबंधीं पुढील

तीन विवाद्य प्रश्न उद्भवतात. (१) ऋ, ऌ यांचे दीर्घ वर्ण (**ॠ ॡ**) यांना वर्णमालिकेत स्थान असावें कीं नाहीं? (२) **क्ष् व ज्ञ्** यांची वर्णमालिकेत गणना व्हावी किंवा होऊ नये? (३) बिंदु व विसर्ग हे वर्ण आहेत का? यांपैकी पहिल्या दोन प्रश्नांचीं आमचीं उत्तरें अस्तिपक्षी आहेत. व तिसऱ्याचे उत्तर नास्तिपक्षी आहे. या तिन्ही प्रश्नांचीं उत्तरें **दामल्यांच्या** निर्णयाविरुद्ध आहेत हें सांगावयास नको. यासबधीं आमचीं कारणे पुढीलप्रमाणे आहेत:—

(१) या प्रश्नासबधीं **दामल्यांनीं** स्वमतसमर्थनार्थ पुढील मुद्दे उपस्थित केले आहेत '(अ) मराठींत **ॠ** हा स्वरवर्ण 'पितॄण' या शब्दाशिवाय आढळत नाहीं व 'पितॄण' हा शब्दही मराठीत सधीचे उदाहरण म्हणून दिलें आहे व तो सधीही सस्कृतात ऐच्छिक आहे. **ॡ** हा स्वरवर्ण मराठींत मुळींच आढळत नाहीं तेव्हां एकदरींत **ॠ** व **ॡ** हे वर्ण वर्णमालिकेंतून गाळणे चांगले' याला आमचे पुढीलप्रमाणे उत्तर आहे. मराठींतील एका शब्दात जरी हा वर्ण आढळला—मग तो व्याकरणविषयक ग्रथात असो अगर अन्य ठिकाणीं असो—तर त्या वर्णाचा वर्णमालिकेंत सामील होण्याचा हक्क तेवढ्यावरूनच शाबीत होतो. सस्कृतात सधि ऐच्छिक झाला तर मराठीत ऐच्छिक होईल व 'पितृण' असा शब्द होईल पण वादविषयक शब्द 'पितॄण' असा आहे तेव्हां ऐच्छिक सधीसबधीं **दामल्यांचा** उल्लेख अप्रस्तुत आहे. शिवाय 'पितॄण' या शब्दाप्रमाणें **भ्रातॄण, मातॄण** इ शब्द हेही शब्द पुढे प्रचारात येण्याचा सभव आहे. भाषेत कोणते शब्द आहेत याकडेच वर्णमालिका ठरवावयाची नसते तर पुढेही कोणते शब्द येतील तिकडे लक्ष दिलें पाहिजे (आ) **ॡ** च्या सस्कृत व्याकरणांतल्या 'तवॡकार' या उदाहरणासबधीं तो शब्दही भाषेत नसून व्याकरणाचें उदाहरण आहे असें **दामले** सागतात आणि तेवढ्यावरच ते '**ॡ**' वर्ण त्या भाषेत घेतला आहे, असें कबूल करतात मराठी व्याकरण ग्रथांत '**ॠ**' आणि '**ॡ**' हे वर्ण भाषेत आहेत (किंवा नाहींत) अशा अर्थाचीं वाक्यें आहेत. या वाक्यात **ॠ** व **ॡ** हे शब्द म्हणून आले आहेत. मग मराठींत **ॠ** व **ॡ** हे वर्ण नाहींत असं कसें म्हणता येईल? मराठी इतक्याच सस्कृताला जवळ असलेल्या हिंदी, बंगाली, गुजराती भाषात हे वर्ण आहेत. या सर्व भाषानीं सस्कृत वर्णमालिकेचाच सरसकट स्वीकार केला आहे मग मराठी हीच यासबधीं अपवाद कां व्हावी? सस्कृत वर्णमालिकेच्या द्वारे हिंदी, गुजराती, बगाली एतद्देशीय शब्दच नव्हेत तर इंग्रजी वगैरे इतर देशांतील भाषाही आपणास बोलतां व लिहिता येतील, असा आम्हीं अभिमान बाळगतो. मग ती वर्णमालिका सरसकट आम्ही मराठीसाठीं कां स्वीकारू नये? (आ) **क्ष्** व **ज्ञ्** हीं व्यजने वर्णमालेतून वगळण्यासाठीं **दामल्यांनीं** पुढील कारणें दिली आहेत "(१) सयुक्त व्यंजनें आहेत, म्हणून त्यांना वर्णमालिकेत घेतले तर **त्क, श्र, म्ल,** सारखीं आणखी शेंदिडशे व्यजने वर्णमालिकेंत घ्यावीं लागतील. (२) **ए, ऐ, ओ, औ** या सयुक्त स्वरांस जरी वर्णमालिकेंत स्वतत्र आकार व उच्चार यामुळे स्थान मिळाले, तरी सयुक्त

व्यंजनांस तसें स्थान देणें युक्त नाहीं. कारण व्यजनें पगू किंवा लगडीं आहेत.''
**दामल्यांनीं** दिलेलीं दोन्ही कारणें भ्रममूलक व चुकीचीं आहेत. दुसरें कारण तर अगदी हास्यास्पद आहे त्यांची एतद्विषयक विचारसरणीच अतिशय विसगत व तर्कदुष्ट आहे. आधीं सयुक्त व्यजन किंवा सयुक्त स्वर म्हणजे सयुक्त वर्ण अशी गोष्टच नाहीं. वर्ण म्हणजे मूळचा एकाकी साधा ध्वनि त्याचा स्वतत्र उच्चार व आकार असतो. अर्थात् सयुक्त वर्ण मग तो स्वर असो वा व्यजन असो हा एक वदतोव्याघात आहे. **दामल्यांनीं** जी शेदोनशे उदाहरणें सांगितलीं तीं चुकीची आहेत. त्याना स्वतत्र आकार उच्चार नाही मूळ वर्णाच्या आकाराचा व उच्चाराचा पुष्कळसा अश त्याच्यांत दिसतो या दोन किंवा अधिक व्यजनांना वर्णरूपात अस्तित्वच नाहीं स्वरात मिळाली म्हणजेच जोडाक्षराच्या रूपानें तीं अस्तित्वात येतात. वर्णमाला लांबते ही सबबही अतिशय लगडी आहे आपल्या विवेचनात **दामल्यांनीं** व्याकरण-दृष्ट्या फायद्याचा उल्लेख केला आहे. पण कोणताही नियम शक्यतो निरपवाद असणे हाच व्याकरण किंवा दुसऱ्या कोणत्याही शास्त्राचा फायदा आहे येन केन प्रकारेण सक्षेप करता येणें हा फायदा नव्हे, हे **दामले** विसरलेले आहेत तेव्हां **क्ष्** व **ज्ञ्** याचे उच्चाटन केलें तर **ए, ऐ, ओ, औ,** ह्या स्वरांचीच नव्हे तर **ख्, छ्, ठ्, थ्,** व **घ्, झ्, द्, ध्, भ्** या दहा वर्णांचीही वर्णमालिकेतून उचलबांगडी केली पाहिजे कारण पहिले पाच वर्ण त्या त्या वर्णाच्या पहिल्या वर्णात व दुसरे पाच वर्ण तिसऱ्या वर्णांत ' **ह्** ' हा वर्ण मिळून झाले आहेत त्याचा आकार व उच्चारही स्वतत्र आहे. ' **क्ष्** ' व ' **ज्ञ** ' ह्या वर्णांचा आणखीही एक विशेष आहे वर सांगितलेल्या दुसऱ्या व चौथ्या कठोर व्यजनांपैकी काहींचे रूपातर सधींत प्रत्यक्ष दृष्टीस पडते उदा. मत्+हरण=मद्धरण. येथें ' **ह्** ' च्या जागीं ' **ध्** ' आलेला स्पष्ट दृष्टीस पडतो पण **क्ष्** व **ज्ञ्** यांमध्ये फरक पडलेला किंवा ते कोणत्यातरी वर्णाच्या जागी आलेले दिसत नाहीत. ' **क्ष्** ' पासून मागील वर्णावरही काहीं फरक झालेला दिसत नाही. ' **ज्ञ्** ' मुळें मागील वर्णावर फरक होण्याचे एकच उदाहरण म्हणजे ' तज्ज्ञ ' ( तत्+ज्ञ ) हा सधिशब्द होय. हा शब्दही आता ' तज्ञ ' या स्वरूपात सर्वत्र वापरात आहे. खुद्द **दामल्यांनीं** हेंच रूप आपल्या व्याकरणांत एकदोन ठिकाणीं योजले आहे. स्वर धडधाकट व व्यजनें लगडीं म्हणून व्यजनांपैकी काहींनीं वर्णमालिकेतून गच्चू मिळावा असें म्हणणें शास्त्रीयत्वाचा पदोपदी टेंभा मिरविणारास शोभत नाहीं. सारांश, **क्ष्** व **ज्ञ्** याना इतर व्यजनांबरोबर वर्णमालिकेंत बसण्याचा पूर्ण हक्क आहे

( ३ ) **बिंदु** व **विसर्ग** यासबधींचा विचार करताना **दामल्यांनी** नानातऱ्हेचे चमत्कार केले आहेत. **खेरां**नी याना व्यजनें म्हटली आहेत. म्हणून त्यांच्यावर हल्ला चढविला. खरें म्हटले तर तीं व्यजनें आहेतही व नाहीतही असें म्हणता येईल. कारण बिंदु जेव्हां **अनुस्वार** असतो तेव्हां बहुधा तो **ङ्, ञ्, ण्, न्, म्** या नासिक्यां-बद्दल तो येतो. अर्थात् अशा प्रसगी त्याला व्यजन असें समजण्यास हरकत नाही व

त्याला परसवर्ण अशी सज्ञाही दिलेली आहे. हा परसवर्ण व्युत्पत्तिदृष्ट्या इतर वर्णा-पासूनही येतो. उदा० उष्ट्र, ऊट, उण्ट किंवा उट. या ठिकाणीं तो ण् या व्यंजनाबद्दल प्रत्यक्ष आहे ही गोष्ट खरी पण व्युत्पत्तिदृष्ट्या तो 'ऊ' यांतल्या 'उ' बद्दल आला आहे ही गोष्ट सहज लक्षांत येईल. पण जेव्हां **अनुनासिक** असतो तेव्हां तो केवळ एक उच्चार असतो हें खरें आहे आणि मग तो कोणत्याही वर्णाबद्दल आला असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् अशा प्रसगीं तो वर्ण नाहीं यावरून **दामल्यांनीं खेरांस** निर्विवादपणे खोडून काढलें असें म्हणतां येणार नाहीं. पण **दामले** म्हणतात त्याप्रमाणें तीं मुळींच व्यजने नाहींत असें गृहित धरलें तर तीं स्वरही नसल्यामुळें वर्णच नाहींत हेही आपतत' ठरतें. **दामल्यांनीं खेरांचें** खडण केल्यावर हाच निर्णय द्यावयास पाहिजे होता. पण हा सरळ मार्ग न स्वीकारतां ते आडरानांत गेले ! व 'मुरारे स्तृतीयः पन्था,' या न्यायानें त्यांनीं वर्णांची एक तिसरीच मुलखावेगळी विभागणी केली ! त्यांनीं वर्णांचें (१) स्वर व (२) स्वरेतर असे दोन मुख्य भाग केले आहेत व नतर स्वरेतरांचे (१) स्वरादि व (२) स्वरान्त असे आणखी दोन पोट विभाग केले. स्वरादि म्हणजे बिंदु व विसर्ग व स्वरान्त म्हणजे व्यजने. या स्वरादि व स्वरान्त पोटविभागणीचाच आपल्याला कसून विचार करावा लागेल

पहिल्याने ह्या सज्ञाच साफ चुकीच्या आहेत. त्या शब्दास लावतां येत नाहींत. कारण स्वर आधी येवो किंवा अती येवो, तो एक स्वतत्र वर्ण आहे व तो कोणत्यातरी दुसऱ्या वर्णाच्या पूर्वी किंवा नतर आला तर त्या **दुसऱ्या** वर्णास स्वरादि किंवा स्वरान्त अशीं नांवे देण्याचे कारण नाहीं उदा० —'भगवत' या शब्दातील अनुस्वारास जर स्वरादि म्हटले तर 'भगवत्' यातील 'त्' या व्यजनालाही स्वरादि म्हटलें पाहिजे. व्यजनें हीं स्वराच्या अतीं येतात म्हणजे तीं स्वरान्त असतात या म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं एक किंवा अनेक व्यजने येतात व स्वरात मिळून त्याचें अक्षर होतें पण येथें 'अन्त' हा अनुसर्ग कसा लावतां येईल? वर्ण एकामागून एक येतात एवढेंच. पण हे दोन वर्ण एक कल्पून त्यांना 'स्वरान्त' हें नांव कसें देता येईल ? **दामल्यांनीं** यांच्या मागे 'अ' हा स्वर लावून देऊन म्हणजे –ं, –ः याऐवजीं 'अं' व 'अः' अशीं नांवें दिलीं आहेत म्हणूनच ते त्यांना स्वरादि म्हणतात मग त्यांनीं बाकीच्या बारा स्वरांवर अनुस्वार देऊन म्हणजे **इं, ईं, उं, ऊं** इत्यादि आणखी बारा स्वरान्त वर्णांची भर वर्णमालिकेंत कां घालूं नये ? हा मुद्दा त्यांच्या डोळ्यांसमोर असता व त्यांनीं त्यासबधीं उल्लेख केला असतांही या प्रसगीं त्याकडे त्यांनी कानाडोळा केला आहे! यांचा आकार व उच्चार स्वतत्र आहे असेंही कारण **दामल्यांनीं** दाखविलें आहे. यावेळीं त्यांनीं **ळ्** व **क्ष्** यांच्यासबधीं केलेल्या कोटीक्रमाचा त्यांना विसर पडलेला दिसतो. एकदरींत –ं (बिंदु) व –ः (विसर्ग) यांना वर्णमालिकेत स्वतत्र स्थान मिळणें शक्य नाहीं. त्यांना 'अं' व 'अः' ह्या संज्ञा देणें हेंही चुकीचें. तर मग त्याचें स्वरूप काय ? याला उत्तर हेंच कीं त्या निव्वळ उच्चाराच्या खुणा आहेत. **अनुस्वार** ही

नासिक्याच्या व क्वचित्प्रसगीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें इतर वर्णांच्या उच्चाराची खूण असू शकते. **अनुनासिक** असतांना मात्र ही एक स्वतत्र उच्चाराचीच खूण आहे. येथे कोणत्यातरी वर्णासाठीं येते म्हणून अनुस्वारास परसवर्ण अशी सज्ञा आहे. पण अनुनासिकाला नाहीं. विसर्गाची तीच गोष्ट. मात्र विसर्गाचे दोन प्रकार नाहींत. **र्, स्, ह्** या वर्णांचाच विसर्ग होतो. व त्या विसर्गासबधीं सधिप्रकार होतात. 'छी' 'थु.' सारखे मराठी शब्दांतील उच्चार हे विसर्ग नाहींत कारण त्यांचे सधि होत नाहींत हा तोतया विसर्गाचा प्रकार आहे. असे उच्चार विसर्गाच्या खुणने ( : ) लिहून दाखवितात म्हणून त्याना विसर्ग म्हणावयाचे हे चुकीचे आहे. व्याकरणाचा व त्यांचा अर्थाअर्थी कांहींच सबध नाही. कारण त्यांचा सधीसुद्धां होत नाहीं. व सधीशिवाय खऱ्याखुऱ्या विसर्गालासुद्धा व्याकरणात काहीं स्थान नाहीं सारांश बिंदु व विसर्ग ह्या काना, मात्रा किंवा सस्कृतांतील ˘ व इग्रजींतील उच्चार मराठींत दाखविण्यासाठीं ˘ अशा सारख्या उच्चाराच्या खुणा आहेत उदा :-बिडालॅास्ताडयति पुरुष व कॅट्, बॅाय् इ. बिदु व विसर्ग यांविषयीं प्रत्यक्ष स्पष्टीकरण माात्र व्याकरणात झालें पाहिजे म्हणून ते पुढे केले आहे. ]

## वर्णाचें स्थान.

३ **वर्णाचें स्थान :**—गळ्यांतील व तोडांतील ज्या भागापासून वर्णाची उत्पत्ति होते त्या भागाला त्या वर्णाचे **स्थान** असे म्हणतात. स्थानाप्रमाणे वर्णाची विल्हेवारी पुढील तक्त्यांत दाखविली आहे :—

| वर्ण. | स्थान. | प्रकार |
|---|---|---|
| अ, आ, क्, ख्. ग्, घ्, ङ्*, ह् | कठ ( गळा ) | कठ्य |
| इ, ई, च्, छ्, झ्, ञ्*, श् | तालु ( टाळा ) | तालव्य. |
| ऋ, ॠ, ट्, ठ्, ड, ढ्, ण्*, र्, ष्, ळ् | मूर्धा ( जीभ ) | मूर्धन्य |
| ऌ, ॡ, त्, थ्, द्, ध्, न्*, ल्, स् | दत ( दांत ) | दन्त्य. |
| उ, ऊ, प्, फ्, ब्, भ्, म् | ओष्ठ ( ओठ ) | ओष्ठ्य |
| ङ्*, ञ, ण्, न्, म् | नासिका (नाक) | नासिक्य. |
| ए, ऐ | कठ व तालु | कटतालव्य. |
| ओ, औ | कठ व ओष्ठ | कठौष्ठ्य. |
| व् | दंत व ओष्ठ | दंतौष्ठ्य |

* **टीपः**—हे वर्ण आपापल्या स्थानांतले असून शिवाय नासिक्य स्थानांतही आहेत. म्हणून ङ् ला **कंठनासिक्य,** ञला **तालुनासिक्य,** ण्ला **मूर्धनासिक्य,** न्ला **दन्त्यनासिक्य,** व म्ला **ओष्ठनासिक्य,** अशा संज्ञा आहेत.

## वर्णांचें वर्गीकरण.

**४ वर्णांचे प्रकार :**—वर्णांचे दोन प्रकार आहेत. ( १ ) स्वर व ( २ ) व्यंजनें.

### १ स्वर.

**५ स्वर :**—ज्या वर्णाचा उच्चार स्पष्ट व पूर्णपणें होतो व एकसारखा उच्चारित राहिला तरी बदलत नाहीं, त्या वर्णास **स्वर** असे म्हणावें. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ असे चौदा स्वर मराठी वर्णमालिकेंत आहेत.

[ 'ज्या वर्णाचा उच्चार स्वतन्त्रपणे म्हणजे दुसऱ्या वर्णाच्या सहाय्यावाचून होतो, त्यास स्वर असे म्हणतात ' ह्या **दामल्यांच्या** व्याख्येत स्वराच्या कार्याचा प्रत्यक्षतः निर्देश नाहीं त्याचप्रमाणें स्पष्टोच्चाराचे लक्षण नाही. याचे कारण हे लक्षण त्यांनीं वर्णासंबधीं गृहित धरले आहे. यामुळे कार्य आणि स्वरूप या दोन्ही दृष्टींनीं व्याख्या नीट नाहीत अर्थात् ती नेति स्वरूपाची व व्यतिरेकी अशी आहे. ]

**६ स्वरांचे प्रकार :**—स्वरातही ( १ ) ऱ्हस्व व ( २ ) दीर्घ असे दोन प्रकार आहेत. अ, इ, उ, ऋ, ऌ हे ऱ्हस्व व ई, ऊ, ॠ, ॡ हे दीर्घ स्वर.

[ **दामल्यांनीं** याशिवाय **मूलस्वर** व **तदुत्पन्नस्वर** असे दोन भेद कल्पून, तदुत्पन्न शब्दाचे ( १ ) द्विगुणित व ( २ ) संयुक्त असे दोन पोटभेद केले आहेत वर्ण म्हणजे भाषेचा साधा **मूळ** ध्वनि. तेव्हां तो स्वत सिद्ध व एकाकी असा असला पाहिजे अर्थात् त्याचे साधित किंवा तदुत्पन्न, द्विगुणित, संयुक्त अशा नांवाचे प्रकार होणें शक्य नाहीं. म्हणून आम्ही त्यांचा स्वीकार केला नाहीं. यासबधीं **क्ष** व **ज्ञ** या व्यंजनांचा विचार करतांना असाच निर्णय आम्हीं दिला आहे स्वराचे स्थानाप्रमाणें वर्गीकरण होत नाहीं म्हणून त्यासंबधीं स्थानाचा उल्लेख केला नाहीं. ]

### २ व्यंजनें.

**७ व्यंजन :**—ज्या वर्णाचा उच्चार अस्पष्ट व थोडा वेळ टिकणारा असून तो स्पष्ट व टिकाऊ होण्यासाठीं ज्याला स्वराची मदत घ्यावी लागते त्या वर्णास **व्यंजन** असें म्हणतात.

[ **दामल्यांच्या** स्वराच्या व व्यंजनाच्या व्याख्या अन्योन्याश्रयी आहेत. अर्थात् त्याच्या स्वराच्या व्याख्येंत जे दोष आम्हीं पूर्वी दाखविले ते व्यंजनाच्या व्याख्येंतही आहेत हें सहज लक्षांत येईल. ]

८ **व्यंजनांचे प्रकार** :—व्यंजनांचे ( १ ) वर्गव्यंजनें व ( २ ) वर्गेतर व्यंजनें हा एक भेद व ( १ ) कठोर व ( २ ) मृदु हा दुसरा भेद आहे.

९ वर्गांत घातलेल्या व्यंजनांस **वर्गीय** व्यंजने असे म्हणतात. क-वर्ग, च-वर्ग, ट-वर्ग, त-वर्ग, प-वर्ग असे पांच वर्ग आहेत.

१० प्रत्येक वर्गांतील पहिल्या दोन व्यंजनांना **कठोर** व शेवटच्या तीन व्यंजनाना **मृदु** व्यंजने असे म्हणतात.

११ **वर्गेतर** व्यंजनांत ( १ ) **अर्धस्वर** **य्, र्, ल्,** ( २ ) **सकार** **श्, स्, ष्, व्,** ( ३ ) **महाप्राण ह्** व केवळ मराठी **ळ्** ही व्यजने येतात. हे सर्व प्रकार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत :—

**व्यंजनांचे प्रकार.**

| **वर्ग व वर्गेतर,** | **कठोर.** | **मृदु.** |
|---|---|---|
| क-वर्ग | क्, ख्, क्ष् | ग्, घ्, ङ्. |
| च-वर्ग | च्, छ् | ज्, झ्, ञ्, ञ्. |
| ट-वर्ग | ट्, ठ् | ड्, ढ्, ण् |
| त-वर्ग | त्, थ्. | द्, ध्, न् |
| प-वर्ग | प्, फ् | ब्, भ्, म्. |
| अर्धस्वर | | य्, र्, ल, व्. |
| सकार | श्, ष् स्. | ... ... |
| महाप्राणोच्चार | ... ... | ह् |
| केवळ मराठी | .... | ळ्. |

[ व्यजनांचे स्पर्श, अन्तस्थ व उष्म असे आणखी तीन भेद **दामल्यांनीं** सस्कृत व्याकरणावरून कल्पिले आहेत या दृष्टीने स्वरांस विवृत म्हणतात असेही त्यांनीं सांगितलें आहे. सामान्यतः वर्णांचेंही त्यांनीं **अघोषवर्ण, घोषवर्ण** अथवा

**श्वास** आणि **नाद** असे भेद केले आहेत. यामुळें वृत्त व छंन्दविषयक शास्त्राची व व्याकरणाची भेसळ होऊन गोंधळ मात्र झाला आहे ऱ्हस्व व दीर्घ यांच्याशीं काल-कल्पना जोडून त्यांनीं असाच गोंधळ उत्पन्न केला आहे. हे सर्व प्रकार आम्हीं टाळले आहेत. सन्धिप्रकरणात ह्याच सञ्ज्ञा **दामल्यांनीं गुंजीकरांचें** अनुकरण करून योजल्यामुळें घोटाळा मात्र झाला आहे डॉ **भांडारकरांनी** सस्कृत पहिल्या पुस्तकात जी वर्णविभागणी केली तीच घेऊन सहज काम भागत असल्यामुळे, आम्हीं त्यांचेंच अनुकरण केलें आहे. ]

## बिंदु व विसर्ग.

१२ **बिंदु** :–नाकांतून होणाऱ्या उच्चाराची जी खूण ( ं ) तिला **बिंदु** असे म्हणतात. ह्याचे दोन प्रकार आहेत ( १ ) अनुस्वार व ( २ ) अनुनासिक.

[ बिंदु ही केवळ उच्चाराची खूण आहे तो वर्ण नव्हे हे पूर्वी दाखविलेंच आहे फक्त अनुस्वार हा ठरीव म्हणजे **ङ्, ञ्, ण्, न्, म्,** वर्णांचा उच्चार असल्यामुळे त्याला एक प्रकारचा वर्ण–परसवर्ण असे म्हणतात अनुनासिक ही निव्वळ उच्चाराची खूण आहे तिचा वर्णाशीं कांहींच सबध नाहीं ]

१३ **अनुस्वार** :—जो बिंदु खणखणित उच्चाराचा असून ङ्, ञ्, ण्, न्, म्, या नासिक्यांबद्दल विकल्पाने वापरतां येतो त्यास **अनुस्वार** किंवा **परसवर्ण** असे म्हणतात.

१४ **अनुनासिक** :—वर्णनिरपेक्ष अस्पष्ट उच्चाराच्या बिंदूस **अनुनासिक** असे म्हणतात.

१५ **विसर्ग** : – संस्कृतांत शब्दाच्या शेवटी **स्, र्** ह्या अक्षरांचा **ह्** सारखा खसूकन् उच्चार होतो. तो दाखविण्याच्या खुणेस विसर्ग ( : ) असे म्हणतात.

[ व्याकरणात विसर्गाचा सधि दृष्टयाच विचार होतो व तोही सस्कृत नियमानुसार होतो. छीः, थुः असे उच्चार मराठींत विसर्गासारखे दिसतात पण त्यांचा सधि होत नाहीं तेव्हां ते विसर्ग नव्हेत ]

## अक्षरविचार.

१६ स्पष्टपणे उच्चारतां व लिहितां येण्यासारखा शब्दाचा जो भाग त्याला **अक्षर** असे म्हणतात.

[ स्वर स्पष्टपणे उच्चारतां व लिहितां येतो. म्हणून सर्व स्वर हे स्वत.सिद्ध अक्षरेच आहेत पण व्यजन-एक किंवा अधिक-पुढील स्वरांत मिळूनच त्याचे अक्षर होते ]

१७ अक्षराचे ( १ ) मुळाक्षर, ( २ ) जोडाक्षर व ( ३ ) बाराखडीचे अक्षर असे तीन प्रकार आहेत.

१८ स्वर व प्रत्येक व्यजन स्वराशी युक्त होऊन झालेली अक्षरे याना मुळाक्षरे म्हणतात.

१९ अनेक व्यजने एका स्वरांत मिळून जे अक्षर होते त्याला **जोडाक्षर** असे म्हणतात.

[ जोडाक्षरे साधारणत शेवटच्या व्यजनाच्या मागे पूर्वव्यजनाची अर्धवट खूण जोडून करतात पण पुष्कळशा जोडाक्षराचे आकार अगदीं वेगळेच असतात ]

२० **बाराखडीचे अक्षर** :—मुळाक्षराचा ऋ, ॠ, ऌ, ॡ, यांशिवाय बाकीच्या स्वराशी व अनुस्वार व विसर्ग यान्या मिलाफाने ज्या पंक्ति होतात त्या पक्तींतील अक्षराना **बाराखडीचें** अक्षर असे म्हणतात.

[ या अक्षरविषयक माहितीचा व्याकरणाशी काहींच सबध नाहीं उलट त्यामुळे काहीं भ्रान्ति उत्पन्न होऊन '**ज्ञ, क्ष**' व बिंदु, विसर्ग यासबधीचे वाद व अ, आ च्या बाराखडीसारखे वाद व्याकरणाच्या बोकाडीं बसले आहेत पुढे अन्त्य व उपान्त्य वर्ण, स्वरव्यजने व अक्षरे अशा तऱ्हेने प्रकार सागण्यात येतील पण येथे ती माहिती अनुक्रमाविषयीं असून वर्णाच्या किंवा अक्षराच्या स्वरूपाविषयी यापेक्षां विवेचन व्याकरणात होणार नाहीं ]

# अध्याय दुसरा.

## संधि.

१ एक वर्ण दुसऱ्या वर्णाजवळ येऊन ते दोन्ही एकरूप झाले किंवा एकमेकांत सांधून गेले म्हणजे त्यांचा **संधि** झाला असे म्हणतात.

[ संधीस संस्कृत व्याकरणात फार महत्त्व आहे मराठींत केवळ प्राकृतेयांच्या म्हणजे अन्तर्घटना या दृष्टीने संधीचे महत्त्व आहे. पण संस्कृतांत पदावस्था प्राप्त झाल्यावरही संधिनियम पाळले पाहिजेत असा व्याकरणाचा कटाक्ष आहे या प्रकरणांतील बहुतेक सर्व नियम संस्कृत व्याकरणाचे आहेत **पूर्वरूप पररूप** संधि केवळ मराठींत आहेत ]

[ संधिप्रकरण सुलभ होण्यास पुढील संज्ञांचे ज्ञान आवश्यक आहे —

**१ आदेश**:—एका वर्णाच्या जागीं दुसऱ्या एक किंवा अनेक वर्ण आले तर त्या फेरफारास **आदेश** असे म्हणतात आदेशाचे चार प्रकार आहेत ( अ ) गुण, ( ब ) वृद्धि, ( क ) यणादेश, ( ड ) संप्रसारण

( अ ) **गुण**:—इ, उ, ऋ, ऌ ऱ्हस्व किंवा दीर्घ–स्वरांच्या जागी **ए, ओ, अर्, अल्** असा जो आदेश होतो त्याला **गुण** असे म्हणतात

( ब ) **वृद्धि**:—अ, इ, उ, ऋ, ऌ या ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वरांच्या जागीं **आ, ऐ, औ, आर्, आल्** असे आदेश होतात त्यांना **वृद्धि** असे म्हणतात

( क ) **यणादेश**:—इ, ई व उ, ऊ च्या जागीं अनुक्रमे **य** आणि **व** हे आदेश आले म्हणजे त्याला **यणादेश** असे म्हणतात

( ड ) **य्, व्, र्, ल्** च्या जागीं **इ, उ, ऋ, ऌ**, आले तर त्या आदेशास **संप्रसारण** असे म्हणतात.

२ शब्दाचे रूप होताना केव्हा केव्हां मध्ये दुसरा एक फाजील वर्ण येतो त्यास **आगम** असें म्हणतात. ]

### १ स्वरसंधि.

३ **स्वरसंधि**:—दोन स्वरांचा संधि झाला म्हणजे त्या संधीस **स्वरसंधि** असे म्हणतात.

[ मराठींत एकापुढें एक आलेल्या स्वतंत्र शब्दाचा संधि होत नाही. तेव्हा मराठी सामासिक शब्द, संयुक्त शब्द तद्धितादि प्रत्यय लागणे एवढ्यापुरतेंच संधीचे महत्त्व आहे.]

**४ सजातीय स्वरांचा संधि**:—दोन सजातीय स्वर एकापुढें एक

आले तर त्यांचा संधि त्यांच्या दीर्घ स्वरांत होतो. जसे :–सुर + असुर= सुरासुर; कवि + इच्छा = कवीच्छा; गुरु + उपकार = गुरूपकार.

[ अ–आ, इ–ई, उ–ऊ इ अनुक्रमें एकमेकाचे सजातीय स्वर आहेत ]

**५ अ** किंवा **आ** याच्यापुढे **इ, उ, ऋ, ऌ,** हे ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वर आले तर त्याचा संधि **गुणादेश** रूपाने होतो. जसे :–ईश्वर + इच्छा = ईश्वरेच्छा; सूर्य + उदय = सूर्योदय; राजा + ऋषि = राजर्षि.

**अपवाद** :—स्व + ईर = स्वैर; अक्ष + ऊहिनि = अक्षौहिणी; प्र + ऊढ = प्रौढ; सुख + ऋत = सुखार्त.

**६ अ** किंवा **आ** याच्यापुढे **ए** किंवा **ऐ** आल्यास त्याचा संधि **ऐ** असा होतो. आणि **ओ** किंवा **औ** आल्यास **औ** असा होतो. जसे :— सदा + एव = सदैव; एक + एक = एकैक, वन + औषधी = वनौषधी.

( १ ) **अपवाद** :–बिंब + ओष्ठ = बिंबोष्ठ किंवा बिंबौष्ठ; अधर + ओष्ठ = अधरोष्ठ किंवा अधरौष्ठ.

( २ ) **अपवाद** :–मराठीत काही वेळा दोहोंच्या जागी **पहिला** किंवा अगोदरचा स्वर येतो, तेव्हा त्याला **पूर्वरूपसंधि** असे म्हणतात. जसे :–काही + असा = काहीसा. काही वेळा **दुसरा** किंवा **नंतरचा** स्वरच येतो, त्याला **पररूपसंधि** असे म्हणतात. जसे :–एक + एक = एकेक; पड + ओत = पडोत.

**७ इ, उ, ऋ, ऌ,** या ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वरांपुढे कोणताही विजातीय वर्ण आला असतां **यणादेश** संधि होतो. जसे :–प्रति + एक = प्रत्येक; मनु + अंतर = मन्वंतर; हेतु + आभास = हेत्वाभास; क्ऌ + आरव = क्लारव; मातृ + इच्छा = मात्रिच्छा.

**८ ए, ऐ, ओ, औ,** यांच्यापुढे कोणताही स्वर आला तर त्याचे जागी अनुक्रमे **अय्, आय्, अव्, आव्** असे आदेश होऊन, त्यांचे शेवटचे **य्, व्,** पुढील स्वरांत मिळतात. जसे :—ने + अन = नयन; गो + ईश्वर = गवीश्वर; नौ + इक = नाविक.

## २ व्यंजनसंधि.

९ वर्गीय कठोर व्यंजनापुढें स्वर किंवा वर्गीय मृदु व्यंजन आले असतां त्या कठोर व्यंजनाच्या जागी त्या वर्गांतील तिसरे व्यंजन येतें. जसें :—दिक् + विजय = दिग्विजय; सत् + आचार = सदाचार. इ०

१० अनुनासिकाशिवाय कोणत्याही वर्गीय मृदु व्यंजनापुढें कठोर व्यंजन आले असतां त्या मृदु व्यंजनाच्या जागीं त्या वर्गांतील पहिले व्यंजन येते. जसें :—शरद् + काल = शरत्काल; क्षुध् + पिपासा= क्षुत्पिपासा. इ.

[ वरील दोन्ही नियम लावतांना अन्त्य **च्**, **ज्**, **श्** यांना **क्** समजतात. या **क्** चा **ग्** ही होतो. जसें :—वाच् + पति = वाक्पति, दिश् + पाल = दिक्पाल, दिक् + अंबर = दिगंबर. इ० ]

११ कोणत्याही वर्गीय व्यंजनापुढे नासिक्य व्यंजन आले असतां त्या वर्गीय व्यजनाच्या जागी त्या वर्गातील अनुनासिक विकल्पाने येते. जसे :—षट् + मास = षण्मास किंवा षड्मास; वाङ् + मन = वाङ्मन किंवा वाग्मन.

१२ त् वर्गातील व्यजनापुढे **च** वर्गातील किंवा ट वर्गातील व्यजन किंवा **श्**, **व्**, **ल्** ही व्यंजने आली तर पहिल्याच्या जागीं दुसरे येते. जसे :—तत् + चरित्र = तच्चरित्र; सत् + जन = सज्जन, भगवत् + लीला = भगवल्लीला. इ०

१३ अनुनासिकाशिवाय कोणत्याही वर्गीय व्यंजनापुढे **श** आल्यास त्या **श्** चा **छ्** होतो व मागील व्यजनाचा **च्** होऊन त्यांत मिळतो. जसे :—सत् + शिष्य = सच्छिष्य; चित् + शक्ति=चिच्छक्ति; उत् + शृंखल = उच्छृंखल. इ.

१४ ऱ्हस्व स्वरापुढे छ् आल्यास त्याचा च्छ् होतो. जसे :— इक्षु + छाया = इक्षुच्छाया इ.

१५ ‘ अहन् ’ ( दिवस ) यांतील **न्** पुढे कोणताही वर्ण आला तर **न्** चा **र्** होतो. पण **र्** आरंभी असलेला शब्द आला तर **न्** चा

विसर्ग होतो व त्याचा ओ होतो. अहन् + गण=अहर्गण; अहन् + रात्र = अहोरात्र.

१६ वर्गीय कठोर किंवा मृदु व्यंजनापुढे ह् आला तर त्या ह् च्या जागी कठोर व्यंजनाच्या वर्गातील चौथे व्यंजन विकल्पानें येते. जसे :— उत् + हरण = उद्हरण किंवा उद्धरण; वाक् + हीन =वाग्धीन किंवा वाक्हीन इ.

## ३ अनुस्वारसंधि.

१७ शब्दाच्या अन्तीं ङ्, ण् किंवा न् असला व त्याच्यामागे ऱ्हस्व स्वर असला तर पुढे कोणताही स्वर आल्यास ङ्, ण्, न् यांस द्वित्व होते. जसें :—प्रत्यङ् + आत्मा = प्रत्यङ्ङात्मा; सगुण् + ईश = सगुण्णीश; ससन् + अच्युत = ससन्नच्युत इ.

१८ म् पुढे कोणतेही व्यजन आले तर म् चा अनुस्वार होतो किंवा पुढील व्यंजनाच्या वर्गातील अनुनासिक येतें. जसे :—सम् + ताप = संताप किंवा सन्ताप; सम् + जय = संजय किंवा सञ्जय इ.

१९ अनुस्वारापुढे य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, हीं व्यजने आलीं तर त्यांचा उच्चार अनुक्रमे यँ, वँ, लँ इ. असा होतो. जसे :—सम् + योग = सँयोग; सम् + लग्न = सँलग्न.

[ संस्कृतांत वरील उच्चार विकल्पानें लिहितात. पण मराठींत तशी रीत नाही. म्हणजे सिंह याचा उच्चार ‘ सिंव्ह ’ असा करावयाचा. पण लिहितांना ‘ सिंह ’ असेंच लिहिलें पाहिजे ]

## ४ विसर्गसंधि.

२० विसर्गापुढें च्, छ्, ट्, ठ्, त्, थ् ही व्यंजने आलीं तर विसर्गाच्या जागीं स् होतो. आणि यांपैकीं च् व छ् नंतर स् चा श् होतो. जसें :—शनैः + चर = शनैश्चर; नभः + छत्र = नभश्छत्र; चक्षुः + तेज = चक्षुस्तेज.

२१ विसर्गापुढें श्, ष्, स् आल्यास, त्यांचे श्, ष्, स् होतात

किंवा विसर्ग तसाच राहतो. जसे :—पुरः + सर = पुरस्सर; पुरःसर; निः + शेष = निश्शेष; निःशेष.

२२ विसर्गापुढे क्, ख्, प्, फ् आले तर विसर्ग कायम राहतो. जसे:—रजः + कण = रजःकण; अधः + पतन = अधःपतन; पण मागे इ, उ असल्यास विसर्गाबद्दल ष् होतो. जसे :—निः + कारण = निष्कारण; दुः + कृत = दुष्कृत; निः + फल = निष्फल.

**अपवाद** :—दुः + ख = दुःख, निः + पक्ष = निःपक्ष.

२३ विसर्गाच्यामागे **अ** हा स्वर व पुढे **अ** किंवा मृदुव्यजन आलें असता विसर्गाचा **ओ** होतो. जसे :—अधः + वदन = अधोवदन; मनः + रथ = मनोरथ; रजः + गुण = रजोगुण इ.

[ विसर्ग हा **स्** व **र्** यांचें रूपांतर म्हणून मागें सांगितलेंच आहे विसर्गविषयक वरील सर्व नियम विसर्ग **स्** चे रूपान्तर असतानाचे आहेत. विसर्ग **र्** चे रूपान्तर असतो तेव्हाचे नियम पुढें दिले आहेत. ]

२४ विसर्गाच्या मागे **अ** किंवा **आ** ह्यांच्याशिवाय इतर स्वर असून पुढे मृदु व्यंजन आले तर त्या विसर्गाचा **र्** होतो. जसे :—बहिः + द्वार = बहिर्द्वार; निः + लेप = निर्लेप; दुः + आत्मा = दुरात्मा.

**अपवाद** :—पुनः + जन्म = पुनर्जन्म.

२५ विसर्गाच्या पुढे **र्** असला तर विसर्गाचा **र्** होऊन त्याचा लोप होतो व मागील स्वर दीर्घ होतो. जसे :—निः + रस = नीरस.

[ येथे अन्तर्घटनेसंबधीं विचार पुरा होतो हें अभ्यासकाच्या लक्षात आलेंच असेल ]

---

प्रकरण २

# बाह्यघटना.

## उपोद्घात.

१ शब्दाची बाह्यघटना दोन रीतीनीं होते ( १ ) प्रत्ययांनी व ( २ ) इतर शब्दांनी.

२ **प्रत्यय** :—घटनेसाठी शब्दापुढे जे अक्षर किंवा अक्षरें येतात त्यांना प्रत्यय असे म्हणतात.

### १ प्रत्ययांचें वर्गीकरण.

३ **प्रत्ययांचे प्रकार** :—प्रत्ययाचे तीन प्रकार आहेत ( १ ) साधक प्रत्यय, ( २ ) विकारक प्रत्यय व ( ३ ) इतर प्रत्यय.

४ **साधक प्रत्यय** :—सिद्ध शब्दास लागून साधित शब्द बनविणाऱ्या प्रत्ययास **साधक** प्रत्यय असे म्हणतात.

५ **विकारक प्रत्यय** :—लिंग, वचन, विभक्ति, काळ, अर्थ इत्यादि विकाराची रूपे ज्या प्रत्ययानी सिद्ध होतात त्याना विकारक प्रत्यय म्हणतात

६ **इतर प्रत्यय** :—केवळ विशिष्ट अर्थ दाखविणारे व विभक्ति काळ याच्याही पुढे येणारे प्रत्यय **इतर** या सदराखाली येतात.

[ **च, ही, ना, मात्र, सुद्धां, देखील**, हे ते **इतर** प्रत्यय होत. यांना आजवर 'शुद्ध शब्दयोगी' म्हणत. याविषयीं 'शब्दयोगी' भागात चर्चा झालीच आहे. पुढेही प्रत्यय भागात होईल ]

### २ घटक शब्दांचे प्रकार.

७ **घटक शब्दांचे प्रकार** :—घटक प्रत्ययांप्रमाणे घटक शब्दांचे ( १ ) साधक व ( २ ) विकारक असे दोन मुख्य प्रकार आहेत.

९ **साधक शब्द** :—साधक प्रत्ययाप्रमाणे जे शब्द साधित शब्द तयार करतात त्यास **साधक शब्द** असे म्हणावें. याचे दोन प्रकार

आहेत. ( १ ) **संयोगी साधक शब्द**, : जो संयुक्त साधितशब्द तयार करतो व ( २ ) **समासक शब्द**, जो सामासिक शब्द तयार करतो.

**१० विकारक शब्द** :— विभक्ति व आख्यात प्रत्ययाचे कार्य जे शब्द करतात त्या शब्दांस विकारक शब्द असे म्हणावे. यांतही ( १ ) विभक्तिक, ( २ ) कालक व ( ३ ) अर्थक असे तीन पोटप्रकार आहेत. त्याचें कार्य त्याच्या नावावरूनच समजण्यासारखे आहे.

## ४ घटनापूर्व फेरफार.

**११ घटनापूर्व फेरफार** :—प्रत्यय अगर शब्द लागण्यापूर्वी मूळ शब्दांत अनेक **फेरफार** होतात. त्यासबंधी विस्ताराने विचार करण्याची आवश्यकता आहे.

[ हे फेरफार समजण्यास पुढील संज्ञाचें ज्ञान आवश्यक आहे —

( १ ) **अन्त्यस्वर व अन्त्यवर्ण** :–शब्दाच्या शेवटच्या वर्णास **अन्त्यवर्ण** व शेवटच्या अक्षरास **अन्त्याक्षर** असें म्हणतात. तसेच शेवटच्या वर्णाच्या पूर्वीच्या वर्णास **उपान्त्यवर्ण** असे म्हणतात ( २ ) शब्दाच्या शेवटी जसा स्वर येतो, त्याप्रमाणे शब्दास ' अकारान्त ', ' आकारान्त ' इ म्हणतात स्वरानंतर बिंदु असला तर त्याचाही ह्या ' अन्तांत ' समावेश होतो, जसें :—पाखरु, तळें इ नामें ' ऊ ' कारांत व ' ए ' कारान्त म्हणून सांगायचीं नामाचे व्याकरण सांगताना ' अन्त ' सांगण्याची पूर्वी चाल होती आतां तो सांगत नाहींत.

शब्दांपुढें प्रत्यय व इतर शब्द लावतांना मध्ये स्वरागम झाल्यामुळें अन्त्याक्षरात व उपान्त्यक्षरात काहीं फेरफार होतात त्यासबधीं नियम पुढें दिले आहेत ]

## २ लिंग, वचन, विभक्ति-पूर्व फेरफार.

१२ अकारान्त दोन अक्षरी शब्दातील **अ** चा दीर्घस्वर **आ** झाला असतां उपान्त्य दीर्घ **ई** व **ऊ** हे ऱ्हस्व होतात. जसे :— **फूल**–फुलाचा, मीठ– मिठाचा, मूठ—मुठीत.

१३ अकारान्त तीन अक्षरी शब्दांतील उपान्त्याक्षराच्या मागें संयुक्तवर्ण किंवा **ह** कार असेल व पुढे **ई**, ऊ आले तर उपान्त्य **ई**, ऊ ऱ्हस्व होतात. जसे :—सिंहीण – सिंहिणीस, चाहूल – चाहुलीस इ.

१४ अकारान्त तीन अक्षरी शब्दांतील द्वितीयाक्षर जोडाक्षर नसलें व त्यांत हकार नसला तर त्यांतील ई, ऊ ऱ्हस्व होतात. किंवा विकल्पानें त्याच्या जागीं अ येतो. जसे :—परीट – परिटास, परटास; कुरूप – कुलुपास, कुलपास; कणीक – कणिकेस, कणकेस इ.

१५ अकारान्त तीन अक्षरी शब्दांतील ईकारान्त व ऊकारान्त उपान्त्य अक्षरांच्या मागील म्हणजे त्या शब्दाचें पहिले अक्षर दीर्घ असेल तर उपान्त्य अक्षरांतील ई व ऊ च्या जागी त्यांचा ऱ्हस्व स्वर न येतां अ असाच आदेश होतो. जसे :—बेडूक – बेडकास; रेशीम – रेशमास; शेपूट – शेपटास. इ.

१६ ईण प्रत्ययान्त चार किंवा चारांपेक्षां अधिक अक्षरी स्त्रीलिंगी उपान्त्य अक्षरातील ई ऱ्हस्व होते. किंवा तिच्या जागी अ हा आदेश होतो. जसे :—परिटिणीस, परटणीस, कुंभारिणीस, कुंभारणीस

१७ चार किंवा चारापेक्षां अधिक अक्षरी अकारान्त शब्दाच्या उपान्त्याक्षरांतील दीर्घ ई व ऊ फक्त ऱ्हस्व होतात त्यांना अ हा आदेश होत नाहीं. जसे :— सोयरीक – सोयरिकेस; रजपूत – रजपुतास.

**अपवाद** :—कोथंबीर, इटकुर हे शब्द अपवाद आहेत. त्यांचीं विकल्पानें कोथबरीस, इटकरास अशीं रूपे होतात.

[ वरील नियम संस्कृत भाषेंतील दीन, शरीर, शूर, रूप वगैरे शब्दास लागू नाहींत. जसे :—दीनास, शरीरास, रूपास इ. ]

१८ मराठींत अन्त्याक्षरातील स् ह्या व्यंजनाच्या पुढे ई हा स्वर आला असतां स् चा श् होतो. जसें :—असा – अशी; शिसा – शिशी इ.

१९ सकारान्त शब्दाच्या विकारी रूपांत ज्या ठिकाणी ‘ स्या ’ किंवा ‘ श्या ’ असें अक्षर यावयाचें त्या ठिकाणी ‘ शा ’ असे अक्षर येतें.

२० **सर्वनामाचे फेरफार** :—सर्वनामाचे फेरफार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत:—

| सर्वनाम | फरक | सर्वनाम | फरक | सर्वनाम | फरक |
|---|---|---|---|---|---|
| तो | त्या | आपण | आपणा | आपला | आपुला, अपुला |
| ती | ति, तो | कोण | कोणा, कोणी | त्या | तया |
| ते | त्या | काय | कशा | ता | ते |
| हा | या, ह्या | आम्ही | अम्ही | ही | हे |
| ही | हि, इ, ह्री | आम्हा | अम्हा | ज्या | जया |
| हे | ह्या | माझा | मम, मदीय | जे | जया |
| जो | ज्या | तुझा | तव, त्वदीय | त्याची | तदीय |
| जी | जि, जी | आपणा | अपुणा, अपणा | | |
| जे | ज्या | | | | |

टीप —यांतील काहीं फरक पद्यात होतात

## ३ सामान्यरूप फेरफार.

२१ **सामान्यरूप** :—विभक्ति प्रत्यय, चा, चि, चे इ. स्वामित्व-दर्शक तद्धित प्रत्यय व शब्दयोगी लावण्यापूर्वी शब्दामध्ये सामान्यपणे जो फेरफार होतो त्याला **सामान्यरूप** असे म्हणतात.

[ सामान्यरूप हा एक घटनेपूर्वी शब्दांत होणारा महत्त्वाचा फेरफार आहे हा फेरफार मराठी भाषेत आरंभीं दिसून येत नाहीं हळूहळू तो मराठी भाषेत येऊन आतां स्थिरस्वरूपात दिसत आहे सामान्यरूपाच्या संख्येच्या आदेशाच्या व्युत्पत्ती-संबंधींही बऱ्याच व्याकरणकारांनीं चर्चा केली तथापी व्याकरणशास्त्राशीं प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळें आम्हीं त्यासंबंधीची चर्चा टाळली आहे. सामान्यरूप होण्यापूर्वी १२ ते २९ पर्यंत नियमात सांगितलेले फेरफार शब्दास होतात ]

२२ नामशब्द ज्याप्रमाणे आकारान्त, ईकारान्त, ऊकारान्त व एकारान्त, ओकारान्त, असेल त्याप्रमाणे सामान्यरूपाचे **आ, ई, इया, इये, या, ऊ, वा, अवा, उवा, उवे, ए, वे, अवे** असे तेरा आदेश होतात.

२३ या आदेशासंबंधीं माहिती पुढील तक्त्यात क्रमानें दिली आहे :—

## १ ‘ आ ’ आदेश सामान्यरूप.

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | पाट | अकारान्त | पुल्लिंगी | पाटास, पाटावर |
| २ | ताट | अकारान्त | नपुसकलिंगी | ताटानें, ताटामध्ये |
| ३ | तट्टू | ऊकारान्त | पुल्लिंगी | तट्टास, तट्टापाशीं |
| ४ | वासरूं | ऊकारान्त | नपुसकलिंगी | वासरानें, वासरापुढें |

## २ ‘ ई ’ आदेश सामान्यरूप.

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | कवि | इकारान्त | पुल्लिंगी | कवीस, कवीमुळें |
| २ | मति | इकारान्त | स्त्रीलिंगी | मतीनें |
| ३ | भित | अकारान्त | स्त्रीलिंगी | भितींत, भितींवर |

## ३ ‘ इया ’ आदेश सामान्यरूप.

( यांत ‘ बी ’ हा एकच शब्द येतो )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | बीं | ईकारान्त | नपुसकलिंगी | बियांत, बियामध्ये |

## ४ ‘ इये ’ आदेश सामान्यरूप.

( यांत ‘ बी ’ आणि ‘ स्त्री ’ असे दोनच शब्द येतात. )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | स्त्री | ईकारान्त | स्त्रीलिंगी | स्त्रियेनें, स्त्रियेमध्यें |
| २ | बी | ईकारान्त | स्त्रीलिंगी | बियेला, बियेत |

## ५ 'या' आदेश सामान्यरूप.

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | घोडा | आकारान्त | पुल्लिंगी | घोड्याला, घोड्यावर |
| २ | तेली | ईकारान्त | पुल्लिंगी | तेल्यास, तेल्यापाशीं |
| ३ | पाणी | ईकारान्त | नपुसकलिंगी | पाण्याशीं, पाण्यामध्यें |
| ४ | तळे | एकारान्त | नपुसकलिंगी | तळ्यांत, तळ्यावर |
| ५ | तो (जो) | ओकारान्त | पुल्लिंगी | त्यानें (ज्याने, ज्याकडे) |

## ६ 'ऊ' आदेश सामान्यरूप.

( गुरु, धेनु, वसूसारखे शब्द. )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | गुरु | उकारान्त | पुल्लिंगी | गुरूनें, गुरूमध्ये |
| २ | धेनु | उकारान्त | स्त्रीलिंगी | धेनूस, धेनूशीं |

## ७ 'वा' आदेश सामान्यरूप.

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | गहू | ऊकारान्त | पुल्लिंगी | गव्हांत, गव्हामध्यें |
| २ | तारू | ऊकारान्त | नपुसकलिंगी | तार्वास, तार्वामध्यें |

## ८ 'अव' आदेश सामान्यरूप.

( 'वा' आदेश होणाऱ्या लाडू, तारू इत्यादि शब्दांत हा आदेश विकल्पाने येतो. )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | साडू | ऊकारान्त | पुल्लिंगी | साडवास |
| २ | तारू | ऊकारान्त | नपुसकलिंगी | तारवास |

## ९ 'अवे' आदेश सामान्यरूप.

( ' ऊ ' स्त्रीलिंगी शब्द )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | सासू | ऊकारान्त | स्त्रीलिंगी | सासवेस |

## १० 'उवा' आदेश सामान्यरूप यांत ऊकारान्त पुल्लिंगी शब्द येतात

( यांत उकारान्त पुल्लिंगी शब्द येतात )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | पू | ऊकारान्त | पुल्लिंगी | पुवास, पुवावर |

## ११ ' उवे ' आदेश सामान्यरूप.

( ' ऊकारांत स्त्रीलिंगी ' धू ' आणि ' ऊ ' हे शब्द यात येतात )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | धू | ऊकारान्त | स्त्रीलिंगी | धुवेत, धुवामध्यें |

## १२ ' ए ' आदेश सामान्यरूप.

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | वाट | अकारान्त | स्त्रीलिंगी | वाटेत, वाटेवर |
| २ | शाळा | आकारान्त | स्त्रीलिंगी | शाळेत, शाळेमध्यें |

## १३ ' वे ' आदेश सामान्यरूप.

( यात सासू, पिसू, जळू, इत्यादि अव आदेश होणारे शब्द येतात. )

| प्रकार | शब्द | अन्त | लिंग | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| १ | जाऊ | ऊकारान्त | स्त्रीलिंगी | जावेनें, जावेपाशी |

[ **दामले** सांगतात की सामान्यरूपाचे प्रकार **दादोबांनीं** सात, **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांनीं तेरा, **गुंजीकरांनीं** दोन किंवा पोटभेदांसह चार असे केले आहेत.

**दामल्यांनी** प्रथम चार मुख्य व त्याच आदेशाप्रमाणे सहा उपप्रकार केले आहेत. यातच 'अविकृतांग' किंवा सामान्यरूपाचा अभाव हा एक भेद आरंभींच कल्पून त्याची गणना करून अखेरीस चौदाचा आंकडा ते सांगतात आम्ही **कृष्णशास्त्र्यां-** प्रमाणे तेराच प्रकार केले आहेत त्याचे निबंध प्रत्यक्षतः पुढे नसल्यामुळे त्याच्याच तत्वानुसार हे प्रकार केले आहेत असें सांगता येत नाहीं. आम्हीं सामान्यरूपाचाच विचार करीत असल्यामुळें, ते कोठे होत नाहीं ते सांगण्याचे कारण नाही तेव्हां, अविकृतांग हा प्रकार आम्ही स्वीकारला नाही पुढे वाक्ययाच्या विभक्ति प्रकरणांत यासबंधीं विचार होईल त्याचप्रमाणे एकाच शब्दाचे अनेक आदेश विकल्पाने होतात. उदाहरणार्थ 'पिसू' ह्या शब्दाचे सामान्यरूप कधीं होत नाहीं तर कधीं 'पिसवे', 'पिस्व' अशा दोन तऱ्हानीं होते याचाही विचार विभक्तिप्रकरणात होईल विभक्तीशीं जोडूनच सामान्यरूपाचा विचार केल्यामुळें पूर्ववैयाकरणाच्या एतद्विषयक अडचणी उत्पन्न झाल्या ]

## ४ इतर फेरफार.

**२४ काळपूर्व फेरफार :**—यात ( १ ) वर्तमानकाळापूर्वीचे फेरफार व ( २ ) भूतकाळापूर्वीचे फेरफार असे दोन प्रकार आहेत. भविष्यकाळात फेरफार होत नाहीत.

**२५ वर्तमानकाळपूर्व फेरफार :**—वर्तमानकाळाच्या प्रत्ययापूर्वी सकर्मक क्रियापदाच्या बाबतीत 'इ' असा आगम विकल्पेकरून होतो. जसे, करतो-करितो.

**२६ भूतकाळपूर्व फेरफार :**—भूतकाळात क्रियापदांत निराळेच आगम येतात. जसेः—घेतो—घेतला; जातो—गेला.

**२७ भेदपूर्व फेरफार :**—प्रयोजक व शक्यभेदी क्रियापदांस काळ अर्थादि प्रत्यय लावण्यापूर्वी 'अव' हा प्रत्यय लागतो. जसेः— करवतो, करवते. प्रयोजकांत 'इ' असाही आगम येतो. जसे 'करिवतो.'

**२८ मुखपूर्व फेरफार :**—'जे' या मुखप्रत्ययापूर्वी 'इ' हा आगम होतो. जसे :—करिजे, जाइजे, इ.

**२९ शब्दपूर्व फेरफार :**—याचे ( १ ) विभक्ति किंवा इतर ( शब्दयोगी ) पूर्वी फेरफार ( २ ) इतर शब्दापूर्वी होणारे फेरफार, ( ३ ) कालअर्थपूर्व फेरफार, ( ४ ) भेदपूर्व फेरफार, ( ५ ) मुखपूर्व फेरफार असे पाच प्रकार आहेत.

**३० विभक्ति किंवा इतर शब्दयोगीपुढें होणारे फेरफार :**—हा फेरफार सामान्यरूपाचा आहे. जसेः—रामाप्रति, घरावर--मध्ये,-पासून हा एक प्रकार व बरोबर, खालीं इ. इतर शब्दयोगी.

**३१ इतर संयुक्त शब्दांच्या आरंभींचे शब्द :**—( १ ) शब्दयोगी विशेषणे. जसे :—पाहण्याजोगा, देण्यासारखा; ( २ ) संयुक्ताच्या आरंभीच्या शब्दास पुढील शब्द शब्दयोगी नसताही सामान्यरूप होतेः हातपाय, पानपत्रावळी, खरेखोटे यास विभक्तिरूपे लावली म्हणजे हातापायाला इ. रूपे होतात. कांही ए, ओ सारखे स्वतंत्र फेरफार होतात. जसेः—मळेकरी, पहारेकरी, घरोघर, दारोदार, ( ३ ) सामासिक शब्द फेरफार उदा. ( १ ) खऱ्याखोटयाचा ( २ ) दीनानाथ, रत्नागिरी इ.

**३२ कालअर्थपूर्व फेरफार :**—या फेरफारांत कालापूर्वी व अर्थापूर्वी मुख्य क्रियापदाचे कृदत रूप होते. जसे : —**करीत** आहे, **केलेलें** आहे, **करतां** येते, **करावयास** लावले.

**३३ मुखपूर्व फेरफार :**—येथेही मुख्य क्रियापदाचे कृदतरूप होते. जसे :—**केले** गेले, **केले** जाईल. इ.

---

# अध्याय पहिला.

## प्रत्यय व प्रत्ययवजा शब्द.

### १ प्रत्यय.

**१ साधक प्रत्यय :**—साधक प्रत्ययाचे (अ) तद्धित प्रत्यय, (ब) कृदंत प्रत्यय, असे दोन प्रकार आहेत.

**२ तद्धित प्रत्यय :**—धात्वेतर शब्दास लागणाऱ्या साधक प्रत्ययास **तद्धित** प्रत्यय असे म्हणतात. जसे :—पणा – देवपणा; य – माधुर्य; का – पाहुरका इ.

**३ कृदंत प्रत्यय :**—धातूंस लागणाऱ्या साधक प्रत्ययास कृदंत प्रत्यय असे म्हणतात. जसे :—णे – करणे; इत – करित; ताना – करतांना इ.

### २ विकारक प्रत्यय.

**४ विकारक प्रत्यय :**—विकारक प्रत्ययाचे (१) लिंग व वचन प्रत्यय, (२) विभक्ति प्रत्यय, (३) काळ व पुरुष प्रत्यय, (४) अर्थ व पुरुष प्रत्यय; असे चार प्रकार आहेत.

[ यापैकीं लिंग, वचन व पुरुष हे प्रत्यय विभक्तिकालादि प्रकारात गुरफटलेले दिसून येतात जेथे ते स्वतंत्र दिसतात तेथें ते तसे दाखविले आहेत ]

### १ लिंग व वचन प्रत्यय.

**५ लिंग व वचन प्रत्यय :**—वचनविषयक प्रत्ययाची माहिती लिंगानुसार पुढील तीन तक्त्यात दिली आहे.

#### १ पुलिंगी नामें व सर्वनामें.

| शब्द | अन्त | प्रत्यय | अनेक. रूप | इतर उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| दिवस | अकारान्त | (नाहीं) | दिवस | पुरुष, देव इ |
| आंबा | आकारान्त | ए | आंबे | हा, तो, रस्ता इ |
| कवि | इकारान्त | (नाहीं) | कवि | अग्नि, नृपति |
| भानु | उकारान्त | (नाहीं) | भानु | शत्रु, रिपु इ |
| लाडू | ऊकारान्त | (नाहीं) | लाडू | साडू, गड्डू, तट्टू इ. |
| टाहो | ओकारान्त | (नाहीं) | टाहो | लाहो, डोहो, मोहो |
| पौ | औकारान्त | (नाहीं) | पौ (पव) | चौ (चव) |

## २ स्त्रीलिंगी नामें व सर्वनामें.

| शब्द | अन्त | प्रत्यय | अने. रूप | इतर उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| भिंत | अकारान्त | ई | भिंती | झेप, पोफळ, जात इ. |
| वाट | अकारान्त | आ | वाटा | झेप, रेघ, खाट इ. |
| भाषा | आकारान्त | (नाहीं) | भाषा | शाळा, गगा इ. |
| मति | इकारान्त | (नाहीं) | मति | रीति, प्रीति इ |
| नदी | ईकारान्त | या, (नाहीं) | नद्या | जी, ती, आई, बाई, स्त्री, बी, इ |
| धेनु | उकारान्त | (नाहीं) | धेनु | तनु, हनु, रज्जु इ |
| सासू | ऊकारान्त | आ, (नाहीं) | सास्वा | जाऊ, धू, ऊ इ |
| आते | एकारान्त | आ | आता | सवे, वन्से |
| पै | ऐकारान्त | आ, (नाहीं) | पया | तिवै, गैइ. |
| बायको | ओकारान्त | आ | बायका | ढबो, ताटको |

**टीप :**—कित्येक ठिकाणीं प्रत्यय देऊन पुढे नाहीं असें लिहिले आहे ते कांहीं शब्दाविषयीं विकल्पानें असें समजावें

## ३ नपुसकलिंगी नामें व सर्वनामें.

| शब्द | अन्त | प्रत्यय | अने. रूप | इतर उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| घर | अकारान्त | ए | घरें | पान, फूल, रान इ. |
| मोतीं | ईकारान्त | ए | मोत्यें | पाणी, मिरीं इ |
| गुरू | ऊकारान्त | ए | गुरें | पाखरू, वासरू इ. |
| तळें | एकारान्त | ई | तळीं | तें, कुत्रे, मडकें इ |

[लिंग व वचन यासबधींची प्रत्यक्ष रूपे पुढे वाक्येय प्रकरणात स्वतत्र रीतीनें देण्यांत येतील त्यावेळीं सर्व रूपाचा विचार होईल. येथे फक्त प्रत्ययाचा विचार केला आहे ]

## २ विभक्ति प्रत्यय.

६ **विभक्ति प्रत्यय :**—विभक्ति प्रत्यय पुढील तक्त्यांत दिले आहेत :—

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| २ द्वितिया | स, ला, तें | स, ला, ना, तें |
| ३ तृतीया | नें, ए, शीं | नीं, हीं, शीं |
| ४ चतुर्थी | स, ला, ना, तें | स, ला, ना, तें |
| ५ पचमी | ऊन, हून | ऊन, हून |
| ७ सप्तमी | त, ई, आं | त, इ, आं |
| ८ सबोधन | रे, गे, गो (लुप्त) | नो |

[ विभक्ति व विभक्तिरूपें यांविषयीं सविस्तर विवेचन वाक्येमाच्या ‘ विकरण ’ प्रकरणांत होईल. हेच प्रत्यय नामास व इतर जातीच्या शब्दांस म्हणजे क्रियापदास लागतात. पण त्यापासून विभक्तिरूपें सिद्ध न होतां, विशेषणे किंवा क्रिया विशेषणे होतात गेल्याचा, रस्त्याने, झाल्याला इ येथें प्रथमा व षष्ठी विभक्ति आतां गाळल्या आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ]

## ३ काळ प्रत्यय.

**७ काळ प्रत्यय :**—निरनिराळ्या काळांचे प्रत्यय पुढील तक्त्यांत दाखविले आहेत : —

### १ वर्तमानकाळ प्रत्यय.

| एकवचन | | | | अनेकवचन |
|---|---|---|---|---|
| पुरुष | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुसकलिंग | तिन्ही लिंगी समान |
| प्रथम | तो | त्यें, ते | ते | तो |
| द्वितिय | तोस<br>सी | त्येस, तेस<br>तीस | तेस | तां, ता |
| तृतीय | तो | त्ये, ते, ती | ते | तात, ( ता, ति, ती ) |

### २ भूतकाळ प्रत्यय.

| एकवचन | | | | अनेकवचन | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुसकलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुसकलिंग |
| प्रथम | लो | ल्यें, ले | लें | लो | लो | लो |
| द्वितिय | लास | लीस | लेस | लां, लात<br>लेत | लां, लांत,<br>ल्यात | लां, लींत |
| तृतीय | ला | ली | लें | ले | ल्या | लीं |

### ३ भविष्यकाळ.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ईन ( सकर्मक ) एन ( अकर्मक ) | ऊ, णार |
| द्वितिय | शील | आल |
| तृतीय | ईल (सकर्मक), एल (अकर्मक) | तील |

## ४ रीति भूतकाळ प्रत्यय.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| प्रथम | ई ( सकर्मक ) ए ( अकर्मक ) | ऊ, ओ |
| द्वितिय | स | आ, आं |
| तृतीय | ई ( सकर्मक ) ए ( अकर्मक ) | त |

[ हे प्रत्यय कवितेंत इतर काळांसही लागतात पण त्यासबधींचा विचार पुढें वाक्येयाच्या विकरण प्रकरणांत निरनिराळ्या काळाचीं रूपें सिद्ध करतांना होईल ]

## ४ अर्थ प्रत्यय.

८ अर्थ प्रत्यय :—निरनिराळ्या अर्थाचे प्रत्यय पुढील तक्त्यांत दाखविले आहेत.

### १ आज्ञार्थ प्रत्यय.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| प्रथम | ऊ, अं ( कवितेत ) | ऊ, ओं ( कवितेत ) |
| द्वितिय | ( नाह ), ईं, ए ( कवितेत ) | आ |
| तृतीय | ऊ, ओ | ऊत, ओत |

### २ विध्यर्थ प्रत्यय.

| पुरुष | एकवचन | | | अनेकवचन | | |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| | पुल्लिग | स्त्रीलिग | नपुसकलिग | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुसकलिंग |
| प्रथम | आवा | आवी | आवे | आव | आव्या | आवीं |
| द्वितिय | आवास | आवीस | आवेंस | आव, आवेत | आव्या | आवी, आवींत |
| तृतीय | आवा | आवी | आवें | आवा, आवेत | आव्या, आव्यात | आवीं, आवींत |

### ३ संकेतार्थ प्रत्यय.

| | एकवचन | | | अनेकवचन | | |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| पुरुष | पुल्लिग | स्त्रीलिंग | नपुं. लिंग | पुल्लिग | स्त्रीलिंग | नपुं. लिंग |
| प्रथम | तो | त्यें, ते | तें | तो | तो | तो |
| द्वितिय | तास | तोस | तेस | ता, तेत | तां, त्यात | तां, तींत |
| तृतीय | ता | ती | ते | ते | त्या | तीं |

[ हीं सर्व रूपे पुढें वाक्येयाच्या विकरण प्रत्ययांत सिद्ध करावयाचीं आहेत ]

## ३ इतर प्रत्यय.

९ **इतर प्रत्यय** :—च, ही, ना, मात्र, देखील, सुद्धां, पण हे सर्व प्रातिपदिकांस लागणारे अर्थदर्शक प्रत्यय **इतर** प्रत्ययांत मोडतात. याशिवाय दुसरे प्रत्यय म्हणजे रात्रीचा, रस्त्यानें (चालतो) केल्यानें (देशाटन) इत्यादि होत. हे नें वगैरे प्रत्यय विभक्ति प्रत्यय नाहींत. कारण ते नामास किंवा सर्वनामास लागत नाहींत तर स्वतंत्र क्रियाविशेषण शब्द आहेत, कांहीं क्रियापदास लागले आहे. हेही अर्थदर्शक प्रत्यय आहेत. यासंबंधींची विशेष चर्चा क्रियाविशेषण अव्यय या भागांत होईल.

[ **च, ही, ना** इत्यादि, शब्द किंवा प्रातिपदिक नाहीत, तर केवळ अक्षर किंवा अक्षरें म्हणून एक विशिष्ट प्रकारचे प्रत्यय आहेत ते साधक प्रत्यय नाहीत व विकारक प्रत्ययही नाहींत. **दादोबां**नीं शब्दयोगी अव्ययाचीं विभक्ती प्रत्ययाप्रमाणे सामान्यरूप करणे व जोडून येऊन नामाचा, सर्वनामाचा, क्रियापदाशीं संबंध दाखविणे ही दोन मुख्य लक्षणे ठरवूनही, हीं दोन्हीं लक्षणे या शब्दात (अर्थात् त्यांच्या मताप्रमाणे) नसतां त्यांना शब्दयोगीच नव्हे तर 'शुद्ध' असे एक बिरुद जोडले आहे **दादोबां**वर **गोडबोले**, **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यानीं हल्ला केला **दामल्यां**नीं ह्या सर्वांनाच फैलावर घेतलें पण त्यांना अखेरीस नाइलाजानें **दादोबां**ची सज्ञा पत्करावी लागली; पण आतां च, ही, ना, मात्र, देखील ह्यांची प्रत्ययात गणना झाल्यामुळे ह्या भेदाचें काहीं महत्त्व राहिले नाहीं ]

## २ विकारक किंवा प्रत्ययवजा शब्द.

१० विकार प्रत्ययाचे कार्य करणाऱ्या शब्दास **विकारक** शब्द असें म्हणतात. याचे (१) विभक्तिदर्शक, (२) काल व अर्थदर्शक, (३) रूप, भेद व मुख-दर्शक.

## १ विभक्तिदर्शक शब्द.

११ विभक्तीचे कार्य करणाऱ्या शब्दयोगी अव्ययास **विभक्तिदर्शक** शब्द असे म्हणावें. पुढील तक्त्यांत हे शब्द व त्यांचें विभक्तिविषयक कार्य दाखविलें आहे.

## विभक्तिदर्शक शब्दयोगी.

| विभक्ति | शब्दयोगी |
|---|---|
| द्वितिया | प्रत, प्रति, स्तव, कडे, खातर इ |
| तृतीया | करुन, द्वारा, मुळे, कडून, प्रमाणे, बरोबर |
| चतुर्थी | लागीं, करितां, साठीं, अर्थी, बद्दल. |
| पचमी | पेक्षा, पासून, विना, खेरीज, विणें, पाडें इ |
| सप्तमी | मध्ये, माजीं, भोवतीं, ठायीं, खालीं, उपरी. |

[ शब्दयोगी शब्दाचीं विभक्ति प्रत्ययाचे कार्य व सामान्यरूप करणें हीं दोन मुख्य लक्षणें आहेत हें पूर्वी सांगितलेंच आहे हीं दोन्ही लक्षणे सामान्य आहेत. पण त्या सामान्यपणांतही फरक आहे. पहिल्या बाबतींत हें सामान्यत्व मर्यादित आहे. कारण कांहीं शब्दयोगी हें कार्य करीत नाहींत, उदा०:—जोगा, इतका ह्या शब्दयोगी विशेषणांचा विभक्ति कार्याकडे कांहींच सबध नाहीं सामान्यरूपाची गोष्टच वेगळी आहे. शब्दयोगी अव्ययाचा सामान्यरूप करणें हा गुण नियत आहे. आणि ज्या शब्दाच्या अगात हें सामर्थ्य नाहीं तो शब्द शब्दयोगीच नव्हे. उदा० ‘ भर ’ हा शब्द यानें सामान्यरूप होत नाहीं. तेव्हां त्याला शब्दयोगी न मानणेच चांगले. ह्या ठिकाणीं ‘रात्रभर’ ’, ‘ दिवसभर ’ हे क्रियाविशेषण सयुक्तशब्द असें समजावें, ‘ घडाभर ’ पाणी येथें तें सयुक्त विशेषण आहे जेथें विभक्तीचा सबध नाहीं अशा प्रसगींही तीं शब्दयोगी विरहित सयुक्त शब्दाचीं उदाहरणें म्हणून समजावें जसें—‘ कालपर्यंत ’, ‘ तेथपर्यंत ’ इ० या ठिकाणीं पर्यंत हें शब्दयोगी नसून ‘ भर ’ या शब्दाप्रमाणें सयुक्त शब्द करणारा निरर्थक शब्द आहे असें समजावे असा पक्ष स्वीकारला म्हणजे **दादोबा, कृष्णशास्त्री, जोशी** व **दामले** यांनीं उपस्थित केलेल्या सर्व अडचणींचें निराकरण होतें. शब्दयोगीसबधीं आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे प्रत्यय लावल्या-नंतर शब्दयोगी येते हा प्रकार सस्कृत व्याकरणास धरुन आहे पण मराठींत अशीं उदाहरणें जुन्या पद्यभाषेत आढळतात. आधुनिक मराठींत अशीं उदाहरणें नाहींत. शेवटीं शब्दयोगीनें झालेला शब्द क्रियाविशेषण व विशेषण जातींचें सयुक्त प्रातिपदिक असतें, एवढें सांगून शब्दयोगीचा विषय पुरा करू. ]

## २ काल-अर्थ विकारकदर्शक शब्द.

१२ काल-अर्थ विकारकदर्शक शब्द :—काल किंवा संयुक्तरीतीनें

काळ व अर्थ बनविणाऱ्या शब्दांस **काल-अर्थविकारक** शब्द असें म्हणावें. याचे दोन प्रकार आहेत.

(१) कालविकारक शब्द, (२) संमिश्र काल-अर्थविकारक शब्द.

[ कालविकारक शब्द निर्भेळ काळाच्या प्रत्ययाचे कार्य करतात. काल-अर्थ-विकारक हे समिश्र स्वरूपाचे असतात. ]

## १ कालविकारदर्शक शब्द.

**१३ कालविकारदर्शक शब्द** :—मूळच्या धातूच्या कृदंतापुढे येऊन अपूर्ण, पूर्ण व रीतिकाळ बनविणाऱ्या साह्यक्रियापदांना काल-विकारदर्शक शब्द असे म्हणावें. यासंबधीं माहिती पुढील तक्त्यांत दिली आहे.

| कृदंत | साह्यक्रियापद | काळ | उदाहरणें |
|---|---|---|---|
| त | आहे, होता, असेल | अपूर्णकाळ | बसत-आहे, होतो, असेल |
| ला, लेला | आहे, होता, असेल | पूर्णकाळ | बसलेला-आहे, होतो, असेन |
| त | असतो, असे, असेल | रीतिकाळ | बसत-असतो, असे, असेन |
| ता | झालो, झालास, झाला | सस्कृत परोक्ष | बसता-झालो, झाला |

[ याप्रमाणे सस्कृतांतील परोक्ष धरून एकदरीत तेरा काळ होतात. मराठींत फक्त बारा म्हणजे तीन मुख्य काळ व पूर्ण, अपूर्ण, रीतिकाळांचे प्रत्येकी तीन प्रकार. **दादोबा** पंधरा काळ सांगतात पण त्यांचे वर्तमान-भविष्य, भूत-भविष्य व भविष्य-भविष्य हे अर्थमिश्रित काळ आहेत **गोडबोल्यां**चे एकोणीस, **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांचे छत्तीस प्रकार हे याच कारणांमुळे झाले आहेत यांना **दामल्यां**-शिवाय सर्वांनींच सयुक्त काळ असें म्हटलें आहे. **जोश्यां**च्या मते असे सयुक्त काळ शें-दोनशे होतील म्हणून ते मानूच नयेत. अर्थात् सयुक्त क्रियापदेही मानू नयेत यांचें कारण 'काळ' व 'सयुक्त' या सज्ञाचा अर्थच त्याना समजला नाहीं हे उघड आहे. काळासबधींचा खुलासा वर झालाच आहे म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे मराठींत काळ तेराच आहेत 'सयुक्त' या शब्दाचा अर्थ जोड असा आहे. शब्दयोगीनें होणारा शब्द सयुक्तच असतो तसाच कृदत आणि साह्यक्रियापद यांच्यापासूनही जोडून बनलेला सयुक्त शब्द सयुक्त क्रियापद या सज्ञेस पात्र होतो. सयुक्त ही सज्ञा काळासबधीं लागतच नाहीं. वर्तमानकाळ हा एकेरी व रीतिभूतकाळ किंवा पूर्ण वर्तमान सयुक्त असें कसें म्हणता येईल ? सारांश, सयुक्तकाळ असें कांहीं नाहींच. ]

## २ मिश्रविकारक शब्द.

१४ काळ व अर्थ हे दोन्हीं मिश्ररीतीनें दाखविणाऱ्या शब्दांस मिश्र-विकारक शब्द असें म्हणतात. ह्यांची माहिती पुढील तक्त्यांत दाखविली आहे. हे सामान्यत: अर्थ काळनिरपेक्ष असतात. येथें अर्थाबरोबर काळही असतात. पण मुख्य महत्त्व अर्थाचे म्हणून अर्थच दाखविले आहेत :—

| धातु | कृदंत | अर्थ | साह्यक्रियापद | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| ये | त | शक्यता | येतें, आलें | बोलतां येते, आलें, येईल |
| शक | ऊ | शक्यता | शकलो, शकेन | करू शकलो |
| जा | त | सातत्य | जातो | करीत जा, जातो, जाईल |
| बस | त | सातत्य | बसतो | बोलत बसतो, बसेल |
| राह | त | सातत्य | राहतो | करीत राहतो, राहिला |
| पाहा | ऊ | इच्छा | पाहतो | जाऊ पाहतो, करू पाहतो |
| चाह | ऊ | इच्छा | चाहतो | फिरू चाहतो, झोपू चाहतो |
| टाक | ऊन | समाप्ति | टाकतो | करून टाकतो, देऊन टाकतो |
| घे | ऊन | साह्य | घेतो | शिकून घेतो |
| दे | ऊन | साह्य | देतो | करून देतो |
| अस | णार | इच्छा | आहें | जाणार आहें, होतो |
| लाग | ऊ, वयास | आरंभ | लागतो | करू लागतो, करावयास लागला |
| लाग | वें | सक्ति | लागतें–तो | करावें लागतें, करावा लागतो |
| दे | ऊ, वयास | अनुज्ञा | देतो | जाऊ देतो, जावयास देतो |
| पाह | लें, वयास | कर्तव्य | पाहिजे | केले पाहिजे, करावयास पाहिजे |
| पड | त | सक्ति | पडते | करीत पडतो |

[ हे अर्थ केवळ घटनेच्या स्पष्टीकरणार्थ सांगितले आहेत पददृष्ट्या ते सांगा-वयाचे नाहींत. ]

## ३ रूप, भेद, मुखरचनाकारक शब्द.

| धातु | साह्यक्रियापद | कृदंत | रूपान्तर | उदाहरणें |
|---|---|---|---|---|
| नस् | नाहीं, नव्हता | त, णार | अकरणरूप | करित नाही, नव्हता |
| नस् | नको, नका | ऊ | ,, आज्ञार्थी | करू नको, नका |
| नस् | नये | ऊ, तां काम } | ,, विध्यर्थी | करतां कामा नये, करू नये |
| नलगे | णे, नलगे | णे | ,,आवश्यकता | करणे नलगे |
| जा | जातो, गेला, जाईल | ला | ,, | केला जातो, गेला, जाईल |
| लाव | लावतो, लावला, लावील | वयास | प्रयोजक | करावयास लावतो,लें लावील |
| ये | येतो, आलें, येईल | तां | शक्य | करतां येते, आले, येईल |

[ कालविकारक किंवा मिश्रविकारक व रूपभेद, मुखकारक शब्द यांच्या साहाय्यानें सयुक्त क्रियापदे बनत असतात. याशिवाय दुसरीं सयुक्त क्रियापदे क्वचितच सांपडतात. सयुक्त क्रियापदें **जोश्यां**शिवाय बाकी सर्व वैयाकरण मानतात. मात्र तीं कां मानावीं व कोणतीं मानावीं याविषयीं कांहीं नियम चर्चेअन्तीं त्यांनीं घातलेले दिसत नाहींत. **दामल्यांनीं** आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणे त्या सर्वांचा खरपूस समाचार घेतला आहे. पण त्यांनींही या बाबतींत कांहीच शास्त्रीय खुलासा केलेला नाहीं. पूर्ववैयाकरणांचा यासंबधींचा दुर्ग्रह म्हणजे सयुक्त काळ व सयुक्त क्रियापदें हीं एकच. यासबधींचे निराकरण पूर्वीं झालें आहे. सयुक्त क्रियापदाचें स्वरूप, कार्य यासबधीं साकल्यानें विवेचन पुढें होईल ]

---

# अध्याय दुसरा.

## साधित शब्द.

१ साधित शब्दाचे ( १ ) उपसर्गसाधित, ( २ ) तद्धितसाधित, ( ३ ) धातुसाधित, ( ४ ) संयुक्त व ( ५ ) सामासिक असे पांच प्रकार आहेत.

### १ उपसर्गसाधित शब्द.

२ हे उपसर्ग संस्कृत, अरबी, फारसी व इंग्रजी भाषेंतील आहेत. त्यांच्या योगाने साधलेले कांही शब्द अर्थात् प्रातिपदिकें संयुक्त व सामासिक शब्द असतात. पुढील तक्त्यांत यांची व्याकरणविषयक माहिती दिली आहे:—

| उपसर्ग | अर्थ | उदाहरणें |
|---|---|---|
| अति | पलिकडे | अत्युक्ति, अतिक्रमण |
| अधि | वर, आत | अध्यात्म, अधिपति, अधिकार |
| अनु | मागाहून | अनुभव, अनुज, अनुरूप |
| अप | खाली, कमी, वाईट | अपकार, अपशकून, अपकर्ष |
| अभि | जवळ, सर्वत्र, विशेष | अभिज्ञ, अभिमान, अभ्यंतर |
| अव | खालीं, अभाव | अवनत, अवकृपा, अवलक्षण |
| वि | उलट, जास्त | विजय, वियोग |
| उत् | वर, उच्च | उत्कर्ष, उत्तेजन, उत्प्रेक्षा |
| उप | कडेस, जवळ, आणखी | उपक्रम, उपकार, उपनेत्र |
| निर्, निस् | अभाव, विशेष | निराकार, निःसंशय, निर्गमन |
| दुर्, दुस् | कठीण, वाईट | दुर्गुण, दुर्गम, दुःसह |
| नि | आंत, वर, सूक्ष्म | निधान, निबंध, निमग्न |
| परि | भोंवतीं | परिसर, परिवृत्ति, पर्यटण |
| प्रति | उलट, पुन्हा | प्रत्युत्तर, प्रतिपक्ष, प्रतिबिम्ब |
| सम् | जोडणें | संगम, संभव, संबंध |

३ यांशिवाय कांही इंग्रजी, अरबी, व फारशी उपसर्गघटित शब्दही मराठींत आढळतात. ते पुढील तक्त्यांत दिले आहेत:—

| उपसर्ग | अर्थ | उदाहरणें |
|---|---|---|
| सब | खालीं, खालचा | सब इन्स्पेक्टर, सबजज्ज |
| कम | कमी, उणा | कमजोर, कम्बख्त |
| खुश | संतोषदायक | खुशखबर, खुशमर्जी |
| गैर | उलट, जास्त | गैरशिस्त, गैरहजर, गैरवाजवी |
| दर | प्रत्येक | दररोज, दरमहा, दरसाल |
| बिन | शिवाय, अभाव | बिनचूक, बिनबोभाट |
| बे | अभाव, शिवाय | बेवकूफ, बेदम, बेदिल |
| सर | मुख्य | सरपंच, सरसुभेदार, सरदेसाई |
| हम | एकच, सर्व | हमरस्ता, हमखास |
| ब | प्रमाणे | बजिन्नस |
| बेला | शिवाय | बेलाशक |
| हर | प्रत्येक | हरवक्त, हरहुन्नर |

## २ तद्धितसाधित शब्द.

४ तद्धित प्रत्यय लागून बनलेल्या साधित शब्दांस ' तद्धितसाधित ' शब्द असे म्हणतात. असे शब्द संस्कृत, मराठी, अरबी, फारशी तद्धित-प्रत्ययापासून झालेले असतात. त्यासंबंधीं माहिती पुढील तक्त्यावरून कळेल :—

### १ संस्कृत तद्धित शब्द.

| प्रत्यय | मूळशब्द | साधित शब्द | जाति |
|---|---|---|---|
| ता, त्व, य | सम्, महत्, मधुर | समता, महत्त्व, माधुर्य | नामें |
| य, इक, मान | नव, प्रथम, श्री | नव्य, प्राथमिक, श्रीमान | विशेषणें |
| चित्, चन | किं, क्व, कदा | किंचित्, क्वचित्, कदाचित् | क्रियाविशेषणें |

### २ अरबी तद्धित शब्द.

| प्रत्यय | मूळशब्द | साधित शब्द | जात |
|---|---|---|---|
| गीर,गिरी,गर,गार | जहान्,गुलाम,सौदा,गुन्हा | जहांगीर, गुलामगिरी, सौदागर, गुन्हेगार | नाम |
| जार, बाज, बंद | गुल, नखरा, हत्यार | गुलजार, नखरेबाज, हत्यारबंद | विशेषण |

## ३ मराठी तद्धितसाधित शब्द.

| प्रत्यय | मूळशब्द | साधितशब्द | जाति |
|---|---|---|---|
| पणा, की, वा, ई | मी, पाटील, थड | मीपणा, पाटीलकी, थडावा थडाई | नामें |
| आळू, आळू, ईक, ईव | लाज, खेळ, खर्च, पाळ | लाजाळू, खेळाळू, खर्चिक, पाळींव | विशेषणें |
| चा, ची, चें | सोने, हरी, शहर | सोन्याची, हरीचा, शहराचे | विशेषण |

## ३ धातुसाधित शब्द.

**५ धातुसाधित शब्द** :—धातुसाधित शब्दांचे दोन प्रकार आहेत. ( १ ) धातुसाधित किंवा कृदंत व ( २ ) धातु.

[ क्रियापद हें प्रातिपदिक धातूपासून होते पण तो साधित शब्द नाहीं. ]

### १ धातुसाधित किंवा कृदंत.

**६ कृदंत** :—धातुपासून क्रियापद किंवा इतर धातु यांच्याशिवाय बनलेल्या शब्दांस ' कृदंत ' असे म्हणतात. याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) साह्यकृदंत, ( २ ) पदकृदंत.

**७ साह्यकृदंत** :—संयुक्त क्रियापद बनविण्यास ज्या कृदंताचा उपयोग होतो त्याला ' साह्यकृदंत ' असे म्हणावे. ह्या कृदंताला स्वत:चा अर्थ नसतो.

**८ पदकृदंत** :—जे कृदंत नाम, विशेषण, क्रियाविशेषण वगैरे स्वतंत्र प्रातिपदिक होऊं शकते त्या कृदंतास पदकृदंत असे म्हणावे.

९ पद व साह्य या दोन्ही कृदंताची माहिती पुढील तक्त्यांत दिली आहे :—

| कृदंत प्रकार | धातु | कृदंत प्रत्यय | उदाहरणें | जाती |
|---|---|---|---|---|
| साह्य कृदत | कर | ऊ, त | करू नको | ( नाहीं ) |
| ,, ,, | धर | तां | धरतां येते | ,, |
| ,, ,, | जा | ऊ | जाऊ दे | ,, |
| पद कृदत | जा | णें | जाणें ( चांगलें ) | नाम |
| ,, ,, | फुट | लेलें | फुटलेले ( चित्र ) | विशेषण |
| ,, ,, | य | ऊन | यऊन ( गेला ) | क्रियाविशेषण |

## २ धातुसाधित धातु.

१० **धातुसाधित धातू** :—धातूपासूनही कांहीं धातू साधलेले असतात. याचे ( १ ) प्रयोजक, ( २ ) शक्य व (३) अकर्तृक असे तीन प्रकार आहेत. जसे :—( १ ) तो ते काम माझ्याकडून करवतो. ( प्रयोजक ) ( २ ) मला तें काम करवते. ( शक्य ) ( ३ ) मला तेथें सांजावलें, ( अकर्तृक )

### १ प्रयोजक धातु.

११ मूळ धातूस **अव** प्रत्यय लागून हे प्रयोजक धातू तयार होतात. त्यासंबंधीं नियम पुढीलप्रमाणे आहेत.

१२ अकारान्त धातूस हा **अव** प्रत्यय लागतांना पररूप संधि होतो. जसें :—कर – करव; बस – बसव; निज – निजव. अपवाद :—कांहीं धातूंस हा संधि विकल्पेकरून होतो तर कांहीच्या बाबतींत तो होतच नाहीं. जसे :—( १ ) फितणे – फितवणें – फितावणे; सरक – सरकवणे – सरकावणे. ( २ ) फडफडणे – फडफडावणे; कडकडणे – कडकडावणें. पररूप संधि झालेल्या रूपांत 'अव' यांतील 'अ' च्या ऐवजीं विकल्पेकरून ई असा आदेश होतो.

१३ एकाक्षरी व हकारान्त धातूस **अवव** असा प्रत्यय लागतो. अकारान्तेतर धातूंस हा प्रत्यय लागतांना पूर्वरूप संधि होतो. जसे :—गाणे – गाववणे; खाणे – खाववणे; लिहिणे – लिहवणे; पहाणे – पहावणे. या प्रत्ययांतील पहिल्या व च्या जागी वि असाही आदेश विकल्पाने होतो. जसे :—गाणे – गावविणे, गाववणे; खाणे – खाववणे – खावविणे.

[ **दामल्यांनीं** कांहीं धातूंच्या रूपात उदा :—खुणावणे, वेडावणें इ. व दिसतो त्याचा प्रयोजक रूपाशीं काहीं संबंध नाहीं म्हणून सांगितले ते बरोबर आहे. पण दुसऱ्या कांहीं धातूंची गुणवृद्धि होऊन प्रयोजक रूपे होतात ( उदा :—पड–पाड, फुट–फोड ) हे खरें नाहीं. हे धातु प्रयोजक नसून स्वकृत व परकृत एवढाच त्याचा अर्थ असतो. म्हणजे 'आंबा पडला' आणि 'कोणी तरी पाडला' यात प्रयोजक भेदाचा कांहींच संबंध नाहीं. कारण 'त्याने नारळ पाडविले' यात किंवा 'त्याने लांकडें फोडविलीं' यांची साधना पद्धतशीर 'अव' लावून करतात.

प्रयोजक व शक्य भेद असा धातू प्रकार मानावा कीं नाहीं यासबधीं **दादोबा, खेर, कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांच्या मतांचा विचार करून त्यासबधीं **दामल्यांनीं** आपलेंही अखेरचे मत दिलें आहे. त्यासबधीं येथे जरा विस्तारानें विचार करू. **दामले** म्हणतात, "प्रयोजकत्वार्थक व शक्यत्वार्थक धातूस **दादोबा** हे साधित धातु न समजतां ते धातु मूळ धातूचींच प्रयोजक व शक्य भेद यांस अनुसरून विकृत रूपें होत असे म्हणतात आणि जसे प्रयोजकभेदी सर्व प्रयोग सकर्मक कर्तरी होतात, तसे त्यांच्या मतें शक्य भेदी सर्व प्रयोग अकर्मक-कर्तरी किंवा भावकर्तरी होतात यान्याविरुद्ध **कृष्णशास्त्री चिपळूणकर** ह्याचें मत असें कीं, पुरुष, काळ, अर्थ, लिंग, वचन याप्रमाणे भेद म्हणून 'क्रियापदरूपक भेदक' असे आणखी कारण मानण्याची जरूरी नाहीं मूळ धातूची रूपें जशीं बदलतात, त्याप्रमाणे हीं सावित धातूचींही रूपें बदलतात मूळ सस्कृत भाषेतही प्रयोजक धातु म्हणून वेगळे धातु मानले आहेत, प्रयोजक भेद म्हणून मानला नाहीं एवच इतर साधित धातू-प्रमाणेंच प्रयोजक रूप हें एक साधित धातु होय. याशिवाय त्यात काही न्यूनाधिक नाहीं हा **कृष्णशास्त्र्यांचा** निकाल युक्ति, सोय, व्याकरण, व्युत्पत्ति व पूर्वपरपरा किंवा इतिहास या सर्वांचे दृष्टीनें प्रयोजक रूपासबधाने निर्विवाद सिद्ध होतो व ह्यामुळेंच आम्हीं या अध्यायांत साधित धातूत प्रयोजक धातूची गणना केली आहे." तथापि शक्य धातूच्या बाबतींत **दामले कृष्णशास्त्र्यांचा** हा निर्णय मानण्यास तयार नाहींत आम्हाला **कृष्णशास्त्र्यांचें** मत मान्य आहे पण लिंग, वचन, काळ, इत्यादिप्रमाणें नव्हे तरी वाक्यरचनेच्यासबधी 'भेद' हा सांगितलाच पाहिजे असे आमचे मत आहे **कृष्णशास्त्र्यांचा** महत्त्वाचा निर्णय म्हणजे हे साधित धातु आहेत, हा होय यापेक्षा दुसरा नाहीं. सस्कृतांत प्रयोजक धातुरूप आहेत मला काम करवते यांत काम कर्मणी प्रयोग इ० कारणे चुकीची व अप्रस्तुत आहेत अर्थात शक्य भेदासबधानेंही हीं दुसरीं कारणे चुकीचीं व अप्रस्तुत आहेत तेव्हा शक्य भेदक वाक्यात कर्ता अमुक, कर्म अमुक, प्रयोग अमुक अशा तऱ्हेच **दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, जोशी, खेर** यान्याशी वाद उपस्थित करून त्यांच्या जोरावर शक्य भेद नेस्तनाबूत करण्याचे त्याचे प्रयत्न व्यर्थ आहेत यासबधी **दामल्यांनी** पुढील कारणें दिली आहेत.—( १ ) वाट, रूप इत्यादि काहीं अकर्तृक किंवा भावकर्तृक धातू-शिवाय बाकीच्या सर्व धातूचा कर्तरी प्रयोग असणे सभवनीय आहे अर्थात शक्यभेदां-तील 'करण' धातूचे कर्तरी रूप झाले पाहिजे तसे ते केव्हांच होत नाही म्हणून शक्य भेदच नाहीं. ( २ ) तसेच सकर्तृक धातूचा कर्तरीप्रयोग न होणे ही गोष्ट मराठीच्या मातृस्थानी असणाऱ्या सस्कृत व प्राकृत भाषांतच नव्हें तर इतर भाषांतही आढळत नाहीं. आणि प्राकृत व सस्कृत व इतर भाषाचा साधारण स्वभाव विरुद्ध पक्षास फारच घातक आहे. यांचे सामान्य उत्तर आम्ही वर दिलेच आहे. म्हणजे 'भेद' या व्यवस्थेशीं प्रयोग, मुख, किंवा रूप या व्यवस्थांचा कांहींच सबध नाही. त्या स्वतत्र व्यवस्था

आहेत. म्हणजे एकीसबधीं अमुक एक गोष्ट असली तर ती दुसरीसबधीं तशीच असली पाहिजे असें नाहीं. पण क्षणभर **दामले** म्हणतात त्याप्रमाणें तसे सबध असतात. असें कबूल केलें तरी त्यांनीं दिलेलीं कारणें समर्पक नाहींत असें थोड्या विचारांतीं दिसून येईल प्रथमत **दामले** म्हणतात त्या धातूमध्यें व या दोन प्रकारच्या धातूमध्यें एक महत्त्वाचा फरक आहे. आणि तो फरक म्हणजे पहिल्या प्रकारचे धातु सिद्ध असून दुसरे साधित आहेत. आणि ही साधनाही विशिष्ट कार्यासाठीं म्हणजे भेद रचनेसाठीं आहे आणि तदनुसार त्यांचीं रूपें होतात. तसेंच प्रयोजक व शक्य हे दोन्ही 'भेद' असले तरी ते वेगळे भेद आहेत तेंव्हा त्याच्यांत काही बाबतीत साम्य व कांहीं बाबतींत वैगुण्य असणें स्वाभाविक आहे म्हणजे 'अव' हा प्रत्यय लागणें हें दोहोसही साधारण आहे शक्य भेदात 'अवव' हा प्रत्यय 'ई' आदेश हीं जशीं नाहींत, त्याचप्रमाणें **दामल्यां**च्या मते सकर्मक धातूचें कर्तरी रूप प्रयोजक भेदांत झालें तरी शक्य भेदांत भावे कां होऊ नये याला कारण नाहीं आणि यामुळे शक्य भेद असू नये हें कोणत्या तर्कावरून सिद्ध होते तें **दामलेच** जाणत. सस्कृतादि भाषांचीं जीं उदाहरणे **दामल्यांनी** दिलीं आहेत त्यांतही कांहीं अर्थ नाहीं. आधीं मराठी व तत्सम क्रियापदाला लिंग असलेल्या भाषांमध्येंच प्रयोगव्यवस्था सभवते. प्रयोग अशी व्यवस्था सस्कृत व इग्रजी वगैरे भाषांत नाही कारण त्या भाषांत क्रियापदाला लिंग नाहीं. **दामले** प्रभृति सर्व वैयाकरणांचा या बाबतींत झालेला घोटाळा प्रयोग व मुख यासबधीं त्यांनीं केलेल्या गल्लतीमुळें झाला आहे. यासबधीं पुढें प्रयोगप्रकरणांत विचार होईल तूर्त एवढेंच सांगावयाचें कीं कर्तरी, कर्मणी, भावे इ सस्कृतांतील सज्ञा मुखासबधीं म्हणजे य प्रत्यय जीं रूपें लावतात त्यासबधीं होत्या त्या मराठी प्रयोगांत चुकून लावल्या गेल्या. आणि त्या चुकीच्या कल्पनांवरच सर्व व्याकरणकारांनीं भेदादि व्याकरणविषयक व काहीं पृथक्करणविषयक बाबतींत चुकीचीं मतें प्रतिपादिलीं आहेत.]

## २ शक्य धातु.

**१ शक्य धातु** :—प्रयोजकाप्रमाणे शक्य साधित धातूही **अव** हा प्रत्यय लावून होतात.

जसे —करव, बोलव, धरव इ

[शक्य धातूस **अवव** हा प्रत्यय लागत नाहीं. त्याचप्रमाणें इ, बि, इत्यादि आदेशही होत नाहींत यासबधी पूर्व वैयाकरणांस पडलेला महत्त्वाचा प्रश्न म्हणजे 'अव' हा प्रयोजकाचा व शक्य प्रत्यय एकच की काय व त्याची व्युत्पत्ति काय? आमच्या मते हे दोन्हीं प्रत्यय निराळे आहेत सस्कृत प्रयोजक प्रत्यय प्रयोजक प्रत्यय 'अय' वापासून आला याविषयी वाद नाहीं मग शक्य प्रत्यय कोठून आला? आमच्या मते तो निवळ मराठी दोन शब्दांपासून आला आहे. मराठींत 'ये' धातु शक्यार्थी आहे. व त्याची 'धरू येतें, धरता येतें' अशीं रूपे होतील. त्याचप्रमाणे सक्षेपाने 'धरू ये' 'धरवे'

'करवे' अशीं रूपें यानतर यापासून धरवतें, करवतें अशीं रूपें आलीं आहेत. यामुळेंच शक्य रूपात प्रयोजकाप्रमाणें 'अवव' हा प्रत्यय व 'ई' आदेश (करवितें) शक्य भेदांत नाहींत यासबंधीं भेदप्रकरणात अधिक विचार होईल.

## ३ अकर्तृक धातु.

**१५ अकर्तृक धातु :**—कर्त्यापासूनच धातु बनल्यामुळे ज्या धातूपासून झालेल्या क्रियापदाला कर्ता नसतो त्या धातस **अकर्तृक धातु** असें म्हणतात. जसे उजेड (णे), सांजाव (णे), कळमळ (णे), कर्ता म्हणजे काय यासबंधींचा विचार वाक्येय प्रकरणात होईल.

## ४ संयुक्त शब्द.

**१६ संयुक्त शब्द :**—मधील लोप करण्यासारखे प्रत्यय किंवा शब्द नसल्यामुळे एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं किंवा शब्दांशीं संयोग होऊन जो पूर्णार्थ शब्द होतो त्याला **संयुक्त शब्द** असे म्हणतात.

[ ही सयुक्त शब्दाची व्याख्या पूर्वींच दिली आहे पूर्णार्थ हा प्रकार येथें सांगण्याचें कारण हेच कीं सयुक्त शब्दातील वेगवेगळ्या शब्दास अर्थच नसतो अर्थ येतो तो सयुक्त शब्दास येतो अर्थात सयुक्त शब्द पद होण्यास पात्र असतो येथें सयुक्त शब्दाचा विचार पुन्हां एकदां सामग्र्याने करावयाचा असल्यामुळें त्याची पुनरावृत्ति केली आहे त्याप्रमाणे अव्ययीभाव समास त्यांत प्रत्यय किंवा शब्द लोप न झाल्यामुळें समासच होऊ शकत नाहीं. तर ते सयुक्त शब्दच आहेत. ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. यासबधीं पुढे समास प्रकरणांत विचार होईल. ]

**१७ संयुक्त शब्दाची जात :**—संयुक्त शब्द सर्व जातीचे असतात. पुढील तक्त्यात ही जातिविषयक माहिती दाखविली आहे :—

| संयुक्त शब्द | जाति | उदाहरणें |
|---|---|---|
| कामधदा | नाम | शेटसावकार, घोडाघोडा. |
| जोजो | सर्वनाम | जो कोणी, जें कांहीं |
| करण्याजोगा | विशेषण | देण्याइतका, पाहण्यासारखा. |
| करावे लागतें | क्रियापद (सयुक्त) | करीत होता, करावयाचे आहे |
| जर करतां | उभयान्वयी अव्यय | ज्याअर्थीं |
| घरापाशीं | क्रियाविशेषण | आल्यामुळें, करण्यासाठीं, यथायोग्य |
| भलारे ! भला ! | केवलप्रयोगी अव्यय | वारे वा ! चोर चोर चोर ! |

**१८ संयुक्त शब्दाचे कार्यप्रकार :**—संयुक्त शब्दाचे कार्याप्रमाणें (१) विभक्तिविकारघटक संयुक्त शब्द (२) आख्यात विकारी संयुक्त शब्द व (३) इतर संयुक्त शब्द.

**१९ विभक्तिविकारी संयुक्त शब्द :**—शब्दयोगी अव्ययाच्या साह्याने साधिलेल्या विभक्तिविकारी शब्दास **विभक्तिविकारी संयुक्त** शब्द म्हणावें. जसे :—रामास्तव, देवासाठीं, घरापासून.

**२० आख्यातविकारी संयुक्त शब्द :**—कृदंत व साह्य क्रियापद यांच्या साह्यानें बनणाऱ्या संयुक्त शब्दास **आख्यात विकारी संयुक्त** शब्द असे म्हणावे.

**२१ इतर संयुक्त शब्द :**—मधील प्रत्यय शब्दविरहित, अर्थासाठींच संयोगाचेच कार्य ज्यामध्ये झाले आहे, त्या संयुक्त शब्दास **इतर संयुक्त** शब्द असे म्हणावे. नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण व केवल-प्रयोगी या सर्व जातीचे संयुक्त शब्द या प्रकारात येतात.

**२२ इतर संयुक्त शब्दांचे प्रकार :**—इतर संयुक्त शब्दांचे दोन प्रकार आहेत. (१) **स्वाभाविक संयुक्त शब्द,** ज्यांत शब्दांचा स्वाभा-विक संयोग होतो, जसे : जो तो, कोणीतरी, टोपलीभर इ. (२) **प्राचारिक संयुक्त शब्द,** जसे : कोण जाणे, कामा नये, डोंगरचे डोंगर, खरें म्हटले म्हणजे. इ.

[ सयुक्त शब्द ही सज्ञा सर्व वैयाकरणांनीं वापरली आहे **गुंजीकरांनीं** सयुक्त व सामासिक शब्द एकच होत, असे ध्वनित केले आहे **दादोबा, गोडबोले** इत्यादि-कांनीं सयुक्त शब्द मानला आहे, पण सयुक्त काळाशी अर्थात् सयुक्त क्रियापदाशी समीकरण केले आहे **जोश्यांनीं** सयुक्त काळ अर्थात् सयुक्त क्रियापद मानलेच नाहीं. **दामल्यांनी** सयुक्त शब्द मानला पण त्याची व्याप्ति निव्वळ सयुक्त क्रियापदापुरती ठेवली. केवळ याच व्याकरणांत 'सयुक्त शब्दाची' चर्चा, स्वरूप, कार्य, व्याख्या, वर्गीकरण इत्यादि दृष्टींनीं सशास्त्र अशी झाली आहे. आमच्या शालेय व्याकरणात जरी ती बरीच पूर्णावस्थेला आली होती, तरी आतां शब्दयोगींच्या योगाने होणाऱ्या सयुक्त शब्दाची भर पडून ते कार्य पुरें झालें. ]

## ५ सामासिक शब्द.

**२३ सामासिक शब्द** :–मधील **शब्दांचा** अगर **प्रत्ययांचा** लोप होऊन, अर्थाचा समास किंवा संक्षेप करण्यासाठीं दोन किंवा अनेक शब्द एकत्र येऊन जो शब्द बनतो त्या शब्दास **सामासिक शब्द** असें म्हणतात.

[ समास म्हणजे सक्षेप. हा सक्षेप अर्थाचा असतो होतां होईल तों अनेक शब्दांचा अर्थ समुच्चयाने सक्षेपतः सागावयाचा हाच या साधनेचा हेतु आहे. या दृष्टीनें सामासिक शब्दाचा व्याकरणापेक्षां प्रबधनाकडेच जास्त सबध आहे, हें सहज दिसून येईल आपणास व्याकरणापुरते पाहावयाचें आहे. सामासिक शब्द प्रकरण हें सस्कृत भाषेचे; पण सर्व वैयाकरणांनीं यासबधीं विचार करतांना मराठींत आपणच केलेल्या सामासिक शब्दाच्या व्याख्येकडे लक्ष न देतां सामासिक शब्दांचे प्रकार व त्यांच्या व्याख्या केलेल्या आहेत. वरील व्याख्येप्रमाणें ( १ ) शब्दाचा लोप, ( २ ) प्रत्ययाचा लोप व ( ३ ) शब्दप्रत्यय लोप असे तीनच प्रकार पडावयाचे, पण समासाची व्याख्या शब्दप्राधान्य हें एकच भेदक तत्त्व स्वीकारून त्यांनीं हे प्रकार पाडले आहेत. व्याख्येप्रमाणे शब्द व प्रत्ययलोप जेथे होत नाहीं त्याला सामासिक शब्द असें म्हणतांच येणार नाहीं. जाती हें एक लक्षण सस्कृत व मराठी वैयाकरणांनीं धरलें आहे. पण मराठी वैयाकरणांनीं त्या लक्षणाचा उल्लेख व्याख्येत केला नाहीं. अर्थातच त्यांना यासबधींचा विचार करण्याचे कारण नव्हतें. आम्हांस त्यासबधींचा विचार प्रातिपदिकदृष्ट्या पुढें करावयाचा असल्यामुळे येथे केवळ शब्दाच्या म्हणजे प्राकृतेयाच्या दृष्टीनें विचार करावयाचे ठरविलें आहे. ]

**२३ समासलक्षणें** :—पुढील दोन लक्षणांप्रमाणे सामासिक शब्दाचे भेद पडतात. ( १ ) शब्दलोप ( २ ) प्रत्ययलोप. ह्यांपैकीं एक किंवा दोन्हीं लक्षणे सामासिक शब्दांत असलीं तरच तो सामासिक शब्द, नाहीं तर त्याची गणना संयुक्त शब्दांत झाली पाहिजे. पुढील तक्ता पाहा:—

| सामासिक शब्द | विग्रह | लोप | समासाचें नांव |
|---|---|---|---|
| रामकृष्ण. | राम **आणि** कृष्ण. | शब्दलोप. | द्वंद्व |
| साखरभात. | साखरेने **युक्त** भात. | शब्दलोप. | मध्यम पदलोपी. |
| रिपुगृहित | रिपूने गृहित. | प्रत्ययलोप. | तत्पुरुष. |
| चक्रपाणी. | चक्र आहे पाणीमध्यें ज्या**च्या** | प्रत्ययलोप. | बहुव्रीहि. |
| मृगनयना. | मृगाच्या नयनाप्रमाणें आहेत नयन जिचे | शब्दप्रत्ययलोप. | बहुव्रीहि मध्यम-पदलोपी |

[ याशिवाय संस्कृत व्याकरणाप्रमाणें ( १ ) शब्दप्राधान्य, ( २ ) अर्थ व सर्व सामासिक शब्दाची जात यांना महत्त्व आहे. पण मराठी व्याकरणांत शब्द व पद यांचा वेगळा विचार झाल्यानें व येथें आम्ही शब्दाचाच विचार करीत असल्यामुळें अर्थाला व जातीला मुळींच महत्त्व दिलें नाहीं. ]

**२४ शब्द प्राधान्य :**—अन्तर्गत शब्दांचें प्राधान्य हेही सामासिक शब्दाचे एक गौण लक्षण आहे. हे प्राधान्य तीन प्रकारांनीं संभवतें. ( १ ) सर्व शब्दांस प्राधान्य असणें, ( २ ) दुसऱ्या शब्दास प्राधान्य असणें, ( ३ ) समासांतील शब्दांस प्राधान्य नसून समासाबाहेरील शब्दास प्राधान्य असणे. पुढील तक्ता पाहा :—

| सामासिक शब्द | विग्रह | प्राधान्य | समास |
|---|---|---|---|
| रामकृष्ण | **राम** आणि **कृष्ण** | दोन्ही (सर्व) शब्दांस | द्वद्व |
| साखरभात | साखरेनें युक्त **भात** | दुसऱ्या शब्दास. | मध्यम पदलोपी. |
| रिपुगृहित | रिपूने गृहित | दुसऱ्या शब्दास | तत्पुरुष |
| चक्रपाणी | चक्र आहे पाणीमध्यें ज्याच्या | दोन्ही नाहीं बाहेरच्या शब्दास | बहुव्रीहि |

[ पहिल्या शब्दाला प्राधान्य फक्त ज्याला **अव्ययीभाव** असे म्हणत त्या समासांतच मिळे पण तो समास नसून संयुक्त शब्द असे पाहिले तेव्हां हा प्रकार-पहिल्या शब्दास प्राधान्य येणें हा प्रकार-आतां नाहीं हें लक्षांत येईल ]

**२५ समासाचे प्रकार :**— वरील विवेचनाप्रमाणे, शब्दलोपासंबधीं समासाचे ( १ ) दंद्व, ( २ ) मध्यमपदलोपी; प्रत्ययलोपाचे ( ३ ) तत्पुरुष व ( ४ ) बहुव्रीहि; शब्दप्रत्यय लोपाचा ( ५ ) बहुव्रीहि मध्यमपदलोपी असे पांच प्रकार होतात.

[ **दामल्यांनीं** सामासिक शब्दाचे ( १ ) अव्ययीभाव, ( २ ) तत्पुरुष ( ३ ) द्वद्व व ( ४ ) बहुव्रीहि असे चार प्रकार कल्पिले आहेत हे संस्कृत व्याकरणास धरून आहे. पण त्यांनीं किंबहुना सर्व व्याकरणकारानी जी सामासिक शब्दाची व्याख्या केली आहे तिच्याशी विसगत आहे. या व्याख्येंत शब्दप्राधान्याचा मुळींच उल्लेख नसून शब्दलोप अगर प्रत्ययलोप हेच समासाचे मुख्य लक्षण मानले आहे अर्थात् शब्दप्राधान्य हे एक दुय्यम लक्षण मानून सामासिक शब्दाची व्यवस्था लावली पाहिजे. अव्ययीभाव समासात हें दुय्यम लक्षणच दिसून येते. शब्दलोप किंवा प्रत्यय-लोप या लक्षणाचा अभावच तेथे दिसतो. अर्थात् सामासिक शब्दाच्या व्याख्येंत

तो बसत नाहीं. अशा शब्दास आतां संयुक्त शब्दांत घातल्याशिवाय गत्यतर नाहीं. हीच गोष्ट तत्पुरुषाचा प्रकार मानलेल्या कर्मधारयासबधीही आहे. याला **दामले** समानाधिकरण तत्पुरुष असें नांव देतात. येथें प्रथमा विभक्ति प्रत्ययाचा लोप होतो अशी एक क्लृप्ति **दामल्यांनीं** काढली आहे. पण प्रथमेला प्रत्ययच नसतात या गोष्टीकडे त्यांनीं जाणून बुजून कानाडोळा केलेला दिसतो! अर्थात् येथें प्रत्ययलोप नाहींच या समासाचा **मध्यमपद लोपी** हा जो प्रकार आहे, त्यांत मात्र शब्दाचा लोप होतो. म्हणून तो एक स्वतत्र प्रकार करणें आवश्यक आहे. अर्थात् 'असा जो' 'सारखा' इत्यादि पदें ज्या कर्मधारय समासांत गृहीत धरतात, तो कर्मधारय नसून मध्यमपदलोपीच समास होय. मध्यमपदलोपीपैकीं एकसमयावच्छेदे शब्द व प्रत्ययलोप होणारीं 'मृगनयना' या सारखींही उदाहरणे आहेत. म्हणून **बहुव्रीहि मध्यमपदलोपी** हाही प्रकार कल्पिला आहे. एवंच आम्ही दोन्ही लक्षणें जमेस धरून वरीलप्रमाणे समासाचे पांच प्रकार केले आहेत.]

## १ द्वंद्व समास.

**२६ द्वंद्व समासः**—ज्या समासांत मधील **शब्दाचा** लोप होऊन **दोन्ही** शब्दांस **प्राधान्य** असतें त्याला **द्वंद्व** समास असें म्हणतात. जसें:—हरिहर, रामकृष्ण इ.

**२७ द्वंद्व , चे प्रकार**:—द्वंद्व समासाचे दोन प्रकार आहेत. (१) **इतरेतर द्वंद्व** व (२) **वैकल्पिक द्वंद्व.**

**२८ इतरेतर द्वंद्वः**—ज्या द्वंद्व समासांतील शब्दसमुच्चयबोधक 'आणि,' 'व' या लुप्त उभयान्वयी शब्दांनीं शब्द जोडलेले असतात त्यांना **इतरेतर द्वंद्व** समास असे म्हणतात. जसें :—भीमार्जुन, स्त्रीपुरुष, एकतीस इ.

**२९ वैकल्पिक द्वंद्व**:—ज्या द्वंद्व समासांत 'किंवा,' 'अथवा' यासारख्या विकल्पबोधक उभयान्वयी शब्दानी शब्द जोडलेले असतात. त्या द्वंद्व समासास **वैकल्पिक द्वंद्व** समास असे म्हणतात. जसेः—पापपुण्य, सत्यासत्य, दोनचार इ.

[**दादोबानीं समाहार द्वंद्व** असाही द्वद्व समासाचा एक प्रकार केला आहे व **दामल्यांनीं**ही त्याला मान्यता दिली आहे. 'समाहार' ही सज्ञा **दामल्यांनीं** आपल्या द्वद्व समासाच्या व्याख्येत योजली आहे. मग या द्वद्वाच्या विशिष्ट प्रकारास **समाहार द्वंद्व** म्हणणें शास्त्रीय कसे होईल? खरी गोष्ट अशी आहे कीं अशा शब्द-

समूहांत ' शब्द ' किंवा ' प्रत्यय ' या दोहोंचाही लोप होत नाहीं. म्हणून ते सामासिक शब्द नव्हत, तर त्यांना संयुक्त शब्दच मानलें पाहिजे. कारण ' कामधदा ' याचा विग्रह ' काम ' आणि 'धंदा' अथवा ' काम ' किंवा ' धदा ' असा होत नाहीं तर धदा अशा सयुक्त अर्थाचाच तो संयुक्त शब्द आहे. कै. **विष्णु बाळकृष्ण भिडे** आपल्या व्याकरणांत म्हणतात, " हातपाय , नाकडोळा, लहानसहान, खरेंखोटे, या शब्दांना विभक्त्यादि प्रत्ययांमुळें होणारे विकार दोन्ही शब्दांसही सारखेच होतात म्हणून हे शब्द समास नव्हत, हें उघड आहे. उदा. :—' हातपाय मजबूत आहेत, ' ' खरेंखोटें समजत नाहीं ' येथें हे शब्द व्यवस्थित जोडलेले दिसतात, पण ' हातापायाला कळा आल्या, ' ' खऱ्याखोट्याचा निर्णय ' येथे अतर्गत शब्दास सामान्यरूप झालेले आहे असें दिसून येईल " **भिडे** यांस दुसऱ्या कोणत्याही व्याकरणकाराचा दुजोरा नाहीं, तरी त्यांचे मत विचार करण्यासारखे आहे असें ठरवून **दामल्यांनीं** त्या मताची बरीच कसून चर्चा केली आहे. पण अखेरीस " अशा विचारानीच आम्हांस निरुपायास्तव **भिडयांच्या** विरुद्ध मार्गाचे अवलबन करावे लागले एरवीं त्यांचा गर्भित सिद्धांत जसा सस्कृतांत निर्बाध आहे तसाच जर तो मराठींत निर्बाध आहे असे आम्हांस म्हणतां आलें असते तर आम्हांस इष्ट होते. परतु भाषाप्रचारामुळें सर्वास हात टेकणें भाग आहे म्हणूनच त्या सिद्धांतास मराठींतील द्वद्व समासाचीं कांहीं उदाहरणें अंशतः अपवादक होत असे समजून त्यांस विभक्ति प्रत्यय लागतांना त्यांतील पहिल्या पदाचेंही सामान्यरूप होतें असा काहींसा विचित्र नियम मानणें प्राप्त आहे. " वेळीं अवेळीं शास्त्रीयत्वाचा बाणा मिरवून पूर्ववैयाकरणावर अशास्त्रीयतेचा आरोप करणाऱ्या **दामल्यांची** येथें अगदींच केविलवाणी स्थिति झाली आहे ! पण त्यांचा निरुपाय होता ही गोष्टही खरी आहे. ' सयुक्त शब्द ' या साधित शब्दाची पूर्ण अशी कल्पना **दामल्यांना** किंवा कोणत्याही पूर्ववैयाकरणाला नव्हती. तसेच शब्दयोगी हा एक स्वतत्र शब्द ( प्रातिपदिक ) अशी कल्पना सर्व वैयाकरणांची होती. आम्हीं शब्दयोगी जरी शब्द असला तरी पद किंवा प्रातिपदिक नाहीं असे दाखविले आहे. तसेच शब्दयोगीच्या योगाने सयुक्त शब्द होतो व त्याप्रमाणे पहिल्या शब्दांत सामान्यरूप होणें हा प्रकार सामासिक शब्दासबधीं जरी विचित्र तरी सयुक्त शब्दा सबधीं तसा नाहीं, हेंही दाखविलें आहे. तसेंच ' विषयीं, ' ' प्रमाणे, ' ' सबधीं ' हे स्वतत्र शब्दयोगी नसून ते सविभक्तिक आहेत, व त्यांच्या योगानेंही सयुक्त शब्द बनतो हेंही आपण पाहिलेंच आहे. ( पहा पान ८७ ) सारांश **भिडे** म्हणतात त्याप्रमाणें तो सामासिक शब्द नाहीं, तर सयुक्त शब्द आहे. येथें हातपाय, खरेखोटें इत्यादिकांचा विग्रह ' हात आणि पाय, ' ' खरें आणि खोटें ' असा नाहीं म्हणजे येथे मधील प्रत्यय किंवा शब्द यांचा लोप झाला नाहीं व अर्थही सयुक्त रीतीनें होतो. हातपाय म्हणजे हातापायासारखे कष्टकरी अवयव, खरेंखोटें म्हणजे सामान्यार्थीं खरें. शब्दयोगीने सयुक्त शब्द होतो. त्यांत सामान्यरूप होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. ]

## २ मध्यमपदलोपी समास.

**३० मध्यमपदलोपी समासः**—ज्या समासांत दोन शब्दांमधील **शब्दाचा** लोप होतो व ज्यांत **दुसऱ्या** शब्दाला प्राधान्य असतें त्याला **मध्यमपदलोपी** समास असें म्हणतात. जसें :—साखरभात, आतेभाऊ, आजेसासरा बालमित्र.

[ हा समास कर्मधारयाचाच एक प्रकार म्हणून पूर्वव्याकरणकारांनीं मानला आहे. आम्हीं शब्द किंवा प्रत्ययलोप हेंच महत्त्वाचें लक्षण मानल्यामुळें कर्मधारय हा समासप्रकार मानण्याची आवश्यकता नाहीं. कर्मधारय म्हणून मानलेल्या समासांत, 'असा जो' 'सारखा' अशा पदांचा लोप मानल्यास तो मध्यमपदलोपी समास असेंच समजलें पाहिजे. ]

## ३ तत्पुरुष समास.

**३१ तत्पुरुष समास** :—ज्या समासांत मधील विभक्ति प्रत्ययाचा लोप होतो, व प्राधान्य दुसऱ्या शब्दास असतें त्या समासास **तत्पुरुष** समास असें म्हणतात. याचे द्वितिया ते सप्तमीच्या प्रत्ययलोपाप्रमाणें पांच प्रकार आहेत. पुढील तक्ता पाहा :—

| पोटप्रकार | सामासिक शब्द | विग्रह | इतर उदाहरणें |
|---|---|---|---|
| द्वितिया तत्पुरुष | ग्रंथकार. | ग्रंथाला करणारा. | काकबली, व्याहीभोजन. |
| तृतीया ,, | कृपावलोकन. | कृपेनें अवलोकन. | तोंडपाठ, मातृसदृश. |
| चतुर्थी ,, | कृष्णार्पण. | कृष्णास अर्पण. | व्यवहारोपयोगी. |
| पचमी ,, | ऋणमुक्त. | ऋणापासून मुक्त. | जातीभ्रष्ट, तदभिन्न. |
| सप्तमी ,, | वनभोजन. | वनांत भोजन. | गर्भश्रीमत, रणशूर. |

[ तत्पुरुषाचा एक प्रकार **कर्मधारय** असें पूर्वीच्या वैयाकरणांनीं मानले आहे पण त्या प्रकारांत मधील प्रत्ययाचा लोप न झाल्यामुळें तत्पुरुष समासाच्या व्याख्येप्रमाणे आम्हीं त्याचा सामासिक शब्दांत अन्तर्भाव केला नाहीं. त्यांपैकीं कांहीं शब्द पूर्वी सांगित-ल्याप्रमाणें मध्यमपदलोपी तर कांहीं सयुक्त असतात हें अभ्यासकाच्या लक्षांत येईल. त्याच कारणासाठीं आम्हीं कर्मधारयाचे 'उपपद', 'नञ्', तत्पुरुष वगैरे प्रकार दिलेले नाहींत. ते अर्थातच सयुक्त शब्द आहेत. पूर्वी कर्मधारयांतच मोडणारा **मध्यमपदलोपी** हा प्रकार त्यांत शब्दाचा लोप झाल्यामुळें एक स्वतत्र प्रकार म्हणून आधींच सांगि-तला आहे. त्यांतच आतां जेथें पदाचा लोप झाला अशीं कर्मधारयाचीं सर्व उदाहरणें

येतील. संस्कृतांत हृदयंगम, आत्मनेपद, पंकेरुह, युधिष्ठिर इत्यादि प्रत्यय तसेच राहि-ल्याचीं उदाहरणें आहेत अशा समासास **अलुक्** समास असे म्हणतात मराठींत तोंडी लावणें यांसारखीं उदाहरणें दिलीं आहेत. पण समासाच्या मराठी व्याख्येप्रमाणे प्रत्ययाचा **लोप** हेंच समासाचे लक्षण. म्हणून असले शब्द समास न मानतां संयुक्त मानावें हे चांगलें. अलुक् समास असा प्रकार मराठींत मानतां येत नाहीं. ]

## ४ बहुव्रीहि समास.

**३२ बहुव्रीहि समास** :—ज्या समासांत **प्रत्ययांचा** लोप होऊन समासांतील **कोणत्याही** शब्दास **प्राधान्य न येतां** बाहेरील तिसऱ्याच शब्दास **प्राधान्य** येतें, त्या समासास **बहुव्रीहि समास** असें म्हणतात. या समासाच्या विग्रहांत संबंधी सर्वनामास जी विभक्ति लागते तिचे नांव देतात. जसे :—चक्र आहे पाणीमध्यें ज्याच्या तो ( विष्णु ). पुढील तक्ता पाहा :—

| पोटप्रकार | सामासिक शब्द | विग्रह |
|---|---|---|
| तृतीया बहुव्रीहि | जितेंद्रिय | जित आहे इंद्रिय ज्यानें |
| चतुर्थी ,, | दशानन | दश आहेत आननें ज्याला. |
| पंचमी ,, | गलितपर्ण | गलित आहेत पर्णे ज्यापासून |
| सप्तमी ,, | शुष्कजल | शुष्क आहे जल ज्यामध्ये |

[ बहुव्रीहीसंबधाने एक प्रश्न पूर्वव्याकरणकारांनीं उपस्थित केला आहे तो म्हणजे वांकडमान्या, आखुडशिंगी, वाघमान्या इ. शब्द बहुव्रीहि समासाचीं उदाहरणें आहेत कीं काय हा होय यासंबधीं **दादोबांचा** अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे "हीं केवळ शब्दसाधितें होत. एक डोळा ज्यास तो एकडोळा. अशाप्रकारें समासघटित शब्द साधून, त्यावरून प्रत्यय लागून साधतात, मग त्या दुसऱ्या समासघटित शब्दाचा बोलण्यांत प्रचार असो वा नसो." याला **कृष्णशास्त्री गोडबोले** पुढीलप्रमाणे दुजोरा देतात. "पण नामांस **या** आणि **ई** लावल्यानें विशेषणें होतात आणि हेच प्रत्यय वरील उदाहरणांत आहेत. म्हणून एकडोळा, आंखुडशिंगी इत्यादि कर्मधारयाच्या उदाहरणांस **या** व **ई** हे प्रत्यय लागून वरील विशेषणें झालीं आहेत असे समजावें. याविरुद्ध **दामल्यांचें** पुढीलप्रमाणें म्हणणें आहे. "प्राकृत शब्दांनीं तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत नाहीं. या दादोबांच्या व्यर्थ आक्षेपास कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधास उत्तर दिलें आहे. 'एकडोळ्या हा शब्द त्या

दोन्ही ( एक आणि डोळा ) शब्दांचा अर्थ नव्हे, असा जो एक डोळ्याचा मनुष्य वगैरे प्राणी तद्रुप निराळा अर्थ दाखवितो. असें असतां या समासास बहुव्रीहीचें लक्षण **पूर्णपणें** येत नाहीं म्हणणे केवळ भ्रांति आहे हे उघड आहे " आमच्या मते येथें भ्रांति **दादोबांना** पडलेली नसून तो **चिपळूणकरांना व दामल्यांना** पडली आहे, असे थोड्याशा विचारान्तीं दिसून येईल कारण **दादोबांच्या** 'पूर्णपणे' या शब्दाकडे त्यांनीं लक्ष दिलेले दिसत नाहीं. तिसऱ्या पदाची उपलब्धी मुळींच होत नाहीं असे **दादोबांचें** म्हणणे नाहीं तर ती **पूर्णपणें** होत नाहीं एवढेच त्यांचे म्हणणें आहे आणि ते खरें आहे म्हणजे तत्पुरुष ( त्याच्या विभक्ति तत्पुरुष व कर्मधारय ) या समासास **या** व **ई** तद्धित प्रत्यय लावल्यावर त्या तिसऱ्या शब्दाच्या अर्थाची प्रतीति होते. बहुव्रीहि समासाच्या 'चक्रपाणी' सारख्या नेहमींच्या शब्दांत ती दोनच शब्दांपासून होते, त्याला प्रत्यय लागत नाहीं हे अभ्यासकास सांगणे नलगे. तेव्हा **दादोबांच्या** व **कृष्णशास्त्री गोडबोल्यांच्या** मताप्रमाणें हे शब्द कर्मधारय ( व विभक्ति तत्पुरुष ) या समासास तद्धित प्रत्यय लागून बनलेले आहेत हेच खरें **दादोबांचे** 'मग त्या समासघटित शब्दाचा बोलण्यात प्रचार असो वा नसो' हे शब्द दांतीं धरून **दामल्यांनीं** जें लांबलचक विवेचन केलें आहे, त्यांतही कांहीं अर्थ नाहीं प्रथम हा प्रश्न बोलण्याचा नसून लिहिण्याचा आहे. व लिहिण्यांतही पूर्वप्रचाराची फारशी काळजी न करतां नवे नवे समास करण्याचा हक्क लेखकांनीं सररहा बजावला आहे. या शब्दांसबधीं पुढील उदाहरणात तसेच दाखवितां येईल. 'रामराव आपल्या एकुलत्या एक मुलासबधाने म्हणाले कीं हा माझा **एकडोळा** आहे.' 'तुमची म्हैस आंखुडशिंगी आहे पण ही **आंखुडशिंगे** तुम्हांस पुष्कळ दूध देतील काय ?' या उदाहरणांत जे **अधोरेखित** सामासिक शब्द आहेत ते प्रचार विरुद्ध म्हणून अशुद्ध आहेत असे कसे म्हणतां येईल ? म्हणून **दादोबा** म्हणतात त्याप्रमाणे हे साधित ( समाससाधित ) शब्द आहेत. मात्र आतां आम्ही कर्मधारय हा समासच मानीत नसल्यामुळें त्यातील कांही शब्द तत्पुरुष समाससाधित तर कांहीं मध्यमपद-लोपी व सयुक्त शब्द आहेत एवढेच ]

**३३ बहुव्रीहि मध्यमपदलोपी समास** :—ज्या बहुव्रीहि समासांत प्रत्ययलोपाबरोबरच शब्दलोपही आढळून येतो, त्या बहुव्रीहि समासास 'बहुव्रीहि मध्यमपदलोपी समास' असें म्हणतात. जसे :—मृगनयना येथें विग्रह 'मृगाचे नयन आहेत नयन जिचे' असा नसून 'मृगाच्या नयना-सारखे आहेत नयन जिचे' असा आहे. येथे 'चे' हा प्रत्यय व 'सारखे' हें पद यांचा लोप झाला आहे.

**३४ कांहीं समासविशेष :**—( १ ) संधि ( २ ) विग्रह व ( ३ ) सामान्यरूप.

**३५ संधि :**—समासांत दोन किंवा अधिक शब्द जोडले जातात. अर्थात् अशा प्रसंगीं संस्कृतांत अवश्य संधि होतो. मराठी व इतर भाषांत कधीं कधीं असा संधि होत नाहीं. उदा० :—लंब + उदर, = लंबोदर; मनस् + भंग = मनोभंग; जांवई + आग्रह = जांवईआग्रह; कमी + अधिक = कमीअधिक.

**३६ विग्रह :**—समासांतील शब्दाचे अर्थ स्पष्ट करून दाखविणें म्हणजे समासाचा विग्रह करणें होय. जसें :—' दृष्टिपूत ' याचा ' दृष्टीनें पूत ' हा विग्रह. असे अनेक समासांचे विग्रह पूर्वी तक्त्यांत दाखविलेच आहेत.

**१७ सामान्यरूप :**— कांही सामासिक शब्दांत विभक्तिरूपें करताना पूर्व शब्दांस सामान्य रूप होतें जसें खऱ्याखोटयांत इ.

[ येथें समासाचा व्याकरणाच्या दृष्टीनें व विशेषतः मराठी व्याकरणाच्या दृष्टीनें विचार झाला आहे. निवळ व्याकरणांतही घटणेची बाजू या भागांत दृष्टीसमोर ठेवली आहे. स्वाभाविकच अर्थाला दुय्यम स्थान दिलें आहे. अर्थाच्या दृष्टीनें प्रबंधन शास्त्रांत सामासिक शब्दाचा विचार होतो. समास कोणत्या शब्दाचे करावे ह्यासबंधीही तेंच शास्त्र सांगते म्हणून येथे त्याचा विचार केला नाहीं. येथे प्राकृतेय हा पहिला भागही पुरा होतो. ]



# भाग दुसरा.

## वाक्येय.

### उपोद्घात.

### ( पदविवेचन )

**१ वाक्येय** :—व्याकरणाच्या ज्या भागांत शब्दाचा **पद** या दृष्टीने विचार होतो त्या भागास **वाक्येय** असें म्हणतात.

[ पूर्वीं दिलेल्या वाक्येयाच्या व्याख्येंत थोडा फेरफार करून ही व्याख्या दिली आहे. पूर्वीच्या व्याख्येंत ' पद ' ही सञ्ज्ञा घालतां येत नव्हती. ती आतां घातली आहे. तिचें स्पष्टीकरण लगेच होईल. व्याकरणांत वाक्याची व्याख्या सांगण्याची जरूरी नाहीं, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जरूरीच असली तर एक तात्पुरती व्याख्या दिली होती. त्यांत ' पद ' या संज्ञेची योजना करून ती येथें पुन्हा देतां येईल. ' पुरा अर्थ असलेला यथाक्रमांत आलेला पदसमूह म्हणजे वाक्य. ' ]

### १ पद व प्रातिपदिक.

**२ पद** :—वाक्यांत अखेरच्या स्वरूपांत स्वतंत्रपणें येणाऱ्या एकाकी किंवा संयुक्त शब्दास **पद** असे म्हणतात.

[ पद व शब्द यांमधील फरक पूर्वीं दाखविलाच आहे. वरील व्याख्येप्रमाणें **गुंजीकर** सांगतात तशा रीतीनें ' विभक्ति ' व ' आख्यात ' या सञ्ज्ञांशीं पद या सञ्ज्ञेचा फारसा संबध नाहीं, असें अभ्यासकास सहज दिसून येईल. संयुक्त शब्दानें होणाऱ्या पदास सयुक्तपद असें म्हणावें. ]

**३ प्रातिपदिक** :—पद या स्थितीस पोहचण्यास पात्र अशा शब्दास **प्रातिपदिक** असें म्हणावें. ( १ ) नाम, ( २ ) सर्वनाम, ( ३ ) विशेषण, ( ४ ) क्रियापद, ( ५ ) क्रियाविशेषण, ( ६ ) उभयान्वयी व ( ७ ) केवलप्रयोगी असे प्रातिपदिकांचे सात प्रकार आहेत.

[ **प्रातिपदिक** ही सञ्ज्ञाही आम्हीं अगदींच स्वतत्र अर्थानें वापरली आहे हें अभ्यासकांच्या लक्षांत येईल. **गुंजीकरांनीं** सस्कृत व्याकरणाप्रमाणें या सञ्ज्ञेचें स्पष्टीकरण केलें आहे. त्यांच्या मतें प्रातिपदिकें व धातु असे शब्दांचे मूळचे प्रकार. **जोश्यांनीं** प्रातिपदिकें, क्रियापद व अव्ययें असे शब्दाचे तीन प्रकार केले आहेत.

याप्रमाणें नाम, सर्वनाम व विशेषण हींच प्रातिपदिकें होतात. याला संस्कृत व्याकरणाचा आधार नाहीं. व या तीन जातींच्या शब्दांशिवाय बाकीच्या शब्दापासूनही पदे बनत असल्यामुळें, त्या तीनच जातीच्या शब्दांना प्रातिपदिके म्हणणें गैरच. **दामल्यांनीं** प्रातिपदिक ही संज्ञा 'शब्द' याला प्रतिशब्द म्हणून क्वचित् प्रसंगीं वापरली आहे. आमच्या प्रातिपदिकाच्या व्याख्येप्रमाणे शब्दयोगी सोडून सात प्रातिपदिकें होतात. शब्दयोगी हा इतर शब्दांस जोडून आल्यामुळे तो स्वतंत्रपणे पद होण्यास कधींही पात्र नसतो. अर्थात् 'कोणीं कांहींही म्हटलें तरी मूलतः शब्दाचे ( म्हणजे प्रातिपदिकाचे ) आठच प्रकार होतात' हा **दामल्यांचा** प्रतिज्ञासिद्धांत ढासळला आहे हें सांगावयास नको ]

## २ प्रातिपदिकांच्या व्याख्या.

**४ नाम** :—ज्या प्रातिपदिकाच्या योगाने वस्तूचा प्रत्यक्षतः बोध होतो व ज्या प्रातिपदिकाला विभक्तिविकार होऊन पदस्थिति प्राप्त होते, त्या प्रातिपदिकास नाम असे म्हणावे.

[ नामाच्या व्याख्या पूर्ववैयाकरणांनीं केल्या आहेत. पण त्या केवळ आठ शब्दांपैकीं नाम हा एक **शब्द** या दृष्टीने केलेल्या होत्या अर्थात् त्यासंबधीं विवेचन करण्याचे आतां कारण राहिले नाहीं. नामाची प्रस्तुत व्याख्या तो शब्द प्रातिपदिक आहे व विभक्ति ( यातच लिंगवचन हे विकार येतात ) या विकारास पात्र असा वस्तु-दर्शक शब्द आहे, या दृष्टीने केली आहे. विकारी प्रातिपदिकाचीं वस्तु व क्रिया हीं जीं दोन महत्त्वाचीं लक्षणें ती आम्हीं वर्गीकरणप्रसंगाने पुढें सांगणार आहोत, त्यापैकीं वस्तुलक्षणाचा या व्याख्येत समावेश झाला आहे येथे 'वस्तु' या संज्ञेची व्याख्या करणे आवश्यक आहे. वस्तु म्हणजे जिचें अस्तित्व कल्पिलें आहे अशी प्रत्येक गोष्ट. मग ती प्रत्यक्षत. असो, नसो, दिसो, भासो याप्रमाणें माणूस, इतर प्राणी, अचेतन पदार्थ, स्थळ, काळ, क्रिया, इतर भाव, कल्पना वस्तु होऊ शकतील. ]

**५ सर्वनाम** :—नामाच्या ऐवजी येणाऱ्या सर्वनाम शब्दास **सर्वनाम** प्रातिपदिक असें म्हणतात. नामाच्या संबंधाने हे प्रातिपदिक अप्रत्यक्षतः वस्तु दाखविते व त्याला विभक्तिविकारही होतो.

[ सर्वनाम या शब्दाची व्याख्या पूर्वीं प्राकृतेय या भागांत केलीच आहे. या व्याख्येंत त्या त्या प्रातिपदिकाचा वस्तुसंबंध व लिंग, वचन, विभक्ति या बाबतींत विकारक्षमता दाखविली आहे. ]

**६ विशेषण** :—जें प्रातिपदिक नामानें दाखविलेल्या वस्तूविषयीं तीं

कशी, किती इत्यादि माहिती देतें व नामाप्रमाणेंच विभक्तिविकारक्षम असतें त्या प्रातिपदिकास **विशेषण** असें म्हणतात.

[ **दामल्यांनीं** पूर्व व्याकरणकारांची 'पदार्थाचा गुण दाखविणारा शब्द' ही व्याख्या सामान्यनामाला व विशेषतः भाववाचकनामालाही लागू असल्यामुळे अतिव्याप्त अतएव त्याज्य ठरविली आहे. आमच्या मते गुणदर्शक नामें भाववाचक नामे आहेत उदा० थोरपणा, माधुर्य, महत्त्व, इ अर्थात् व्याख्या अतिव्याप्त असून ती विशेषणास मुळीं लागूच पडत नाही. हा तिचा दोष आहे. खुद्द **दामल्यांनीं** 'नामाची व्याप्ति मर्यादित करणारा शब्द' अशी जी व्याख्या केली आहे, तीही तितकीच सदोष आहे नामाची व्याप्ति सर्वनाम, क्रियापद, क्रियाविशेषण इत्यादि शब्दही मर्यादित करतात. ]

७ **क्रियापद** :—जें प्रातिपदिक धातुशब्दापासून बनून प्रत्यक्षतः **क्रिया** दाखविते व काळ व अर्थ या विकारांस पात्र असतें, त्या प्रातिपदिकास **क्रियापद** असें म्हणावें.

[ क्रिया म्हणजे **व्यापार** धातुशब्द कृति, गति, स्थिति या दृष्टीनें अप्रत्यक्षतः वस्तुदर्शक म्हणजे नाम व विशेषण होईल. पण क्रियापद हे प्रत्यक्षतः व्यापारच दाखविते क्रियापदाचें दुसरे लक्षण म्हणजे नाम जसें विभक्तिविकारक्षम असतें तसें क्रियापद हें काळ व अर्थ या विकारांस नियतत. पात्र होते. ]

८ **क्रियाविशेषण** :—जे प्रातिपदिक क्रिया केव्हां, कोठें, कशी व कां घडली अशी क्रियेविषयी माहिती सांगून क्रियेशीं अप्रत्यक्षतः संबंध ठेवते त्या प्रातिपदिकास **क्रियाविशेषण** प्रातिपदिक असे म्हणावें.

[ विशेषण जसे नामाच्या वस्तूविषयी एक विशिष्ट प्रकारची माहिती पुरवतें, त्याप्रमाणें क्रियापदांतील किंवा अन्य धातुपदांतील क्रियेविषयीं माहिती सांगते विशेषण व क्रियाविशेषण यामधील फरक हाच कीं विशेषण नामाप्रमाणे विभक्तिविकारक्षम असतें, पण क्रियाविशेषणास क्वचित् लिंग व वचन पोटविकार झाले, तरी काळ व अर्थ हे विकार होत नाहींत. ]

९ **उभायान्वयी** :—जे प्रातिपदिक उभयान्वयी इषदर्थ शब्द असून दोन पदें किंवा दोन वाक्ये जोडण्याचेंच कार्य करते त्या प्रातिपदिकास **उभायान्वयी** प्रातिपदिक असें म्हणावें.

१० **केवलप्रयोगी** :—जे प्रातिपदिक केवलप्रयोगी इषदर्थ शब्द

असून वाक्यांतील अन्य पदाशीं ज्याचा फारसा संबंध नसतो त्या प्रातिपदिकास केवलप्रयोगी प्रातिपदिक असे म्हणावें.

[ शेवटचीं उभयान्वयी व केवलप्रयोगी हीं अविकारी असल्यामुळे विकार हें लक्षण त्यांत आलेलें नाहीं. ते त्याच्या जातीचे इष्टदर्थ शब्द एवढेच त्यांचें लक्षण सांगितलें आहे. व तें त्यांचें निश्चित स्वरूप दाखविण्यास पुरेसे आहे. ]

# प्रकरण पहिलें.

## वर्गीकरण.

### उपोद्घात.

१ **वर्गीकरण** :—प्रातिपदिकाच्या जाति पोटजातीचा वाक्येयाच्या ज्या भागांत विचार होतो त्या भागास वर्गीकरण असें म्हणतात.

२ प्रातिपदिकांचे ( १ ) वस्तुदर्शक, ( २ ) क्रियादर्शक व ( ३ ) इतर असे तीन प्रकार पडतात.

३ **वस्तुदर्शक प्रातिपदिकें** :—जीं प्रातिपदिकें प्रत्यक्षतः अगर अप्रत्यक्षतः वस्तु दाखवितात त्यांना **वस्तुदर्शक प्रातिपदिकें** असें म्हणावें. नाम, सर्वनाम व विशेषण हीं वस्तुदर्शक प्रातिपदिकें होत.

४ **क्रियादर्शक प्रातिपदिकें** :—ज्या प्रातिपदिकांपासून प्रत्यक्षतः अगर अप्रत्यक्षतः क्रिया दाखविली जाते त्या प्रातिपदिकांस **क्रियादर्शक प्रातिपदिकें** असे म्हणावें. यांत क्रियापद व क्रियाविशेषण या प्रातिपदिकांचा समावेश होतो.

५ **इतर प्रातिपदिकें** :—जीं प्रातिपदिके वस्तु किंवा क्रिया ही दोन्हीं दर्शवीत नाहीत त्यांना **इतर प्रातिपदिकें** असे म्हणावें. यांत **उभयान्वयी, केवलप्रयोगी** या प्रातिपदिकांचा समावेश होतो.

६ प्रातिपदिकांचे ( १ ) विकारी व ( २ ) अविकारी किंवा अव्ययें असेही दोन प्रकार आहेत.

७ **विकारी प्रातिपदिकें** :—ज्या प्रातिपदिकांस लिंग, वचन, पुरुष, विभक्ति, काळ, अर्थ ह्यांपैकीं कोणतेही विकार होतात त्यांना **विकारी** प्रातिपदिके असें म्हणतात. नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण व क्रियापद हीं विकारी प्रातिपदिकें होत.

८ **अविकारी प्रातिपदिकें** :—ज्या प्रातिपदिकांना लिंग, वचन, पुरुष, विभक्ति इ० विकार होत नाहींत त्यांना अविकारी **प्रातिपदिकें**

असें म्हणतात. यांत क्रियाविशेषण, उभयान्वयी व केवलप्रयोगी ह्या तीन प्रातिपदिकांचा अंतर्भाव होतो. यांना अव्यय अशीही संज्ञा आहे. ही संज्ञा त्याला प्रातिपदिकांच्या नांवांपुढें जोडतात म्हणून यांना ( १ ) क्रियाविशेषण अव्यय, ( २ ) उभयान्वयी अव्यय व ( ३ ) केवलप्रयोगी अव्यय अशी नांवें आहेत.

९ याप्रमाणें ( १ ) नाम, ( २ ) सर्वनाम, ( ३ ) विशेषण, ( ४ ) क्रियाविशेषण, ( ५ ) क्रियापद, ( ६ ) क्रियाविशेषण अव्यय, ( ७ ) उभयान्वयी अव्यय व ( ८ ) केवलप्रयोगी अव्यय असे प्रातिपदिकाचे आठ प्रकार होतात.

१० प्रातिपदिकांचें साधित, संयुक्त, सामासिक अशा प्राकृतेय दृष्टीनेही वर्गीकरण करतां येईल. व त्याप्रमाणें ते पुढील अध्यायांत केलेही आहे.

---

# अध्याय पहिला.

## नाम, सर्वनाम व विशेषण.

### १ नामाचें वर्गीकरण.

**१ नामाचे** ( १ ) सामान्यनाम, ( २ ) विशेषनाम, ( ३ ) पदार्थ-वाचकनाम, ( ४ ) समुदायवाचकनाम, व ( ५ ) भाववाचक नाम असे पांच प्रकार आहेत.

**२ सामान्यनामः**—जे नाम वस्तूची जाति व व्यक्ति अशीं दोन्ही दर्शवितें त्या नामाला **सामान्यनाम** असे म्हणतात. जसेः—' घोडा ' हें नाम केव्हां घोडा या प्राण्याच्या सर्व जातीचें द्योतक असते, तर केव्हां त्यांतील एका व्यक्तीचे म्हणजे अमुक एक घोडा असें दाखविते.

**३ विशेषनामः**—केवळ व्यक्तिनिदर्शक नांव असणारें जें नाम त्याला **विशेषनाम** असे म्हणतात. जसेः—केशव, जवाहीरलाल, गांधीजी, विजयालक्ष्मी इ.

[ यावरून **दादोबा, जोशी, गुंजीकर** इत्यादिकांनीं नामाच्या व्याख्येंत संस्कृत कोशानुसार व इंग्रजी व्याख्येनुसार ' नांव ' या शब्दाची जी योजना केली आहे ती कशी चुकीची आहे तें दिसून येईल. सामान्यादि इतर नामांना ' नांव ' अशी संज्ञा केव्हांही देता येणार नाहीं. घोडा हे त्या प्राण्याचें नांव नव्हे त्याला नांवच द्यावयाचें असेल तर ' इंद्रायुध ' ' ब्युसेफालस ' ' सयाजीराव, ' ' मायबाबू ' अशीं नावें देतां येतील पण यावेळीं हीं प्रातिपदिकें विशेषनामें असतात त्यांच्या व्याख्येचा मुख्य दोष म्हणजे इतर सात व्याख्यांत ' शब्दा ' संबधी सरसहा विधान केलेले असून नामाच्या व्याख्यें-तच ' नांव ' हा शब्द घातला आहे व त्याचें स्पष्टीकरणही केलें नाहीं. या सर्व व्याख्या शब्दाच्या आहेत म्हणून शब्द हेच सामान्य ( Genera ) सर्व व्याख्यांत आलें पाहिजे. **दामल्यांनीं बाळशास्त्र्यांचें** अनुकरण करून ' शब्द ' हीच संज्ञा नामाच्या व्याख्येत योजिली आहे पण ' नांव ' संज्ञा नामाच्या व्याख्येंत योजणे चुकीचे कसें तें त्यांनीं दाखविले नाही.

याच प्रसंगानें ( १ ) कांहीं सामान्यनामांचीं विशेषनामें होतात उदा —पंचवटी, हिमालय इ. व ( २ ) विशेषनामांचीं सामान्यनामे होतात उदा०ः—( सोळा ) सोमवार, ( असले कैक ) नाना फडणवीस इ ह्या **कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं** उपस्थित केलेल्या प्रश्नांचा विचार करणे युक्त होईल. **जोश्यांनीं चिपळूणकरांची** री ओढलेली

आहे. **दामल्यांनीं** यासंबंधीं थोडेसें साधकबाधक विवेचन करून अखेरीस **कृष्ण-शास्त्र्यांचें** मत ग्राह्य धरलें आहे! आमच्या मतें यांतील पहिला म्हणजे हिमालय, पंचवटी ह्यांची कधींही सामान्यनामे म्हणून वाक्यांत योजना होत नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या शब्दांचे 'हिमाचें आलय' किंवा 'पांच वडांचें ठिकाण' अशाप्रकारें प्रथम विग्रह करून मग त्या नामाची जात ठरवणे चुकीचें आहे. हे शब्द आहेत तसे व्यक्तीचे केवळ नांव दर्शविणारे असे घेऊन विशेषनाम असेच समजले पाहिजेत. **चिपळूणकरांच्या** दुसऱ्या प्रश्नांत एक निराळाच हेत्वाभास दृग्गोचर होतो म्हणजे व्याकरणांत ते म्हणतात त्याप्रमाणे शब्दाची जात ठरवितांना वाक्यांत त्या शब्दाचा कसा उपयोग होतो हें पाहावयाचे नसते तर उपयोग निरपेक्ष अशाच रीतीनें यासबधीं विचार होतो. म्हणजे हिमालय, मगळवार, रामचद्र, माणूस असे एकाकी शब्द सांगून त्यांची जात विचारतात. आतां वाक्यातील शब्दान्या उपयोगाप्रामणे ही जात ठरते ही गोष्ट खरी आहे. पण तो स्वतत्र पक्ष आहे. कारण विशेषनामांप्रमाणें इतर म्हणजे भाववाचकनामासबधीं हाच प्रकार आहे. एवढेंच नव्हे तर इतर जातीच्या शब्दांविषयीं तीच गोष्ट आहे. उदा० :—विचार, आचार, रीति, नीति हीं भाववाचकनामें आहेत. पण वाक्यांत 'दोनतीन विचार,' 'असले आचार' 'तुमच्या कुटिल नीति' 'कामकाजाच्या रीति' अशा प्रसंगाने हे शब्द आले तर तीं सामान्यनामें होतात. वाक्यांत विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग होतो व दिसण्यांत क्रियापद असलेला शब्दही नाम असतो. उदा० .—'करतो' हें क्रियापद आहे येथें करतो शब्दाचें नांव असल्यामुळें तें नाम आहे. पण अशा गोष्टी व्याकरण सांगतांना जमेस धरावयाच्या नसतात. सारांश वाक्यांत उपयोग हें भलतेंच लक्षण **चिपळूण-करांनीं** उपस्थित केलें आहे ]

४ पदार्थवाचक नाम :—राशिगण्य द्रव्यवाचक वस्तु किंवा पदार्थ दाखविणाऱ्या नामास **पदार्थवाचक** नाम असें म्हणतात. जसें :—तेल, तूप, गंहू, साखर इ०

[ असे नाम इंग्रजींत मानलें आहे पण मराठींत त्यासबधीं व्याकरणांत मतभेद आहे. **गुंजीकरांना** हा भेद पसत नाहीं व **दामल्यांनींही** तो स्वीकारला नाहीं. 'नाम म्हणजे प्रत्येक **पदार्थाचें** नांव' अशी नामाची व्याख्या केल्यावर, **जोश्यांस** त्यांना **द्रव्यवाचक** नांवें म्हटल्याशिवाय गत्यतर नव्हतें. सामान्यनामें व पदार्थवाचक नामांमध्ये फरक हाच कीं सामान्यनामांनीं दाखविलेल्या वस्तु संख्यागण्य असून, पदार्थवाचकनामें राशिगण्य आहेत. म्हणजे पहिल्याचें अनेकवचन होतें व दुसऱ्याचे होत नाहीं. याविषयीं अधिक विचार पुढें होईल. ]

५ समुदायवाचक नाम :—अनेक वस्तूंचा समुदाय दर्शविणाऱ्या

नामास **समुदायवाचक नाम** असें म्हणतात. जसें :—आज तेथें हजार **पान** पडलें.

[ येथें वस्तू अनेक असूनही नामाचें एकवचन असतें ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. 'कळप', 'थवा' 'फौज', हीं सामान्यनामें. कारण त्यांचीं अनेकवचनें होतात. 'लोक' समुदायवाचक नाम. त्याचें एकवचन नाहीं. ]

६ **भाववाचक नाम** :—जें नाम अमूर्त व भावरूप वस्तु दाखवितें त्याला **भाववाचक नाम** असें म्हणावें. जसें :—चमत्कार, हुशारी, वाचन, बोलणें इ०

[ **दामल्यांनीं** आरभींच नामांचे धर्मीवाचक व धर्मवाचक असे दोन भेद करून धर्मीवाचक नामांत सामान्य व विशेष हीं नामें घालून भाववाचक नामाची धर्मीवाचक नाम अशी व्याख्या केली आहे. पूर्वीची व्याख्या बदलण्याचा हा शुद्ध अव्यापारेषु व्यापार आहे. यानें कांहींच साधलेलें नाहीं. **गुंजीकरांनीं** यासबधीं पुढील विचार प्रकट केले आहेत. "विभक्तिप्रकरण नीट समजण्यासाठीं आधीं नामादिकांचे पोटभेद आणि लिंगविचार हीं प्रकरणें सांगितलीं पाहिजेत. नामाच्या जाती कोणी 'सामान्य' व 'विशेष' अशा केल्या आहेत. कोणी 'भाववाचक' हा भेद मानला आहे. कोणी अधिकही केल्या आहेत. पण या जाती कोणत्या पायावर रचिल्या आहेत तें सांगणें कठीण आहे. जोशीबुवांनीं म्हटलें आहे कीं सामान्यनाम व विशेषनाम हे भेद नामाच्या अर्थावरून केले आहेत. 'उपयोगावरून सामान्य-नामाचे अनेक पोटभेद मानतां येतील. परंतु त्यांतले ( १ ) गुणवाचक नामें, ( २ ) भाववाचक नामें व ( ३ ) समुदायवाचक नामें हे मुख्य आहेत.' वास्तविकपणें म्हटलें म्हणजे मराठी व्याकरणांत नामाच्या जाती सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं." यानतर इंग्रजी व्याकरणांत सामान्यनाम व विशेषनाम ह्या जाती आहेत. म्हणून त्या पाहिजे तर मराठींत खुशाल कराव्या' असें सांगून ते म्हणतात 'समुदायवाचक नामें व द्रव्यवाचक नामें यांची गोष्टही तीच आहे. समुदायवाचक नामें इंग्रजींत दिलीं आहेत. त्यांचें तेथें कारण आहे. केव्हां त्यांना लावावयाचें क्रियापद एकवचनी असतें, केव्हां अनेकवचनी असतें, म्हणून त्या विभागाचें कारण पडतें पण मराठींत त्याचें प्रयोजन-काय ? तसेंच 'द्रव्यवाचक' नामें म्हणून जोशीबुवांनीं इंग्रजींतील nouns of materials नाऊन्स ऑफ मटेरिअल्स' या अर्थीं मराठींत आणण्याकरितां संज्ञा केली आहे, तिचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण त्या संज्ञांमध्यें पाणी, सोनें यांचा जसा समावेश होतो तसा वृक्ष, पाषाण यांचा अवश्य समावेश होतोच. तेव्हां तो विभागही कांहीं कामाचा नाहीं. 'गुणवाचक नामें' आणि 'भाववाचक नामें' देण्यापेक्षां 'क्रियावाचक नामें' दिलीं असतीं तर त्यांचा कांहीं तरी उपयोग झाला

असता. कोणी म्हणेल कीं 'भाववाचक' इत्यादि संज्ञा पुढें तद्धितादि प्रकरणांत येत नाहींत काय ? हो, येतात खऱ्या, पण दुसऱ्याही शतशः संज्ञा येतात त्यांचा संग्रह कां करू नये ? पाटिलकी, मामलेदारकी अशीं अधिकारवाचक नामे, शेती, सुतारकी इ० उद्यमवाचक नामें अशीं शतशः प्रकारचीं नामें, मानतां येतील. पण त्यांचीं मुद्दाम लक्षणें सांगत बसण्या पासून कांहीं उपयोग नाहीं. आतां वडिलोपार्जित वहिवाट चालत आलेली मोडणे हे पातक वाटत असल्यास अथवा व्यवहारज्ञानाच्या उपयोगी पडतील म्हणून सामान्य, विशेष आणि फार तर भाववाचक व सर्वनाम असे विभाग दिले तर पुरे असे आम्हांस वाटते. परंतु त्यांतही करणाची विशेष पदवी काढून त्यास सामान्यांत ढकलणे हें योग्य किंवा अयोग्य, हा करणाचा नियम नव्हें, असें म्हणणे अवश्य दिसते"

**गुंजीकरांनीं** आरंभींच कोणत्याही शास्त्रीय ग्रंथांत एखाद्या विषयाचे जेव्हां विभाग करावयाचे असतात तेव्हां त्याच्या उपयोगाकडे पाहिल्याशिवाय ते करू नये असें सांगितले आहे हा उपयोगही सामान्यत, व्याकरणदृष्ट्या असावा असे त्याचे म्हणणें आहे ह्या दोन्ही गोष्टी आम्हास मान्य आहेत पण वरील विवेचनात ह्या गोष्टी त्यांनीं आपल्या दृष्टीसमोर ठेवल्याचे दिसत नाही त्यांच्या मनात संस्कृत व इंग्रजी हाच भेद डांचत असल्याचें दिसून येतें समुदायवाचक नाम, सामान्यनाम, विशेषनाम, भाववाचकनाम व पदार्थवाचक नाम किंवा द्रव्यवाचक नाम यांच्या मागेही इंग्रजींत एकवचन, अनेकवचन यासंबधींची व तदनुरोधि उपपद विषयक कल्पना आहे हें त्यांच्या लक्षांत आले नाहीं आणि ही कल्पना अर्थाची नसून व्याकरणविषयक आहे ही गोष्ट ते विसरले मराठींतही या भेदांच्या मागें अनेकवचन क्षमता हेच व्याकरण-विषयक लक्षण आहे, सामान्य नामाचे ते संख्यागण्य असल्यामुळे एकवचन अनेकवचन अशीं दोन्हीं होतात विशेषनाम व्यक्तीसंबधींचे व केवळ संज्ञादर्शक असल्यामुळे एक-वचनीच असतें मात्र मानवी व्यक्ति एकच असली तर शब्दाचें रूप बहुमानार्थी अनेकवचनीं असतें. भाववाचक नाम तेथें वस्तुभावगण्य असल्यामुळें अनेकवचन होत नाहीं तीच गोष्ट पदार्थवाचक किंवा द्रव्यवाचक नामाचीं तेथें वस्तु राशिगण्य असल्या-मुळे अनेकवचन होत नाहीं सामान्यादि नामाप्रमाणे पदार्थवाचक नाम व्याकरण-दृष्ट्या मानणे अवश्य आहे. 'कर्ण' या विशेषनामाला सामान्यनामांत ढकलण्यासंबधीं पूर्वी सांगितलेच आहे ]

## नामाचे घटनात्मक प्रकार.

**७ नामाचे घटनात्मक प्रकार** :—घटनेच्या दृष्टीनें नामाचे ( १ ) धातुसाधित, ( २ ) संयुक्त व ( ३ ) सामासिक असे तीन प्रकार आहेत.

**८ धातुसाधित नाम** :—धातूने साधलेले जें नाम त्याला **धातु-साधित** नाम असे म्हणतात. जसें :—करणें, बोलणे, दळप, करणावळ इ.

**९ संयुक्त नाम**:—संयुक्तशब्द असलेल्या नामाला **संयुक्त नाम** असें म्हणावें, जसें :—कामधंदा, मीठभाकर इ.

**१० सामासिक नाम**:—सामासिक शब्दापासून होणाऱ्या नामास **सामासिक नाम** असें म्हणतात. याचे ( १ ) द्वंद्व सामासिकनाम उदा. रामकृष्ण, ( २ ) तत्पुरुष सामासिकनाम उदा०.:—राजपुत्र व ( ३ ) मध्यमपदलोपी सामासिकनाम उदा० :—साखरभात, आजेसासरा. असे तीन प्रकार आहेत.

## २ सर्वनामाचें वर्गीकरण.

**११ सर्वनामाचा प्रकार**:— सर्वनामाचे अर्थावरून ( १ ) पुरुषवाचक, ( २ ) दर्शक, ( ३ ) संबंधी, ( ४ ) प्रश्नार्थक, ( ५ ) सामान्य व ( ६ ) आत्मवाचक असे सहा प्रकार आहेत.

### १ पुरुषवाचक सर्वनाम.

**१२ पुरुषवाचक सर्वनाम** :—जे सर्वनाम केवळ क्रियापदाचा पुरुष विकार दर्शवितें. त्या सर्वनामास **पुरुषवाचक** सर्वनाम असें म्हणतात. जसें :—मी, तूं, तो, ती, तें व अनुक्रमे त्यांचीं अनेकवचनें.

[ वस्तु बोलणारी असली किंवा कल्पिली म्हणजे ती स्वताविषयीं, ज्याच्याशीं बोलते त्याविषयीं किंवा तिसऱ्याच व्यक्ती विषयीं बोललेलं दिसते व त्याप्रमाणे क्रियापदाच्या लिंग, वचन, काळ, अर्थ या रूपांत फरक पडलेला दिसतो क्रियापदाच्या या विकारास **पुरुष** असें म्हणतात. स्वतःविषयीं बोलतांना झालेल्या विकारास **प्रथमपुरुष** ज्याच्याशीं बोलते त्याचा उल्लेख करतांना झालेल्या विकारास **द्वितिय पुरुष** व तिसऱ्याच व्यक्तीचा उल्लेख करतांना झालेल्या विकारास **तृतीय पुरुष** असे म्हणतात पुरुष विकारासबधीं अधिक माहिती पुढें होईल. ]

**१३ प्रथमपुरुषवाचक सर्वनाम**:—जे पुरुषवाचक सर्वनाम प्रथम पुरुष हा विकार दर्शवितें त्या सर्वनामास **प्रथमपुरुषवाचक** सर्वनाम असें म्हणावें. जसें :—मी, आम्हीं, आपण.

**१४ द्वितियपुरुषवाचक सर्वनाम** :—जें पुरुषवाचक सर्वनाम द्वितियपुरुष हा विकार दर्शविते त्या सर्वनामास **द्वितियपुरुषवाचक सर्वनाम** असें म्हणतात. जसें :—तू, तुम्हीं, आपण.

१५ **तृतीयपुरुषवाचक सर्वनाम** :—जें पुरुषवाचक सर्वनाम तृतीय पुरुष हा विकार दर्शवितें त्या सर्वनामास **तृतीयपुरुषवाचक सर्वनाम** असें म्हणावें. जसें :—तो, ती, तें, ते, त्या, तीं.

## २ दर्शक सर्वनाम.

१६ **दर्शक सर्वनाम**:—जें सर्वनाम केवळ जवळच्या किंवा लांबच्या वस्तूचा निर्देश करतें त्या सर्वनामास **दर्शक सर्वनाम** असें म्हणतात. जसें :—हा, ही, हे, तो, ती, तें.

[ यांतील हा, ही, हें हीं व त्यांचीं अनेकवचनें हे, ह्या, हीं, हीं स्वतःसिद्ध दर्शक सर्वनामें आहेत. पण तो, ती, तें हीं व त्यांचीं अनेकवचनें हीं वर सांगितल्याप्रमाणें तृतीयपुरुष वाचकाचेही कार्य करीत असल्यामुळें त्याचें दर्शकत्व किंवा पुरुषवाचकत्व वाक्यांतील उपयोगावरून ठरणार हें उघड आहे. इंग्रजींत तृतीय पुरुषवाचक व दर्शक सर्वनामें वेगळीं आहेत हें ती भाषा जाणणाऱ्यांना माहितच आहे ]

## ३ संबंधी सर्वनाम.

१७ **संबंधी सर्वनाम** :—जे सर्वनाम पुढील दर्शक सर्वनामाच्या संबंधानें येतें त्या सर्वनामास संबंधी सर्वनाम असें म्हणतात. जसें :—जो, कोण, काय, जो कोण, जें काय, जें कांहीं.

[ संबंधी सर्वनामाची ही व्याख्या इतर वैयाकरणांच्या व्याख्येहून अगदीं निराळी आहे, हे स्पष्ट दिसून येईल. **दामले** म्हणतात "जो ( जी, जें ) हें एकच संबंधी सर्वनाम मराठींत आहे. तेव्हां तें शास्त्रीयदृष्ट्या लक्षणक्षमच नाहीं. ह्यामुळें संबंधी सर्वनामाचीं आजपर्यंत देण्यांत आलेलीं लक्षणें असमाधानकारक असावीं यांत नवल नाहीं. कांहींनीं इंग्रजी लक्षणांचा अनुवाद केला आहे. तो मराठींतील **जो** या शब्दास सर्वथा लागू पडत नाहीं. " ज्या सर्व नामावरून पूर्वी ज्याचा संबंध आला आहे अशा पदार्थांचा बोध होतो, तें संबंधी सर्वनाम–'जो' म्हणजे पूर्वी सांगितलेला कोणी असेल तो, म्हणून हें संबंधी सर्वनाम." **जोशी.** हें लक्षण इंग्रजी संबंधी सर्वनामास यथायोग्य लागतें हें तज्ज्ञांस कळेल. पण मराठींत **जो** ह्यास तें कसें लागतें हें मोठें गूढ आहे. जोशांचें लक्षण भाषांतरी विदेशी मराठीस तें मराठी भाषेच्या मूळ स्वभावाच्या दृष्टीनें ग्राह्य होण्यासारखें आहे असें दिसत नाहीं. मराठी संबंधी सर्वनाम हें नेहमीं तो या सर्वनामाशीं संबद्ध असतें. हा या सर्वनामाशीं त्याचा संबंध कधींच घडत नाहीं. वाक्यामध्यें संबंधी सर्वनाम येतें व त्याचेनंतर **तो** हें येतें. संबंधी सर्वनामाशीं अशाप्रकारें जोडल्या जाणाऱ्या **तो** या सर्वनामास केवळ दर्शक ही संज्ञा देणे

योग्य नाहीं. तर त्यास दादोबांनीं सुचवल्याप्रमाणें **प्रतिबंधी** म्हणण्यास हरकत नाहीं." **दामल्यांचीं** हीं सर्वच विधानें चिन्त्य आहेत. पहिल्यानें **जो हें** संबधी सर्वनामाचें एकच उदाहरण आहे हें खरें नाहीं. 'काय पाहिजे तें माग,' 'कोण येईल तो खाईल,' 'जो कोणी असला समर्थ भगवान् त्या मी नमीं मंदधी' या उदाहरणांवरून 'काय,' 'कोण', 'जो कोणी' हीं सबधी सर्वनामें आहेत, हें स्पष्ट दिसून येईल. हा या दर्शक सर्वनामाबद्दल **दामले** म्हणतात तेंही खरें नाहीं. उदा० :–'हें जें मीं सांगितलें तें खरें आहे.' मात्र ह्या उदाहरणांत **हें** पूर्वीं आलें व **तें** पुढें आलें. यावरून दर्शक सर्वनाम पूर्वींही येतें असें दिसून येईल. पुढें येणारें सर्वनाम दर्शकच नसतें, हें म्हणणें बरोबर नाहीं. तें दर्शक नसलें तर पुरुषवाचक असलें पाहिजे. पण तें तसें नाहीं. निर्देश स्पष्ट असल्यामुळें तें दर्शकच आहे हें सहज दिसून येतें. **प्रतिबंधी** ही **दादोबांनीं** सुचवलेली किंवा **अनुबंधी** ही **दामल्यांनीं** चांगली म्हणून पसंत केलेली संज्ञा इग्रजींतील consequent या सज्ञेला प्रतिशब्द आहे. या सज्ञा व्याकरण विषयक नसून अर्थविषयक आहेत. या दृष्टीनें सबधी हा relative याचा प्रतिशब्द आहे हें उघड आहे आमच्या मतें relative आणि consequent यांचे प्रतिशब्द हवेच असतील तर **योगी** व **प्रतियोगी** असे योजावे. पण व्याकरण प्रथांत त्यांची जरूरीच नाहीं. शिवाय 'अनुबधी' किंवा 'प्रतिबधी' हें जर दर्शक व पुरुषवाचक नव्हे तर त्याला आणखी नव्याच जातीचें सर्वनाम मानलें पाहिजे. आणि असा प्रकार तर **दामल्यांनीं** मानलेला दिसत नाहीं. सारांश आम्हीं वर दिलेली सबधी सर्वनामाची व्याख्या निर्दोष असून संबंधी सर्वनामाचें लक्षण करणे सुसाध्य आहे ही गोष्ट सिद्ध होते.]

## ४ प्रश्नार्थक सर्वनाम.

१८ **प्रश्नार्थक सर्वनाम** :—प्रश्न करण्याकरितां जे सर्वनाम योजतात, त्याला **प्रश्नार्थक** सर्वनाम असें म्हणतात. जसें :–कोण ? काय ?

[ हीं सर्वनामें सबधी सर्वनामांप्रमाणें वापरतात हें पूर्वीं दाखविलेंच आहे. ]

## ५ सामान्य सर्वनाम.

१९ **सामान्य सर्वनाम** :—सामान्य व अनिश्चित अर्थानें योजलेल्या सर्वनामास **सामान्य सर्वनाम** असे म्हणतात. जसें :–कोण, काय, एक, कोणी एक, फलाणा.

[ कोण व काय हीं सर्वनामें संबंधी व प्रश्नार्थक सर्वनामाप्रमाणेंही योजतात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो हें सर्वनाम पुरुषवाचक व दर्शक हे दोन्ही प्रकार दाखवितें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. सारांश मराठींत तींच सर्वनामें निरनिराळे प्रकार दाखवितात. अर्थात ते निराळेच शब्द असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. सामान्यसर्वनामाची

पूर्वीची **दादोबांची** सञ्ज्ञा आम्ही कायम ठेवली आहे. **दामल्यांची** 'अनिश्चित' ही सञ्ज्ञा वापरण्याची मुळींच जरूरी नाहीं म्हणूनच एक, फलाणा, प्रत्येक, सर्व हीं आम्हीं सामान्य सर्वनामें मानलीं आहेत. संस्कृतांत 'सर्वनाम' ही सञ्ज्ञाच ज्या नामाच्या यादींत सर्व हें नाम आहे त्यावरून पडली आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्वनामांची संख्या पूर्ववैयाकरणाप्रमाणें ठराविक सात किंवा नऊ मानतां येत नाहीं ही होय. ]

## ६ आत्मवाचक सर्वनाम.

**२० आत्मवाचक सर्वनाम** :—नाम किंवा सर्वनामाबरोबर आपणच, दुसरा नाहीं अशा अर्थी जें सर्वनाम योजतात, त्यास **आत्मवाचक** सर्वनाम असें म्हणतात. जसे :—आपण, स्वतः.

[ हीं सर्वनामें इंग्रेजींतील सर्वनामाप्रमाणें मराठींत उपयोजिलीं जातात, हें तज्ज्ञाच्या लक्षांत येईलच. ]

## ७ संयुक्त सर्वनाम.

**२१ संयुक्त सर्वनाम** :—सर्वनाम जातीच्या संयुक्त शब्दास **संयुक्त** सर्वनाम असें म्हणतात. जसे :—जोजो, तोतो, जो कोणी इ.

[ **दामल्यांनीं** सर्वनामाची व्युत्पतिदृष्ट्या व निबधनदृष्टया बरीच चर्चा केली आहे. पण ते अन्य शास्त्राचे विषय असल्यामुळें आम्ही निव्वळ व्याकरणविषयक चर्चाच येथे केली आहे ]

## ३ विशेषणाचें वर्गीकरण.

**२२ विशेषणाचें प्रकार** :—विशेषणाचे ( १ ) गुणविशेषण व ( २ ) संख्याविशेषण असे दोन मुख्य प्रकार आहेत. याशिवाय सर्वनामापासून झालेल्या विशेषणास सर्वनामात्मक विशेषण असेंही साधणुकेच्या दृष्टीनें नांव देतात.

**२३ गुणविशेषण** :—ज्या विशेषणाच्या योगानें वस्तूच्या संख्या सोडून इतर गुणांविषयीं बोध होतो त्या विशेषणास **गुणविशेषण** असें म्हणतात. जसें :—चांगला, सुंदर, वाईट, काळा, गोरा इ.

**२४ संख्याविशेषण** :—ज्या विशेषणापासून संख्याविषयक गुणांचा बोध होतो, त्या विशेषणास संख्याविशेषण असें म्हणतात.

जसे :–दोन, चार, पांच, सात, दोनदां, चौथा इ. संख्याविशेषणाचे ( १ ) गणनावाचक, ( २ ) परिणामवाचक, ( ३ ) आवृत्तिवाचक, ( ४ ) क्रमवाचक हे प्रकार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत:—

| प्रकार | कार्य | उदाहरणें |
|---|---|---|
| १ गणनावाचक. | संख्या मोजणें. | एक, दोन, पांचशें, कमी, पुष्कळ, अधिक. |
| २ परिणामवाचक. | राशी मोजणें. | पांच शेर, दोन मण, पुष्कळ, कमी, अधिक. |
| ३ आवृत्तिवाचक | पट मोजणें. | दुप्पट, तिहेरी, चौपडी. इ. |
| ४ क्रमवाचक | क्रम दाखविणे | पहिला, दुसरा, तिसरा. इ |

**२५ सार्वनामिक विशेषण** :—सर्वनामासारखा दिसणारा शब्द नामामागें येऊन त्यानें नामाची वस्तु कशी आहे असें दाखविलें तर त्या शब्दास **सार्वनामिक विशेषण** असें म्हणतात. जसे :–**तो** ( मुलगा ), **त्याची** ( मुलगी ), असला, कोणता इ.

[ सर्वनाम म्हणजे नामाऐवजीं येणारा शब्द. तसा शब्द नामाबरोबरच मागें आला व त्याने विशेषणासारखें कार्य केलें, तर त्याला सर्वनाम असें म्हणतांच येणार नाहीं. कांहीं वाक्यात मागें येऊन तो शब्द सर्वनामाचेंच कार्य करतो. अशा प्रसगीं तें सर्वनामच होय. जसे :– 'मीं गरीब त्यांत कशाला पडूं.' "येथें 'मी' सर्वनाम. पडूं या क्रियापदाचा कर्ता." ]

**२६ संयुक्त विशेषण** :—विशेषण जातीच्या संयुक्त शब्दाला **संयुक्त विशेषण** म्हणावें. याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) साधें संयुक्त विशेषण, ( २ ) शब्दयोगी संयुक्त विशेषण.

**२७ साधें संयुक्त विशेषण** :—शब्दयोगीशिवाय कोणतेही दोन शब्द एकत्र होऊन जें संयुक्त विशेषण होते त्याला **साधें संयुक्त विशेषण** असें म्हणावें. जसें :–पांचशेर, कानफाटा, इ०

**शब्दयोगी संयुक्त विशेषण** :—शब्दयोगी शब्द इतर इतर शब्दाला लागून जें विशेषण होतें त्याला **शब्दयोगी संयुक्त विशेषण** असें म्हणतात. जसें :–पाहाण्याजोगा, दिसण्यासारखा, पोहोंचण्याइतका, हातावेगळा इ०

**२९ सामासिक विशेषण** :—सामासिक जातीचा जो विशेषण शब्द त्याला **सामासिक विशेषण** असें म्हणावें. जसें :—चक्रपाणी, हयग्रीव इ. हा सामासिक शब्द **बहुव्रीही** जातीचा असतो.

[ विशेषण शब्दाच्या पूर्वींच्या वैयाकरणांनीं केलेल्या प्रकारांत **विधिविशेषण** हा प्रकार आहे. **दामल्यांनीं** विशेषणाचे मुख्य दोन प्रकार असे सांगून, **जोशांचें** अनुकरण करून, मागाहून हा प्रकार घातला आहे. अर्थात् येथें इंग्रजीचें अनुकरण झालें आहे हें स्पष्ट आहे. खरें म्हटलें तर विधिविशेषण हें विशेषणच नाहीं. तर तें क्रियाविशेषण आहे. 'मुलगा चांगला आहे' व 'चांगला मुलगा आईबापांची आज्ञा पाळतो' ह्या वाक्यांत 'कसा आहे' असा प्रश्न उत्पन्न होऊन उत्तर 'चांगला आहे' असें येतें. येथें चांगला या शब्दाचा 'आहे' या क्रियापदांतील 'असणें' या क्रियेकडे संबंध आहे. म्हणून तें क्रियाविशेषण आहे. दुसऱ्या वाक्यातील 'चांगला' यानें 'कसा मुलगा' असा प्रश्न येतो. येथें 'चांगला' या शब्दाचा संबंध 'मुलगा' या वस्तूकडे आहे. तेव्हां ते विशेषण आहे. मराठींत 'चाकू चांगला चालतो,' 'सुरी चांगली चालते,' 'पेन चांगलें चालतें' यांत चांगला, चांगली, चांगलें हीं क्रियाविशेषणें आहेत. याविषयीं पुढें क्रियाविशेषण प्रकरणांत अधिक विचार होईल. संख्याविशेषणासंबंधीं **दामल्यांनीं** उगाच मोठा प्रपंच केला आहे. त्यांत कांहीं अर्थ नाहीं हें सगळें स्पष्टीकरण निबंधनाच्या दृष्टीनें असल्यामुळे व्याकरणदृष्ट्या त्याचें महत्त्व नाहीं. कांहीं सामान्य सर्वनामाला विशेषणांत घालून त्यांना 'अनिश्चित' हें दिलेलें नांवही जमेंत घेण्यासारखें नाहीं. साधनेच्या दृष्टीनें संयुक्त विशेषणें ( पोटप्रकारासह ) व सामासिक विशेषण हे प्रकार आम्हीं नव्यानेंच दाखविले आहेत. ]

---

# अध्याय दुसरा.

## क्रियापदाचें वर्गीकरण.

१ **क्रियापदाचें वर्गीकरण** :—निरनिराळ्या भेदक लक्षणांनीं क्रियापदाचे ( १ ) सकर्मक, ( २ ) अकर्मक, ( ३ ) गौण, ( ४ ) साह्य, ( ५ ) संयुक्त, ( ६ ) अकरणरूपी, ( ७ ) अस्वाधीनमुखी, ( ८ ) प्रयोजक, ( ९ ) शक्य व ( १० ) अकर्तृक असे दहा प्रकार पडतात.

२ **सकर्मक क्रियापद** :—ज्या क्रियापदाच्या क्रियेला कर्म असतें त्या क्रियापदास **सकर्मक क्रियापद** असें म्हणतात.

[ क्रिया कृतिपर असली म्हणजे तिनें केलेली अशी कांहीं वस्तु असते. व ती वाक्यांत एका नामपदानें दाखविली जाते हा नाम शब्द म्हणजेच कर्म. जसें :–' मी काम करतो ' या वाक्यांत ' करतो ' या क्रियापदाची क्रिया कृतिपर असल्यामुळें तिनें केलेली वस्तु काम या नामानें दाखविली आहे. तेव्हां काम हें नाम. कर्म ते ' करतों ' या क्रियापदाचें म्हणून करतो हें क्रियापद सकर्मक. कर्म या संज्ञेचा पुढें विचार होईल. ]

३ **अकर्मक क्रियापद** :—ज्या क्रियापदाच्या क्रियेला कर्म नसतें त्या क्रियापदाला **अकर्मक क्रियापद** असें म्हणावें.

[ कांहीं क्रियापदांतील क्रिया स्थिति किंवा गतिदर्शक असतात. उदा० ' मी बागेंत होतों, ' ' मी घरीं जातों ' येथें क्रिया कृतिपर नाहीं. केलेली वस्तु दाखविणारा नामशब्द म्हणजे कर्म नाहीं. म्हणून तीं अकर्मक क्रियापदें. ]

४ **गौण क्रियापद** :—ज्या क्रियापदाला लिंग, वचन, पुरुष, काळ, अर्थ यांपैकीं कांहीं किंवा सर्व विकार होत नाहींत व जें मूळ रूपांतच असतें त्याला **गौण क्रियापद** असें म्हणतात. जसें :–पाहिजे, नको, नलगे, नये इ.

[ यांतील कांहीं कांहीं साह्य क्रियापदेंही असतात. ]

५ **साह्यक्रियापद** :—कृदंत किंवा क्वचित् इतर शब्दाच्या संयोगानें जें क्रियापद संयुक्त क्रियापद बनविण्यास साह्य देतें, त्या क्रियापदास **साह्यक्रियापद** असें म्हणतात. जसें :–( करीत ) **आहे**, ( करूं ) **नका**, ( केलें ) **असेल** इ.

६ **संयुक्त क्रियापद** :—कृदंत किंवा क्वचित् अन्य शब्द व साह्य क्रियापद यांनी काळ किंवा अर्थ यासंबंधीं रूपें बनविणारा क्रियापद जातीचा जो संयुक्त शब्द त्याला **संयुक्त क्रियापद** असे म्हणतात.

[ सयुक्त क्रियापदाची ही व्याख्या पूर्वी प्राकृतेयांत सिद्ध झालेल्या निरनिराळ्या उपसिद्धातांवरून केली आहे हे उपसिद्धांत पुढीलप्रमाणे आहेत :–( १ ) सयुक्त क्रियापद म्हणजे स्वतत्र अर्थ असलेला क्रियापद जातीचा सयुक्त शब्द ( २ ) तो कृदत साह्य क्रियापद यांनीं बनलेला सयुक्त शब्द असतो ( ३ ) तो नाम, क्रियाविशेषण जातीचा शब्द व साह्य क्रियापद यानीं बनलेला प्राचारिक शब्द असतो ( ४ ) त्याचे कार्य म्हणजे काळ व अर्थ यासबधीं रूपे बनविणे ( १ ) यांसबधीं पुढील दोन वाक्यें पाहा 'त्यानें काम करून टाकले,' 'त्याने ते पत्र पोष्टांत टाकलें' यापैकीं पहिल्या वाक्यात 'करून टाकलें' हे सयुक्त क्रियापद आहे. त्यांतील 'करून' 'टाकलें' असे निरनिराळे शब्दाचे अर्थ अभिप्रेत नाहींत तर 'हातावेगळें केलें' असा अर्थ घेतला पाहिजे. दुसऱ्या वाक्यांत 'टाकिले' हे क्रियापद स्वतत्र आहे. त्याचें पत्र हें कर्म आहे. यासबधीं **दामल्यांनीं** पुढील प्रश्न उपस्थित केला आहे "सयुक्त क्रियापदामध्यें धातु कोणता मानावा हा एक प्रश्न आहे बसत होता, बसणार आहे, बसलें पाहिजे, इ. ठिकाणीं पूर्ववैयाकरणाच्या पद्धतीप्रमाणे कृदतांतील धातु मानण्यांत येतो उदा .— बसत होता हें त्याच्या मतें 'बस' या धातूचे अपूर्ण काळाचें रूप होय. आमच्या मते हें ठीक नाहीं करून टाक, लिहितां यते, करू शकला इ. स्थळीं नुसते कर, लिही, कर हे धातु मानणें अर्थदृष्ट्या प्रशस्त नाहीं आणि लिहू दिलें, जाऊ दिले, जेवू घातलें या ठिकाणीं तर लिही, जा, जेव हे एकाकी धातु मानणे चुकीचें होय. कारण कीं या ठिकाणीं कृदतांतील धातु व आख्यात रूपांतील धातु ह्यांचे कर्ते भिन्न आहेत म्हणून आमच्या मत सर्वत्र असा नियम करणें चांगले की सयुक्त क्रियापदांमध्यें साह्य क्रियापदांतील धातु घेऊन तो त्यामागील कृदतास जोडून एक सयुक्त धातु मानावा " हें **दामल्यांचें** मत सयुक्तिक नाहीं. पहिलें कारण ते अर्थदृष्ट्या हे धातु मानणें प्रशस्त नाहीं असे देतात पण कां ते सांगत नाहींत. आमच्या मते या धातूचेच विशिष्ट काळाचे किंवा अर्थाचे रूप करावयाचे असल्यामुळें तेथें तो मूळचा एकच धातु मानणे अपरिहार्य आहे. उदाहरणार्थ :—'लिहितां येते' हे 'लिही' याचें शक्यार्थी रूप आहे. 'बसत होता' हें 'बस' याचे अपूर्ण भूत काळाचें रूप आहे. त्यांनीं दिलेले दुसरें कारण म्हणजे कृदतातील धातु व आख्यात रूपातील धातु यांचे कर्ते भिन्न भिन्न आहेत. हें कारणही अप्रस्तुत व चुकीचें आहे. सयुक्त शब्दातील–मग तो सयुक्त शब्द क्रियापद असो किंवा अन्य शब्द असो—घटक एकाकीशब्दास स्वतत्र असा अर्थच नाहीं. आणि म्हणूनच त्याचे धातु कोणते, आणि कर्ते कोणते यासंबधीं विचारच करावयाचा नसतो. जो विचार करावयाचा तो सयुक्त शब्दाचा आणि वर सांगितल्याप्रमाणें

काळ, व अर्थ यांचीं प्रत्यय वजा कृदत किंवा अन्य शब्द जोडून कोणत्यातरी धातूचीं रूपें करणें हेंच सयुक्त क्रियापदाचें कार्य असल्यामुळे तोच सयुक्त क्रियापदाचा धातु असे सांगितल्याशिवाय गत्यतर नाहीं शिवाय आतां व्याकरण करतांना धातु सांगण्याची सुद्धां आवश्यकता नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे ( २ ) याचा अर्थ मुख्य धातूचे कृदत करावयाचे व त्याच्यापुढें जरूर त्या साह्य धातूचे क्रियापद ठेवावयाचे व अशारीतीनें काळाचे किंवा अर्थाचे रूप सिद्ध करावयाचे. उदा. 'करीत आहे,' 'करू दे.' 'श्रवण करणें,' 'सपादन करणे,' 'भाग पाडणे,' 'कामा नये,' इ. या संयुक्त शब्दांत कृदत न येता नाम शब्द येतो. असे शब्द फक्त प्रचार भाग मानावे. म्हणजे वाक्यांत प्रचार ( Idiom ) आल्यामुळे त्याचा व्याकरणदृष्ट्या विचार न करतां ते मूलत सयुक्त समजावें. 'कामा नये' यांतला 'कामा' हेंही अशाच प्रकारचे उदाहरण आहे. याशिवाय **खेर, नवलकर** इत्यादि व्याकरणकारांनीं इग्रेजी भाषेत तशा अर्थाचे स्वतत्र शब्द आहेत त्या धोरणानें युद्ध करणें, प्रेम करणें गोंधळ करणें, मार खाणें, अगांत येणें, सिद्धीस नेणें इत्यादि सयुक्त शब्द मानलेले आहेत **दादोबांनीं** हे शब्द सयुक्त मानले नाहींत. **दामल्यांनीं** त्याना टेकू दिला आहे. पण 'श्रवण करणें,' 'सपादन करणें' याना जर सयुक्त क्रियापदे म्हणावें तर यांना कां म्हणू नये असा कोणाचा तरी आक्षेप उपस्थित करून 'ही शका कांहीं अंशीं योग्य आहे तिचें समाधान करणे जरासें कठीणच आहे' असें ते सागतात **दादोबांनीं** यासबधीं केलेलें स्पष्टीकरण **दामल्यांस** मानवलेले दिसत नाहीं त्यांनीं स्वतः 'कांहीं अशीं' व 'जरासें कठीण' असें सागून शेवटीं कांहींच स्पष्टीकरण केलेले नाहीं. तेव्हां ते येथे देणें आवश्यक आहे आमच्या मते त्यांस सयुक्त क्रियापदे न मानण्याचे कारण हेच कीं त्यांत 'अगांत,' 'सिद्धीस' असे सविभक्तिक शब्द येतात. अर्थात तीं स्वतत्र पदें आहेत. येथे प्रचाराचाही प्रश्न नाहीं. कारण प्रेम ह्याबद्दल प्रीति, अनुराग हे शब्द वापरले तर क्रियापदाच्या रूपातही फेरफार होतो. म्हणजे व्याकरणाच्या दृष्टीनें या शब्दाकडे पाहावें लागतें तेव्हा हीं सयुक्त क्रियापदें नव्हत. हाच पक्ष खरा आहे ( ३ ) काळ व अर्थ यासबधीं रूपें तयार करणे हेंच सयुक्त क्रियापदाचें मुख्य कार्यलक्षण आहे. त्यासबधीं विवेचन पूर्वी झालेले आहे याकडे लक्ष न गेल्यामुळें सयुक्त क्रियापदाचा पूर्ववैयाकरणानीं क्रियापद प्रकरणांत विचार न करतां इतर प्रसगीं आगतुक रीतीनें केला आहे. त्याच्या खऱ्या स्वरूपाचा पूर्ण अशा रीतीनें कधींच निर्णय झाला नव्हता तो आतां होईल अशी आशा आहे. ]

**७ अकरणरूपी क्रियापद** :—नास्तिपक्षीं अशा स्वरूपांत असलेल्या क्रियापदास **अकरणरूपी** क्रियापद म्हणावे. जसे :—**नाहीं, नव्हता, नसेल. इ.**

[ हीं क्रियापदे साह्य, स्वतत्र अशा उभयविध रूपांत असतात. ]

८ **अस्वाधीनमुखी क्रियापद** :—क्रिया अस्वाधीनपणें होत आहे असें ज्या क्रियापदानें दर्शविलें जातें त्या क्रियापदास **अस्वाधीनमुखी क्रियापद** म्हणावें. जसें :—करिजे, जाणिजे, केलें जातें, लिहिलें, गेलें इ० याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) **सकर्मक अस्वाधीनमुखी** क्रियापद सकर्मक असून जेथें स्वाधीनमुखी वाक्यांतील कर्म अस्वाधीनमुखी वाक्यांत कर्ता असतें. जसें 'शिपायाने चोर धरला' या स्वाधीनमुख वाक्यांत चोर कर्म आहे, ते अस्वाधीनमुखी वाक्यांत कर्ता झालें आहे. ( २ ) **अकर्मक अस्वाधीनमुखी**—जेथें क्रियापद अकर्मक असते. उदा० : जाईजे, फसला गेला इ०

[ इंग्रेजींत स्वाधीन व अस्वाधीनमुख रचनेस 'व्हॉइस' असें म्हणतात. त्याचे ॲक्टिव्ह (स्वाधीनमुख) व पॅसिव्ह (अस्वाधीनमुख) असे दोन प्रकार आहेत. जसे :—करिजे, जाईजे इ संस्कृतांतही अशी रचना आहे. व त्यांना अनुक्रमे 'कर्मणि' व 'भावे' अशाच संज्ञा आहेत सर्व मराठी वैयाकरणांनीं चुकून या संज्ञा प्रयोगास लावल्या व कर्मणि व भावे प्रयोग व कर्मणि व भावी अस्वाधीनमुख एकच असें ठरविलें ! वास्तविक प्रयोग ही गोष्ट संस्कृत भाषेंत नाहींच कारण तेथें क्रियापदास लिंगच नसते. मग क्रियापद हें कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें कसे फिरणार ? पण ही गोष्ट कोणत्याच व्याकरणकाराच्या लक्षांत आली नाहीं. यांसबधींचा विचार पुढें मुख व प्रयोग या प्रकरणांत होईल. ]

९ **प्रयोजकभेदी क्रियापद** :—प्रयोजक धातूपासून होणाऱ्या क्रियापदास **प्रयोजकभेदी क्रियापद** असें म्हणावें. जसें :—करवितो, बोलवितो, खाववतो इ०

[ प्रयोजक धातूसबधीं विचार पूर्वींच झाला आहे तेव्हां प्रयोजक क्रियापदासंबधीं फिरून येथें विचार करण्याचें कारण नाहीं. पुढें प्रयोजक भेदासबधीं चर्चा करतांना यासबधीं अधिक विचार होईल. ]

१० **शक्यभेदी क्रियापद** :—शक्यभेदी धातूपासून जे क्रियापद होतें, त्यास **शक्यभेदी क्रियापद** असें म्हणावें. जसें :—बोलवतें, बोलतां येतें; जाववतें, जातां येतें.

[ शक्यभेदी धातूसबंधानें मागें विचार झाला आहे. पुढें शक्यभेदाच्या प्रसंगानें अधिक विचार होईल. ]

**११ अकर्तृक क्रियापद :—अकर्तृक** धातूपासून होणाऱ्या क्रियापदास **अकर्तृक क्रियापद असें म्हणावें.**

[अकर्तृक धातू कोणते तें पूर्वी सांगितलेंच आहे. अकर्तृक क्रियापदासबधीं **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांनीं पुढील मत प्रदर्शित केलें आहे. प्रत्येक धातूस कर्म असतें असें अम्हा जसा नियम नाहीं, तसा प्रत्येक धातूस कर्ता असतो असाही नियम म्हणतां येत नाहीं जसें :–उजाडतें व मळमळतें या धातूच्या पोटांत कर्ता व क्रिया या दोहोंचाही समावेश झाल्यामुळें त्यांस कर्तृपदाची अपेक्षा लागत नाहीं. उजाडतें व मळमळते येथें 'उजेड होतो' व 'मळमळ होते,' असा कर्ता व क्रिया या दोन्हींचा अर्थ एका क्रियापदानें होतो. असल्या क्रियापदास अकर्तृक क्रियापद असें म्हणावें. कारण त्यास स्वतत्र कर्ता असत नाहीं. (निबध ११) **दादोबांनीं** यास भावकर्तृक क्रियापदे म्हटलें तें **कृष्णशास्त्र्यांस** पसत नाहीं. आम्हाला **कृष्णशास्त्र्यांचें** म्हणणें मान्य आहे हें वरील व्याख्येवरून दिसून येईल.]

---

# अध्याय तिसरा.

## क्रियाविशेषण, उभयान्वयी व केवलप्रयोगी.

### १ क्रियाविशेषणाचें वर्गीकरण.

**१ क्रियाविशेषण** :—लिंग व वचन ह्या विकारांस पात्र असणाऱ्या क्रियाविशेषणास **क्रियाविशेषण** असें म्हणतात. जसें :–(दांडा) तिरपा, (दांडी) तिरपी, (दांडकें) तिरपें बसला-ली-लें. तो मुलगा, ती मुलगी, तें मूल, चांगला–चांगली–चांगले आहे.

[ क्रियाविशेषण हें विशेषण नसून क्रियविशेषण आहे, हें पहिल्या अध्यायांत सांगितलेंच आहे इंग्रेजींत to be ( असणें ) या क्रियापदानंतर विधेयपूरक म्हणून जें विशेषण येते त्याला complementary असे म्हणतात. त्या भाषेत विशेषणाला किंवा क्रियाविशेषणाला लिंग, वचन, विकार होत नाहींत. व विशेषणें तीं विशेषणें व क्रियाविशेषणे तीं क्रियाविशेषणे असतात. जसें :–good ( चांगलें ) हें विशेषण. well ( चांगलें ) क्रियाविशेषण. मराठींत इंग्रेजीच्या रीत्यनुसार विचार झाल्यामुळें मागे सांगितल्याप्रमाणे क्रियाविशेषणास विशेषण म्हणण्याचा घोटाळा झाला आहे क्रियाविशेषण हें फक्त क्रिया कशी झाली तें दाखवितें म्हणून त्याचे अर्थावरून प्रकार पडत नाहीत. क्रियाविशेषणास विधिविशेषण हें उगीच दिलेलें नांव आम्ही टाकून दिलें आहे ]

**२ क्रियाविशेषण अव्यय** :—ज्या क्रियाविशेषणास लिंग, वचन वगैरे कोणतेच विकार होत नाहींत त्यास **क्रियाविशेषण अव्यय** असें म्हणतात. जसे :–हळु, तेथें, कोठें इ. क्रियाविशेषण अव्ययाचे अर्थावरून होणारे मुख्य प्रकार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत.

| क्रि. अव्यय | कार्य | प्रकार | उदाहरणें |
|---|---|---|---|
| तेथे | स्थळ दाखवित | स्थलवाचक | वर, खालीं, मागें. |
| तेव्हां | काळ दाखवितें | कालवाचक | केव्हां, काल, उद्यां. |
| पांच | सख्या दाखवितें | सख्यावाचक | अधिक, कमी, पुष्कळ. |
| सहज | रीति दाखवितें | रीतिवाचक | मुद्दाम, हळू, जलद. |

[ यांचे आवृत्तिवाचक इ पोटप्रकार **दामल्यांनीं** दाखविले आहेत. पण व्याकरणदृष्ट्या त्यांचे फारसें महत्त्व नाहीं. खरें म्हटले तर वरील प्रकारही निवळ अर्थाच्या दृष्टीनें केले आहेत व्याकरणदृष्टया ते करण्याची आवश्यकता नाहीं. पूर्वव्याक-

रणकारांनीं हे प्रकार केले आहेत. म्हणून ते येथे दिले. आहेत. यांत आम्हीं वाक्यालंकार हा प्रकार पैं, परता इ. घातलीं नाहींत तीं केवल प्रयोगी असल्यामुळें तेथें त्याचा विचार होईल ]

**३ साधनिकेवरून प्रकार** :—साधनिकेवरून क्रियाविशेषणाचे (१) साधित क्रियाविशेषण. व (२) संयुक्त क्रियाविशेषण. यांचे प्रकार पुढील तक्त्यांत दिले आहेत :—

## १ साधित क्रियाविशेषण अव्ययें.

| क्रियाविशेषण | प्रकार | उदाहरणें |
|---|---|---|
| दिवसा | नामसाधित. | रात्राचा, रस्त्यानें, रात्रीं |
| पांचदां. | विशेषणसाधित | इतक्यात, मोठ्याने इ०. |
| तेंव्हां. | सर्वनामसाधित. | येथें, जेथ, तस्मात् इ० |
| वरून. | क्रियाविशेषणसाधित | खालून, जवळून, लाबून. |
| करून | धातुसाधित | येता, जातां इ |

## २ संयुक्त क्रियाविशेषण अव्यय.

| क्रि. विशेषण अ. | प्रकार | उदाहरणें |
|---|---|---|
| घरावर | शब्दयोगी | त्यामुळें, जेणेकरून. |
| आतापर्यंत. | क्रियाविशेषणसाधित | एव्हांपासून, झाल्यामुळें. |
| दररोज | सामान्यसंयुक्त | प्रतिक्षण, दररोज. |

**४ विशेषण क्रियाविशेषण** :—विशेषणाच्या विशेषणास **क्रियाविशेषण** म्हणावें. जसे :—फार मोठा. क्रियाविशेषणाचे विशेषण अर्थातच क्रियाविशेषण असते. जसें :—फार ( जलद ).

[ क्रियाविशेषणाच्या चर्चेस **दामल्यांनीं** पुढीलप्रमाणें सुरुवात केली आहे: "क्रियाविशेषण अव्ययें किंवा अविकारी शब्द असें म्हणतात. या विधानासबधी शंका उत्पन्न होणें साहजीक आहे. कारण एक तर 'आरभो', 'रात्रीं' सारखे शेकडो शब्द विभक्त्यंत असतात व 'वरून', 'वरचा' 'इकडेस' इत्यादि अनेक क्रियाविशेषणांस विभक्ति प्रत्यय लागतात.' यापुढें ते म्हणतात 'दिवसास, रात्रीं, शेवटीं इ० ' यांस क्रियाविशेषणें म्हणावें असें दादोबा व बहुतेक सर्व वैयाकरण म्हणत आहेत. परंतु त्यांस जर क्रियाविशेषणें म्हणावयाचें तर सायंकाळीं, त्यावेळीं, पांच दिवसांनी, आरभीं, सुरुवातीस, गेल्या वर्षीं इ. विभक्त्यंत नामांस व शब्दसमुच्चयांस क्रियाविशेषण अव्ययें

म्हणण्यास काय हरकत आहे ? तथापि वर निर्दिष्ट केलेल्या सर्व ठिकाणच्या नामांस क्रियाविशेषण म्हणण्यास वैयाकरण तयार नाहींत. अशी सरसकट एकजात एकव्यवस्था केलेली अन्य भाषांतही कोठे पाहण्यांत नाहीं. आणि वाक्यमीमांसेची दृष्टि व व्याकरणाची दृष्टि कांहींशी भिन्न आहे. म्हणून मराठी वैयाकरणां विरुद्ध निकाल देणें प्राप्त आहे. आमच्या मतें नामास कोठेंच क्रियाविशेषणें म्हणणें प्रशस्त नाहीं, तर त्यांची जी विभक्ति असेल त्या ठिकाणचा विशिष्ट अर्थ सांगावा म्हणजे झालें. म्हणून वर आम्हीं क्रियाविशेषणाचीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं केवळ आजपर्यंतच्या रुढीस अनुसरून होत. वाक्यमीमांसेच्या दृष्टीनें त्यांत कांहीं गैर नाहीं. तथापि केवळ व्याकरणाच्या दृष्टीनें अशा शब्दांस क्रियाविशेषणें मानणें प्रशस्त नाहीं असे आमचें मत आहे. "

दामल्यांचीं हीं विधानें त्यांच्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें उलटसुलट असून, त्यांचा कोटिक्रम अगदीं बाष्कळ आहे. त्यांनीं उपस्थित केलेल्या प्रश्नास आपल्यास इष्ट असें म्हणजे ‘ हरकत नाहीं. ’ असें उत्तर त्यांनीं गृहीत धरलें आहे. आमच्या मते तशी हरकत आहे व ती कोणती तें आम्ही पुढें दाखविणार आहों. वाक्यमीमांसेच्या दृष्टीनें त्यांत गैर नाहीं व कोणत्याच व्याकरणांत सरसकट एकजात व्यवस्था केलेली पाहण्यांत नाहीं या त्यांनीं सांगितलेल्या दोन्ही गोष्टी पूर्ववैयाकरणांच्या बाजूच्या आहेत. मग त्याच पुढें करून, त्यांच्याविरुद्ध निकाल कसा देतां येईल ? बरें तो निकाल दिला तर अत्यंत न्यायनिष्ठुर रीतीनें त्यांनीं स्वतां अमलांत आणावयास हवा होता. पण पूर्ववैयाकरणांनीं क्रियाविशेषणें म्हणून मानलेलीं बरींच विभक्त्यंत नामेंही त्यांनीं क्रियाविशेषणे म्हणून स्वीकारली आहेत. मात्र रूढी म्हणून आपण स्वीकारली व्याकरण दृष्ट्या तें प्रशस्त नाहीं असें ते सांगतात. येथें ‘ रूढी ’ हा सामान्यलोकांच्या विचाराशी निगडत असलेला शब्द कसा वापरतां येतो ते समजत नाहीं. पूर्ववैयाकरणानीं त्यांच्या मते असलेल्या व्याकरणाच्या नियमाप्रमाणेंच तीं क्रियाविशेषणें मानलीं. तो नियम चुकीचा तर व दामले म्हणतात तेंच व्याकरणदृष्ट्या योग्य तर जुनें टाकून त्यांनीं नवेंच स्वीकारलें पाहिजे होतें. असो. आतां दामल्यांनीं उपस्थित केलेल्या वरील प्रश्नाचा म्हणजे नाम शब्द कोठें मानावयाचा व क्रियाविशेषण शब्द कोठें मानावयाचा, त्यासंबधीं विचार करूं. यासंबधीं पुढील वाक्यें पाहा. ‘ तो दिवसा जागतो व रात्रीं अभ्यास करतो ’ या वाक्यांत अधोरेखित दोन्हीं पदें क्रियाविशेषणें आहेत हें त्या दोन्ही पदांच्या अर्थावरून दिसून येतें. पण ‘ त्यावेळीं तो घरीं होता. ’ या वाक्यांत वेळ व घर ( जागा ) यांचा अर्थ निश्चित असल्यामुळें दोन्ही अधोरेखित पदें विभक्त्यंत नामेंच आहेत. यामुळें यासंबधीं अर्थ हेंच निर्णायक तत्त्व आहे ही गोष्ट लक्षांत येईल. आम्हीं आतां यासंबधीचा विचार प्राकृतेय या भागांत केला आहे. म्हणजे हीं क्रियाविशेषणें विभक्त्यंत नामें असून विभक्ति प्रत्ययासारख्या दिसणाऱ्या एक प्रकारच्या तद्धित प्रत्ययांपासून बनलेले स्वतंत्र असे क्रियाविशेषण शब्द आहेत असें ठरविलें आहे. अर्थात् ती कोणतीं तें वर सांगितल्याप्रमाणें अर्थावरून ठरवावयाचें.

क्रियाविशेषणें अविकारी कीं विकारी हा प्रश्न उपस्थित करून **दामल्यांनीं** केवळ विभक्ति विकाराच्या दृष्टीनेच त्याचा विचार केला. पण वचन व लिंग या दृष्टीनेंही यासबधीं विचार झाला पाहिजे ही गोष्ट **दामल्यांच्या** किंवा दुसऱ्या कोणत्याही मराठी वैयाकरणाच्या लक्षांत आलेली नाहीं. आम्ही या दोन्हीं गोष्टींचा विचार करून विकारी व अविकारी असें क्रियाविशेषणांचे दोन प्रकार केले आहेत. पहिल्या प्रकारास क्रिया-विशेषण व दुसऱ्या प्रकारास क्रियाविशेषण अव्यय असे म्हटले आहे. यासबधीं विवेचन आधींच झाल्यामुळें त्याची पुनरावृत्ति करण्याची जरूरी नाहीं येथें दुसरी एक सांगावयाची गोष्ट म्हणजे, 'बेटा,' 'पैं,' 'वहिला' इत्यादि निरर्थक उद्गारवाची शब्द 'वाक्यालकार्थक' असे नांव देऊन 'क्रियाविशेषणां'त घालीत. आम्हीं ते उद्गारवाची शब्द असल्यामुळें त्यांचा 'केवलप्रयोगी' शब्दांत समावेश केला आहे.]

## २ उभयान्वयी अव्यय.

५ उभयान्वयी अव्ययाचे अर्थावरून पडणारे प्रकार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत :—

| उभयान्वयी अव्यय | प्रकार | उदाहरणें |
|---|---|---|
| आणि | समुच्चयबोधक. | व, आणखी. |
| अथवा | विकल्पबोधक. | वा, अगर, किंवा. |
| पण. | न्यूनत्वबोधक. | परतु. |
| कारण. | कारणदर्शक. | म्हणून, तेव्हां इ. |
| जर-तर | सकेतदर्शक | म्हणजे, यद्यपि-तथापि. |
| कीं | स्वरूपदर्शक. | ते. |

[**दामले** म्हणतात "आजपर्यंतच्या वैयाकरणांनीं उभयान्वयी अव्ययांचे भेद सांगितले आहेत. **दादोबांनीं** आपल्या व्याकरणात वाक्यमीमांसेला बिलकुल स्थल दिलें नसल्यामुळें त्याच्या व्याकरणांत ही उणीव भासण्याचें कारण नाहीं. परतु वाक्य-मीमासेत व्याकरणाचा एक भाग मानून जे वैयाकरण भेद व उपभेद हा क्रम उभया-न्वयी अव्ययासबधी पाळीत नाहीत, त्यास तो नतर वाक्यमीमासेत सांगावाच लागतो. त्यापेक्षां तो प्रथमच सागितल्याने व्यवस्था व अभ्यास या दोहोंसही अधिक फायदेशीर होतो हें उघड आहे.' आम्हीं 'व्याकरण' व 'वाक्यमीमांसा' किंवा 'वाक्यपृथ-क्करण' हीं साफ निराळीं ठरविल्यामुळें आम्हांस **दामल्यांनीं** केलेले भेदोपभेद कर-ण्याचें कारण नाहीं, हें उघड आहे.]

**६ संयुक्त उभयान्वयी अव्ययें** :—कांहीं उभयान्वयी अव्ययें

सयुक्त शब्द असतात; अशांस संयुक्त उभयान्वयी अव्ययें असें म्हणावें. जसे :—जरकरतां, ज्याअर्थी इ०

## ३ केवलप्रयोगी अव्ययें.

७ केवलप्रयोगी अव्ययांचे वर्गीकरण ज्या निरनिराळ्या विकारांचे ती उद्गार असतात, त्यांवरून होतें. हे प्रकार पुढील तक्त्यांत दाखविले आहेत. :—

| केवलप्रयोगी | प्रकार | उदाहरणें |
|---|---|---|
| अहाहा | हर्षद्योतक | ओहो, वा |
| अरेरे. | शोकद्योतक | हाय, हाय हाय, हरहर इ |
| वारेवा. | प्रशसाद्योतक. | शाबास, भले, वाहवा, |
| पैं. | वाक्यालकारार्थक. | पा, वहिलें, परता, बेटा, बेटी, इ. |
| अरे बाप रे | आश्चर्यद्योतक | अबब, अरिच्चा, |
| छी | तिरस्कार. | थु, छुत, चल, भलतेंच |
| अरे-अगे-अगो. | सबोधन | बा, ए, गा, अगा |
| होय | स्वीकार | ठीक, बर, हां |
| उहू, उ. | विरोध | छट्, छे, अह |

[ **दामल्यांनीं** पूर्वी वाक्य अलकारार्थक क्रियाविशेषणें म्हणून पूर्वी सांगितलेली अव्ययें केवलप्रयोगींत घातलेलीं आहेत, हें चुकीचें आहे केवलप्रयोगीपैकीं कांहींना लिंगवचन असतें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे जसें :—अरे, अगे, अगो, अरे, अहो वाक्यालकारार्थक हीं मागे सांगितल्याप्रमाणें क्रियाविशेषणांतून काढून केवलप्रयोगींत घातली आहेत. कारण ते अचानक निघणारे उद्गार असून वाक्यातील दुसऱ्या कोणत्या शब्दांकडे त्यांचा सबध नसतो ]

## प्रकरण दुसरें.

# विकरण.

### उपोद्घात.

**१ विकार व विकरण** :—वस्तु व क्रियादर्शक प्रातिपदिकांत पदस्वरूप प्राप्त होतांना जे फेरफार होतात त्यांना **विकार** असें म्हणतात. आणि विकार होण्याचे जें कार्य त्याला **विकरण** असे नांव आहे.

[ मागील प्रकरणांत ' वर्गीकरणा ' संबधीं सांगितलें. या प्रकरणांत ' विकरणा ' सबधीं विचार होईल विकरण प्रत्ययाच्या अगर शब्दाच्या द्वारें होतें हें मागे सांगितलेंच आहे. ]

**२ विकारांचे प्रकार** :–विकारांचे दोन प्रकार आहेत—(१) वस्तुदर्शक प्रातिपदिक विकार व (२) क्रियादर्शक प्रातिपदिक विकार.

### १ वस्तुदर्शक प्रातिपदिक विकार.

**३ नाम, सर्वनाम, व विशेषण** :—या प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें वस्तुदर्शक प्रातिपदिकांस होणाऱ्या विकारांस **स्वतुदर्शक प्रातिपदिक विकार** असे म्हणतात. ह्यांचे ( १ ) लिंग, ( २ ) वचन व ( ३ ) विभक्ति असे तीन प्रकार आहेत.

**४ लिंगविकार** :—या विकाराच्या द्वारे वस्तुदर्शक प्रातिपदिकांपासून तद्दर्शक वस्तूच्या पुरुषत्वाचा किंवा स्त्रीत्वाचा निश्चित अथवा अनिश्चित बोध होतो त्या विकारास **लिंगविकार** असें म्हणतात.

[ सचेतन वस्तूसबधीं स्त्रीपुरुष, नरमादी, असे भेद निसर्गानेंच केले आहेत आणि प्रातिपदिकांच्या विशिष्ट विकारानें ते व्यक्त व्हावे हेंही साहजिक आहे. पण असा विकार बहुतेक भाषांत अचेतन वस्तुदर्शक प्रातिपदिकांसही झालेला दिसतो अर्थात् हा प्रकार लाक्षणिक रीतीनें होतो व मग ती लक्षणाच अभिधा होते. मूळ लक्षणा एका विशिष्ट परिस्थितींत होते व तिच्या कारणांचा कांहीं कालानें मागमूसुद्धा राहत नाहीं तेव्हां त्या सबधाची चर्चा बहुतांशीं काल्पनिक म्हणूनच करावयाची असली तर व्युत्पत्तिशास्त्रांत करावी. व्याकरणशास्त्राचा तिच्याशीं फारसा सबध नाहीं ही गोष्ट उघड आहे. व म्हणून पूर्व वैयाकरणांनीं व्याकरण व इतर शब्दशास्त्रांच्या भेदरेषा त्याकाळीं

स्पष्ट नसल्यामुळें त्यांच्या बाबतींत अशी चर्चा क्षम्य आहे. पण आम्हीं व्याकरणाची कक्षा निश्चित केली आहे व म्हणूनच ती चर्चा टाळली आहे. यासबंधी अत्युत्तम उपाय म्हणजे त्या त्या भाषेंतील कोशांत उच्चार व्युत्पत्ति यांप्रमाणें लिंग व अनेकवचनाचें रूपही द्यावें. व्याकरणांत एका विकाराची चर्चा ह्या दृष्टीनेंच लिंगवचनाची व्याप्ति मर्यादित असावी. ]

५ **लिंगप्रकार** :—१ पुल्लिंग, २ स्त्रीलिंग व ३ नपुंसकलिंग असे लिंगाचे तीन प्रकार आहेत.

६ **पुल्लिंग** :—ज्या लिंगविकारापासून वस्तूविषयीं पुरुषविषयक बोध होतो त्या लिंगविकारास **पुल्लिंग** असें म्हणतात.

७ **स्त्रीलिंग** :—ज्या लिंगविकारावरून वस्तूविषयीं स्त्रीविषयक बोध होतो, त्या लिंगविकारास **स्त्रीलिंग** असे म्हणतात.

८ **नपुंसकलिंग** :—ज्या लिंगविकारापासून वस्तूविषयी स्त्रीपुरुषत्वासंबंधींचा सामान्य व अनिश्चित असा बोध होतो त्या लिंगविकारास **नपुंसकलिंग** असें म्हणतात.

[ **दादोबांनीं** सामान्यलिंग असाही एक चौथा प्रकार कल्पिला आहे. व कांहीं व्याकरणकारांनीं त्यांना पाठिंबा दिला आहे पण नपुसक अशी प्रत्यक्षतः वस्तूच नाहीं. अनिश्चित व सामान्य अशा अर्थानेंच या प्रकाराची योजना होते तेंव्हा आणखी सामान्य लिंगाची आवश्यकता नाहीं, हे उघड आहे. कांहीं शब्द दोन्ही किंवा तिन्ही लिंगांत असतात. पण हे पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कोशांत दाखविलें म्हणजे झालें. व्याकरणांत त्याची दखलगिरी घेण्याची जरुरी नाहीं. कारण वाक्यांतील पदांत एका वेळीं एकच लिंग येतें व तेंही मागील किंवा पुढील सर्वनाम, विशेषण व क्रियापद या शब्दाच्या त्याच विकारावरून निश्चित होतें. ]

९ **वचनविकार** :—ज्या वस्तुदर्शक प्रातिपदिकांच्या विकारावरून वस्तूविषयीं एकत्वाचा किंवा अनेकत्वाचा बोध होतो, त्या विकारास **वचनविकार** असें म्हणतात.

[ वचनविकार लिंगविकारानतर होतो व त्यातच गुरफटलेला असतो. हे दोन्ही विकार मुळांत म्हणजे आदिम प्रत्ययांनीं होतात. चरम प्रत्ययांनीं होत नाहींत. त्याप्रमाणें त्यांतील पुष्कळशा शब्दांचे एकवचन व अनेकवचन सारखेंच असतें. तसेंच पदार्थवाचक, भाववाचक नामाचें अनेकवचन होत नाहीं. या अनेक कारणांनीं लिंग

व वचन हे जरी विभक्ति, काळ, अर्थ याप्रमाणें विकार होऊ शकत नाहींत, तरी कांहीं मर्यादित अर्थानें त्यांना विकार असें म्हणतां येईल. ]

१० **एकवचन** :—ज्या वचनविकाराच्या योगानें वस्तु एक आहे असा बोध होतो, त्यास **एकवचन** विकार असें म्हणतात.

[ एकवचन हें प्रातिपदिकाचें मूळचें रूप. अनेकवचन हा तद्धित प्रत्यय लागून झालेला विकार. ]

११ **अनेकवचन** :—ज्या वचनविकारानें वस्तु अनेक आहेत असा बोध होतो, त्याला **अनेकवचन** विकार असें म्हणतात. व्यक्ति एक असतांही बहुमानार्थी अनेकवचन हा विकार होतो.

[ खरें म्हटलें तर अनेकवचनांतच प्रत्यक्षतः विकार झालेला दिसतो. पण लिंग हें मूळरूप असूनही त्यासबधीं विकार या सज्ञेची योजना झाली, त्याचप्रमाणें एकवचन हें मूळरूप असूनही तो एक विकार मानला आहे. या दृष्टीनें पुढें विभक्तीच्या चर्चेच्या प्रसगानें विचार होईल. ]

१२ **विभक्ति** :—ज्या विकाराच्या योगानें वस्तुदर्शक प्रातिपदिकाचा प्रत्यय अगर शब्दयोगीच्या द्वारे दुसऱ्या क्रियादर्शक प्रातिपदिकाशी संबंध जोडण्यांत येतो त्या विकारास **विभक्तिविकार** असे म्हणतात. जे संबंध जोडले जातात त्यांना क्रियासंबंध किंवा **कारक** संबंध असे नांव आहे व ज्या प्रत्ययांनीं तो जोडला जातो त्यांना **विभक्ति प्रत्यय** असें म्हणतात.

[ **गुंजीकरांनीं** आपल्या विभक्तिविषयक निबधांत पूर्वव्याकरणकारांच्या मतांवर पुढील विचार प्रकट केले आहेत. " दादोबा म्हणतात, ' या भाषेंत विभक्तीविषयीं फार गोंधळ आहे. ' पण आमची अशी समजूत आहे कीं, हा गोंधळ या भाषेंत आहे असे नाहीं, तर या भाषेचे जे सध्यांचे व्याकरणग्रंथ आहेत त्यांत आहे. मराठी विभक्तींचा पाया बाल व्याकरणामध्ये सस्कृत विभक्तीवर रचिला होता, तो योग्य होता. कारण कीं सस्कृत व्याकरणामध्ये जशी विभक्तीसबधीं व्यवस्था आहे तशी उत्तम व्यवस्था दुसऱ्या कोणत्याही भाषेच्या व्याकरणांत नाही. अशी उघड स्थिति असतांना दादोबांनीं आणि इतरांनीही जरी आग्रहाने म्हटले, तरी ते म्हणणे प्रशस्त नव्हे, असें म्हणावें लागतें. दादोबा, चिपळूणकर, गोडबोले, जोशी यांच्या व्याकरणांमध्यें यासबधानें गोंधळ आहे, असें फार तर म्हणतां येईल. गगाधरशास्त्री फडके व बाळशास्त्री जांभेकर यांनीं प्रत्येक विभक्तीचे प्रत्यय निरनिराळे ठेविले होते. असे असतां विभक्ति

प्रत्ययांच्या व्यवस्थेचे खरें तत्त्व सोडून देऊन दादोबांनीं आणि त्यांच्यानंतर झालेल्या इतर वैयाकरणांनीं विभक्ति प्रकरणात नुसता गोधळ उपस्थित केला आहे, असें म्हणणें प्राप्त होते." पुढें **गुंजीकर** म्हणतात, "या विभक्ति प्रकरणाच्यासबधानें दादोबांपासून अलिकडच्या प्रत्येक वैयाकरणाने एकाहून एक अधिक चमत्कार केले आहेत. दादोबानीं चतुर्थीला द्वितीयेचेच प्रत्यय ठेवले चिपळूणकर यानीं षष्ठी विभक्ति काढून टाकली. गोडबोले यांनीं द्वितीया व षष्ठी या दोन विभक्ति काढून टाकल्या. जोशीबुवांनीं द्वितीया परत आणली इतकेंच नव्हे तर तिचे 'सप्रत्यय' व 'अप्रत्यय' द्वितीया असे दोन प्रकार केले."

**गुंजीकरा**दिकांच्या उपरिनिर्दिष्ट अभिप्रायाची बारकाईने चर्चा करणे आवश्यक आहे तत्पूर्वी **गुंजीकरांनीं** आपल्या निबधात उतरून घेतलेल्या या वैयाकरणाच्या विभक्तीच्या व्याख्या वाचकांसाठीं येथें देणें योग्य होईल 'नामाशीं आणि क्रियेशीं जो सबध तो कारक सबध. आणि हा सबध सुचविणारे जे प्रत्यय, तदन्त जे शब्द त्यांस विभक्ति म्हणतात' **दादोबा.** "क्रियेशीं किंवा क्रियावाचक शब्दाशीं नामाचा जो सबध त्यास कारक म्हणतात. आणि तो सबध दाखविणाऱ्या प्रत्ययास विभक्ति प्रत्यय म्हणतात नामांस विभक्ति प्रत्यय जोडून जी रूपे होतात त्यास विभक्ति किंवा विभक्त्यत म्हणतात." **गोडबोले.** "प्रातिपदिकाचा क्रियापदाशीं जो सबध असतो त्यास कारक म्हणतात. आणि तो सबध दाखविण्यासाठीं नामाचे जे रूप करतात त्यास विभक्ति असें म्हणतात" **जोशी** "नामास व सर्वनामांस जो विकार झाल्याने त्यांचा वाक्याच्या इतर शब्दाशीं असलेला सबध समजतो त्या विकाराच्या भिन्न भिन्न जातींस विभक्ति असे म्हणतात" **दामले.**

यासबधीं **गुंजीकरांचें** पुढीलप्रमाणे म्हणणें आहे. "परंतु विभक्तीचे हें असलें लक्षण मुळीं आणिलें कोणीकडून हें कांहीं कळत नाही इंग्रेजींतून घेतलें म्हणावें, तर इंग्रेजींतही असें लक्षण नाहीं सस्कृतांतून घेतले म्हणावे, तर तेथेंही असें नाहीं. क्रियेशीं नामाचा असणारा जो सबध तो दाखविणाऱ्या प्रत्ययानाच विभक्ति प्रत्यय ही सज्ञा करावी आणि कोणत्याही इतर प्रत्ययाला ती करू नये या विलक्षण शास्त्राला आधार काय ? कांहीं नाहीं." याला उत्तर असे आहे कीं, हें लक्षण पूर्वोक्त वैयाकरणांनीं इंग्रेजींतून मुख्यतः घेतले आहे. सस्कृतांतून विभक्तीची सख्या व सम प्रत्ययत्व एवढेच घेतले आहे. तसें म्हटलें तर **दादोबादिकांनीं** विभक्ति हा शब्द case शब्दाचा प्रतिशब्द म्हणून योजला आहे इंग्रेजींत षष्ठीशिवाय विभक्तींना प्रत्यय नाहींत. ज्या नामेनिटिव, ऑबजेक्टिव, डेटिव, जेनेटिव वगैरे विभक्ति आहेत त्या कर्ता, कर्म, संप्रदान व स्वामित्व ( possession ) हे सबध दाखवितात. अर्थात् case या शब्दाचा प्रतिशब्द विभक्ति तोही हे संबंध दाखविते, असें म्हणणें वावगें नाहीं. पण **दादोबांनीं** या सर्वच संबंधांना क्रियासबंध किंवा 'कारक' असें नांव दिलें तें योग्य नव्हतें.

कारण इंग्रजी जेनेटीवचा संबध कारक सबध नाहीं. त्याप्रमाणें मराठींतील षष्ठीचा सबधही कारक सबध नव्हे. **दादोबांच्या** लक्षांत पहिल्याने ही चूक आली नाहीं. पण **कृष्णशास्त्री चिपळूणकांनीं** त्यांच्या लक्षांत आणली. व षष्ठी विभक्तीच काढून टाकावी असे सुचविले. त्यांनीं हा जो पायंडा पाडला, त्याचा फायदा घेऊन **गोडबोल्यां**नीं चतुर्थीची हकालपट्टी केली! त्यांनीं या बाबतींत कारकासबधीं कारण दाखविले नाहीं. तर प्राकृत भाषेत चतुर्थीचा लोप झाला या व्युत्पत्ति-शास्त्राच्या आधारावर तसे केले आणि याला ते ऐतिहासिक कारण म्हणतात! सस्कृताची परपरा चालवावी म्हणून **दादोबां**नीं आठ विभक्ति केल्या मग आतां त्या परपरेविरुद्ध प्राकृताकडे सस्कृताभिमानी **गोडबोल्यां**नीं बोट कां दाखवावें? त्यांनीं तें तसे केले म्हणूनच त्यांच्या कृतीस **गुंजीकरां**नीं चमत्कारांत ढकलले आहे पण "जर सस्कृत व प्राकृत व्याकरणाचा मूळशाखा सबध नसता व तो सबंध ठेवणें इष्ट नसते तर चतुर्थीस केव्हाच काढून टाकून सबोधनासह सातच विभक्ति ठेवल्या असत्या" असे सागून **दादोबां**नीं त्याना पाठिंबाच दिला होता हे लक्षांत ठेवलें पाहिजे होते. हे ध्यानांत घेतलें तर **फडके** व **जांभेकरां**च्या सस्कृत पद्धतीस **दादोबा** अनुसरले नाहींत, हा **गुंजीकरां**नीं त्याना दिलेला ठपका बरोबर नाहीं, असे दिसून येईल. **जोश्यांनीं** आपले गुरु **कृष्णशास्त्री** याच्या मुर्वतीखातर सात विभक्ति मानल्या आहेत. त्यांनीं सप्रत्यय अप्रत्यय द्वितियेचें जे सव्यापसव्य केले आहे त्याचा विचार पुढें प्रथमा विभक्तीच्या चर्चेच्या प्रसगानें होईल. **गुंजीकरां**नीं **दादो-बां**च्या समप्रत्यय व्यवस्थेस हरकत घेतली आहे पण कोणतीच विभक्ति काढून टाकली नाहीं. त्यांनीं चतुर्थीसाठीं 'साठीं' हा प्रत्यय 'स्वार्थे'चा अपभ्रंश सुचविला. पण त्याचेंच अनुकरण करून 'याला आधार काय?' असा प्रश्न करून 'काहीं नाहीं' असे उत्तर दिलें, तर तें फारसे चुकलें असे म्हणतां येणार नाहीं **दामल्यां**नीं आपल्या तृतिय प्रकृतिक स्वभावास अनुसरून द्वितियेला गच्चू दिला आहे! अर्थात् द्वितियाच नाहींशी केल्यामुळें **जोशीबुवां**च्या 'सप्रत्ययअप्रत्ययत्व प्रकारास' अवसरच ठेवला नाह! **दामल्यां**नीं द्वितियेस बहिष्कार घालण्याचे जें कारण दिलें आहे ते शुद्ध अरेरावीचें व हातचलाखीचेही आहे. ते म्हणतात, "मराठींत द्वितिया ही अलग विभक्ति दिसत नाहीं तिचे कार्य अशतः चतुर्थीच्या प्रत्ययांनी होते, आणि बरेचसे प्रथमेने होते. सस्कृतातील द्वितियेच्या प्रत्ययांपासून आलेला मराठींत एकही विभक्ति प्रत्यय आला नाहीं, हे एक आणि अन्य विभक्तीपासून भिन्न असे कर्मार्थी प्रत्यय मराठींत आढळत नाहींत हें दुसरें. सस्कृतांत पुल्लिंगी नामाचे प्रथमा व द्वितिया ह्यांचें द्विवचनी अभिन्न रूप असतें. म्हणजे पुल्लिंगामध्यें त्या विभक्तीचे एक रूप **समान** असते स्त्रीलिंगामध्ये द्विवचन व बहुवचन हीं बहुधा समान असतात, आणि नपुसकलिंगी पहिल्या दोन विभक्तींचीं तिन्ही वचनी रूपें **समान** आढळतात. यामुळे द्वितियेचा प्रथमेंत **अंतर्धान** पावण्याचा प्रकार सस्कृतांतही सर्वत्र दिसून येतो. आणि पुल्लिंगामध्यें तो जरी कमी

आढळतो तरी नपुंसकलिंगामध्यें केवळ मराठीप्रमाणेंच द्वितियेचा प्रथमेत **लोप** झाला असें मानणें व्युत्पत्तिदृष्ट्या किंवा इतिहासदृष्ट्या गैर नाहीं हें उघड आहे."

व्युत्पत्तीचा व इतिहासाचा येथें कांहींच संबंध नाहीं. निवळ व्याकरणविषयक गोष्टींत अगदीं जरूर पडली तरच त्यांचा आधार घ्यावा. मात्र तो आधार निश्चित असला पाहिजे. हें आम्हीं सांगितलेच आहे. मराठी प्रत्यय कसे उत्पन्न झाले याविषयीं एकवाक्यता नाहीं. तेव्हां असला अनिश्चित आधार विभक्तीच्या लोपाला कसा घेतां येईल ? तेव्हां व्युत्पत्तीच्या आधाराची गोष्ट **दामल्यांनीं** बोलावयाचीच नव्हती. अन्य विभक्तीपासून भिन्न असे प्रत्यय मराठींत आढळत नाहींत म्हणून सांगणें म्हणजे **दादोबां**प्रमाणें मराठींत द्वितियेचे व चतुर्थीचे प्रत्यय समान ठेवले असे म्हणण्यासारखेच आहे. आणि हा **समान** शब्दच **दामल्यांनीं** संस्कृतांतील प्रथमा व द्वितिया विभक्तीच्या प्रत्ययांसंबधीं वापरला आहे. यांत व तृतीयेचें द्विवचन व चतुर्थीच्या द्विवचनांच्टा व अनेकवचनाच्या रूपांची भर घालून संस्कृतांतही समान प्रत्यय ठेवले आहेत. यांत कांहींच गैर केले नाहीं संस्कृतातील व्यवस्थाच पावली असें **गुंजीकरांस दामल्यांना** खडकावून सांगतां आले असते. पण पूर्वीच्या सर्वच व्याकरणकारांस चीत करून स्वमत स्थापनेच्या विजयाची ही संधि गमावण्यास **दामले** तयार नव्हते. म्हणूनच सफाईच्या हातचलाखीनें 'समान' याच्या जागीं प्रथम 'अन्तर्धान' व नंतर दोनदां 'लोप' हा शब्द वापरला आहे 'अन्तर्धान' व 'लोप' हे शब्द एकाच अर्थी असतील, पण 'समान' आणि अन्तर्धान किंवा 'लोप' हे एकाच अर्थाचे असू शकतील काय ? संस्कृतांत द्वितिया विभक्ति प्रथमेत अन्तर्धान किंवा लोप पावली आहे काय ? तसेंच द्वितिया प्रथमेंत अंतर्धान पावली असें म्हणण्याऐवजी समान प्रत्ययामुळें प्रथमा द्वितियेत अन्तर्धान पावली असें कां म्हणू नये ? संस्कृताला मराठीची साक्ष व मराठीस संस्कृताची साक्ष ही प्रत्यतर पद्धति कुठच्या तर्कशास्त्रात सांगितली आहे ? याचें उत्तर संस्कृतांत द्वितिया विभक्ति आहे तिचा लोप झाला नाहीं, म्हणून मराठींतही तिचा लोप मानू नये असेच येईल. इंग्रजीकडून कारक संबधाचा जो त्यांनीं आधार घेतला आहे तोही सम प्रत्ययाच्या बाबतीत उपयोगी पडण्यासारखा आहे कारणापासून कार्य समजावें हा सामान्य नियम. पण एकच कारण दिसते तेथे भिन्न भिन्न कार्यांपासून कारण निश्चित करतां येईल कारण हे कार्य होय. आणि द्वितियेचें कारक कार्य असते व चतुर्थीचें संप्रदान असते. तेव्हां 'गुरुजींनी रामास व्याकरण शिकविलें' या वाक्यात 'स' हा विभक्ति प्रत्यय द्वितिया व चतुर्थी समान असला तरी व्याकरणांत हे प्रथमान्त पद कर्म असल्याकारणाने 'रामास' हें पद चतुर्थ्यंत असें निश्चित झालें. कारण त्याचा कारक संबध संप्रदान होय. यावरून संप्रदान संबध व चतुर्थी विभक्ति हीं इंग्रजीत ज्यांना प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर्म असलेलीं क्रियापदे म्हणतात, तीं असलेल्या वाक्यांतच होतात, हें सांगावयास नको. आम्हीं व्याकरणासंबधीं संस्कृताकडे किंवा इंग्रेजीकडे, लक्ष न देतां मराठीच्या घटणेकडेच पाहण्याचा दंडक ठेवला आहे. त्याप्रमाणें सुरुवातीस प्रथमे-

संबधीं विचार करू. यासबधीं पहिली गोष्ट म्हणजे प्रथमेला प्रत्यय नाहींत ही होय. आणि विभक्ति प्रत्ययांवर अवलबून असते हें तत्व मान्य केल्यावर प्रत्यय नसेली ही तथाकथित प्रथमा मानूं नये असें म्हणणें ओघानेंच येतें. पण यासंबधीं दुसरी एक सबब पुढें येईल. ती ही–प्रथमेचे प्रत्यय आहेत, पण त्यांचा लोप झाला आहे. असा लोप सस्कृतांत होतो पण मराठींत प्रत्ययासबधीं आणखी एक महत्त्वाची गोष्ट ही कीं प्रत्यय असो किंवा त्याचा लोप होवो, तत्पूर्वी सामान्यरूप झालेंच पाहिजे म्हणजे प्रत्यय नाहीं व सामान्यरूप नाहीं तेथें विभक्तिविकार झाला असें म्हणतांच येणार नाहीं. सबोधन विभक्तींत 'रे' 'गे' 'गो' सारख्या प्रत्ययांचा लोप झाला, असे मानतां येईल. तथापी तेथे सामान्यरूप होतें. पण आजवर मानलेल्या प्रथमेस प्रत्ययही नाहीं व सामान्यरूपही नाहीं म्हणून ती विभक्तीच न मानणें प्राप्त आहे. षष्ठीसबधींचा निर्णय **कृष्णशास्त्र्यांनीं** आधींच दिला आहे. **जोश्यांनीं** तो मान्य करून सात विभक्ति मान्य केल्या. आमच्या मतें तो निर्णय बरोबर आहे. याचीं कारणे :–मराठींत षष्ठीचे प्रत्यय आदिम व तद्धित स्वरूपाचे आहेत त्यामुळें तीं विशेषणे होतात तसेंच सबधहा क्रियेशीं नसल्यामुळें त्याला कारक सबध असें म्हणतां येत नाहीं षष्ठीचे प्रत्यय लागल्यानतर विभक्ति प्रत्यय लागतात. तेव्हांही ही विभक्ति टाकल्याशिवाय गत्यतर नाही अर्थात् सामान्यरूप होणारे असे हे सयुक्त शब्द मानून त्यांचा प्राकृतेयांत आधींच विचार झाला आहे ]

**१३ विभक्तीचे प्रकार** :—( १ ) द्वितिया, ( २ ) तृतीया, ( ३ ) चतुर्थी, ( ४ ) पंचमी, ( ५ ) सप्तमी व ( ६ ) संबोधन असे विभक्तीचे सहा प्रकार आहेत.

[ यासबधीं विवेचन वर झालेंच. आतां प्रत्येक विभक्तीचा विचार करू ]

**१४ द्वितिया विभक्ती** :—ज्या विभक्तींत प्रातिपदिकास स, ला, ना, तें हे प्रत्यय व कांहीं शब्दयोगी लागतात व जिचें मुख्य कारक **कर्म** हें आहे, त्या विभक्तीस **द्वितिया** विभक्ति असे म्हणतात.

[ **जोश्यांनीं** द्वितियेचे सप्रत्यय द्वितिया व अप्रत्यय द्वितिया असे दोन प्रकार केले हे पूर्वी सांगितलेंच आहे यासबधीं **गुंजीकरांची** पुढीलप्रमाणें टीका आहे. " 'राम रावण मारितो' यांत **राम** ही प्रथमा व **रावण** ही अप्रत्यय द्वितिया. 'राम रावणास मारितो' यांत रावणास ही सप्रत्यय द्वितिया ! " त्यांनीं आणखी म्हटलें आहे. " सकर्मक क्रियापद असतां वाक्यात जो शब्द त्या क्रियापदाचे कर्म असतो. तो द्वितियांत असतो. उदा०:–'रामा काम करितो,' 'बाप मुलास पोशितो.' " यावरून पाहिले असतां सहज वाटेल कीं जो शब्द कर्मार्थी योजला असेल तो सप्रत्यय असो वा अप्रत्यय असो त्याला द्वितिया हीच संज्ञा द्यावी, असा जोशीबुवांचा सिद्धांत असेल. पण

तसेंही नाहीं. ' मी **गाई** बांधल्या, ' ' हरीनें **पत्रें** लिहिलीं ' ' त्याने **पुस्तक** रचिलें. ' यांत ' गाई ' ' पत्रें, ' ' पुस्तक ' हे शब्द प्रथमांत समजावे असें ते म्हणतात. याच्या स्पष्टीकरणार्थ त्यांनीं जो लेख लिहिला तोच उतरून घेऊ " कर्मणि प्रयोग असतां कर्म प्रथमांत असते व त्याच्याप्रमाणें क्रियापदाचें रूप फिरतें, म्हणून त्यास क्रियापदाचा कर्ता असें म्हणतात. ( प्रश्न :–कोण म्हणतात ? ) परतु त्यापासून **क्रियाकर्तृत्वाचा** बोध होत नाहीं " ( !!! ) या वाक्याचा अर्थ पुन्हा स्पष्ट करण्याकरितां यान्याखालीं जोशीबुवांनीं टीका लिहिली नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट समजावयाची कारण कीं हें टीकेचें काम इतरांच्या हातून साध्य होण्याची कोणत्याही प्रकारें अगदीं आशा नाहीं. तथापि यांतील सारांश असा दिसतो कीं अप्रत्यय शब्द कर्तृस्थानीं असतां त्याला प्रथमा हें नाव द्यावें. इतकेंच नव्हें तर तेथे त्या कर्माला कर्ता हें नांव द्यावें ' " जोशीबुवांनीं पुढें ' कर्माला कर्ता म्हणावे ' हा नियम मागें घेतला, पण अप्रत्यय द्वितियेचें त्यांनीं उभारलेलें पाखड तसेंच राहिलें व अगदीं अलिकडील एका व्याकरण कमिटीनें त्याला शालेय व्याकरणांत कायमचे स्थान देण्याचा फतवा काढला म्हणून प्रथमा ही विभक्तीच नाहीं व द्वितियेचे स, ला, ना, ते हे प्रत्यय व कर्म हे कारक ज्या विभक्तींत असतात ती द्वितिया असे द्वितियेचें निश्चित लक्षण केलें आहे अर्थात् प्रथमेचा व द्वितियेचा वाद आतां राहिला नाहीं ]

१५ **तृतीया विभक्ति** : —ज्या विभक्तीत प्रातिपदिकास एकवचनीं **ने, एं, ईं, शीं,** व अनेकवचनीं **नीं, हीं, ईं, शीं** असे प्रत्यय व कांही शब्दयोगी लागतात व तिचीं **कर्तृकारक** व **करणकारक** हीं कारकें आहेत. त्या विभक्तीस तृतीया विभक्ति असे म्हणावे.

[ तृतीया विभक्तींत सस्कृताप्रमाणें कधीं कधीं प्रत्ययानतर शब्दयोगी लागतात. जसें –तेणेंकरून, तेणेपाडें इ ]

१६ **चतुर्थी विभक्ति** :—ज्या विभक्तीत प्रातिपदिकास एकवचन व अनेकवचनी **स, ला, ना, तें** हे प्रत्यय व कांहीं शब्दयोगी अव्ययें लागतात व **संप्रदान** हें कारक आहे त्या विभक्तीस **चतुर्थी** विभक्ति असें म्हणतात.

[ याप्रमाणें द्वितया व चतुर्थी या समप्रत्यय विभक्ति कशा ओळखाव्या ते ठरलें.]

१७ **पंचमी विभक्ति** :—ज्या विभक्तींत प्रातिपदिकास **हून** हा प्रत्यय व कांहीं शब्दयोगी अव्ययें लागतात व **अपादान** हें कारक असतें त्या विभक्तीस पंचमी विभक्ति म्हणतात.

**१८ सप्तमी विभक्ति :**—ज्या विभक्तींत प्रातिपदिकास एकवचनी **त, ई, आं** हे प्रत्यय व कांहीं शब्दयोगी अव्ययें लागतात व जींत **अधिकरण** हें कारक आहे, त्या विभक्तीस **सप्तमी** असें म्हणतात.

**१९ संबोधन विभक्ति :**—ज्या विभक्तींत प्रातिपदिकास एकवचनी **रे** ( लुप्त ) व अनेकवचनी **नों** असे प्रत्यय लागतात व जिचा संबोधनासाठीं म्हणजे हांक मारण्यासाठी उपयोग होतो व जींत प्रातिपदिकाचा पद म्हणून वाक्यातील इतर कोणत्याही पदाशी संबंध येत नाही; त्या विभक्तीस **संबोधन** विभक्ति असे म्हणतात.

[ प्रत्ययापूर्वी सामान्यरूप होते तेव्हां या विभक्तीच्या एकवचनापुढे कोणतातरी प्रत्यय असला पाहिजे व तो लुप्त असला पाहिजे हें उघड आहे रे हा तो प्रत्यय होय. या लुप्त प्रत्ययाऐवजीं मागें **अरे** हे केवलप्रयोगी वाक्यांत योजतात, तेव्हां सबोधनास सबोधनकारक असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. प्रत्येक विभक्तीस कारक असावें असें आता ठरलेंच आहे

**दामल्यांची** विभक्तीची व्याख्या पूर्वी दिली आहे ती व्याख्या आमच्या व्याख्येशीं जुळते लिग, वचन व विभक्ति हें विकार आहेत हे त्यांनीं प्रथमच सांगितलें पण पुढे काळ, अर्थ हे असेच क्रियापदाचे विकार न मानतां 'आख्यात' ही सज्ञा क्रियापदासबधीं योजली व त्याचेही लाख्यात, ताख्यात असे प्रकार केले! सारांश 'विकार' ही सज्ञा योजूनही त्यापासून त्यांनीं व्याख्या करण्याच्या दृष्टीने काहींच साधले नाहीं. विभक्तीच्या व्याख्येंत 'जे विकार त्याना विभक्ति' असे म्हटले आहे म्हणजे 'विभक्ति' हा एकच विकार अशी व्याख्या न करता तिचे प्रकार धरून व्याख्या केली आहे. लिग व वचन यासबधीं मात्र त्यांची स्वतत्र विकार म्हणून व्याख्या असून नतर एकाचे ( लिगाचे ) तीन व दुसऱ्याचे ( वचनाचे ) दोन असे प्रकार केले आहेत. त्याचप्रमाणे विभक्ति हा एक विकार आहे. व त्याचे सहा प्रकार आहेत अशारीतीनें विवेचन केले असते तर ते अधिक शास्त्रीय होऊन त्यांची व्याख्याही अधिक बिनचुक झाली असती 'सबधा'च्या बाबतींत त्यांच्या व्याख्येंत कशी चूक झाली आहे तें वर दाखविलेच आहे. **दामल्यांनीं** 'विभक्ति प्रत्ययांवरून कीं कारकावरून' असा जो कित्येक व्याकरणकारांनीं प्रश्न उपस्थित केला आहे, त्यावर चर्चाही केली आहे. ते म्हणतात, " एवच विभक्ति प्रत्ययांवरून मानाव्या कीं, अर्थावरून ( सबधावरून ? ) मानाव्या हा प्रश्न जो विचारतो, तो एकदरींत शास्त्राचे साधारण स्वरूप व व्याकरण विवेचनाची शास्त्रीय पद्धति या गोष्टीबद्दलच्या आपल्या शोचनीय अज्ञानाचें जणु कांहीं हास्यास्पद प्रदर्शन करतो हें निर्विवाद आहे. **सारांश विभक्ति या प्रत्ययांवरूनच मानल्या पाहिजेत.**

म्हणून **दादोबांचा** द्वितेया व चतुर्थी यांमधील भेद आणि **जोशी व खेर** यांचा तोच भेद, व सप्रत्यय द्वितिया व अप्रत्यय द्वितिया हा नवीन भेद हे केवळ अशास्त्र व शिवाय घोटाळा उत्पन्न करणारे असल्यामुळें सर्वथा अग्राह्य होत हें उघड आहे. मूळ संस्कृत भाषेंत अशाच प्रत्ययांवरून विभक्ति मानिल्या आहेत. आणि विभक्ति म्हणजे वाक्यांमध्यें शब्दांचा परस्परसबध दाखविणारीं नामाचीं भिन्नभिन्न रूपें हें **विभक्ति या शब्दाच्या धात्वर्थावरूनही समजण्यासारखें** आहे. आतां संस्कृतामध्यें भिन्न भिन्न प्रत्यय सर्वत्र दृष्टीस पडतात असें नाहीं. तसें असणे ही विभक्तीच्या व्यवस्थेची पूर्णावस्था होय. तथापि एका नपुसकलिंगांतील प्रथमा व द्वितिया या विभक्तीशिवाय दुसऱ्या कोठेही कोणत्याही दोन विभक्तींचे तिन्हीवचनी एकच प्रत्यय दिसून येत नाहींत कांहीं ठिकाणीं एकएक दोनदोन विभक्तींचे प्रत्यय समान आहेत. परतु तितक्या अशाने संस्कृत व्याकरणातील विभक्तीची व्यवस्था अपूर्ण होय असें म्हटल्यावांचून गत्यतर नाहीं ( ! ) परतु या अशतः न्यूनत्वाच्या आधारावर प्रत्यय भिन्नत्वाच्या अत्यत्वाभावीं प्रथमा व द्वितिया आणि द्वितिया व चतुर्थी या फरकाची उभारणी करणे सूज्ञपणाचे ( ! ) नाहीं. एवच मराठींतही प्रत्ययभिन्नत्व हेच विभक्तिभिन्नत्वाचें मूलचिन्ह समजले पाहिजे आजपर्यंतच्या मराठी वैयाकरणांनीं केल्याप्रमाणे कारकभिन्नत्व हे विभक्तिभिन्नत्वाचें लक्षण होऊ शकत नाही तसे झाल्यावर एक तर ज्या भाषांत षष्ठी विशेषणात्मक नाहीं त्या भाषातही तिला विभक्ति म्हणता यावयाचे नाहीं आणि दुसरें कारकांच्या स्पष्टीकरणास विभक्ति ज्ञानाची मदत घ्यावयाची असते. तसे न करतां, उलट विभक्तीचे ज्ञानासच कारकाच्या ज्ञानाची जर अपेक्षा लागू लागली, म्हणजे कारकज्ञान विभक्तींशिवाय होऊ लागले, तर विभक्तीच्या ज्ञानाचे प्रयोजनच उरले नाहीं म्हणावयाचे "

या उताऱ्यात **दामल्यांचें** विभक्तीचे तत्त्वाज्ञान थोडक्यात पण पूर्णपणे आले आहे हे तत्वज्ञान त्यांनी सर्वांशीं **गुंजीकरां**कडून घेतले आहे. हेंही **गुंजीकराच्या** पूर्वी दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल. मात्र त्यांमधील बेछूटपणा, तर्कदुष्टता, हेत्वाभासपूर्ण विचारसरणी हीं **दामल्यांची** स्वतचीं आहेत वरील उताऱ्यातील प्रत्येक विधान सप्रत्यय अप्रत्यय द्वितियेशिवाय कसे चुकीचे व भ्रममूलक आहे हें आम्हीं पूर्वी दाखविलेच आहे तथापि त्याची वाक्यश छाननी करून या विभक्तीच्या प्रकरणाची फेरतपासणी करणे योग्य होईल **दामल्यांनीं** सुरुवातच कशी अरेरावीपणाची केली आहे ती पाहा ते म्हणतात कीं, विभक्ति प्रत्ययावरून की कारकावरून ठरवावयाच्या हा प्रश्नच उपस्थित करणें म्हणजे एकदरींत शास्त्राचे सामान्यस्वरूप व व्याकरणविवेचनाची सामान्य पद्धति यासबधी शोचनीय अज्ञान प्रकट करणे ! असें कां ? **गुंजीकर** व **दामले** प्रत्ययवादी आहेत व पूर्वीचे सर्व व्याकरणकार कारकवादी आहेत अशा आत्यतिक विवादप्रसगात कोण्या आधुनिक शकितानें अर्जुनाप्रमाणें ‘ तदेक वद निश्चित्य ’ अशा स्वरूपाचा प्रश्न विचारला तर त्याच्या मस्तकावर कायदेआझम **दामल्यांचा राजवाडी** वरवटा कां पडावा ? तसेंच प्रथमेंत मुळींच प्रत्यय

नसतां संबोधनाच्या एकवचनांत प्रत्ययाचा लोप व द्वितिया व चतुर्थीचें समप्रत्ययत्व त्यामुळें त्यापैकीं एक विभक्तीच नष्ट होण्याची आपत्ति-अर्थात् त्यांच्या मताप्रमाणें-एवढ्या गोष्टी विरुद्ध असून, बेगुमानपणें त्यांनीं प्रत्ययांच्या बाजूनें जो फतवा दिला आहे त्याला ते कोणत्या शास्त्रीयपद्धतीचा आधार दाखवतील? या दृष्टीनें कारकसंबंधाचा विचार करतां षष्ठीचा संबंध कारकसंबंध नाहीं एवढीच अडचण असतां व स्वतः आपल्या व्याख्येत 'कारक' अशी संज्ञा न योजतां साधारणपणें 'संबंध' हा शब्द योजून या अडचणीचें निराकरण केले असतां विभक्ति कारकावर मुळींच अवलंबून नाहीं हा निर्णय कोणत्या विकटोशास्त्राच्या आधारावर त्यानीं दिला?

भिन्नभिन्न विभक्तीस भिन्नभिन्न प्रत्यय असणें ही विभक्तिव्यवस्थेची पूर्णावस्था होय व जितक्या अंशांत हे तत्व संस्कृत विभक्तिव्यवस्थेत अमलांत आलें नाहीं तितक्या अंशानीं संस्कृत विभक्तिव्यवस्था अपूर्णच समजली पाहिजे हें विधानही विचित्र व **गुंजीकरांचें** अनुकरण करून हटातटाने स्थापलेल्या सिद्धांताच्या अगदीं उलट आहे. वैयाकरणानी सामान्यतः प्रयोगाला शरण गेलें पाहिजे तेव्हां भाषेंत ज्या विभक्तीचे व ज्या अर्थानें जे प्रत्यय प्रचलित आहेत ते जसेच्या तसे स्वीकारल्याशिवाय व्याकरणकारास गत्यंतरच नाहीं. तेव्हां समप्रत्ययत्व ही कांहीं व्याकरणकाराच्या हातची गोष्ट नाहीं. तसेच पांच हजार वर्षांच्या कालांतील अनेक पोटभाषांच्या संघर्षानें विकास पावणाऱ्या भाषेची सातशे वर्षांत विकास पावलेल्या भाषेच्या एका विशिष्ट बाबतींत तुलना करणें हें हास्यास्पद होय. खरें म्हटलें तर आठ ही विभक्तींची संख्या ही संस्कृत विभक्तिव्यवस्था. समप्रत्ययत्व अगर विषमप्रत्ययत्व ह्या त्या त्या भाषेच्या आगंतुक गोष्टी होत. संख्येच्या बाबतींत **दादोबांनी** स्वतःला घोटाळा वाटला तरी केवळ संस्कृतव्यवस्थेचा बोज राखावा म्हणून आठ ही संख्या मराठींत मुक्रर केली. **गुंजीकरांनीं** समप्रत्ययत्व व्यवस्थेला सदोष ठरविलें तरी तो दोष जावा, पण संख्या कायम राहावी म्हणून 'साठीं' हा चतुर्थीसाठीं प्रत्यय सुचविला पण **दामल्यांनीं** 'समान', 'अन्तर्धान', लोप अशी धूळफेक करून केवळ आगंतुक स्वरूपाचा म्हणून जो दोषच नव्हे तें समप्रत्ययत्व टाकलें, पण द्वितियेचा विच्छेद करून संस्कृत व्यवस्थेचा एक अष्टमांश भाग कापून काढला! आणि वर शास्त्रीयत्वाचा टेंभा आहेच! **दामल्यांच्या** शेवटच्या कोटिक्रमासंबंधीं आम्हीं एवढेंच सांगतो कीं, विभक्तिप्रत्यय हेच निरनिराळ्या विभक्ति दर्शविण्याचें साधन असल्यामुळें त्यांना मुख्यत्वें प्राधान्य यावें हें साहजिकच आहे पण समप्रत्ययत्वाच्या अडचणींच्या प्रसंगीं कारकाची मदत घेतली तर त्या प्राधान्यास मोठीशी बाधा येते असेंही नाहीं. तसें केले तर विभक्तींचे मुळीं प्रयोजन नाही. असा त्रागा करण्याचें कारण नाहीं.

**दामल्यांनीं** आपलें विभक्तिविषयक मत **गुंजीकरां**पासून घेतलें आहे, हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां **गुंजीकरांच्याच** विवेचनाची जरा संक्षेपानें छाननी करणें जरूर आहे. **गुंजीकरांचें** पहिलें विधान हें कीं, **दादोबादि** व्याकरणकारांचें विभक्तीचें लक्षण संस्कृताप्रमाणेही नाहीं व इंग्रजीप्रमाणेंही नाहीं. ते संस्कृताप्रमाणें नाहीं ही गोष्ट

खरी आहे. पण इंग्रजीविषयींचें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. पूर्ववैयाकरणांनीं आपली विभक्तीची व्याख्या इंग्रजीवरून घेतली आहे. किंबहुना 'विभक्ति' हा 'केस' ह्या इंग्रेजी शब्दास मराठींत प्रतिशब्द म्हणून योजला हें आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे. **दादोबादिकांनीं** आपलीं व्याकरणें **मरे, हॉवर्ड** वगैरे व्याकरणकारांच्या ग्रंथांच्या आधाराने लिहिलीं व त्यासाठीं पारिभाषिक शब्द जरी संस्कृतांतून घेतले, तरी ते इंग्रजींतील कांहीं विशिष्ट संज्ञांस प्रतिसंज्ञा म्हणून घेतले. उद०—विभक्ति म्हणजे "केस", काळ म्हणजे 'टेन्स', अर्थ म्हणजे 'परपज' यांपैकीं काळ व अर्थ या संज्ञा संस्कृतांत नाहींत व विभक्ति ही संज्ञाही अगदीं निराळ्या अर्थानें आहे. यासंबधाने **गुंजीकर** स्वत च काय म्हणतात तें पाहा. "प्रत्ययामध्ये दोन जाती आहेत. एका जातीचे प्रत्यय असे आहेत कीं ते प्रकृतीला लागून एकदां कांहीं रूप सिद्ध झालें म्हणजे त्या शब्दाची वाढ खुटते. पण दुसऱ्या जातीच्या शब्दांचें तसें नाहीं, त्यांच्या योगानें प्रत्ययान्त प्रातिपदिकें किंवा प्रत्ययान्त धातू उत्पन्न होतात आणि त्यांच्यापुढें पुनः प्रत्यय लागू शकतात. पहिल्या जातीचे म्हणजे शब्दाची वाढ खुटविणारे जे प्रत्यय त्याना विभक्तिप्रत्यय अशी संज्ञा आहे. विभक्तिप्रत्यय लागून जे शब्द सिद्ध होतात, त्यांना 'पद' ही संज्ञा आहे. धातूपुढें लागणारे जे विभक्तिप्रत्यय त्यांना आख्यात प्रत्यय अशी वेगळी संज्ञाही आहे." येथें विभक्तिपेक्षां विभक्तिप्रत्ययांविषयींच सांगितलें आहे व तेंही विभक्तिप्रत्यय हे चरम् प्रत्यय आहेत एवढेंच. मात्र यापासून विभक्तीची व्याख्या पुढीलप्रमाणे करतां येईल. "जिच्या योगानें शब्दाचें पद होतें ती विभक्ति आणि ज्या प्रत्ययानीं तें बनते ते प्रत्यय विभक्तिप्रत्यय." पण हें लक्षण मराठींत विभक्तीला लागूच पडत नाहीं आधीं पूर्वीं मानलेल्या आठ प्रातिपादिकांपैकीं चारांत पद होण्यास प्रत्ययांची आवश्यकता नाहीं. दुसरी गोष्ट संस्कृतांत सर्व जातींच्या शब्दांस विभक्तीप्रत्यय लागतात. पण मराठींत ते नाम किंवा नामाप्रमाणें उपयोग केलेल्या शब्दास म्हणजे फार तर तीन जातींच्या शब्दांस लागतात तसेंच संस्कृतांत विभक्ति ही सामान्य संज्ञा आहे. व तिच्याच एका प्रकारास म्हणजे धातूना विभक्तिप्रत्यय लावतांना आख्यात हें नांव दिलें आहे. पण **गुंजीकर** व **दामले** या दोघांनीं नाम किंवा नामाप्रमाणें उपयोग होणाऱ्या शब्दासबधीं विभक्ति व क्रियापदासबधीं आख्यात अशा स्पष्ट वेगळ्या संज्ञा योजल्या आहेत. त्यास अर्थात् संस्कृताचा आधार नाहीं व इंग्रेजीचा तर मुळींच नाहीं. सारांश **दादोबांवर** घोटाळा केल्याचा आरोप करणाऱ्या **गुंजीकर, दामल्यांनीं** हा भलताच घोटाळा उत्पन्न केला आहे! यासंबधीं पुढें अधिक चर्चा होईल सध्यां विभक्ति प्रत्ययावर अवलबून कीं कारकावर या प्रश्नाचें उत्तर भगवतानीं अर्जुनास दिलेल्या उत्तराप्रमाणें, 'श्रेयस्करौ उभौ" म्हणजे विभक्ति दोहोंवरही अवलबून आहे असेंच दिलें पाहिजे. सारांश विभक्ति हा विकार आहे. तो विकार नामाचा क्रियापदाशीं सबध दाखविण्यासाठीं होतो म्हणून कारकांनाही महत्त्व आहे. पण विकाररूपे प्रत्ययांच्या द्वारें होतात. व विभक्ति-

प्रकारही प्रत्ययांमुळें होतात. म्हणून विभक्ति ओळखण्याच्या कामीं प्रत्ययांचें महत्त्व अधिक आहे द्वितियेचे व चतुर्थीचे प्रत्यय एक अशावेळीं या विभक्ति ओळखण्यास कारक उपयोगी पडतें. पण त्यामुळें ओळखण्याच्या कामीं विभक्तीप्रत्ययच अधिक महत्त्वाचे आहेत या म्हणण्यास बाध येत नाहीं आम्ही विभक्तिसख्या **सहा** हीच निश्चित केली आहे, प्रथमेस प्रत्यय नाहींत व सामान्यरूप नसल्यामुळे प्रत्ययलोपही कल्पितां येत नाहीं तेव्हां ती विभक्ति गेली **कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं** षष्ठीचे प्रत्यय आदिम तद्धित, शिवाय संबध नामाशीं असल्यामुळें येथे कारक सबध सभवत नाहीं अशी कारणें देऊन षष्ठी विभक्ति काढून टाकली आम्हांसही हा त्यांचा निकाल मान्य आहे. नावें मात्र पूर्वींचीच कायम ठेवलीं आहेत. तृतीयेस कर्तृकारक व करणकारक अशीं दोन कारकें ठेवून बाकीच्या प्रत्येक विभक्तीस एकच कारक ठेवले आहे याप्रमाणें आम्ही विभक्तीची सामान्य व्याख्या करून प्रत्येक विभक्तीची निराळी व्याख्या केली आहे येथें ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे पूर्वव्याकरणकारांप्रमाणे इंग्रजी पद्धतिनुसार आम्ही लिंग, वचन, विभक्ति, काळ, अर्थ हे विकार मानले आहेत ]

## २ क्रियादर्शक प्रातिपदिक विकार.

२२ क्रियादर्शक प्रातिपदिकांत ( १ ) काळ, ( २ ) अर्थ, ( ३ ) लिंग, ( ४ ) वचन व ( ५ ) पुरुष असे प्रत्ययांच्या अगर शब्दांच्या द्वारें पांच विकार होतात.

[ यांपैकीं काळ व अर्थ हेच विकार मुख्य असून इतर विकार पोटविकार होत. म्हणजे विभक्तींच्या पोटांतच जसे लिंग व वचन हे विकार आहेत त्याचप्रमाणे काळ व अर्थ यांच्या पोटांतच पुरुष, लिंग, वचन हे विकार होतात. क्रियादर्शक प्रातिपदिकें क्रियापद व क्रियाविशेषण अशीं दोनच आहेत. त्यांपैकीं क्रियापदासच काळ व अर्थ म्हणजे सर्वच विकार होतात. लिंग व वचन या विकारांसबधींसुद्धां नाम व क्रियापद यांच्या दृष्टीनें एक महत्त्वाचा फरक आहे. नाम वस्तू दाखवते त्या वस्तूंत लिंग वास्तविक किंवा कल्पित असलें तरी मूलभूत व प्रत्यक्ष अशा स्वरूपाचें असतें. क्रियापद क्रिया दाखवते पण त्या क्रियेंत लिंग, वचन ही मूलभूत नसतात, वस्तू सबधानें म्हणजेच नामासबधाने अप्रत्यक्ष व आगंतुक रीतीनें येतात लिंग हा विकार तर क्रियापदांत सस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांत नाहीं म्हणूनच क्रियापदाच्या विकारांत काळ, अर्थ, लिंग, वचन, पुरुष असा क्रम योजला आहे पुरुष हा विकारही क्रियापदास बोलणारी व्यक्ति या दृष्टीने येतो अर्थात् तो वस्तूपासून म्हणजे नामापासून अप्रत्यक्षतः येतो. ]

२३ **काळविकार** :—क्रियापदाच्या ज्या विकारापासून सध्यां मागें, पुढें असा काळाच्या संबंधाचा बोध होतो व जो विकार प्रत्ययांच्या किंवा शब्दाच्या द्वारें होतो त्या विकारास **काळविकार** असे म्हणतात.

[ **दामल्यांनीं** आपल्या प्रकरणास 'विकरण' हें नाव देऊन लिंग, वचन, विभक्ति हेच म्हणजे नामाचे तेवढे विकार असें सांगितले. पण पुढें काळ व अर्थ यांना विकार न मानतां प्रत्ययावरच भिस्त ठेवून आख्यात व आख्यातार्थ असा एक भलताच घोटाळा उत्पन्न केला आहे. यासबधीं अखेरीस आम्हीं अधिक विस्तारानें चर्चा करणार आहों. तूर्त व्याकरणशास्त्रास गुंडाळून ठेवून **दामल्यांनीं** काळाविषयीं एकाद्या पट्टीच्या हरदासालाही लाजविणारें वेदान्ती तत्त्वज्ञान पाघळलें आहे, त्याचे पुढील मासले पहा. 'काळ म्हणजे वेळ हें सर्वांनाच माहित आहे. काळ अनादि व अनत आहे. आणि त्याचा प्रवाह अप्रतिहत चालला आहे. त्याचे भाग पाडणे शक्य नाहीं. तथापि वक्त्याचे किंवा लेखकाच्या दृष्टीनें काळाचे तीन भाग कल्पितां येतात ज्या वेळीं वक्ता बोलत असतो किंवा लेखक लिहीत असतो तो वर्तमानकाळ, त्याच्या पूर्वीचा तो भूतकाळ आणि त्याचेनतरचा तो भविष्यकाळ म्हणजे वर्तमान, भूत आणि भविष्य हे काळाचे भाग वक्त्याचे किंवा लेखकाचे दृष्टीनें कल्पिले म्हणजे सापेक्ष आहेत हें उघड आहे तसेंच भूत व भविष्यकाळ हे दोन्ही बाजूनीं मर्यादित नसून केवळ एकाच बाजूने समर्याद आहेत. आता वर्तमानकाळ हा जरी दोन बाजूनीं मर्यादित आहे, तरी त्याच्या मागीलपुढील मर्यादा अगदीं ठरलेल्या नाहींत. तर त्या केवळ वक्त्याच्या व लेखकाच्या त्या त्या वेळच्या लहरीवर अवलबून आहे एका निमिषापासून किंवा एका निमिषार्धापासून तो पळ, घटिका, मुहूर्त, प्रहर, दिवस, पक्ष, महिना, वर्षशतक, युग, मन्वतर किंवा कल्प याच्या लाबीइतकी वर्तमान काळाची लाबी वक्त्याच्या किंवा लेखकाच्या लहरीप्रमाणें आणि दृष्टीप्रमाणे लाबू शकते हें विसरतां कामा नये.'

**दामल्यांच्या** चर्पटपजरीचा मुळांतून एक तृतीयांश भाग येथे उतरून घेतला आहे. तेवढ्यातच **दामल्यांनीं** जीं विलक्षण विधाने केलीं आहेत ती एकाद्या सामान्य तारतम्य बुद्धीच्या माणसानें केलीं असतीं, तरीसुद्धा तो शुद्धीवर असून हीं विधानें करतो आहे कीं काय असें त्याला कोणीही हटकले असते. पण ज्याच्या त्याच्या पुढे आपली शास्त्रीयत्वाची व तर्ककुशलतेची मशाल पाजळणाऱ्या **दामल्यांस** काय म्हणावें तें कळत नाहीं. काळाचे भाग पाडणें शक्य नाहीं, तर त्याचे तीन भाग पाडणें शक्य कसे ? आणि **दामल्यांनीं** निमिषार्धापासून कल्पापर्यंत असख्य भाग जे सांगितले ते काळाचे भाग नव्हेत काय ? आणि येथें बोलणाऱ्यांचा सबध काय ? त्याच्या निरपेक्ष काळाचा उल्लेखच होत नाहीं काय ? "पधरा मिनिटें थांबा" यांतील काळाच्या उल्लेखाचा बोलणारांशीं किंवा लिहिणारांशीं अर्थाअर्थी कोणता सबध आहे ? पण **दामले** म्हणतील आम्हीं व्याकरणाविषयीं बोलत आहों. आतां ठीक आहे पण काळ अनादि आहे. त्याचा प्रवाह अप्रतिहत आहे. यात काळाचा उल्लेख कोणत्या अर्थानें केला आहे ? येथें **दामल्यांच्या** लक्षांत काळ म्हणजे वेळ नव्हे तर काळविषयक सबध किंवा अर्थ आहे पण त्याही दृष्टीनें पाहिलें तरी बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्या व्यक्तीच्या लहरीशीं काळाचा सबध येत नाहीं. समजा एखादा वक्ता किंवा लेखक **शिवाजीच्या**

जन्माविषयीं बोलत आहे तर तो शिवाजी इ. स. १६३० त **जन्मला** असें भूतकाळाचें रूपच बोलेल किंवा लिहील तो ज्या काळांत बोलतो किंवा लिहितो तो वर्तमान ( **जन्मतो** ) किंवा **दामल्यांच्या** मताप्रमाणे क्षणांत येणारा भविष्य ( **जन्मेल** ) अशीं रूपें केवळ लहरीखातर त्याला करतां येणार नाहींत तसेंच 'मी आठ दिवसानीं येईन असे सांगून तो निघून गेला' असें बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्या व्यक्तीस, तो तें वर्तमान काळांत बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्याला त्या वाक्यांतील भविष्यकाळचें किंवा भूतकाळचे रूप बदलून वर्तमानकाळचें रूप घालतां येणार नाहीं. आणि एखाद्या व्यक्तीस निमिषार्धापासून कल्पापर्यंत वर्तमानकाळ वाढवितां येईल या म्हणण्यांतही कांहींच अर्थ नाहीं. **मार्कंडेयास** सोळा कल्प आयुष्य होतें. पण **धर्मराजा**नें त्याला कांहीं विचारलें तर 'राजा, तू मला आतां विचारतोस' परत पांचसहा पळांनीं किंवा अर्ध घटकेंत 'राजा तू मला पांचसहा पळांपूर्वी विचारलेंस व आणखी पांचसहा पळांनीं विचारशील असे तो म्हणेल. तेव्हां कल्पापर्यंत वर्तमानकाळ वाढविण्याची कल्पना अगदींच बाष्कळ आहे. तसेंच एका निमिषार्धांत किंवा निमिषांत एक शब्दसुद्धा उच्चारतां येत नाहीं. मग त्या काळाचा निर्देश करण्यांत हांशील काय? अशारीतीनें **दामल्यांचें** एक विधान धड नसतां त्याच विधानांचा आधार घेऊन लगेच ते काय लिहितात तें पहा. " यावरून व्याकरणामध्यें अपूर्ण वर्तमान, रीतिवर्तमान, इ काळांचीं नांवें दिसतात, तीं कशीं अप्रयोजक आहेत हे तेव्हांच कळेल. अपूर्ण वर्तमान, पूर्ण वर्तमान, वर्तमान वर्तमान, भूतवर्तमान, भविष्य वर्तमान इ. पारिभाषिक शब्द तर फारच विचित्र व हास्यास्पद वाटतात. संस्कृत व्याकरणांत असली अप्रयोजक, विलक्षण आणि विरोधी भाषा कोठेंच आढळत नाहीं. इंग्रजी व्याकरणापासून मराठीस ही जोड प्राप्त झाली आहे. तथापि तिचा मराठीस इतका कांहीं दृढ सहवास घडला आहे कीं त्या दोहोंचा आतां एकजीव होऊन गेल्यासारखा आहे. ह्यामुळें आतां या अनिष्ट व त्याज्य भागाचाही यापुढें त्याग करतां येईल कीं नाहीं, याची शंकाच वाटते. म्हणून पदरांत पडलें आणि पवित्र झालें, या न्यायानें त्याचा आतां तसाच स्वीकार करून त्यास होतां होईल तितकें पवित्र करून घेतलें पाहिजे. " यांत **दामल्यांनीं** काळकल्पनेसंबधीं संस्कृत व इंग्रजी व्याकरणांकडे बोट दाखवून ती कल्पनाच हास्यास्पद व अप्रयोजक, आहे ती नाइलाजानें स्वीकारली पाहिजे, म्हणजे स्वतःची आख्यात प्रत्यय कल्पना अमलांत आणून काळाची ( व त्याच्याबरोबरच अर्थाची ) हकालपट्टीच करावी. पण तसें करणें शक्य नाहीं, म्हणून आख्यातार्थ म्हणून एक नवीनच प्रकार कल्पून या अनिष्ट काळांना त्यांत कोंबावें व पवित्र करून घ्यावें असा साळसूद मार्ग **दामले** सुचवतात ! त्याची सडेतोड रीतीनें दखलगिरी घेतल्याशिवाय अर्थातच गत्यंतर नाहीं.

**दामल्यांची** पहिली चूक म्हणजे विभक्ति व आख्यात या संज्ञा संस्कृतांत एकाच अर्थाच्या असतां त्यांनीं मराठींत निराळ्या अर्थानें वापरल्या आहेत. दुसरी चूक म्हणजे लिंग, वचन, विभक्तिप्रमाणेंच काळ व अर्थ हे विकार असतां ते त्यांनीं तसे

मानले नाहींत. याचा अर्थच असा कीं पूर्वी वैयाकरणांनीं विभक्ति ही संज्ञा 'केस' ह्याअर्थीं वापरली, त्याचप्रमाणें काळ, अर्थ ह्या संज्ञा 'टेन्स' व 'मुड' या इंग्रेजी संज्ञांना प्रतिसंज्ञा आहेत. संस्कृत व्याकरणांतून विभक्ति ही संज्ञा व तिचे आठ प्रकार एवढेच **दादोबांनीं** घेतले. व तेही केवळ संस्कृताचा बोज राखण्यासाठीं. पण त्यांपैकीं एका बाबतींत म्हणजे प्रकारांच्या बाबतींत **गुंजीकरां**शिवाय बाकीच्या सर्वांनीं तीन-पर्यंत विभक्ति कमी करण्याचा प्रयत्न केला. कारकादि संबधांविषयीं नाना तऱ्हेचे आक्षेप काढून शेवटीं व्याख्येंत त्यांचा समावेश केला सारांश संस्कृत व्याकरणाची तोंड देखली स्तुति करून विभक्तिप्रकरणांत इंग्रेजी केसचा स्वीकार केला. तेव्हां त्याच कारणासाठीं काळ, अर्थ या संज्ञाचा इंग्रेजीला अनुसरूनच विकार या दृष्टीनें स्वीकार करणें प्राप्त होतें पदरीं पडली म्हणून पवित्र करण्याची भाषा व्यर्थ आहे सारांश विभक्ति हा विकार तो निरनिराळे सहा संबध दाखवितो व हें कार्य प्रत्ययाच्या द्वारें होतें, त्याचप्रमाणें काळ हाही एक विकार असून तो क्रियेचें साधारणत्व, पूर्णत्व, अपूर्णत्व व रीति ( सवय ) हे संबध लक्षांत घेऊन क्रिया सध्यां, मागें किंवा पुढें कशी घडते, घडली किंवा घडेल हें प्रत्ययांच्या किंवा शब्दांच्या द्वारें दाखवितो विभक्तीच्या बाबतींत प्रत्ययांवरच भिस्त ठेवणें बरोबर नाहीं तसेंच काळाच्या व अर्थाच्या बाबतीं-तही चुकीचें म्हणून लाख्यात, वाख्यातसारखी आख्यातें कल्पून 'विकार' ही दृष्टि सोडून देणें चुकीचें आहे. आख्यात कल्पना कशी चुकीची व चालू शास्त्रीय पद्धतीच्या विरुद्ध व संस्कृत पद्धतीसही न तुळणारी आहे, यासंबधीं पुढें विचार होईल ]

**२४ काळाचे प्रकार** :—काळाचे मुख्य ( १ ) वर्तमान, ( २ ) भूत व ( ३ ) भविष्य असे तीन प्रकार आहेत. या प्रत्येकाचे पूर्ण, अपूर्ण व रीति असे तीन तीन प्रकार आहेत. म्हणजे ( १ ) वर्तमान, ( २ ) अपूर्ण वर्तमान, ( ३ ) पूर्ण वर्तमान व ( ४ ) रीति वर्तमान असे चार वर्तमानाचे, ( १ ) भूत, ( २ ) अपूर्ण भूत, ( ३ ) पूर्णभूत व ( ४ ) रीतिभूत असे चार भूतकाळाचे व ( १ ) भविष्य, ( २ ) अपूर्ण भविष्य, ( ३ ) पूर्ण भविष्य, व ( ४ ) रीतिभविष्य असे भविष्यकाळाचे चार मिळून काळाचे बारा प्रकार आहेत.

[ **दादोबांनीं** काळाचे पंधरा प्रकार मानले **दामल्यांनीं** काळाला एक आख्यातार्थ समजून वरील काळ तर मानलेच आहेत. पण संनिहित भविष्य यांसारखीं आणखींही नांवें सांगतात. यासंबधीं पुढें संबध प्रकरणांत विचार करावयाचा आहे. पूर्व व्याकरणकार ज्यांना संयुक्त काळ म्हणत त्यांचाही पुढे विचार करू ]

२५ **वर्तमानकाळ** :—जो काळ विशिष्ट **प्रत्ययांच्या द्वारें** साधारणपणें **सध्यां** काय घडतें त्याविषयीं सांगतो त्या काळास **वर्तमानकाळ** असें म्हणतात.

२६ **अपूर्ण वर्तमानकाळ** :—ज्या वर्तमानकाळांत क्रिया अपूर्ण किंवा चालू असते व ज्याचीं रूपें तकृदंत व 'आहे' ह्या साह्य क्रियापदानें सिद्ध होतात, त्या काळास **अपूर्ण वर्तमानकाळ** असे म्हणतात.

२७ **पूर्ण वर्तमानकाळ** :—ज्या वर्तमानकाळांत क्रिया पूर्ण झालेली असते, व ज्याचीं रूपें ला, लेला कृदंत व 'आहे' ह्या साह्य क्रियापदानें सिद्ध होतात त्या काळास **पूर्ण वर्तमान** काळ असें म्हणतात.

२८ **रीतिवर्तमानकाळ** :—ज्या वर्तमानकाळांत क्रियेच्या रीती-(संवयी) संबंधाने उल्लेख असतो व ज्याचीं रूपें त-कृदंत व 'असतो' हें साह्य क्रियापद यांनीं सिद्ध होतात, त्या काळास **रीतिवर्तमानकाळ** असें म्हणावें.

[ वर्तमानकाळाचीं रूपें रीति वर्तमानकाळासाठीं विकल्पानें योजतात या ठिकाणीं रीति हा शब्द चुकीचा असून समय (सवय) हा आला असता तर बरें होतें.]

२९ **भूतकाळ** :—जो काळ विशिष्ट प्रत्ययाच्या द्वारें साधारणपणे **मागें** काय घडले त्याविषयीं सांगतो त्या काळास **भूतकाळ** म्हणतात.

३० **अपूर्ण भूतकाळ** :—ज्या भूतकाळांत क्रिया अपूर्ण किंवा चालू असते व ज्याची रूपे त-कृदंत व 'होता' हे साह्य क्रियापद यांच्या द्वारें सिद्ध होतात, त्या काळास **अपूर्ण भूतकाळ** असें म्हणतात.

३१ **पूर्णभूतकाळ** :—ज्या काळांत क्रिया पूर्ण झालेली असते व ज्याचीं रूपें ला, लेला कृदंत व 'होता' हें साह्य क्रियापद यांनीं सिद्ध होतात, त्या काळास **पूर्ण भूतकाळ** म्हणतात.

३२ **रीतिभूतकाळ** :—ज्या भूतकाळांत क्रियेच्या रीती (संवयी) संबंधीं उल्लेख असतो व ज्याचीं रूपें त-कृदंत व 'असे' हें साह्य क्रियापद यांनीं सिद्ध होतात, त्या काळास **रीतिभूतकाळ** असें म्हणतात.

**३३ भविष्यकाळ** :—जा काळ विशिष्ट प्रत्ययांच्या द्वारें साधारणतः **पुढें** काय घडेल याविषयीं सांगतो त्या काळास **भविष्यकाळ** असें म्हणतात.

**३४ अपूर्ण भविष्यकाळ**:—ज्या भविष्यकाळांत क्रिया अपूर्ण किंवा चालू असते, व ज्याचीं रूपें त-कृदंत व 'असेल' या साह्य क्रियापदानें सिद्ध होतात, त्या काळास **अपूर्ण भविष्य** असें म्हणतात.

**३५ पूर्ण भविष्यकाळ** :—ज्या भविष्यकाळांत क्रिया पूर्ण झालेली असून, ज्याचीं रूपें ला, ले-कृदंत व 'असेल' या साह्य क्रियापदानें सिद्ध होतात त्या काळास **अपूर्ण भविष्यकाळ** असें म्हणतात.

**३६ रीतिभविष्यकाळ** :—ज्या भविष्यकाळांत क्रियेच्या रीती-(संवयी) विषयीं उल्लेख असून, ज्याचीं रूपें त-कृदंत व 'असेल' या साह्य क्रियापदानें सिद्ध होतात, त्या काळास **रीतिभविष्यकाळ** असें म्हणतात.

[ येणेंप्रमाणें काळाची व्याख्या देऊन पुढें बाराही काळांच्या स्वयपूर्ण व्याख्या आम्हीं वर दिल्या आहेत. त्यांत 'आहे' 'असतो' 'होता' 'असेल' अशीं साह्य क्रियापदांचीं रूपें सांगितलीं, त्यांतच त्या त्या काळाच्या बाकीच्या रूपांचाही समावेश होतो असें समजावें. सङ्क्षेसाठीं केवळ एकाच रूपाचा उल्लेख केला आहे. उदा० आहे मधें आहेस, आहां, आहेत हीं सर्वच रूपें समजावयाचीं. त्या त्या काळांचे प्रत्ययही पूर्वीं दिलेच आहेत.

आतां अपूर्ण, पूर्ण व रीतिकाळ मानण्याविरुद्ध **दामल्यांनीं** घेतलेल्या आक्षेपाचा विचार करू. ते म्हणतात, "या योजनेंत जी चूक आहे ती अशी बसत, बसला बसणार हीं रूपें कालदर्शक आहेत असें वरील परिभाषा योजणारास वाटतेंसें दिसतें. परतु वर सांगितल्याप्रमाणे हीं रूपें कालदर्शक नाहींत तर क्रियास्थितिदर्शक आहेत." याला उत्तर हेंच कीं लोकांना काय वाटतेसें दिसतें त्यासबधीं **दामल्यांची** चूक असण्याचा सभव आहे. पण ही चूक योजनेंत आहे असें कसें म्हणतां येईल ? काळाचे भाग पाडणें अशक्य म्हणून ते सांगतात. आणि लगेच मागें, सध्या, पुढें असे भाग पाडतात, तर क्रियेच्या पूर्णत्व, अपूर्णत्व व समय याप्रमाणें या मुख्य तीन काळांचे क्रियेच्या अपूर्णत्वा—पूर्णत्वावरून किंवा समयावरून आणखी भाग करावयास हरकत कोणती ? काळ असें कांहीं नाहीं हें स्वतः **दामल्यांनीं** सांगून तीन काळ असें लाक्षणिक रीतीनें मानण्यास ते तयार झाले तर तींच लक्षणें क्रियेच्या पूर्णत्वा—अपूर्णत्वाच्या दृष्टीनें **पुढें** चालविलीं व आणखी काळांचे पोटप्रकार मानले तर ती चूक कशी ? अखेरीस कटाळून

जाऊन म्हणा किंवा पूर्वी सांगितल्याप्रमाणें पदरीं पडलें, पवित्र झालें या त्यांच्या तडजोडीच्या दृष्टीनें म्हणा, नाइलाजानें हा पूर्ण, अपूर्ण, रीतिकाळ मानण्याचा पुढील गुळमुळीत निर्णय त्यांनीं दिला आहे. 'ह्यामुळें वर्तमान-वर्तमान, भूत-वर्तमान, भविष्य-वर्तमान, अशा प्रकारच्या नांवापेक्षां, अपूर्ण वर्तमान, पूर्ण वर्तमान, उद्दिष्ट वर्तमान अशीं नांवें बरीं. मात्र त्यांचा शब्दशः दिसणारा उत्तान अर्थाला बाजूस ठेवून, वर स्पष्ट केलेला गभीरार्थ ध्यानांत ठेवावा म्हणजे झालें. तथापि इतकें सांगणें आवश्यक आहे, कीं साधारण लोक किंवा वैयाकरण समजतात त्याप्रमाणें हे काळाचे भेद नसून क्रियेचे भेद होत. काळ तीनच . वर्तमान, भूत, भविष्य. अपूर्ण वर्तमान, पूर्ण वर्तमान उद्दिष्ट वर्तमान इ० हे वर्तमानकाळाचे भेद नसून त्या त्या काळीं धातुनिर्दिष्ट क्रिया कोणत्या स्थितींत आहे, हें दाखविणारे शब्द आहेत हें. विसरतां कामा नये. काळ हा वास्तविक अर्थ होय.' यासबधीं आम्हीं तर स्पष्ट सागतों कीं, येथें बऱ्यावाईट नांवाचा व अर्थाचा कांहीं सबध नाहीं. ज्या रीतीनें तीन मुख्य काळ, त्याच रीतीनें बाकीचे अपूर्ण, पूर्ण व रीतिकाळ हे काळाचे पोटप्रकार आहेत. मागें, सध्यां, पुढें ह्याही क्रियेच्या स्थितीच आहेत त्यांच्याप्रमाणें तीन प्रकार पडतात तर अपुरा, पुरा, सवयीचा याप्रमाणें त्या मुख्य काळांचे पोटप्रकार कां पडू नयेत ? सामान्य लोकांस अनुसरून वैयाकरण जें मानतात, त्याच्याविरुद्ध 'प्रयोग शरणा. वैयाकरणाः' या तत्त्वाची वेळी अवेळीं घोषणा करणाऱ्या **दामल्यांना** तरी कागाळी करण्याचा अधिकार पोहचत नाहीं. पण या वरील विधानांतील अत्यत चुकीचें व इतर चुकांना कारणीभूत होणारें त्याचें विधान म्हणजे 'काळ हा वास्तविक एक अर्थ आहे.' हें होय. यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, **दामल्यांना** 'काळ' म्हणजे काय याची जशी कल्पना नाहीं तशी 'अर्थ' म्हणजे काय यासबधीं मुळींच कल्पना नाहीं. अर्थासबधीं आम्हीं पुढे सांगणार आहो पण काळ हा **विकार** असून विभक्तिविकार प्रत्ययाच्या अगर शब्दाच्या द्वारें जसे, कर्ता कार्यकरणादि सबध ( अर्थ ) दाखवितो, त्याचप्रमाणें काळ हा विकार प्रत्ययाच्या द्वारें क्रियेसबधीं साधारण पूर्ण, अपूर्ण, रीति अशारीतीने काळ सबध ( अर्थ ) दाखवितो. म्हणून प्रत्ययांना किंवा सबधाला ( अर्थाला ) महत्त्व न देतां दोहोंच्याही दृष्टींनीं काळाकडे विकार म्हणूनच पाहिले पाहिजे म्हणजे प्रत्ययाला तर मुख्य महत्त्व दिलेंच पाहिजे. पण पूर्णत्व, अपूर्णत्व या बाजूची जी इंग्रजी व्यवस्था आहे तिच्याकडेही थोडे लक्ष पुरविलें पाहिजे ताख्यात, लाख्यात वगैरे सज्ञा योजून, **दामल्यांनीं** आपण प्रत्ययांना महत्त्व देतो असा भास उत्पन्न केला आहे. पण 'हा मी आलोच' यासारख्या वाक्यात 'आलो' हा लाख्यात म्हणजे भूतकाळ असता, त्याला 'सनिहित भविष्य' असें ते म्हणतात. त्याचप्रमाणे 'तुम्हीं कधीं आलां ?' हा **येतो** इतकाच' यांतील 'येतो' ह्यास 'सनिहित भूत' व 'थांब हो, ही गोष्ट मी उद्यां तुझ्या बापास **सांगतों**' यांतला 'सांगतों' हा 'निःसशय भविष्य' असे काळ त्यांनीं सांगितले आहेत ! हे शेवटचे दोन काळ केवळ वर्तमानकाळ आहेत. हें

प्रत्ययावरून स्पष्ट दिसतें. पण अर्थावरून हे काळ दामल्यांनीं ठरविले आहत ! खरें म्हटलें तर ' हा आलो. ' म्हणजें ' मी आधींच आलों आहें असें समज. ' असा लाक्षणिक अर्थ आहे म्हणजे येथे अर्थानें पूर्ण वर्तमान होतो. पण व्याकरणांत केवळ वाच्यार्थाचा विचार होतो लाक्षणिक अर्थाचा विचार होत नाहीं तेव्हा दामल्यांनीं सांगितलेले हे काळ भेद मानण्याचें कारण नाहीं मात्र वर्तमान–वर्तमान वगैरे नावाविरुद्ध गिल्ला करून 'सन्निहित–भविष्य' नि:संशय–भविष्य यासारखे नवेच काळ त्यांनीं व्याकरणाच्या उरावर–काळाच्या उरावर–अर्थ या नांवाने बसवावे, यात त्यांनीं कोणतें शास्त्रीयत्व साधले समजत नाहीं ]

**३७ अर्थविकार** :—क्रियापदाच्या ज्या विकारापासून केवळ प्रत्ययांच्या द्वारे आज्ञा, विधि, संकेत या हेतूंचा किंवा अर्थाचा बोध होतो त्या विकारास **अर्थविकार** असे म्हणतात.

**३८ अर्थाचे प्रकार** :—( १ ) आज्ञार्थ, ( २ ) विध्यर्थ व ( ३ ) संकेतार्थ असे अर्थाचे तीन प्रकार आहेत.

**३९ आज्ञार्थ** :—ज्या अर्थापासून एका विशिष्ट प्रत्ययांच्या द्वारें आज्ञेचा बोध होतो त्याला **आज्ञार्थ** असे म्हणतात.

**४० विध्यर्थ** :—ज्या अर्थापासून एका विशिष्ट प्रत्ययांच्या द्वारें विधि–म्हणजे कर्तव्य, आशीर्वाद, सामर्थ्य इत्यादि हेतूंचा बोध होतो त्या अर्थास **विध्यर्थ** असे म्हणतात.

**४१ संकेतार्थ** :—ज्या अर्थापासून कांहीं विशिष्ट प्रत्ययांच्या द्वारें सकेत म्हणजे अट, पर्याय इत्यादि हेतूंचा बोध होतो त्या अर्थास **संकेतार्थ** असे म्हणतात.

[ अर्थ या शब्दाचा मुख्य अर्थ जो 'अर्थ' ( meaning ) तो शब्दास **दामल्यां**शिवाय कोणत्याही व्याकरणकारानीं दिला नाहीं **दामल्यांनीं** मात्र आख्यातार्थ हें प्रकरण लिहून तो अर्थ घेतला आहे. व्याकरणांत 'सबध' व हेतु या अर्थानीं 'अर्थ' ही सज्ञा वापरली आहे. 'सबधा'बद्दल ह्या सज्ञेचा उपयोग केवळ व्याकरण सांगतांना होतो. म्हणजे चतुर्थीचा **अर्थ** सप्रदान असे व्याकरण सागतात. खरें म्हटलें तर 'सप्रदान' हा सबंध आहे. 'हेतू' अर्थ विकारासबधीं हें वरील अर्थाच्या व्याख्येंत सांगितलेंच आहे. यावरून कालाप्रमाणें अर्थ हा एक विकार असून तो प्रत्ययांच्या द्वारा होतो हे दिसून येईल. स्वार्थ हा अर्थ पूर्वी मानीत होते. पण स्वार्थाचे असे निराळे प्रत्यय नाहींत. व त्यांत काळाचीही प्रतीति होते. म्हणून तो विकार आतां मानीत नाहींत.

सकेतार्थ ' जर ' ' तर ' सारख्या उभयान्वयीच्या द्वारेंही होतो. पण तेथे प्रत्यय नसतात व काळाचे प्रत्ययही दिसतात म्हणून तो अर्थ असें मानीत नाहींत. अर्थ व काळ स्वतंत्र विकार आहेत. ते एकसमयावच्छेदेंकरून होत नाहींत

या शेवटच्या प्रसगानें व्याकरणकार ज्यांना ' सयुक्त काळ ' म्हणतात, त्यांचा विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटते. सर्व व्याकरणकारांनीं ही चर्चा सयुक्त क्रियापदाच्या प्रश्नाच्या अनुरोधानें केली आहे. **दामल्यांनीं** याला आपल्या आख्यात-विषयक कल्पनेची पुस्ती जोडली आहे. ' सयुक्तकाळ ' ही सज्ञा **दामले** म्हणतात त्याप्रमाणे अप्रयोजक आहे, यांत शका नाही पण त्या सज्ञेच्या ऐवजी 'सयुक्त कालार्थ' ही सज्ञा घेतली तर या प्रश्नाचा सरळ उलगडा होतो काळ व अर्थ यांचे स्वतत्र प्रत्यय किंवा साह्यक्रियापदे असतात तेव्हां पूर्वी सांगितलेल्या बारा काळांपैकीं काहीं काळांत संयुक्त क्रियापदें असली तरी त्यांना सयुक्त काळ असे म्हणतां येणार नाहीं आणि **जोश्यांनीं** त्यांची गणना केली आहे ती चुकीची आहे पण ' करित जा, करित जावो, जाणार आहे–होतो–असेन ' इत्यादि ठिकाणीं जेथें काळ व अर्थ यांचा सयोग अशीं रूपं **जोशी** सागतात, त्याप्रमाणें शेंकडो होतील यांत शका नाही आणि धड काळ व धड अर्थ नसल्यामुळे त्यांची म्हणजे सयुक्त काळार्थांची व्याकरणांत दखलगिरी घेण्याची जरूरी नाही, असा सरळ निष्कर्ष निघतो त्यासाठी **दामले** म्हणतात त्याप्रमाणें आख्यात प्रत्यय मानावयास नको किंवा **जोशी** म्हणतात त्याप्रमाणें सयुक्त क्रियापदे टाकावयास नकोत

शेवटीं **गुंजीकरांच्या** अनुकरणानें **दामल्यांनीं** विभक्ति या नामासबधीं असलेल्या सज्ञेप्रमाणे ' आख्यात ' ही संज्ञा क्रियापदाच्या बाबतींत अमलांत आणण्याची जी योजना आपल्या व्याकरणात स्वीकारली आहे तिचा विचार करू. **दामल्यांनीं** याविषयीं प्रथम वर सांगितलेल्या सयुक्त काळासबधी किंवा सयुक्त क्रियापदासबधी विचार करतांना विस्तारपूर्वक विचार केला आहे. ते म्हणतात, " नामास लागणाऱ्या चरम प्रत्ययांचे जे वर्ग होतात, त्याना मराठी व्याकरणांत विभक्ति हे सर्वसाधारण तरी नांव आहे. परतु धातूस लागणाऱ्या चरम प्रत्ययांचे जे वर्ग आहेत त्यांस सर्वसाधारण असे एकही नांव प्रचारात नाहीं. त्यांपैकीं कांहींस काळ व काहींस अर्थ म्हणतात. हा सर्व घोटाळा इग्रजी व्याकरणाच्या सहवासापासून आमच्यांत उत्पन्न झाला आहे. हा घोटाळा आणखी किती दिवस चालू राहणार किंवा आम्ही ठेवणार ? आमच्या मते त्याचें समूळ निराकरण जितकें लवकर होईल तितकें चागले म्हणूनच या ग्रथात असल्या घोटाळ्याचा जागजागीं सविस्तर परिस्फोट करून त्यास हद्दपार करण्याचा किंवा त्याजवर बहिष्कार घालण्याचा प्रयत्न केला आहे. " यानतर बरीच पुनरुक्ति करून ते आपल्या निर्णयासबधीं पुढील कारणे देतात. " आमच्या मते काळ व अर्थ यांमधील फरक व्याकरणात फारसा महत्त्वाचा नाहीं **कारण कीं, ज्या आख्यातास अर्थ म्हटलें आहे, तीं काळ मुळींच दाखवीत नाहींत. किंवा ज्यांस**

**'काळ' म्हटलें आहे, त्यांनीं अर्थ कधींच दाखविला जात नाहीं असें थोडेंच आहे!** शिवाय 'अर्थ' या शब्दास दिलेला मराठी व्याकरणांतील मर्यादित अर्थसुद्धा योग्य व अवश्य नाहीं. हा संकुचित अर्थ संस्कृतागत नसून इंग्रजीपासून घेतला आहे. तथापि 'अर्थ' या शब्दाचा नेहमीचा विस्तृत अर्थसुद्धां व्याकरणांत घेण्यास हरकत नाहीं या नेहमींच्या विस्तृत अर्थानें काळ हाही एक धातूच्या आख्यात प्रत्ययाचा अर्थच आहे **ज्या आख्यातांस काळ म्हणतात त्यांस, संकेत, विधि, आज्ञा वगैरे अर्थ फारसे नसतात आणि ज्या आख्यातांस अर्थ हें नांव देतात त्यांचा बहुधा तिन्ही काळांचे अर्थी उपयोग होत असल्यामुळें, त्यांत एका विशिष्ट काळाचा अर्थ नाहीं हें खरें आहे.** तथापि काळ किंवा व्याकरणातील मर्यादित अर्थ, किंवा नेहमींचा विस्तृत अर्थ ह्याशीं धातूस चरम प्रत्यय लागून होणाऱ्या रूपांच्या वर्गीकरणांत वैयाकरणांस विशेष कर्तव्य नसल्यामुळें, या वर्गांपैकी काहींस काळ व कांहींस अर्थ अशीं भिन्न भिन्न नावे देणें योग्य नव्हे ज्यांस काळ व अर्थ असे म्हणतात, तीं सर्व पदें धातूस चरम प्रत्यय लागून झालेलीं असल्यामुळें त्या सर्वांस साधारण असें एक नाव असणें इष्ट व अवश्य आहे. आणि तें आख्यात हें होय." यांतील दोन ठिकाणीं जाड टाईपात मजकूर आम्हीं घातला आहे.

**दामल्यांचीं** वरील सर्व विधाने चुकीचीं, भ्रमभूलक व दिशाभूल करणारीं आहेत हे याविषयीं केलेल्या पूर्वविवेचनावरून दिसून येईल पण फिरून एकवार त्याचे स्पष्ट खंडण करणे जरूर आहे. प्रथम इंग्रेजी किंवा संस्कृत या वादासंबधीं हें सांगणे आवश्यक आहे कीं, सारेच मराठी व्याकरण जवळजवळ इंग्रेजीवरून घेतले आहे. त्याप्रमाणें विभक्ति, काळ व अर्थ हे **विकार** म्हणून घेतले जाहेत अर्थ ( meaning ) म्हणून नव्हेत संस्कृत पद्धति अलीकडील तार्कीक वर्गीकरण व व्याख्याच्या काळांत बहुतांशी स्वीकारतांच येणार नाहीं. विभक्ति ही संस्कृतांतील संज्ञा मराठींत त्या अर्थानें घेतां येत नाहीं आख्यात ही संज्ञा विभक्तीच्या प्रकारांस संस्कृतांत लागू असल्याकारणानें मराठींत विभक्ति ही संज्ञा नामासंबधीं व आख्यात ही संज्ञा क्रियापदास म्हणजे अगदीं भिन्नार्थी लावणे गैर आहे निदान त्याला संस्कृताचा आधार आहे असे म्हणता येणार नाहीं. अर्थ ह्या शब्दाचा विस्तृत अर्थ मराठी व्याकरणांत मुळीच घेतां येत नाहीं. मराठी व्याकरणांत अर्थ म्हणजे संबध किंवा अर्थ नांवाचा आज्ञा, विधि व संकेत हें संबध दाखविणारा विकार जाड टाइपातील दामल्यांचे पहिले विधान ( दुसरे तसें विधान त्याच्या अगदी उलट आहे. ) साफ चुकीचे आहे जे काळ आहेत ते अर्थ दाखवीत नाहींत व जे अर्थ आहेत ते काळ दाखवीत नाहींत, असे आम्हीं स्पष्ट वर सांगितलें आहे. व **दामल्यांनीं** ही गोष्ट कबूल केली आहे. ( त्यांचें जाड टाइपांतलें दुसरें विधान पाहा. एकाच परिच्छेदात या बोटावरची थुकी त्या बोटावर झेलण्याची कला अजबच म्हटली पाहिजे! ) चरम किंवा विभक्ति प्रत्यय लागून पद बनणें हें विभक्तीचें कार्य व तें कार्य करणारी ती विभक्ति असें विभक्तीचें

संस्कृत लक्षण **गुंजीकरां**नीं सांगितलें आहे. **दामल्यां**ना तें कबूल आहे मराठींत फक्त चारच पदांना चरम प्रत्यय लागतात व त्यांपैकीं लिंग, वचनाचें व विभक्तीचीं प्रथमेचीं रूपें तद्धित प्रत्यय लागून होतात. शिवाय प्रत्ययाप्रमाणें शब्दही लागून पदें होतात. व या सगळ्याचा विचार स्वतंत्र रीतीनें व्याकरणाच्या एका भागांत **प्राकृतेयांत** केल्यामुळें **वाक्येयांत** वर्गीकरणादि प्रसंगीं चरम प्रत्ययासंबधीं चर्चा करण्याचें कारण नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण तें कांहीं विभक्तीप्रमाणें आख्यात ही संज्ञा प्रचलित करण्यास कारण होऊं शकत नाहीं. मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे विभक्तिप्रमाणें काळ व अर्थ हे विकार आहेत व इंग्रेजींतील case, Tense व mood या संज्ञांवरून या संज्ञा मराठींत आल्या आहेत हें कधींही दृष्टिआड करून चालणार नाहीं. सारांश आख्यात ही संज्ञा मराठी व्याकरणांत घेण्याची जरूरी नाहीं. इतकेंच नव्हे तर तसें करणें चुकीचें आहे आख्यातेंच नाहींत. मग ती प्रत्ययावर कीं अर्थावर ( संबधावर ) हा प्रश्नच कसा उद्भवतो ? पण केवळ विकार या दृष्टीनें हा प्रश्न निघतो आणि मग विभक्तिविकारासंबधीं या प्रश्नाचें जें उत्तर पूर्वी आम्हीं दिलें आहे तेंच येथें देतां येईल.

संस्कृतांतील लट्, लिट्, लुङ् इत्यादि निरर्थक संज्ञांप्रमाणें मराठींत ताख्यात, लाख्यात इत्यादि संज्ञा आख्यातासंबधीं घ्याव्या अशी **राजवाड्यां**च्या अनुकरणानें **दामल्यां**नीं जी व्यवस्था सुचविली तिची स्वतंत्र चर्चा होणें इष्ट आहे. ह्यासंबधीं त्यांचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहे. "आतां आख्यातांस जीं नावें द्यावयाचीं, तीं अर्थपूर्ण कामाचीं नाहींत, तर केवळ चिन्हांसारखीं असलीं पाहिजेत. एकाच आख्यातास अनेक अर्थ असल्यामुळे अर्थपूर्ण नाव जरी बऱ्याच अशी अर्थपूर्ण असलें, तरी तें कांहीं अशीं तरी अप्रयोजक ठरणारच. ह्यामुळें संस्कृत व्याकरणांत विभक्तीस प्रथमा, द्वितिया इत्यादि सांकेतिक चिन्हमय नांवें दिलीं आहेत. 'अर्थपूर्ण' नावाच्या अप्रयोजकत्वाचें ढळढळीत उदाहरण पाहिजे असल्यास ते आज्ञार्थ हें होय, ते बहुतांशीं यथार्थ नाहीं. कारण कीं लिंग–पुरुष–वचन–भेदानें फिरणाऱ्या प्रत्येक आख्याताचीं सहा सहा रूपें असतात. आणि ज्या आख्यातास आज्ञार्थ असें म्हणतात, त्या आख्याताच्या द्वितिय पुरुषाच्या दोन रूपांचाच आज्ञा या अर्थी बहुधा उपयोग होतो म्हणून आज्ञार्थ हें नाव फार तर एक तृतीयांशानें यथार्थ आहे. आणि दोन तृतियांशानी म्हणजे बहुतांशीं अप्रयोजक होय. हें उघड आहे. म्हणून आख्यातांस द्यावयाचीं नावें खुणासारखीं सांकेतिक असावीं. आतां प्रचलित नांवाचे जागीं त्याचा प्रचार दाखवायचा असल्यामुळें तीं फारच सुलभ म्हणजे सहज ओळखण्यासारखीं व ध्यानांत ठेवण्यासारखी पाहिजेत. यामुळें विभक्तीप्रमाणें त्यास पहिलें, दुसरें इ० वास्तविक ज्या ठिकाणीं क्रम नाहीं अशा ठिकाणीं क्रमसूचक नांवें देणें उपयोगाचें नाहीं. कारण कीं अशी नांवें अभ्यासावांचून ध्यानांत राहण्यास कठीण. आणि त्याचा सहज प्रचार होण्यास लायक नाहीं, ह्यामुळें आख्यातास आम्हीं ताख्यात, लाख्यात, वाख्यात इत्यादि. सांकेतिक पण सुलभ आणि आख्यात ओळखण्याच्या कामीं उलट सहाय करणारीं अशीं नावें दिलीं आहेत. त्यांचें

योग्य चीज होओ. यावरून ही गोष्ट उघडच आहे कीं क्रियापद चालवितांना काळ व अर्थ हल्लींच्या पद्धतीनें न सांगतां फक्त त्याचे आख्यात सांगून त्या आख्याताचा अर्थ सांगितला म्हणजे झालें. उदा० मी आलोंच. तुम्ही पुढें चला. या वाक्यांतील 'आलो' हें ये धातूचे स्वार्थी भूतकाळीं प्रथम पुरुषाचें एकवचन असे न म्हणतां 'आलो' हें ये धातूचे लाख्यातीं प्रथम पुरुषाचे एकवचन, अर्थसन्निहित भविष्य. त्याच-प्रमाणे चला हे 'चल' धातूचें ऊ आख्यातीं द्वितियपुरुषाचे अनेकवचन, अर्थ—आज्ञा असें म्हणावें. म्हणजे नामाचे व्याकरण करतांना ज्याप्रमाणें विभक्ति सांगून मग तिचा काय अर्थ असेल तो सांगावयाचा, त्याचप्रमाणें क्रियापदाचे व्याकरण करतांना त्याचे आख्यात सांगून त्या आख्याताचा अर्थ सांगावयाचा. सयुक्त क्रियापद असतां साहाय धातु ज्या आख्याती असेल ते त्या सयुक्त कियापदाचें आख्यात होय जसे.—करीत असतो, केला असतो, करणार असतो इत्यादि सर्वांचें प्रथम ताख्यात होय. गेला असेल, जाता होईल, करावयाचें असेल या सर्वांचें ईलाख्यात होय असेच अन्यत्र समजावे."

दामल्यांचें हे सारें विवेचन दोन चुकीच्या समाजावर आधारलेलें असल्यामुळें त्याची ही लाख्यात, ताख्यात योजना 'विनायक प्रकुर्वाणो रचयामास वानर' अशा प्रकारची झाली आहे म्हणजे तिला धड सस्कृताचा आधार नाहीं आणि इग्रेजीचाही आधार नाहीं सुलभपणा किंवा सहज ओळखतां येण्याचे चिन्ह ज्या विषयीं ते सांगतात त्याचाही अभावच आहे **दामल्यांना** भ्रमात टाकणारा दुसरा चुकीचा समज म्हणजे व्याकरणाचा अर्थाशी सबध असतो हा होय. यासबधी हें आम्हीं आधींच सागितले आहे कीं meaning किंवा sense या दृष्टीने व्याकरणाचा अर्थाशीं कांहींच सबध नाहीं व्याकरणात 'अर्थ' ही सज्ञा सबध (कारक व स्वामीत्वसबध) या अर्थी व काळाप्रमाणे आज्ञा, विधि, सकेत इत्यादि हेतु दाखविणारा विकार या दोनच दृष्टीनीं आजपर्यंत योजण्यांत आली आहे. यापैकीं पहिली व्याकरण सागतानाच योजण्यांत येते म्हणजे चतुर्थीचा अर्थ सप्रदान असे सांगताना असे सबधाच्या ऐवजीं अर्थ असे साग-तात असे न करता चतुर्थीचें सप्रदान कारक असें सांगून 'अर्थ' ही सज्ञा केवळ आज्ञा, विधि व सकेत दाखविणाऱ्या क्रियापदाच्या विकारासाठींच ठेवावी असे आतां आम्ही ठरविलें आहे. विभक्ति, काळ व अर्थ यांची साधनात्मक तुलना करावयाची असेल तर विभक्ति हा विकार ज्याप्रमाणें नामाच्या सबधीं किंवा शब्दाच्या प्रत्ययाच्या द्वारे सहा मुख्य सबध दाखवतो. त्याप्रमाणें काळ हा विकार प्रत्ययाच्या किंवा शब्दाच्या द्वारें बारा संबध व अर्थ प्रत्ययाच्या द्वारें तीन सबध दाखवितो, अशा रीतीने ती तुलना करावी. 'अर्थ' म्हणजे अर्थ (meaning) हा अर्थ व्याकरणांत आणून **दामल्यांनीं** आपले शेकडो अर्थ (आख्यातार्थ) व्याकरणाच्या बोकांडी बसवले आहेत. **दादोबां**ची पधरा काळांची व्यवस्था नाहींशी करण्याचा प्रयत्न **जोश्यांनीं** संयुक्त काळ म्हटलेल्या काळांचा अनिश्चितपणा व असख्यता या दोषाच्या भीतीनें केले तेच आख्यातार्थ म्हणून **दामल्यांनीं** मराठी व्याकरणांत घुसविले.

**दामल्यां**ची दुसरी मोठी चूक म्हणजे विशेषनामास किंवा पारिभाषिक शब्दांस त्यांच्या सांकेतिक अर्थाशिवाय केवळ यौगिक असा अर्थ असतो अशी कल्पना करणें. म्हणून ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं आरभीं जरी नांवें ठेवतांना किंवा पारिभाषिक शब्द योजनांना थोडासा यौगिक अर्थ केव्हा केव्हां दृष्टीसमोर असतो, तरी पुढें पुढे या केवळ लट्, लुट् या अर्थहीन सज्ञा इतक्याच सांकेतिक असतात. अशावेळीं त्याचा यौगिक अर्थ करणें म्हणजेच घोटाळ्याचे असते. उदा० **दामल्यांनीं** दिलेलें आज्ञार्थाचेच उदाहरण पाहा. आज्ञार्थ ही सज्ञा इग्रजींत 'इपरेटीव मुड' या शब्दाचा प्रतिशब्द आहे इग्रेजींत आज्ञा या शब्दाला 'कमाड' किंवा 'आरडर' असे आहे. हा अर्थ इग्रेजींतील 'इपरेटिव' या शब्दात सुद्धां थोडयाच प्रमाणात आहे. 'इपरेटिव'साठीं आज्ञार्थ योजावयाचा नाहीं प्रथम इतकाच अर्थ अभिप्रेत असला पाहिजे. आणि त्याचा उपयोगही ती सज्ञा प्रचलीत होण्यास सुलभ व्हावी एवढ्याचपुरता होता. **दामल्यांनीं** सस्कृतातील लट्, लिट्, या शब्दांचे उदाहरण देऊन आपल्या खुणा सस्कृताप्रमाणें अगदीं निर्भेळ न ठेवता सुलभ प्रसारासाठीं प्रत्ययाचा अर्थ जोडला 'विभक्तींत क्रमसूचक' अर्थ असतो, तो प्रथम टाळला. पण फिरून प्रथम ताख्यात, द्वितिय ताख्यात यामध्यें क्रम आलाच व त्यामुळे प्रथम ताख्यात, द्वितिय ताख्यात हीं ओळखतां येणे कठीणच. शिवाय ताख्यात, लाख्यात येथे प्रत्यय स्पष्ट दिसतात पण 'ऊ' आख्यातापासून चटकन् आज्ञार्थ असे कसे ध्यानात येईल ? सस्कृतात, इग्रजींत व मराठींत प्रत्ययाप्रमाणे शब्दापासूनही आख्यात होतें. पण ताख्यात लाख्यात व्यवस्थेंत केवळ प्रत्ययावरच अवलबून राहाव लागते. सयुक्तकाळ किवा आख्यात अर्थ यांच्या बाबतींत साह्यक्रियापदाच्या प्रत्ययावरुन आख्यात ठरवावें अशी **दामल्यां**ची सूचना आहे पण त्या साह्यक्रियापदाचे प्रत्यय ठरलेले नसतात तीं बहुतेक अनियमित क्रियापदे असतात. अशा वेळीं त्यांचीं आख्याते कशीं सागावयाचीं ? एकदरींत **दामल्यां**च्या या व्यवस्थेत कशाचा काहीं मेळ नाहीं म्हणून विभक्तिकाळ व अर्थ हे इग्रजी व्याकरणाप्रमाणें विकार म्हणून स्वीकारून बारा काळ व तीन अर्थ मानणें हाच श्रेयस्कर मार्ग होय.

**दामल्यांनीं** उदाहरण देऊन जे स्पष्टीकरण केले आहे त्याचीही छाननी करणें योग्य होईल. ते म्हणतात कीं, क्रियापद चालवितांना हल्लींच्या पद्धतीप्रमाणें त्याचा काळ व अर्थ न सागता आख्यातार्थ सागावा उदा. मी आलोंच तुम्हीं पुढें चला. 'आलोच' याचे ये धातूचे स्वार्थी भूतकाळीं तृतीय पुरुषाचें एकवचन असे चालू पद्धतीप्रमाणे म्हणू नये तर ये धातूचे तृतीय पुरुषाचे एकवचन अर्थ सन्निहित भविष्य असे सांगावे असे **दामल्यांचें** म्हणणे आहे सध्या स्वार्थ कोणी सांगत नाहींत. तेव्हां या वाक्यात कालनिरपेक्ष असा अर्थविकार नाहींच भूतकाळाऐवजीं लाख्यात सागितला तर काळाचा कांहींच बोध होत नाहीं. स्वतः **दामल्यांनीं** 'ला' ह्या प्रत्ययावरून भूतकाळ होण्यास सुलभ होईल म्हणून सांगितलें आहे व लाख्याताबरोबर कसांत भूतकाळ घातला आहे. मग पुढें सन्निहित भविष्य हा जो काळ सांगितला

त्याला आधार कशाचा ? येथें लाख्यात सांगण्याचा फायदा कोणता ? आणि ' सन्निहित भविष्य ' हें काळाचें नांव तरी सार्थ कसें ? ' हा आलोच ' म्हणजे मी पूर्वींच आलों असें समज. येथें धडधडीत भूतकाळ आहे. मग **दादोबा, चिपळूणकर** यांच्या वर्तमानभविष्य वगैरे नांवाची चेष्टा करून मनमानेल तशा अर्थाच्या नांवाखालीं अनेक कालसंज्ञा तयार करून व्याकरणांत बेबंदशाही माजविण्याचा **दामल्यांस** अधिकार कसा पोहोंचतो ? ' चला ' हें चल धातूचें 'ऊ आख्यातीं' द्वितिय पुरुषाचें एकवचन अर्थ आज्ञा येथें ' ऊ ' आख्यातापासून आज्ञा हा अर्थ कसा ओळखावयाचा ? व चला किंवा ' चल ' येथे रूपावरून सहज समजतो. पण ( मी ) ' चलू ' या रूपावरून जरी ' ऊ ' आख्यात सहज दिसलें तरी त्यांतून आज्ञा हा अर्थ येणें शक्य नाहीं हें त्यांनींच एक तृतीयांशाचें गणित मांडून पूर्वींच दाखविलें आहे एवंच **दामल्यांची** योजना व्यवहार्य नसून तिला संस्कृताचा आधार नाहीं. अर्थ ही संज्ञा meaning या दृष्टीनें मराठी व्याकरणांत स्वीकारतां येत नाहीं असंख्यात व नियमित असे संयुक्तकाळ किंवा **दामले** ज्यांना आख्यातार्थ ते म्हणतात घेतल्यानें व्यर्थ घोटाळा माजणार ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे **दामल्यांनीं** असल्या आपल्या पद्धतीस कितीही आशीर्वाद दिले व ती स्वीकारण्याविषयीं कितीही काकळुत केली तरी ती त्यांच्या व्याकरणात तशीच पडून राहिली आहे तिचा कोणींच स्वीकार केला नाहीं यावरून तिचें वैय्यर्थ सहज दिसून येतें ]

**४२ क्रियापदाचें लिंग :**—मराठी भाषेंत केव्हां केव्हां कर्त्याप्रमाणें तर कधीं या दोहोपासून निरपेक्ष असें क्रियापदाचें **लिंग** असते. कर्त्याचें किंवा कर्माचे लिंग क्रियापदास नसल्यास तें क्रियापद फक्त नपुंसकलिंगी असते.

[ कर्ता व कर्म म्हणजे काय हे पूर्वी थोडक्यात सांगितलेंच आहे पुढेही ' संबंध ' व ' प्रयोग ' या अध्यायात त्याविषयीं चर्चा होईल लिंग हें खरें किंवा मानलेलें असलें तरी प्रत्यक्षत वस्तुगत असल्यामुळे प्रत्यक्षत नाम किंवा तत्सदृश शब्दांत असतें तो नाम शब्द कर्ता किंवा कर्म असला तर त्याचच लिंग त्याच्याशी संबंध असलेल्या क्रियापदाचें होतें पण तसें नसले तर क्रियापदाला कोणते तरी लिंग मराठी व्याकरणाच्या योजनेप्रमाणें असले पाहिजे म्हणून सामान्य जे नपुंसकलिंग त्याचीच त्याप्रसंगीं योजना होते हें लिंग वस्तुगत नाहीं हें सांगावयास नको. क्रियापदास मराठी किंवा तत्सम भाषेशिवाय अन्य भाषांत म्हणजे संस्कृत किंवा इंग्रजी भाषेंत लिंग नाहीं हें पूर्वीं सांगितलेंच आहे ]

**४३ क्रियापदाचें वचन :**—क्रियापदाचे वचनही कर्त्याच्या किंवा कर्माच्या वचनाप्रमाणें असतें. कर्त्याचे किंवा कर्माचें वचन क्रियापदास

नसल्यास त्याचें एकवचनच असतें. अर्थात् यावेळीं वरच्या नियमाप्रमाणें क्रियापद नपुंसकलिंगी असतें.

[ काळ किंवा विभक्तिप्रत्ययांत अगर साह्यक्रियापदांत लिंगवचनाचे प्रत्यय गुरफटून असलेले दिसतात. ]

**४४ क्रियापदाचा पुरुष** :—क्रियापदाच्या ज्या विकारापासून बोलणारी किंवा लिहिणारी व्यक्ति स्वतःविषयीं, ज्याच्याशीं बोलते त्या व्यक्तीविषयी किंवा तिसऱ्याच व्यक्तीविषयीं असा बोध होतो त्या विकारास **पुरुष** असें म्हणतात. क्रियापदाचा पुरुषही कर्ता व कर्म याप्रमाणेंच असतो. ज्यावेळीं तो तसा नसतो त्यावेळी तो तृतीय पुरुष असतो. अर्थात् वरील दोन नियमाप्रमाणें अशा प्रसंगी क्रियापद नपुंसकलिंगी एकवचनीं असते.

[ पुरुषाची व्याख्या पूर्वीं सर्वनाम प्रकरणांत दिली आहे. तीच येथे दिली आहे. लिंगवचनाप्रमाणें पुरुष हा विकारही काळ व अर्थ याच्या प्रत्ययांत गुरफटलेला असतो. याविषयीं प्रयोग प्रकरणांत पुढें विचार होईल. ]

---

# अध्याय पहिला.

## विकरण—लिंग व वचन.

### १ लिंग—विकरण.

**१ लिंग-विकरण :**—लिंग-विकरण हें नाम शब्दाच्या अन्त्य स्वरावर किंवा अन्तावर अवलंबून असते.

**२ आकारान्त पुल्लिंगी नामें :**—प्राणीवाचक आकारान्त पुल्लिंगी नामांस ई आणि एं हे प्रत्यय लागून अनुक्रमें स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी रूपें तयार होतात. पुढील तक्ता पाहा :—

| पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग |
|---|---|---|
| कुत्रा | कुत्री | कुत्रें. |
| घोडा | घोडी. | घोडें |
| बकरा | बकरी | बकरें |
| लांडगा. | लाडगी | लांडगें |
| कोल्हा. | कोल्ही. | कोल्हें. |
| मुलगा | मुलगी. | मुलगें. |

[ नातें दाखविणारे काका, मामा, चुलता यांसारखे याच प्रकारांत येतात पण त्यांचीं केवळ पुल्लिंगी व स्त्रीलिंगी रूपें होतात. वरील नपुसकलिंगी रूपें हीं केवळ सामान्यजातिवाचक व क्षुद्रार्थानें असल्यामुळें नात्याच्या म्हणजे मनुष्यवाचक नामांत तें लिंग सभवत नाहीं हें सांगावयास नको. ]

**३ अकारान्त पुल्लिंगी दोनतीन अक्षरांचीं नामें :**—मनुष्य व मनुष्येतर प्राणीवाचक अकारान्त दोनतीन अक्षरी नामांचें स्त्रीलिंगी रूप ई हा प्रत्यय लावून होते.

| पुल्लिंग | स्त्रीलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग |
|---|---|---|---|
| गोप | गोपी. | हस. | हसी. |
| तरुण. | तरुणी | सिंह | सिंही. |
| महिष. | महिषी. | व्याघ्र. | व्याघ्री. |
| हरीण. | हरिणी, हरणी. | देव. | देवी. |
| गाढव. | गाढवी. | शूद्र. | शूद्री. |
| उदीर. | उदरी. | दास. | दासी |
| बेडूक | बेडकी. | माकड | माकडी. |
| सांबर. | सांबरी. | मांजर. | मांजरी. |
| पोपट. | पोपटी. | मृग. | मृगी. |

[ यांतील पुष्कळसे शब्द संस्कृत असून तेथेंही ई हाच प्रत्यय लागून स्त्रीलिंग होतें. ]

**४ अकारान्त, ईकारान्त, ऊकारान्त, एकारान्त पुलिंगी नामें :–** अकारान्त, ईकारान्त, ऊकारान्त व एकारान्त नामांच्या पुल्लिंगास ईण लागून स्त्रीलिंगी नामे तयार होतात. पुढील तक्ता पाहा :—

| पुल्लिंगी | स्त्रीलिंगी | पुल्लिंगी | स्त्रीलिंगी |
|---|---|---|---|
| वाघ. | वाघीण. | सिंह. | सिंहीण |
| सुतार. | सुतारीण | तेली. | तेलीण. |
| गवळी. | गवळीण, गवळण | धोबी. | धोबीण. |
| भट | भटीण | रेगे. | रेगीण |
| वागळे. | वागळण. | दामले | दामलीण |
| देशपांडे. | देशपांडीण | परीट. | परटीण, परिटीण. |
| व्याही. | विहीण. | शिक्षक | शिक्षकीण |
| सबनीस. | सबनिशीण | तांबोळी. | तांबोळीण-ळण |
| बुरुड. | बुरडीण, बुरुडीण | पाटील. | पाटलीण |
| चिटणीस | चिटनिशीण-नीशीण. | वकील | वकीलिण,वकिलीण. |
| नवरा | नवरी | नवरे (आडनांव) | नवरेबाई, नवरण |

[ ईण प्रत्ययाच्या ऐवजीं आडनांवासबधीं 'बाई' हा शब्द लागतो. वागळेबाई, रेगेबाई इ० वाघ आड नाव असतां वाघीण न म्हणतां वाघबाई असेंच म्हणावयाचे. ]

कांहीं थोडयाशा शब्दांस ईण च्या आणि ( संस्कृत आनि, आणि ) हा प्रत्ययही लावण्यांत येतो. पुढील तक्ता पाहा :—

| पुलिंग | स्त्रीलिंग |
|---|---|
| शेट. | शेटाणी |
| मेहतर. | मेहतराणी. |
| इंद्र. | इंद्राणि |
| भव. | भवानी. |
| मृड. | मृडानि. |
| मोंगल. | मोंगलाणी. |

[ लिंग रूपें बनविणाऱ्या प्रत्ययापूर्वी होणारे फेरफार, पूर्वरूप, पररूप वगैरे संधि होतात. ह्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. ]

५ मराठींत इतर भाषांप्रमाणें पुल्लिंगापासून स्त्रीलिंगाचीं रूपें अगदीं भिन्न असतात. पुढील तक्ता पाहा :—

| पुल्लिंग | स्त्रीलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग |
|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री. | रेडा. | म्हैस. |
| नवरा. | बायको. | नर. | मादी. |
| बाप. | आई. | भाऊ. | बहीण. |
| वर | वधू | दीर. | जाऊ. |
| बैल. | गाय | पिता. | माता. |
| मोर. | लांडोर. | वडील. | मातोश्री. |
| उट. | सांड. | खोंड. | कालवड. |
| पुत्र. | कन्या. | वाघ्या. | मुरळी. |
| बोका. | भाटी. | राजा. | राणी. |
| बोकड. | शेळी. | भाऊ. | भावजय. |

[ हे शब्द निराळेच असण्याचीं कारणें अनेक आहेत. एक कारण हे शब्द निरनिराळ्या भाषांतून आलेले आहेत. मोर हा संस्कृतांतून आलेला शब्द आहे. तर लांडोर हा फारशी भाषेंतील शब्द आहे. साहेब हा फारशी भाषेंतील शब्द आहे. तर मडम हा इंग्रेजी भाषेंतील शब्द आहे. माता, पिता हे दोन्ही शब्द संस्कृतांतच वेगळे आहेत. ]

६ पुष्कळशीं स्त्रीलिंगी रूपें संस्कृतांतून जशींच्या तशीं मराठींत आलीं आहेत. पुढील तक्ता पाहा:—

| पुल्लिंग | स्त्रीलिंग | पुल्लिंग | स्त्रीलिंग |
|---|---|---|---|
| राजा. | राज्ञी. | कर्ता. | कर्त्री. |
| युवा. | युवती. | धाता. | धात्री. |
| भगवान्. | भगवती. | दाता. | दात्री. |
| विद्वान्. | विदुषी. | कवि. | कवियित्री. |
| श्रीमान्. | श्रीमती. | बाल. | बाला. |
| श्वा. | शुनी. | अन्य | अन्या. |

## २ वचन—विकरण.

**७ वचन—विकरण** :—वचन हें लिंगांतच गुरफटलेलें असतें व एकवचन तर त्या त्या अन्ता व लिंगानुसार मूळ प्रातिपदिक, म्हणजे रूप फक्त अनेकवचनाचें होतें.

८ आकारान्त पुल्लिंगी नामाचें अनेकवचन ए प्रत्यय लागून पररूप संधीनें होतें. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| आंबा. | आंबे. | पिता. | पिते |
| रस्ता. | रस्ते. | आत्मा. | आत्मे |
| कुत्रा | कुत्रे. | चद्रमा | चद्रमे |

[ दादा, काका, आजोबा वगैरे आकारान्त पुल्लिंगी नात्याच्या नामांचे अनेकवचन तेच होतें ]

९ आकारान्ताशिवाय इतर सर्व पुल्लिंगी शब्दांचीं अनेकवचनी रूपे.

| अन्त | एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|---|
| अकारान्त | दिवस | दिवस. | खाब | खाब |
| इकारान्त. | कवि. | कवि. | भू[illegible]त. | भूपति |
| उकारान्त | हेतु | हेतू. | शत्रु. | शत्रु |
| ऊकारान्त. | लाडू. | लाडू. | गडू. | गडू. |
| ओकारान्त | टाहो. | टाहो | डोहो. | डोहो. |

१० अकारान्त स्त्रीलिंगी नामें :—यांचीं अनेकवचनें तीन प्रकारांनीं होतात. कांहीचे अनेकवचन ईकारान्त होते आणि कांहींचें अनेकवचन दोन्हीं प्रकारांनीं होते. पुढील तक्ता पाहा :—

| प्रकार पहिला | | प्रकार दुसरा | | प्रकार तिसरा | |
|---|---|---|---|---|---|
| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
| आत. | आता. | भिंत | भिंती. | झेप. | झेपा, झेंपी. |
| माळ. | माळा | कुऱ्हाड | कुऱ्हाडी. | मशाल. | मशाली, मशाला |
| खारीक | खारका. | पगत. | पगती. | परवाल. | परवाली, परवाला |
| शिंप | शिंपा. | कोळीण. | [illegible] | परात. | पराती, पराता. |

११ आकारान्त, इकारान्त, उकारान्त व कांहीं ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें एक व अनेकवचनी सारखीं असतात. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| विद्या | विद्या. | गोपी. | गोपी |
| आज्ञा. | आज्ञा. | देवी | देवी |
| मति | मति. | चमू | चमू |
| बुद्धि. | बुद्धि. | वधू. | वधू. |
| धेनु. | धेनु | शेपू | शेपू |

१२ ईकारान्त स्त्रीलिंगी नामें :—ईकारान्त स्त्रीलिंगी नामाचें रूप आ प्रत्यय लागून सरळ संधि होऊन याकारान्त होतें. ज्या नामांचे अन्त्याक्षर ई आहे, त्यांचे यान्त रूप विकल्पानें होते. एक अक्षरी स्त्रीलिंगी नामांपैकी बी आणि स्त्री यांचे बिया आणि स्त्रिया असे एकवचन रूप अनेकवचनी होतें. बाकीच्यांची रूपें दोन विकल्पांत होतात. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| नदी | नद्या | बेडकी. | बेडक्या. |
| काठी. | काठ्या. | साडी | साड्या |
| आई. | आई, आया | समई. | समया. |
| बाई. | बाई, बाया | आवई | आवई, आवया. |
| बी. | बिया. | राई | राई, राया |
| स्त्री. | स्त्रिया | सवई. | सवई, सवया. |
| धी | धिया | ऱ्ही | ऱ्हिया. |

१३ ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें :—कांही ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांस अनेकवचनी आ हा प्रत्यय लागून अन्तींच्या ऊ स कधीं अव् व बहुधा उव असे आदेश होतात. कित्येकांस अव् हा आदेश विकल्पानें होतो. आणि ह्या रूपांतील उपान्त्य अ हा स्वर विकल्पानें लुप्त होतो. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| धू | धुवा. | चिरू | चिरवा, चिर्वा |
| ऊ. | उवा. | टाळू. | टाळू, टाळवा, टाळ्वा |
| सासू. | सासू, सास्वा, सासवा | बाजू | बाजू, बाजवा, बाज्वा |
| जाऊ | जाऊ, जावा | जळू | जाळू, जळवा, जळ्वा. |
| पिसू | पिसू, पिसवा, पिस्वा | पेळू | पेळू, पेळवा, पेळ्वा. |
| वाळू | वाळू, वाळवा, वाळ्वा | दुरु | दुरवा, दुर्वा |

**१४ ऋकारान्त, एकारान्त व ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें :**—हीं वास्तविक आकारान्त, अकारान्त व यकारान्त असल्यामुळें त्यांचीं अनेकवचनें तशीं होतात. ओकारान्त स्त्रीलिंगी नामांचे अनेकवचन आ प्रत्यय लागून होते. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| मातृ ( माता ) | माता | स्वसृ ( स्वसा ) | स्वसा. |
| आते | आता | सवै, सवै. | सवया. |
| ( वन्से ) | वन्से, वन्सा | तिवै, तिवय. | तिवया. |
| पै, पै, पय. | पै, पया | गै, गय. | गया. |
| बायको | बायका. | खै, खय. | खै, खया. |
| ढबो | ढबो. | ताटको. | ताटको. |

**१५ नपुंसकलिंगी अनेकवचन :**—अकारान्त नपुंसकलिंगी नामांचें अनेकवचन एकारान्त होतें. ईकारान्त नपुंसकलिंगी नामाच्या अनेकवचनांत ईच्या जागी य असा आदेश होतो. ऊकारान्त नपुंसकलिंगी नामांचे अनेकवचन एकारान्त होते. परंतु कांही शब्दांस अन्त्य ऊ नाहींसा होतो. आणि कांहींमध्यें त्या ऊस अव् किंवा व् असा आदेश होतो. ऊकारान्त नपुंसकलिंगी नामांपैकीं कांहीं नामांची रूपें या दोन्हीं प्रकारांनीं होतात. एकारान्त नपुंसकलिंगी नामें अनेकवचनांत ईकारान्त होतात. पुढील तक्ता पाहा :—

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| मोतीं. | मोत्यें. | मिरीं. | मिरें. |
| दहीं | दह्यें. | बी | बियें. ( अनियमित ) |
| कैंबरीं. | कैंबऱ्यें | पाणी. | पाण्यें. |
| लेंकरू. | लेंकरें. | वासरू. | वासरें. |
| पाखरू. | पाखरें. | लिंबू | लिंबें |
| तारू. | तारवें, तार्वे. | आसू | आसवें, आस्वे |
| अळू. | अळवें, अळ्वें. | कुकू | कुकवे, कुक्वे |
| कुसू. | कुसवे, कुसे, कुसवें. | सुकाणू. | सुकाणे, सुकाण्वें, सुकाणवे. |
| तळें | तळीं. | घोसाळें. | घोसाळीं. |
| मडकें. | मडकीं. | कुत्रें | कुत्रीं. |

[ 'तारूं' या नामाच्या अनेकवचनासबधीं **दामल्यांनीं दादोबांचा** खरपूस समाचार घेणारी पुढील टीका केली आहे. "या वैकल्पिक अनेकवचनासबधीं दादोबा म्हणतातः—तारवे, आसवें, गळवे याप्रमाणें रूपें लिहिण्याचा फार परिपाठ आहे पण तो व्याकरणरीतीनें शुद्ध नाहीं. त्याचे मते, "जसे काठी, सासू ह्याचीं अनेकवचनी काठ्या, सास्वा अशीं रूपें होतात. तसें याच नियमास अनुसरले असता मोती, मिरीं याचीं मोत्ये मिऱ्ये अशींच रूपें लिहिलीं पाहिजेत. आणि हाच नियम ऊकारान्त नपुसक-लिंगी नामांस लावून तार्वे, आसवें, गळ्वे अशींच रूपें लिहावीं ' परतु तारवें, आसवे, गळवे अशीं रूपें लिहिण्याचा 'फार परिपाठ' आहे तर तुम्हीं वैयाकरण त्यास अशुद्ध ठरविणारे कोण ? तुम्हीं या रूपांस फार तर वैकल्पिक अथवा अपवादक किंवा अनि-यमित म्हणा. पण कोणत्याही शिष्टसमत प्रचलित प्रयोगास अशुद्ध ठरविण्याचा तुम्हास अधिकार नाहीं. तो अधिकार बळेंच बळकावून तुम्हीं गाजवूं लागल्यास तुम्हास जर कोणीं मानले नाहीं तर त्याचा दोष तुम्हाकडेच आहे 'मीं आंघोळ केलें.' या प्रयोगावर तुम्हीं अशुद्धतेचा भक्कम व स्पष्ट ठसा जरी कित्येक वर्षांपासून मारिला आहे, तरी लोकांनीं त्यास बहिष्कार घातल्याचे कोठेंच दिसत नाहीं उलट प्रयोगशरणाः वैयाकरणाः हें तत्त्व विसरून तुम्हीं आपल्या अधिकाराच्या मर्यादेचे उल्लघन करून भलताच अधिकार गाजवूं लागल्यामुळे तुमचेंच हसे होत आहे यापुढे तरी मराठी वैयाकरणांनीं आपले व्यर्थ हसे करून घेण्याचे मार्गास लागू नये. भाषेच्या शुद्धाशुद्धते-सबधानें देण्याचा अधिकार वैयाकरणांचा नसून शिष्टसांप्रदायाचा आहे, हे आणखी एकवार पुकारून पुढें जाऊं " यापूर्वी **दादोबांनीं** 'गहूं' असें रूप 'गहू' याबद्दल लिहावें अशी सूचना केली त्यावेळीं अशाच अर्थाचे उद्गार **दामल्यांनीं** काढले आहेत.

मनाच्या निराळ्याच अवस्थेंत असतांना **दामल्यांनीं** याच बाबतीत **दादोबांचें** कसें कसें समर्थन केलें तेंही पाहण्यासारखें आहे. "दादोबा आपल्या मोठ्या व्याक-रणाच्या दुसऱ्या आवृत्तींत म्हणतात, 'इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितकें साधेल

तितकें करून, आजपावेतो तिला नियमांत आणण्याविषयीं कोणी प्रयत्नच केला नाहीं. म्हणोन अत्यंत विस्खलित झालेली व व्याकरणरूप फणीनें जिला कोणी विंचरलें नाहीं म्हणोन जींत अनेक ग्रंथी जमून फारच गुतलेली आहे अशी जी ही मराठी भाषा तिला कांहींतरी नियमांत आणावी, आणि दीर्घकाल ग्रथित जी तिची गुंत ती हातीं घेऊन तिचे पदर सोडवून कांहींतरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी. आतां हें कार्य मीं कसें व कोठपर्यंत सिद्धीस नेलें याचा विचार करणें सूज्ञांकडे आहे.' हें दादोबांनीं सन १८५० त लिहिले त्यांच्या व्याकरणाची पहिली आवृत्ति सन १८३६ त प्रसिद्ध झाली तीस आज पाऊणशें वर्षें झालीं. त्यावेळीं व्याकरण लिहिण्याचा उद्देश व आज व्याकरण लिहिण्याचा उद्देश एक असूं शकणार नाहीं. हें ध्यानांत ठेवलें म्हणजे अमुक शुद्ध व अमुक अशुद्ध, अमुक ग्राह्य अमुक अग्राह्य असे जें अमुक ठिकाणीं शेरे मारलेले आढळतात ते केवळ अस्थानी होत असें म्हणवत नाही. त्या शेऱ्यांनीं आपलें काम बऱ्याच स्थळीं केलें आहे. व त्यामुळेच आज मराठी भाषेस कांहीं स्थैर्य प्राप्त झालें आहे व तें दिवसेदिवस वाढत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं तात्पर्य इतकेंच कीं, आरंभींच्या वैयाकरणांचा भाषाप्रचार संग्रह व व्यवस्था हाच उद्देश नसतो तर भाषेला योग्य वळण लागून तिला स्थैर्य यावें म्हणून कांहीं प्रयोगांवर आपल्या अभिप्रायाचा छाप मारणे वावगे नाहीं. तथापि यासही मर्यादा आहेच. ती मर्यादा नक्कीं ठरविणे व शब्दांनीं व्यक्त करणे फारच कठीण आहे. तथापि ती मर्यादा बहुतांशीं सामान्य शिष्टप्रचार ही होय असें म्हणण्यास हरकत नाहीं 'प्रयोगशरणा. वैयाकरणा.' या म्हणींतही प्रयोग शब्दामागे शिष्ट हा शब्द अध्याऱ्हत समजला पाहिजे. आतां शिष्टप्रचार तरी कसा ठरवावयाचा हा एक बिकट प्रश्न आहे. त्याचे निःसंशय व पूर्णपणें समाधानकारक उत्तर देतांच येत नाहीं म्हणूनच वरील मर्यादा जराशी अव्यक्त म्हणजे अधुक आहे असें म्हटलें पाहिजे. ही अव्यक्त मर्यादा नेहमीं साफ न दिसल्यामुळे तिचे कांही कांहीं स्थळीं आरभींच व्याकरणकारांनीं आपल्या कर्तव्यकर्माच्या भरांत उल्लंघन केले असल्यामुळें त्या त्या स्थळीं त्यास तात्पुरता दोष देणें भाग पडते यामुळे त्यांच्या एकदर कृतीबद्दल आमचा आदर नष्ट होणे शक्य नाहीं हें उघड आहे."

**दामल्यां**च्या वरील दोन उताऱ्यात दीडशे पानाचे अन्तर आहे. अर्थात् पहिला उतारा हा बेछुट टीकेचा एक मासला आहे तर दुसरा उतारा हा त्याचेंच एक प्रकारचे खंडण आहे. हे खंडणही धरसोडीचें असून आपण वेळोवेळीं जो दोष पूर्ववैयाकरणांस विशेषत. **दादोबां**स दिला तो अपरिहार्य होता असेही त्यांनीं ध्वनित केले आहे. **दादोबां**प्रमाणे पाऊणशे ( दामल्याच्या पूर्वीं ) व्याकरणकार किंवा त्यानंतर पन्नास वर्षांनीं आपले शास्त्रीय व्याकरण लिहिणारे **जोशी** किंवा त्याच्याहीनंतर पंचवीस वर्षांनीं आपलें शास्त्रीय व्याकरण लिहिणारे **दामले** यांचे किंवा कोणत्याही एकप्रकारचे कार्य करणारे कोणीही याचे हेतु **सर्वस्वी** सारखे असणें शक्य नाहीं हे **दामले**

म्हणतात त्याप्रमाणें उघड आहे पण **बाळशास्त्र्यां**पासून **दामल्यां**पर्यंत सर्वांचा मुख्य हेतु एकच होता म्हणजे **दादोबां**चा शुद्ध कसे बोलावे व शुद्ध कसे लिहावें हा हेतु होता. तोच **दामल्यां**नीं निराळ्या शब्दात म्हणजे बोलण्याच्या किंवा लिहिण्याच्या कामीं मार्गदर्शन असा सांगितला आहे. म्हणजे शुद्धाशुद्ध, ग्राह्याग्राह्य इत्यादि गोष्टींवर केवळ आरभीचे व्याकरणकारच भर देत असत ही गोष्ट खरी नसून **जोशी, दामले** वगैरेनीही त्यानाच महत्त्व दिले होते तसेच प्रचारसग्रह, भाषेचें स्थैर्य इत्यादिकांचा व व्याकरणाचा तादृश सबध नाहीं, असे जरी आमचें ठाम मत आहे तरी **जांभेकरां**पासून **दामल्यां**पर्यंत सर्वांपुढेंच हे हेतु होते. कारण त्यांचें व्याकरणशास्त्राचें क्षेत्र **पाणीनीय** व्याकरणाइतकें विस्तृत होतें. म्हणजे त्यांत व्युत्पत्ति, उच्चार इत्यादि अन्य शास्त्रांचा समावेश होत होता. तेव्हां यासबधींहि आरभींचे व्याकरणकारच अधिक काळजी बाळगीत होते असे म्हणतां येत नाहीं अर्थात् पूर्वीच्या व्याकरणकारांनाच हे हेतु अभिप्रेत होते हें म्हणणें खरें नाहीं. तेव्हा पूर्वीच्या व्याकरणकारांनीं दिलेले शेरे अस्थानीं नाहींत असें गुळमळीत मत प्रस्थापित करण्याससुद्धां ते समर्थ नाहींत. म्हणून त्यांचे शेरे अगदीं अस्थानीं होते हे दाखविण्यास ते अयथार्थ, तर्कदुष्ट होते असेंच कांहीं कारण दाखविले पाहिजे. अप्राप्त वचन तें **दादोबा, दामले,** प्रस्तुत लेखक किंवा प्रत्यक्ष **बृहस्पती**चे असले तरी त्याची कदर कोणीही करणार नाहीं

शिवाय त्यांची 'प्रयोगशरणा वैयाकरणा'ची मळमळ होतीच. तीही **दामल्यां**नीं ओकून टाकून आपल्या अर्धवट समर्थनावर बोळा फिरवला आहे **दामल्यां**नी या व्याकरणकारावर शेरा देण्याच्या कामीं एक मर्यादा घातली आहे ती म्हणजे सामान्य शिष्टाचार पण ही मर्यादा अतिशय अधुक, अस्पष्ट, शब्दांनीं व्यक्त न करतां येण्याजोगी आहे असें तेच कबूल करतात. मग अशी मर्यादा खरोखरच आहे याला प्रमाण काय ? आणि त्याविषयीं सशय जरी असला तरी, इतरांस ती न पाळण्याबद्दल दोष देण्याचा अधिकार त्यांना कसा आला ? पुनः शिष्टप्रचार कसा समजावा हा प्रश्न बिकट आहे असें ते म्हणतात. याचे उत्तर देणें त्यांना कां कठीण पडावे ' पण 'आम्हीं आंघोळ केलों.' इत्यादि प्रयोग करून त्यांनाच चिकटून बसणारे सोमेगोमे ह्यांची शिष्टांत गणना केल्यामुळें त्यांच्यावर ही आपत्ति कोसळली आहे शिष्ट म्हणजे न्यायशास्त्रप्रणीत 'आप्त' असें गृहित धरलें म्हणजे हा प्रश्न सहज सुटतो. 'आप्त' याची व्याख्या 'यथार्थ वक्ता पुरुष.' अशी आहे. आणि भाषेच्या बाबतींत असे आप्त किंवा शिष्ट व्युत्पत्ति, व्याकरण इत्यादि शास्त्रांच्या अभ्यासकांशिवाय दुसरे कोण असणार ? आज अशाच लोकांची समिती नेमून हे प्रश्न ठरविण्यांत येतात. 'गहू' या शब्दवरच्या अनुस्वाराचेंच नव्हे तर इतर पुष्कळ अनुस्वारांचें या समितीनें उच्चाटन केलें आहे 'आंघोळ केलो' हा प्रयोग ( usage ) रत्नागिरींतील 'मी खल्लीं' या प्रयोगाप्रमाणें कोठच्या कोठें दडी मारून बसला. सारांश हंसे व्हावयाचें तें अप्राप्त बोलण्यानें होते. हेंही अप्राप्त वचन दीडशें पानांच्या

अन्तरानें लिहिलें तर पचतें, पण तेंच एका परिच्छेदाच्या किंवा पांचदहा ओळींच्या अंतरानें लिहिलें म्हणजे अगाशीं येते, ही गोष्ट सर्व लेखन कामाठ्यांनीं लक्षांत ठेवली पाहिजे.

लिंगाप्रमाणें वचन हा भागही तो एक विकार कल्पून आम्ही चर्चिला आहे. म्हणून प्रत्ययाना-हे प्रत्यय तद्धित म्हणजे आदिम आहेत. व क्वचित् शब्दाला महत्त्व दिलें आहे. संधि वगैरे फेरफार पूर्वी सांगितलेच आहेत ते येथें गृहित धरले आहेत अर्थात् व्युत्पत्तीला बेताचें महत्त्व दिलें आहे. पण प्रबंधनदृष्ट्या मुळींच विचार केला नाहीं.]

———

# अध्याय दुसरा.

## विभक्तिविकरण.

**१ लिंग व वचन** :—हे विकार नामांच्या विभक्तिविकारांतच विलीन झालेले असतात. तेव्हां विभक्तिविकारांचीं रूपें सांगतांना लिंग व वचन रूपांची प्रथमा विभक्तींत पुनरावृत्ति होते. लिंग हें अन्तावर अवलंबून असतें. तेव्हां अन्त, लिंग व सामान्यरूप सांगून एकेक प्रकारचा शब्द चालवून दाखविला म्हणजे झाले. अनेकवचनांच्या रूपावर अनुस्वार असतो. हा सामान्य नियम आहे.

### १ पुल्लिंगी नामें.

**२ अकारान्त पुल्लिंगी नामें** :—सामान्यरूप दोन्ही वचनीं 'आ.'

### १ दिवस.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | दिवसास, दिवसाला, दिवसातें. | दिवसास, दिवसांना, दिवसांला, दिवसांतें. |
| तृतीया. | दिवसाने, दिवसाशीं | दिवसानीं, दिवसांहीं, दिवसांशीं |
| चतुर्थी. | दिवसास, दिवसाला, दिवसातें | दिवसांस, दिवसांला, दिवसांना, दिवसांते |
| पचमी | दिवसाहून | दिवसांहून. |
| सप्तमी | दिवसांत, दिवशीं. | दिवसांत, दिवशीं. |
| सबोधन. | दिवसा ( रे ) | दिवसांनो. |

**३ आकारान्त पुलिंगी नामें** :—सामान्यरूप दोन्ही वचनी 'या.'

### २ घोडा.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | घोड्यास, घोड्याला, घोड्याते. | घोड्यांस, घोड्याला, घोड्यांना, घोड्याते. |
| ततीया. | घोड्यानें, घोड्याशीं, घोडें. | घोड्यानीं, घोड्याही, घोड्याशीं. |
| चतुर्थी. | घोड्यास, घोड्याला, घोड्यातें. | घोड्यांस, घोड्यांला, घोड्याना, घोड्यांते. |
| पचमी. | घोड्याहून. | घोड्यांहून. |
| सप्तमी. | घोड्यात. | घोड्यांत |
| सबोधन. | घोड्या ( रे ) | घोड्यांनो. |

[ आजोबा, काका, बाबा वगैरे नात्याच्या शब्दांचे अनेकवचन एकवचनाप्रमाणेच असतें. एकवचनांत व अनेकवचनांत सामान्यरूप होत नाहीं. ]

### ३ आजोबा.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | आजोबास. | आजोबांस. |
| तृतीया. | आजोबानें, आजोबाशीं. | आजोबांनीं. |
| सबोधन. | आजोबा ( रे ) | आजोबांनो |

४ इकारान्त पुल्लिंगी नामें :—सामान्यरूप ई.

### ४ कवि.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | कवीस. | कवींस, कवीना |
| तृतीया | कवीनें, कवीशीं. | कवींनीं, कवींशीं-हीं |
| सबोधन | कवी ( रे ) | कवींनो. |

५ ईकारान्त पुल्लिंगी नामें :—एकवचन अनेकवचनासारखेच. सामान्यरूप होत नाहीं.

### ५ दर्जी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | दर्ज्यास, दर्ज्याला. | दर्ज्यांना |
| चतुर्थी. | दर्ज्याला स तें. | दर्ज्यांना-ला-स-तें |
| सप्तमी. | दर्ज्यांत | दर्ज्यांत |
| सबोधन | दर्ज्या ( रे ) | दर्ज्यांनो. |

[ हत्ती, जती, करी, दडी वगैरे सस्कृत इनन्त शब्दांची मराठी रूपें व वादी, प्रतिवादी, मोलवी, काजी वगैरे शब्द आणि पतोजी, मशालजी, मोची, काची वगैरे जी व ची अक्षरान्त नामाचें एकवचन व अनेकवचन सारखे व सामान्यरूपही होत नाहीं. ( दर्जी अपवाद ) ]

### ६ हत्ती.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | हत्तीला, हत्तीस,-ते. | हत्तींस—ना—तें—ला. |
| सबोधन | हत्ती ( रे ) | हत्तींनो |

### ७ मशालजी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतिया. | मशालजीनें-शीं. | मशालजींनीं-शीं-हीं. |
| सबोधन | मशालजी ( रे ) | मशालजींनो. |

### ८ काची.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| द्वितिया. | काचीतें, काचीला-स. | काचींना-स-ला-ते |
| तृतोया | काचीनें-काचीशी | काचींनीं, काचींशीं. |

[ मोची हें ची अक्षरान्त नाम दोन्ही रीतींनीं चालतें. ]

**६ उकारान्त पुल्लिंगी नामें** :—एकवचन, अनेकवचन सारखेंच. सामान्यरूप दीर्घ ' ऊ '.

### ९ हेतु.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया. | हेतूनें-शीं. | हेतूंनी-शा-ही. |
| सबोवन. | हेतू ( रे ) | हेतूंनो |

[ हे सर्व शब्द सस्कृतच आहेत. केवळ मराठी असा ' हतुतू ' हा एकच शब्द आहे. ]

**७ ऊकारान्त पुल्लिंगी नामें** :—याचें एकवचन अनेकवचनासारखें असतें. यांत सामान्यरूपाचा फेरफार होत नाही. यापैकी ' गंहू ' व ' भाऊ ' ( नातें या अर्थी ) नामांस ' वा ' असें सामान्यरूप होते. लाडू, नारू, साडू, काडू, विंचू, नात ( नातें दाखविणारा ) या शब्दांची तीन रूपें होतात. एका रूपांत सामान्यरूप होत नाहीं. एकांत वा किंवा अवा अशीं सामान्यरूपें होतात. यांतील एकाक्षरी ' पू ' या शब्दाचे पुवा असे सामान्यरूप होतें.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया. | बोरूनें-शीं. | बोरूनीं-शीं. |
| सबोधन | बोरू ( रे ). | बोरूनो. |

१० गंहू—भाऊ.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया. | गऱ्हाने-शीं, भावानें. | गऱ्हाशीं-नीं, भावानीं. |
| सबोधन. | गऱ्हा ( रे ), भावा ( रे ). | गऱ्हांनो, भावानो |

[ **दादोबां**च्या सूचनेप्रमाणे आम्हीं हा शब्द 'गहू' असा, न घेतां, 'गह्रू' असा घेतला आहे. यासबधींही **दामले** यानीं बरेंच अकाडतांडव केले आहे. पण येथें त्याचा फारसा विचार करावयास नको ]

११ साडू.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया | साड्वाने, साडवाने | साड्वांनीं, साडवांनीं. |
| सबोधन. | साड्वा, साडवा, ( रे ) | साड्वांनो, साडवांनो. |

१२ पू.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया | पुवाने-शीं. | पुवानीं-शीं. |
| सबोधन. | पुवा ( रे ) | पुवांनो. |

[ इतर शब्द , रू इ० ]

८ एकारान्त पुलिंगी नामें :—याचें एकवचन अनेकवचन सारखेंच होतें. सामान्यरूप 'या'.

१३ देशपांडे.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| द्विතिया. | देशपांड्यास-ला-तें. | देशपांड्यांना-ला-तें. |
| सबोधन. | देशपांड्या ( रे ). | देशपांड्यांनो. |

९ **ओकारान्त पुल्लिंगी शब्द** :—एकवचन अनेकवचन सारखेंच. सामान्यरूप होत नाहीं.

### १४ टाहो.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | टाहोनें–शीं. | टाहोनीं–हीं–शीं. |
| संबोधन. | टाहो ( रे ) | टाहोनीं |

[ या प्रकारचे दुसरे शब्द लाहो, डोहो इ. ]

१० **औकारान्त पुल्लिंगी शब्द** :—याची औकारान्ताशिवाय अकारान्त व ऊकारान्त अशीं आणखी दोन रूपें आहेत. या तिहींत एकवचनाप्रमाणेंच अनेकवचन असते. सामान्यरूप औकारान्तास व ऊकारान्तास नसते. पण अकारान्त ‘ आ ’ असें असतें.

### १५ पौ.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | पौ, पऊ, पव. | पौ, पऊ, पव |
| तृतीया | पौनें–पऊनें–पवानें | पौनी, पऊनीं, पवानीं |
| संबोधन | पौ, पऊ, पवा ( रे ). | पौनो, पऊनो पवानो |

## २ स्त्रीलिंगी नामें.

११ **अकारान्त स्त्रीलिंगी नामें** :—यांचे दोन प्रकार आहेत. एकांत अनेकवचन **ई** प्रत्यय लागून होते. जसें–भिंत, भिंती. यांत सामान्यरूप ‘ ई ’. दुसऱ्या प्रकारात अनेकवचन **आ** प्रत्यय लागून होते. जसें–वाट, वाटा. यात एकवचनाचे सामान्यरूप ‘ आ ’ असे होते. जसें–वाटेने, वाटांनी. ‘ तलवार ’ इ. शब्द ह्या दोन्ही प्रकारांत येतात.

### १ भिंत.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | भितीनें–शी. | भितींनीं–शीं. |
| पंचमी. | भितीहून. | भितीहून. |
| संबोधन | भिंती ( गे ). | भिंतींनीं. |

## २ वाट.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया. | वाटेनें-शीं | वाटांनीं-हीं-शीं. |
| सबोधन | वाटे ( गे ). | वाटांनो |

## ३ तरवार.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया | तरवारीनें, तरवारेने | तरवारींनीं, तरवारांनीं |
| पचमी. | तरवारीहून, तरवारेहून. | तरवारींहून, तरवारांहून. |
| सप्तमी. | तरवारींत, तरवारेंत. | तरवारींत, तरवारांतें. |
| सबोधन. | तरवारे ( गे ) | तरवारांनो. |

१२ स्त्रीलिंगी आकारान्त नामें:—हीं बहुधा संस्कृतांतून आलेलीं असतात. प्रथमेचें अनेकवचन एकवचनासारखेंच. एकवचनांत सामान्यरूप 'ए', अनेकवचनात नाहीं. रमासारख्या विशेषनामांचे सामान्यरूप होत नाही.

## ४ शाळा.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया | शाळेनें-शाळेशीं. | शाळानीं-शाळांहीं-शीं. |
| सबोधन | शाळे ( गे ). | शाळांनो. |

## ५ रमा.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| तृतीया. | रमानें-शीं | रमांनीं-शी-हीं. |
| सबोधन | रमा ( गे ) | रमांनो. |

१३ स्त्रीलिंगी इकारान्त नामें:—हीं बहुतेक संस्कृतांतून आलीं आहेत. प्रथमेचे अनेकवचन एकवचनाप्रमाणें. सामान्यरूप 'ई.'

### ६ मति.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | मतीनें–शीं. | मतींनीं–शीं–हीं. |
| सबोधन. | मती ( गे ). | मतींनो |

**१४ स्त्रीलिंगी ईकारान्त शब्द** :—यांत कांही शब्दांचे अनेकवचन एकवचनासारखेच होते व सामान्यरूप होत नाही. पुष्कळशा शब्दांचें अनेकवचन 'या' हा प्रत्यय लागून होते. सामान्यरूप एकवचनांत होत नाहीं. पण अनेकवचनांत होतें. 'बी' आणि 'स्त्री' या दोन शब्दांचें **इये** असे सामान्यरूप होते. 'आई' हा शब्द बहुमानार्थी असला तर त्याचें अनेकवचन एकवचनाप्रमाणेच असते व सामान्यरूप होत नाही. एकवचनांत सामान्यरूप होत नाही अनेकवचनांत होते.

### ७ नारी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | नारीनें–शीं. | नारींनीं–हीं–शीं. |
| सबोधन | नारी ( गे ). | नारींनो |

### ८ नदी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | नदीनें–शीं. | नद्यांनीं–हीं–शीं. |
| सबोधन. | नदी ( गे ). | नद्यांनो |

### ९ स्त्री–बी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया | बीनें, स्त्रीनें, बियेनें, स्त्रियेनें. | बियांनीं, स्त्रियानीं. |
| सबोधन. | बिये, स्त्रिये, बी, स्त्री ( गे ). | बियांनो, स्त्रियांनो. |

## १० आई.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया.<br>संबोधन. | आईने—शीं<br>आई ( गे ) | आईनीं, आयानीं.<br>आईनो, आयांनो. |

१५ ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें:—हीं बहुतेक संस्कृतांतूनच आलीं आहेत. अनेकवचन एकवचनासारखे. सामान्यरूप ' ऊ '.

## ११ धेनु.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया.<br>संबोधन | धेनूने, धेनूशीं.<br>धेनू ( गे ). | धेनूनी—शीं—हीं.<br>धेनूनो |

१६ ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें:—यांपैकीं बहुतेकांच्या अनेकवचनांत फरक होत नाही. कांहींचे अनेकवचन **वा** आणि **अवा** असें आणखी विकल्पाने होतें. तर कांहींचें **वा** असेंच विकल्पानें होते म्हणजे पहिल्या प्रकारांत तीन रूपें झालीं तर दुसऱ्यांत दोन रूपें होतात. एकाक्षरी शब्दांत **उवा** असा आदेश अनेकवचनांत होतो. ' पिसू ' हा शब्द वैकल्पिक आहे. त्याची अनेकवचनाचीं चार रूपें होतात. सामान्यरूप एकवचनांत व, **अवे**, **उवे** अशी होतात तर अनेकवचनांत **अवा**, **वा**, **अ** अशींही आढळतात.

## १२ सासू.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया.<br>संबोधन. | सास्वेने, सासवेने, सासूनें.<br>सासू, सास्वे, सासवे ( गे ). | सास्वांनीं, सासवांनो, सासूनीं.<br>सासूनो, सास्वांनो, सासवानो. |

## १३ जाऊ.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया<br>संबोधन | जाऊने, जावेनें.<br>जाऊ, जावे ( गे ). | जाऊनीं, जावांनी.<br>जाऊनो, जावांनो. |

## १४ धू.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया | धुवेनें-शीं. | धुवांनीं-शीं. |
| सबोधन | धुवे ( गे ) | धुवांनो. |

[ ऊ हा शब्द सामान्यरूप न होतांही चालतो. ]

## १५ पिसू.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | पिसेने-पिसेनें इ | पिसानीं-पिस्वानीं इ |
| सबोधन. | पिसू, पिसे, पिस्वे, पिसवे ( गे ). | पिसूनो, पिसानो, पिस्वांनो, पिसवांनो |

१७.एकारान्त व ऐकारान्त स्त्रीलिंगी नामें:—यांतील दोन्ही शब्द 'आते' व 'सवे' हे 'आत' व 'सवय' हेच असल्याकारणानें अनेकवचन 'आता' व 'सवया' असे होतें. सामान्यरूप एकवचनांत होत नाहीं. तर अनेकवचनांत-या ( सवया ) असें होतें. ऐकारान्त स्त्रीलिंगी नामाचीं आणखी अकारान्त व इकारान्त रूपें आढळतात. ईकारान्ताचें अनेकवचन एकवचनापासून निराळें नाहीं. अकारान्त शब्द 'वाट' ह्या शब्दासारखाच चालतो.

## १६ सवे.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया | सवेनें-शीं. | सवयानीं-शीं. |
| सबोधन. | सवे ( गे ) | सवयांनो. |

## १७ आते.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | आतेनें-शीं. | आतांनीं-शीं. |
| सबोधन. | आते ( गे ). | आतांनो |

## १८ तिवै.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | तिवैनें, तिवईनें, तिवयेनें | तिवयांनीं. |
| सबोधन | तिवै, तिवई, तिवये ( गे ) | तिवयांनो. |

## १९ पै.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया<br>सबोधन. | } बाकीचीं तिवैप्रमाणें. | |

**१८ ओकारान्त स्त्रीलिंगी शब्द** :—यांत अनेकवचनांत आ असा आदेश होतो. अनेकवचनांत सामान्यरूपही तेंच आहे.

## २० बायको.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया | बायकोनें–शीं. | बायकानीं–शीं. |
| संबोधन | बायको ( गे ) | बायकानो. |

[ ढबो व ताटको असे दोन प्रचारातून गेलेले शब्द या प्रकारांत येतात स्त्रीलिंगी सर्वनामाचा प्रत्यय सबोधनांत ' गे ' असतो. ]

## ३ नपुंसकलिंगी नामें.

**१९ नपुंसकलिंगी अकारान्त नामें** :—अनेकवचन ' ए ' प्रत्यय व अनुनासिक बिंदू. बाकी सर्व विभक्ति पुल्लिंगी अकारान्ताप्रमाणे.

## १ घर.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | घरानें–शीं | घरांनीं–शीं. |
| सबोधन. | घरा ( गो ). | घरांनो. |

**२० ईकारान्त नपुंसकलिंगी नामें** :—आकारान्त व इकारान्त नपुंसकलिंगी नामें मराठींत नाहींत. ईकारान्त नामाचें प्रथमेचें अनेकवचन

'ये' कारान्त असतें. बाकीचीं रूपें पुल्लिंगी ईकारान्त 'तेली' या नामाप्रमाणें 'बी' या शब्दास अनेकवचनी व सामान्यरूपांत 'इया' आदेश होतो.

### २ पाणी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया | पाण्यानें-शीं. | पाण्यांनीं-शीं |
| सबोधन. | पाण्या ( गो ) | पाण्यांनो |

### ३ बीं.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | बियानें-शीं. | बियानीं-शीं |
| सबोधन. | बिया ( गो ) | बियांनो |

२३ ऊकारान्त नपुंसकलिंगी नामें:—यांचे अनेकवचन एकारान्त असतें. व वर अनुस्वार असतो. बाकीच्या विभक्तीत अकारान्ताप्रमाणें सामान्यरूप आ होतें. कुसूं, जिन्नाणूं, सुकाणूं याशिवाय दोन रीतींनीं चालतात. त्याची एक व अनेकवचनाचीं रूपें पूर्वी दिलींच आहेत.

### ४ वासरूं.

| विभक्त | कवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | वासरानें-शीं | वासरांनीं-शीं |
| सबोधन | वासरा ( गो ) | वासरांनो. |

### ५ सुकाणूं.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | सुकाणानें, सुकण्वानें, सुकाणवानें. | सुकाणांनीं,-ण्वांनीं-णवांनीं. |
| सबोधन. | सुकाणा, सुकाणवा, सुकाण्वा (गो) | सुकाणूनो, सुकाणवांनु, सुकाण्वांनु |

**२२ एकारान्त नपुंसकलिंगी नामें** :—यांत अनेकवचन पूर्वी सांगितल्याप्रमाणें इकारान्त असतें व अन्तीं अनुस्वार असतो. बाकीचीं रूपें आकारान्त पुल्लिंगी शब्द घोडा याप्रमाणें.

**६ तळें.**

| वभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीया. | तळ्यानें-शीं | तळ्यांनीं-शी-हीं. |
| सबोधन | तळ्या ( गो ) | तळ्यांनो. |

[ सबोधनांत गो हा लुप्त प्रत्यय नपुसलिंगांत असतो. ]

## ४ सर्वनामांची विभक्ति.

**२३ सर्वनामांचीं अनेकवचनें** :—हीं पुढे दिलीं आहेत. यांवरून प्रथमेच्या एकवचनाची व अनेकवचनाची कल्पना होईल.

| एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|---|
| मी | आम्ही. | आपण. | आपण |
| तू | तुम्ही | स्वता | स्वता. |
| तो, ती, ते | ते, त्या, तीं | कोण. | कोण |
| जो, जी, जें | जे, ज्या, जी | काय | काय |

**२४ मी व तूं यांच्या विभक्ति** :—वरील सर्वनामांपैकीं मी व तूं सर्वनामांचीं रूपे अनियमित आहेत म्हणून पुढे दिली आहेत.

**१ मी.**

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | मला, मस, ( मज ) माते | आम्हास, आम्हाला, आम्हांते. |
| तृतीया. | मीं, म्या, मशीं, मजशीं. | आम्हीं, आम्हाशीं. |
| चतुर्थी | —द्वितियेप्रमाणे.— | |
| पचमी. | मजहून, माझ्याहून. | आम्हाहून, आमच्याहून. |
| सप्तमी. | माझ्यात | आम्हांत, आमच्यांत |

[ प्रा. **कोलत्यांनीं** 'मीनें' असें जें रूप प्रचलित करण्याचा प्रयत्न चालविला आहे, त्याला व्याकरणदृष्ट्या कोणत्या हरकती आहेत तें दाखविणें युक्त होईल. येथें

अनुस्वार हा तृतीयेचा प्रत्यय आहे. नेहमींचा नें प्रत्यय येथें यावयाचा नाहीं. हा प्रत्यय एकवचनांत काढला व त्याऐवजीं 'ने' योजला तर अनेकवचनांतही 'नीं' असा प्रत्यय देऊन 'आम्हीनों' असें रूप करावें लागेल व असें रूप वऱ्हाडाकडेसुद्धां नाहीं. 'तू' या सर्वनामाचें देखील 'तू' असेंच तृतीयेचें एकवचनी रूप होतें. 'मीने' हें रूप स्वीकारलें तर 'तूनें' व 'तुम्हींनी' हींही रूपें स्वीकारलीं पाहिजेत. शेवटीं हें रूप हिंदुस्तानी 'मैंने' या रूपापासून आलें व तें वऱ्हांडातच नव्हे तर ठाण्याभिवडीकडील गुजराती व मुसलमानही योजतात इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे.]

## २ तूं.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | तुला, तूस, तुज-ला, तुते. | तुम्हांस-ला-तें. |
| तृतीया. | तूं, त्वा, तुशीं, तुझ्याशीं, तुजशीं, तुझ्याते. | तुम्हीं, तुम्हाशीं. |
| चतुर्थी. | — द्वितिये प्रमाणे — | |
| पचमी | तुझ्याहून. | तुम्हांहून, तुमच्याहून. |
| सप्तमी. | तुझ्यांत | तुम्हांत, तुमच्यांत |

**२५ तो, जो, हा ह्यांचीं तिन्हींलिंगीं रूपें:**—हीं सर्वनामें तो, ती, ते; जो, जी, जे; हा, ही, हे अशी आहेत. यांपैकी जो, तो, हा ही अकारान्त पुल्लिंगी घोडा या नामाप्रमाणे चालतात. यांना द्वितियेत व चतुर्थीत सामान्यरूपानंतर 'ज' हा आगम होतो. ती, ती, ही ही नदी या नामाप्रमाणें चालतात. एकवचनांत ई विकल्पानें ऱ्हस्व होते. जसे तिला, हिला, जिला. ती व ही यांच्या द्वितियेपुढे व चतुर्थीपुढे 'ज' आगम होतो. तें, जे, हें ही सर्वनामें एकवचनांत तळे या नपुंसकलिंगी नामाप्रमाणें होतात.

## ३ तो–जो.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | त्याला, त्याजला, ज्याला. | त्यांना, ज्यांना, ज्यातें, त्यांनें. |
| तृतीया. | त्यानें, ज्यानें. | त्यांनीं, ज्यांनीं. |
| पचमी. | त्याहून. ज्याहून. | त्यांहून, ज्यांहून. |

## ४ ती–जी.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | तिला, तिजला, जिला. | त्यांना, त्यांजला. |
| तृतीया. | तिनें, जिनें. | त्यांनीं. |
| पचमो | तिहून, जिहून | त्यांहून |

## ५ तें–जें.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | त्याला, त्याजला, ज्याला. | त्यांना, त्यांजला, ज्यांना. |
| तृतीया | त्यानें, ज्यानें. | त्यांनीं, ज्यांनीं. |

## ६ हा.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | याला, ह्याला, याजला. | यांनीं, ह्यांनीं |
| पचमी. | याहून, ह्याहून. | यांहून, ह्यांहून. |

## ७ ही.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | हिला, हिस, हिजला. | ह्यांना, ह्यास. |
| तृतीया. | हिनें, हिशीं. | ह्यांनीं, ह्यांशीं, यांशीं. |

## ८ हें.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | ह्याला, याजला, याला. | ह्याना, यांना. |
| पचमी | ह्याहून, याहून | ह्यांहून, यांहून. |

२६ आपण, स्वता, कोण, काय यांच्या विभक्ति :—आपण, कोण, काय यांच्या विभक्ति अकारान्त पुल्लिंगी दिवस या नामाप्रमाणें. स्वता आजोबा या अकारान्त नामाप्रमाणें. काय याचें सामान्यरूप ‘ कशा ’ असें होतें.

### ९ कोण—आपण.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | कोणाला, कोणास. | कोणांला, कोणांस. |
| तृतीया. | कोणीं, कोणाशीं | कोणीं, कोणांशीं |

[ कोणी हे तृतीयेचे दोन्हीवचनी स्वतंत्र रूप आहे ]

### १० स्वता.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया. | स्वता, स्वताशीं. | स्वता, स्वताशीं |
| पचमी | स्वताहून | स्वताहून. |

### ११ काय.

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| द्वितिया | कशाला, कशास | कशास, कशाना |
| चतुर्थी | कशास, कशाला | कशांस, कशांला |

**२७ प्रत्ययाभाव विभक्ति :**—कवितेत केव्हां द्वितिया, चतुर्थी यांची प्रत्ययविरहीत रूपे योजतात. अशा प्रसंगी त्या विभक्तीस प्रत्ययाभाव विभक्ति असे म्हणनात. जसे—‘ **जड जीवा** काम तुझे परिपाळी, ‘ **रामा** वन **भरता** सिंहासन देईन, ’ इ.

[ **दामल्यांनी** हीं उदाहरणे दिलीं आहेत पण **प्रत्ययाभाव** विभक्ति अशी सांगितली नाहीं ‘ फक्त सामान्यरूप होतें असें सांगितले आहे. आमच्या नव्या व्यवस्थे-प्रमाणे सामान्यरूपासारखा फेरफार शब्दपरिस्फोटाच्या दृष्टीनेच सांगतां येईल. परतु पदस्फोटाच्या दृष्टीनेच विभक्तीसारख्या प्रकाराचें व्याकरण सांगितलें पाहिजे व म्हणूनच प्रत्ययाभाव विभक्ति हा प्रकार कल्पिला आहे. प्रत्यायाभाव विभक्ति नामाप्रमाणें सर्व-नामाचीही होते उदा० **आम्हां** गरिबांना कोण विचारतो. ]

### ५ विशेषणाची विभक्ति.

**२८ नामाप्रमाणें योजलेली विशेषणाची विभक्ति :**—विशेषणे विशेष्याप्रमाणें म्हणजे नामाप्रमाणें योजलीं म्हणजे त्याचें विभक्तिकार्य

नामाप्रमाणेच होते. जसें :–‘ मला गरिबास कोण विचारतो ?’ ‘नावडतीला कोण विचारतो ?’ इ०.

**२९ प्रत्ययाभाव विशेषण विभक्ति :**–संकृतांत विशेषणाची विभक्ति पुढील नामाचे प्रत्यय लागून होते. मराठींत प्रत्ययाचा लोप होऊन, विशेषण सामान्य स्वरूपांतच राहतें. अशा प्रसंगीं विशेषणाची प्रत्ययाभाव विभक्ति म्हणून सांगावी. उदा०–**काळ्या** माणसानें येथे येऊंच नये असें त्यांचे म्हणणे आहे. या ठिकाणीं ‘ काळा ’ विशेषणाची प्रत्ययाभाव तृतीया आहे.

[ आतापर्यंत ‘ पुढील सविभक्तिक शब्दाच्या योगाने सामान्यरूप ’ असें व्याकरण सांगण्याची वहिवाट होती प्रत्ययाभाव विभक्ति कां सांगावी हे पूर्वी नाम विभक्तिसबधीं सागतांना सांगितलेच आहे. तेव्हां त्याची पुनरुक्ति करण्याचे कारण नाहीं. शब्दयोगी योगानेंही विभक्ति होते येथेंही मागील विशेषणाचें व्याकरण वरप्रमाणेंच सांगावे. जसे–‘ मोहरलेल्या आंब्यावर कोकीळ होता ’ येथे मोहरलेल्या हे आंब्यावर याशीं सविभक्तिक. प्रत्ययाभाव विभक्ति ]

**३० सप्रत्यय विशेषण विभक्ति :**—संस्कृतांत विशेषणास पुढील नामाप्रमाणें विभक्तिप्रत्यय लागतात. मराठींतही कवितेत अशा प्रकारचीं प्रत्यय लागलेली रूपें आढळतात. जसें–मोर पत्रे विचित्रे, हुतावहार्पित खांडवाने पांडवाने, प्राज्ञें पुरुषें इ० अशावेळीं विशेषणाची प्रथमा, तृतीया वगैरे विभक्ति सांगावी.

# अध्याय तिसरा.

## काळ व अर्थविकरण.

### १ काळविकरण.

**१ वर्तमानकाळाचीं रूपें :**—धातूस वर्तमानकाळाचे प्रत्यय लागून वर्तमानकाळाची रूपें होतात. कांहीं धातूंचीं रूपें अनियमित असतात. पुढील तक्ता पाहा :—

१ धातु : पड ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) पडतो-ते-ते | ( आम्ही ) पडतो. |
| द्वितिय. | ( तू ) पडतोस-तेस, तेस | ( तुम्ही ) पडता. |
| तृतीय | ( तो, ती, तें ) पडतो-ते-ते | ( ते, त्या, तीं ) पडतात. |

२ धातु : अस ( साह्य ) ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) असतो-तें-तें | ( आम्ही ) असतो. |
| द्वितिय. | ( तू ) असतोस-तेस-तेंस | ( तुम्ही ) असता. |
| तृतीय. | ( तो, ती, तें )असतो-ते-तें | ( ते, त्या, तीं ) असतात |

३ धातुः अस ( अकर्मक ) अनियमित रूपें.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) आहें | ( आम्ही ) आहो |
| द्वितिय | ( तू ) आहेस. | ( तुम्ही ) आहा. |
| तृतीय. | ( तो, ती, तें, ) आहे | ( ते, त्या, तीं ) आहेत. |

४ धातुः अस ( अकर्मक ) दुसरीं अनियमित रूपें.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) होय. | ( आम्ही ) होय. |
| द्वितिय. | ( तू ) होस. | ( तुम्ही ) व्हा |
| तृतीय. | ( तो, ती, ते ) होय. | ( ते, त्या, तीं ) होत. |

### ५ धातु: कर ( सकर्मक ) ‘ इ ’ आगम वैकल्पिक.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) करतो–करितो–तें–ते. | ( आम्ही ) करतो–करितों. |
| द्वितिय. | ( तू ) करतोस–करतेस–करितेस. | ( तुम्ही ) करतां–करितां |
| तृतीय. | ( तो, ती, तें ) करतो, करते–रितें. | ( ते, त्या, तीं ) करतात, करितात. |

**२ अपूर्ण वर्तमानकाळाचीं रूपें** :—धातूच्या वर्तमान कृदंतापुढें अस धातूचीं ‘ आहे ’ इ० अनियमित रूपें ठेवून अपूर्ण वर्तमानकाळाचीं रूपें सिद्ध होतात. पुढील तक्ता पाहा:—

### १ धातु : पड ( अकर्मक ) त–कृदंत.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) पडत आहें. | ( आम्ही ) पडत आहों |
| द्वितिय. | ( तू ) पडत आहेस. | ( तुम्ही ) पडत आहां |
| तृतीय | ( तो, ती, तें ) पडत आहे | ( ते, त्या, तीं ) पडत आहेत |

### २ धातु : कर ( सकर्मक ) ईतकृदंत.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) करीत आहें. | ( आम्ही ) करीत आहो. |
| द्वितिय. | ( तूं ) करीत आहेस. | ( तुम्ही ) करीत आहां. |
| तृतीय. | ( तो, ती, तें ) करीत आहे. | ( ते, त्या, तीं ) करीत आहेत |

**३ पूर्ण वर्तमानकाळाचीं रूपें** :—भूत कृदंतापुढे अस धातूचीं ‘ आहे ’ इत्यादि अनियमित रूपें ठेवून पूर्ण वर्तमानकाळाचीं रूपें सिद्ध होतात. पुढील तक्ते पाहा :—

### १ पड धातु ( अकर्मक ) कृदंत ( ला, लेला ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) पडलो, लें, लो, आहें | ( आम्ही ) पडलो आहो |
| द्वितिय. | ( तू ) पडला, ली, लें आहेस. | ( तुम्हीं ) पडलां आहां. |
| तृतीय. | ( तो, ती, तें ) पडला, ली, ले आहे | (ते, त्या, तीं ) पडले, ल्या, लीं आहेत. |

**टीप**:—लेला रूपें दिलीं नाहींत.

## २ कर धातु ( सकर्मक ) कृदंत ( ला, लेला ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय | ( मी ) केला, ली, लें आहें. | ( आम्ही ) केला, ली, लें आहे. |
| ,, | ( तू ) केला, ली, लें आहेस | ( तुम्ही ) केला, ली, ले आहे. |
| ,, | (त्याने, तिने, त्यानें) केला, ली, ले आहे | ( त्यांनीं ) केला, ली, लें आहे. |

[ येथे काहीं गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत ( १ ) 'आहे' हेंच साह्य क्रियापद सर्व ठिकाणीं आहे त्याचेंच अनेकवचन 'आहेत' असे अनेकवचनी केलें व ले, ल्या, लीं अशीं कृदतें केलीं तरी चालेल एकदरीत ही तृतीय पुरुषाचींच रूपें आहेत ( २ ) हा कर्मणिप्रयोग असल्यामुळे कर्माप्रमाणें लिग, वचन, पुरुष या बाबतींत क्रियापद फिरते. अर्थात् सर्वत्र वर सागितल्याप्रमाणे तृतीय पुरुषच घातला आहे येथे मीं, आम्हीं इत्यादींवर टिंबे देऊन तृतीया दाखविली आहे. ]

### ४ रीतिवर्तमानकाळाचीं रूपें :—

## १ धातु पड ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | नेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) पडत असतो, तें, ते. | ( आम्ही ) पडत असतो. |
| द्वितिय. | ( तू ) पडत असतोस, तेस, तेस. | ( तुम्ही ) पडत असतां. |
| तृतीय | (तो, ती, तें) पडत असतो, ते, ते | ( ते, त्या, ती ) पडत असतात. |

## २ धातु कर ( सकर्मक ) ईत कृदत.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) करीन असतो-ते-ते. | ( आम्ही ) करीत असतो. |
| द्वितिय. | ( तू ) करीत असतोस-तेस-तेस | ( तुम्ही ) करीत असता. |
| तृतीय | ( तो, ती, तें ) करीत असते-ते-ते | ( ते. त्या, ती ) करीत असतात |

**५ भूतकाळाचीं रूपें**:—भूतकाळाचीं रूपे धातूस भूतकाळाचे प्रत्यय लागून होतात. कांहीं क्रियापदांची भूतकाळाची रूपें अनियमित असतात.

## १ धातु पड ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) पडलों | ( आम्ही ) पडलो. |
| द्वितिया | ( तू ) पडलास | ( तुम्ही ) पडला. |
| तृतीय. | ( तो, ती, ते ) पडला, ली, लें | ( ते, त्या, तीं ) पडले, ल्या, लीं |

## २ धातु अस ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | ( मी ) असलों-ले-ले. | ( आम्ही ) असलों. |
| द्वितिय | ( तू ) असलास-लोस-लेंस | ( तम्ही ) असलां. |
| तृतीय. | ( तो, ती, ते ) असला-ली-लें | ( ते, त्या, तीं ) असले-ल्या-लीं. |

## ३ धातु अस ( अकर्मक ) अनियमित रूपें.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) होतो-ते-ते | ( आम्ही ) होतो. |
| द्वितिय | ( तू ) होतास-तोस-तेस. | ( तुम्ही ) होतां. |
| तृतीय | ( तो, ती, ते ) होता-ती-ते | ( ते, त्या, ती ) होते-त्या-ती. |

## ४ धातु शीक ( असर्मक-सकर्मक ) उमजगण.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) शिकलो, ले, ले | ( आम्ही ) शिकलो |
| द्वितिय. | ( तू ) शिकलास, लीस, लेस | ( तुम्ही ) शिकला |
| तृतीय | ( तो, ती, ते ) शिकला, ली ले | ( ते, त्या, तीं ) शिकले, ल्या, ली. |

## ५ धातु अस दुसरीं अनियमित रूपें.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | ( मी ) झालो, लें, ले | ( आम्ही ) झालो. |
| द्वितिय. | ( तू ) झालास, लीस, लेस | ( तुम्ही ) झाला. |
| ततीय | ( तो, ती, ते ) झाला, ली, लें | ( ते, त्या, तीं ) झाले, त्या, लीं. |

## ६ धातु कर ( सकर्मक ) ( ला-ले-लें कृदंत. )

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय | ( मी ) केला, ली, लें. | ( आम्ही ) केला, केली. |
| ,, | ( तू ) केलास, लीस, लेस. | ( तुम्ही ) केलां, ली, लें. |
| ,, | (त्यानें, तिनें, त्यानें) केला, ली, लें | ( त्यांनी ) केला, ली, लें. |

[ पूर्णवर्तमानकाळाप्रमाणें येथेंही कर्मणिप्रयोग असल्यामुळे सर्वत्र तृतीय पुरुष कर्माप्रमाणें आहे. याविषयीं सविस्तर तेथें सांगितलेंच आहे. ]

६ याशिवाय भूतकाळांत धातूचीं अनियमित रूपें होतात तीं पुढील तक्त्यांत दाखविलीं आहेत.

| धातु | अनियमित रूपें | धातु | अनियमित रूपें |
|---|---|---|---|
| सांग | सांगितला. | जा. | गेला. |
| माग. | मागितला | गा | गाईला |
| बघ. | बघितला. | म्हण | म्हटला, म्हणाला |
| घाल | घातला | खण | खटला, खणला |
| धू | धुतला | पळ | पळाला. |
| घे. | घेतला | हो | झाला, जाहला |
| ये. | आला | अस | होता |

७ अपूर्ण भूतकाळाचीं रूपें :—वर्तमान कृदंतापुढे 'आहे' ह्या साह्य क्रियापदाच्या भूतकाळाचे रूप ठेवून अपूर्ण भूतकाळाची रूपें करतात.

## १ धातु पड ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडत होतो. | आम्ही पडत होतो. |
| द्वितिय | तू पडत होतास | तुम्ही पडत होतां. |
| तृतीय | तो, ती, तें पडत होता-ती-ते | ते, त्या, तीं पडत होते-त्या-तीं |

## २ धातु कर ( सकर्मक ) ( इ आगम ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी करीत होतो | आम्हीं करीत होतो |
| द्वितिय. | तू करीत होतास. | तुम्ही करीत होता. |
| तृतीय. | तो, ती, तें करीत होता-ती-ते. | ते, त्या, तीं करीत होते-त्या-तीं. |

पूर्ण भूतकाळाचीं रूपें:—पूर्ण भूतकाळाची रूपें धातूच्या भूत कृदंतापुढे ( ला-लेला ) 'आहे' ह्या साह्य क्रियापदाचीं भूतकाळाचीं रूपें ठेवून होतात.

## १ धातु : पड (अकर्मक) (ला, लेला कृदंत).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडलो होतो. | आम्ही पडलो होतो. |
| द्वितिय. | तू पडला होतास | तुम्ही पडलां होतां. |
| तृतीय. | तो, ती, ते पडला-ली-लें होता-ती तें. | ते-त्या-तीं पडले-ल्या-लीं होते-त्या-तीं. |

## २ धातु : कर (सकर्मक) (ला-लेला कृदंत)

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय. | मी केला-ली-लें होता-ती-ते | आम्हीं केला-ली-लें-होता-ती-तें. |
| ,, | तू केला-ली-लें होता-ती-तें | तुम्हीं केलें होते |
| ,, | त्यानें-तिनें-त्यानें केला-ली लें होतें | त्यानीं केला-ली-ले होते |

[ येथेंही पूर्ण वर्तमान व भूतकाळाप्रमाणे कर्मणिप्रयोगांत लिंग कर्माप्रमाणें फिरतें असे दाखविलें केले-ल्या-ली अशीं रूपें वचनाप्रमाणेंही फिरतात हें दिसून येईल. येथेही शीक, पढ वगैरे अकर्मक-सकर्मक धातूचा कर्तरीप्रयोग होतो ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ]

९ **रीतिभूतकाळाचीं रूपें** :—हीं रूपें त्या काळाचे प्रत्यय लावून किंवा धातूच्या वर्तमान कृदंतापुढें अस धातूच्या रीतिभूतकाळाचीं रूपें ठेवून करतात. नुसत्या भूतकाळाचीं रूपेंही रीतिभूतकाळासाठीं वापरतात. पुढील तक्ते पाहा :—

## १ धातु : पड (अकर्मक).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडें. | आम्ही पडूं. |
| द्वितिय. | तू पडस | तुम्ही पडां. |
| तृतीय. | तो, ती, तें पडे. | ते, त्या, तीं पडत. |

## २ धातु : अस (अकर्मक).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी असे. | आम्ही असूं. |
| द्वितिय. | तू असस. | तुम्ही असां. |
| तृतीय. | तो, ती, ते, असे. | ते, त्या, तीं असत. |

### ३ धातु : पड ( अकर्मक ) ( वर्तमान कृदंतापुढें साह्य धातु अस. )

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी पडत असें. | आम्हीं पडत असूं. |
| द्वितिय | तू पडत असस. | तुम्ही पडत असां. |
| तृतीय. | तो, ती, तें पडत असे. | ते, त्या, तीं पडत असत. |

[ कवितेंत रीतिभूतकाळाचे कांहीं स्वतंत्र प्रत्यय असतात. त्याप्रमाणें रूपेंही निराळीं होतात. तीं पुढें दिलीं आहेत. ]

### १ धातु : कर ( सकर्मक ) ( पद्य रीतिभूतकाळ ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी करीं. | आम्ही करूं. |
| द्वितिय. | तू करीस. | तुम्हीं करां. |
| तृतीय. | तो, ती, तें करी. | ते, त्या, तीं करोत. |

[ आधुनिक गद्यांत साह्य क्रियापदाचा रीतिभूतकाळच योजतात या काळांतही रीतिवर्तमानकाळाप्रमाणें 'जा' व 'राहा' हे धातु योजतात जसें०—'करीत गेला' 'करीत राहिला.' 'पडत गेला.' 'पडत राहिला.' ]

**१० भविष्यकाळाचीं रूपें:**—भविष्यकाळाचीं रूपे धातूस भविष्यकाळाचे प्रत्यय लागून होतात. पुढील तक्ते पाहा :—

### १ धातु : पड ( अकर्मक ) ( एन, एल प्रत्यय ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडेन. | आम्ही पडूं. |
| द्वितिय. | तूं पडशील. | तुम्ही पडाल. |
| तृतीय | तो, ती, तें पडेल. | ते, त्या, तीं पडतील. |

[ एकाक्षरी स्वरान्त अकर्मक धातूस **ईन** व **ईल** हेच प्रत्यय लागतात. जसें—जाईन, देईन, जाईल, देईल. ]

### २ धातु : अस ( अकर्मक ) ( हो रूपें ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी होईन. | आम्ही होऊं. |
| द्वितिय. | तूं होशील. | तुम्ही व्हाल. |
| तृतीय | तो, ती, तें होईल | ते, त्या, तीं होतील. |

### ३ धातु : अस ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी असेन. | आम्हीं असूं. |
| द्वितिय. | तू असशील | तुम्हीं असाल. |
| तृतीय. | तो, ती, तें असेल | ते, त्या, तीं असतील |

### ४ धातु : कर ( सकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी करीन | आम्हीं करू |
| द्वितिय. | तू करशील | तुम्हीं कराल. |
| तृतीय | तो, ती, ते करील. | ते, त्या, तीं करतील |

११ अपूर्णभविष्यकाळाचीं रूपें :—धातूच्या वर्तमान कृदंता-पुढें अस धातूचीं भविष्यकाळाची रूपे ठेवलीं म्हणजे अपूर्ण भविष्यकाळ होतो. पुढील तक्ते पाहा :—

### १ धातु : पड ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडत असेन. | आम्ही पडत असू |
| द्वितिय. | तू पडत असशील. | तुम्ही पडत असाल. |
| तृतीय. | तो, ती, तें पडत असेल | ते, त्या, तीं पडत असतात. |

### २ धातु : कर ( सकर्मक ) ( ई कृदंत ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी करीत असेन. | आम्ही करीत असू |
| द्वितिय. | तू करीत असशील | तुम्ही करीत असाल |
| तृतीय. | तो, ती, ते करीत असेल. | ते, त्या, तीं करीत असतील. |

१२ पूर्ण भविष्यकाळाचीं रूपें :—धातूच्या भूतकृदंतापुढें भविष्यकाळचीं रूपें ठेवलीं म्हणजे पूर्णभविष्यकाळ होतो. पुढील तक्ते पाहा :—

### १ धातु : पड (अकर्मक) (ला, लेला कृदंत).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडला, ला, ले असेन | आम्ही पडलेले असू. |
| द्वितिय | तू पडला, ली, लें असशील | तुम्हीं पडला असाल. |
| तृतीय. | तो, ती, ते पडला, ली, लें असेल. | ते, त्या, तीं पडले, पडल्या, लीं असतील. |

### २ धातु : कर (सकर्मक) (ला, लेला कृदंत).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय. | मी केला, ला, लें असेन | आम्हीं केला, ली, लें असू. |
| ,, | तू केला, ला, लें असशील | तुम्हीं केला, ली, लें असाल. |
| ,, | त्यानें, तिने, त्यानी केला, ली, ले असेल | त्यानीं केला, केली, केलें असेल. |

[ पूर्ण वर्तमान, पूर्ण भूतकाळाप्रमाणें या काळांतही कर्मणिप्रयोग आहे अर्थात् तृतीय पुरुष तिन्ही रूपांत आहे वचनाचीं रूपें कर्माप्रमाणें बदलतील. लिंगाप्रमाणें फेरफार दाखविलाच आहे. पड, शीक वगैरे अकर्मक क्रियापदांचीं कर्तरीरूपें होतात ]

**१३ रीतिभविष्यकाळाचीं रूपें**—वर्तमान कृदंताप्रमाणें 'जा' किंवा 'राहा' धातूंची भविष्यकाळाचीं रूपें योजून रीतिभविष्यकाळ होतो. अस धातूचीं रूपें योजलीं तरी तो होतो. पण तीं व अपूर्ण भविष्यकाळाचीं रूपे सारखीं होतात.

### १ धातु : पड (अकर्मक).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी पडत जाईन, राहीन. | आम्ही पडत जाऊ, राहू. |
| द्वितिय. | तू पडत जाशील, राहशील. | तुम्ही पडत जाल, राहाल. |
| तृतीय. | तो, ती, तें पडत जाईल, राहील | ते, त्या, तीं पडत जातील, राहतील. |

### २ धातु : कर (सकर्मक) (ई आगम).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी करीत जाईन, राहीन. | आम्ही करित जाऊ–राहू. |
| द्वितिय. | तूं करीत जाशील, राहशील. | तुम्ही करित जाल रहाल. |
| तृतीय. | तो, ती, तें करीत जाईल, राहील. | ते, त्या, तीं करीत जातील, राहतील. |

[ रीतिकाळ हे एका दृष्टीने सयुक्तकाळ अर्थ आहेत. कारण रीति हा अर्थ आहे. शिवाय 'करीत जा.' "तुम्हीं करीत असावें." रीतीचा आज्ञा व विधि यांबरोबर सयोग होतो रीतिभूतकाळाचे स्वतत्र प्रत्यय नसते तर असे काळ मानणें योग्य किंवा काय असा प्रश्नच पडला असता. 'झाला' हें क्रियापद 'करितां' 'जाता' इत्यादि वर्तमान कृदतास जोडून सस्कृत परोक्ष भूतकाळही मराठींत अलिकडे करतात. जसें०–'जाता झाला' 'करिता झाला' इ० ]

**१४ गौण क्रियापदाचीं रूपें:**—ह्यापैकी कांही रूपे अनियमित असून सर्व काळात सांपडत नाहीत. त्यामुळें त्यांच्या बाबतीत प्रयोगाचा प्रश्नच उद्भवत नाही. तशीच काही अकरण रूप करण्यास साह्यभूत होतात. पुढील तक्त्यांत निरनिराळ्या गौण क्रियापदांची रूपे दाखविलीं आहेत.

## १ पाहिजे.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मा पाहिजे. | आम्ही पाहिजे. |
| द्वितिय | तू पाहिजेस. | तुम्ही पाहिजे. |
| तृतीय. | तो, ता, ते पाहिजे, ल | ते, त्या, तीं पाहिजेत, ल |

[ 'पाहिजे' हे रूप कर्त्याच्या तिन्हीं पुरुषात व दोन्हीं वचनात येईल 'पाहिजेल' हे भविष्यकाळासारखे दिसते पण पाहिजे व पाहिजेल यांत फरक नाहीं. साराश ह्या क्रियापदाचीं रूपे फक्त वर्तमानकाळाचीं असतात. ह्याचे काळ दाखवावयाचे असल तर त्याच्यापुढे अस धातूची त्या त्या काळाचीं रूपें पाहिजेत जसे–पाहिजे आहे–होते–असेल पाहिजे हे रूप सकर्मक धातूच्या भूतकाळाच्या रूपापुढे आले तर भावेप्रयोग होतो जसे०–'त्याने काम केले पाहिजे' 'त्याला गेलें पाहिजे' ]

## २ हवा.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी हवा, वा, वे. | आम्ही हवे |
| द्वितिय. | तूं हवा, वी, वे, स. | तुम्ही हवा, हवेत. |
| तृतीय. | तो, ती, तें हवा, वी, वें. | त्याना हवा, वी, वें. |

[ 'हवा' ह्या क्रियापदामध्ये एवढाच फरक आहे कीं, हवा याला लिंग, वचन हीं असतात. पाहिजेला लिंग, वचन नसल्यामुळे तेथें प्रयोग सागण्याची गरजच पडत नाहीं. ]

## ३ होय. तिन्ही लिंगीं समान.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी होय, होई. | आम्ही होऊ |
| द्वितिय. | तू होस. | तुम्ही व्हां, व्हा. |
| तृतीय. | तो, ती, तें होय, होई. | ते, त्या, तीं होति. |

## ४ नाहीं. ( आहेचें अकरणरूप ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी नाहीं. | आम्ही नाहीं |
| द्वितिय. | तू नाहींस. | तुम्ही नाहीं. |
| तृतीय. | तो, ती, तें नाहीं. | ते, त्या, तीं नाहींत |

## ५ नव्हे ( वर्तमानकाळ ) ( होयचें अकरणरूप ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी नव्हें. | आम्ही नव्हों, नहो. |
| द्वितिय. | तूं नव्हेस | तुम्ही नव्हां. |
| तृतीय. | तो, ती, तें नव्हे. | ते, त्या, तीं नव्हत. |

[ कवितेंत नोहें ( प्र. पु. ए. व. ), नोहे ( तृ. पु. ए. व.), नोहेत (तृ. पु. अ व.) आढळतात. ]

## ६ नव्हे ( भूतकाळ ) ( होचें अकरणरूप ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | नव्हतों, तें, तें. | आम्ही नव्हतों. |
| द्वितिय. | तूं नव्हतास, तीस, तेंस. | तुम्ही नव्हतां. |
| तृतीय. | तो, ती, तें नव्हता, ती, तें. | ते, त्या, तीं नव्हते, त्या, तीं. |

## ७ नको ( हवा किंवा पाहिजे धातूचें अकरणरूप ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी नको | आम्ही–नको. |
| द्वितिय. | तू नकोस. | तुम्ही नको–नकोत. |
| तृतीय. | तो, ती, तें नको. | ते, त्या, तीं नकोत. |

### ८ नलगे ( कर्तरी ) ( लागतें याचें अकरणरूप ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी नलगें. | आम्ही नलगों. |
| द्वितिय. | तू नलगस, नलगेस. | तुम्ही नलगां |
| तृतीय. | तो, ती, तें नलगे | ते, त्या, तीं नलगत, नलगेत |

## २ अर्थविकरण.

### १५ आज्ञार्थाचीं रूपें:—

१ जा धातु ( अकर्मक ) हीं रूपें आज्ञार्थाचे प्रत्यय लागून होतात.

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी जाऊ? | आम्हीं जाऊ? |
| द्वितिय. | ( तू ) जा | तुम्ही जा. |
| तृतीय | तो, ती, तें जावो | ते त्या, तीं जावोत. |

### २ धातु कर ( सकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी करू ! | आही करू ! |
| द्वितिय. | ( तू ) कर | तुम्ही करा |
| तृतीय. | तो. ती, तें करो. | ते, त्या, तीं करोत. |

**रीतिआज्ञार्थाचीं रूपें:**—आज्ञार्थी त इत वर्तमानकृदंतें घालून पुढें अस, जा व राहा धातूंचीं आज्ञार्थाचीं रूपें घालून रीतिरूपेंही करतात. पुढील तक्ता पाहा:—

### १ पड धातु ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडत असू ? | आम्ही पडत असू ? |
| द्वितिय. | तू पडत अस. | तुम्ही पडत असा. |
| तृतीय. | तो, ती, तें पडत असो. | ते, त्या, तीं पडत असोत |

जा, राहा धातूचीं रूपें ' पडत जा ' ' पडत राहा ' इ० होतील.

## २ कर धातु ( सकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी करीत असू ? | आम्हीं करीत असू ? |
| द्वितिय | ( तू ) करीत अस | तुम्ही करीत असा |
| तृतीय | तो, ती, ते करीत असो | ते, त्या, तीं करीत असोत |

[ 'जा' व 'राहा' प्रमाणे 'करीत जा', 'करीत रहा' अशी रूपें होतात. ]

१६ **विध्यर्थाचीं रूपें**:—हीं रूपें विध्यर्थाचे प्रत्यय लागून तयार होतात. पुढील तक्ते पाहा:—

## १ पड धातु ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम. | मी पडावा, वी, वें | आम्ही पडावें, व्या, वीं |
| द्वितिय | तू पडावास, वीस, वेंस | तुम्ही पडावेत, व्यात, वीत |
| तृतीय | तो, ती, तें पडावा, वी, वे | ते, त्या, तीं पडावेत, व्यात, वींत |

## २ पड धातु ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय | मीं पडावें. | आम्हीं पडावें |
| ,, | तू पडावें. | तुम्हीं पडावें |
| ,, | त्यानें, तिनें, त्यानें पडावें | त्यांनीं पडावें |

[ या ठिकाणीं **मी, आम्ही** यावर अनुस्वार देऊन तीं तृतीयात रूपें केलीं आहेत हें लक्षांत ठेवावें. ]

## ३ कर धातु ( सकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| तृतीय | मीं करावा, वी, वें. | आम्हीं करावा, वी, वें. |
| ,, | तू करावा, वी, वे | तुम्ही करावा, वी, वे |
| ,, | त्यानें, तिनें, त्यानें करावा, वी, वें. | त्यांनी करावा, वी, वे |

[ पूर्वीं सांगितल्याप्रमाणें येथेही कर्माच्या वचनाप्रमाणे फेरफार होईल म्हणजे करावे–व्या–वीं अशींही रूपें होतील. विध्यर्थाचींही पुढीलप्रमाणें अस, जा, राहा, या

साह्य धातूंचीं रीतिरूपें होतात पड धातु अकर्मक. पडत असावी-राहावा-जावा. कर धातु सकर्मक ( कर्मणि ) करीत असावा-वी-वें, राहावा-वी-वें ]

**१७ संकेतार्थाचीं रूपें** :—हीं रूपें संकेतार्थाचे प्रत्यय लागून होतात. पुढील तक्ते पाहा :—

### १ पड धातु ( अकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी पडतो, ते, त | आम्ही पडतो |
| द्वितिय. | तू पडतोस, तेस, तेस | तुम्ही पडता, तेत |
| तृतीय | तो, ती, ते पडता, ता, तें | ते, त्या, तीं पडते, त्या, तीं. |

### २ कर धातु ( सकर्मक ).

| पुरुष | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम | मी करतो, तें, ते | आम्ही करतो. |
| द्वितिय. | तू करतास, तेस, तेस | तुम्ही करता, करतेत |
| तृतीय | तो, ती, ते करता, ती, ते. | ते, त्या, ती करते, त्या, तीं |

**१८ संयुक्तकाळाचीं रूपें** :— ही रूपे काळाचीच असतात पण त्यांचो शक्यतो भाग पाडणें, सुरुवात करणे, परवानगी देणें अशांसारखे पोटअर्थही असतात. जसें :—करतां येते, आलें, येईल. करावें लागतें, लागलें, लागेल.

[ पाहिजे या गौण साह्य क्रियापदाचीं काळाचीं रूपें नाहींत. साह्य क्रियापदाच्या मागें त्या त्या धातूचीं भूतकाळीं रूपें घातलीं म्हणजे ही रूपें होतात. धातु अकर्मक असला तर भावे व सकर्मक असला तर कर्मणिरूपें असतात. ]

**१९ संयुक्त अर्थाचीं रूपें** :—हीं वास्तविक अर्थाचीं असतात असें त्यांच्या साह्य क्रियापदाच्या रूपांवरून दिसून येईल. करूं दे, पडूं द्यावें, करू देतास ? येथें काळाचा कांहींच संबंध नाहीं तर तिन्ही अर्थांचा पोटअर्थाशीं संबंध असतो.

[ पूर्वी आज्ञार्थ व विध्यर्थ यासबधों रीति या पोटअर्थाचीं रूपें सांगितलीं आहेत, तीं याच प्रकारचीं आहेत. ]

[ या अध्यायांत सर्व पूर्ण काळांत व भूतकाळांत क्रियापदांच्या रूपासंबधीं कर्तरि, कर्मणि, भावे असे उल्लेख केले आहेत वास्तविक असे उल्लेख प्रयोगप्रकरणीं करावयास हवेत. पण येथे ते 'प्रयोग' या सज्ञेचा उपयोग ( usage ) हा अर्थ धरून केले आहेत त्याप्रमाणे प्रत्यक्षतः उपयोगांत असणारीं क्रियापदाचीं रूपें दिलीं आहेत. व्याकरणदृष्ट्या तींच रूपें ग्राह्य असून अन्य रूपे चुकीचीं व अशुद्ध असें मानणें प्राप्त आहे. म्हणूनच 'तू श्लोक लिहिले आहेस', 'तिने मुलीला निजविली आहे,' 'मीं आंघोळ केलो.' ही रूपे पद्यात व गद्यांत प्रसिद्ध कवींनीं व लेखकांनीं योजलीं किंवा सामान्यत. कोणत्या तरी प्रदेशांत कोणत्या तरी प्रमुख जातींतील लोकांनीं योजलीं तरी तीं व्याकरणदृष्ट्या चुकीचीं आहेत असें म्हटल्याशिवाय गत्यतर नाहीं. 'प्रयोग शरणा वैयाकरणाः' या मताप्रमाणें जे जे प्रयोग भाषेत आढळतील ते वैयाकरणांनीं निमुटपणे घेतले पाहिजेत त्याना अमुक एक शुद्ध व अमुक एक अशुद्ध म्हणण्याचा अधिकार नाहीं असें **गुंजोकर** व **दामले** यांनीं आग्रहाने प्रतिपादलें आहे मात्र हे प्रयोग शिष्टानुमतेच ठरतात हें मत त्याना मान्य आहे पण हे शिष्ट कोण याविषयीं त्यानीं मूग गिळले आहेत याविषयीं आम्हीं पूर्वीं प्रसगानुसार चर्चा केली आहे पण आता या सबधी पूर्ण विचार करून निर्णय घेणें चांगलें

यासबधो **गुंजीकरांचें** म्हणणे पुढीलप्रमाणे आहे 'मराठी भाषेची परीक्षा' घेण्याचा जेथें जेथे प्रसग येतो तेथे तेथें बहुधा 'तू काम केलेस', 'तू उद्योग केलास' इत्यादि प्रयोग शुद्ध किंवा अशुद्ध असल्यास कां अशुद्ध ते कळवावे अशा प्रकारचे प्रश्न वारंवार येत असतात . परिक्षकांना 'हे प्रयोग अशुद्ध' असे उत्तर मिळाले पाहिजे कारण त्याचें म्हणणें असे असतें की, वरील वाक्यात **केलें, केला** व **लिहिलीं** हीं क्रियापदे लिंग, वचन व पुरुष या तिन्हीं गोष्टींनीं कर्माशीं अनुसरून आहेत. व त्यामुळें हा कर्मणीप्रयोग आहे कर्मे तृतीयपुरुषी आहेत व क्रियापदेहीतृतीय पुरुषीं आहेत असें असतां त्याच्यापुढें द्वितिय पुरुषवाचक 'स' हा प्रत्यय लावणे चुकीचे आहे. याकरितां हा प्रयोग रूढींत असला तरी व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहे. व प्रख्यात मोरोपत व वामन इत्यादि मराठी कवींनीं ही चूक जाणूनच बहुधा अशा प्रयोगामध्यें 'स' जोडलेला नाहीं. आतां याविषयी विचार करू. अमुक एक प्रयोग रूढींत आहे, परतु व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहे.' हे म्हणणे अगदीं अप्रशस्त आहे. व्याकरण म्हणजे काय? रूढीमध्ये जे प्रयोग असतील ते सिद्ध धरून त्यामध्यें जे अतर्गत नियम असतील ते उघड करणें. असे असतां रूढींत असलेला प्रयोग अशुद्ध याचा अर्थ काय? काहीं नाहीं. .परीक्षकांची जी शका असते कीं तृतीयपुरुषीं प्रयोग असतां त्याजवर पुनः आणखी 'स' कां लावावा? तिला उत्तर हेच कीं 'रूढी आहे म्हणून' पण हे व्याकरणाच्या नियमांत नाहीं त्यास काय करावें? तर अमुक एक नियम तुमच्या व्याकरणामध्यें लिहिलेला नाहीं, म्हणून त्याप्रमाणे तुम्हीं लिहू नका व बोलू नका म्हणून सांगणें हा मोठा जुलूम आहे. या करितां व्याकरणामध्यें हा नियम नसला तर घालावा आणि व्याकरण शुद्ध करावें.

यावर शंका निघेल, कीं अशा रीतीनें व्याकरणामध्यें नवीन नियम घातल्यानें घोटाळा होईल. या शकेला उत्तर हेंच कीं ज्यांची भाषा त्यांना जर तें मान्य आहेत तर ते घातले पाहिजेत. व्याकरणामध्यें घोटाळा होईल ही शका भाषा बोलणारे जे असतील त्यांच्यापुढें चालत नाहीं. असा प्रकार नसता तर आज संस्कृत व्याकरणामध्यें जे इतके अपवाद व प्रत्ययवाद, मतभेद इत्यादि गोष्टी झाल्या आहेत. त्या सर्व निघून गेल्या असत्या व अनेक ठिकाणीं असेच दुहेरी प्रत्यय लागलेले आहेत, ते सर्व रद्द पडले असते. आतां हीं रूपें खरीं ठरल्यावर ' केलेंन ', ' केलेनी ' इत्यादि रूपें कां खरीं ठरूं नयेत, असा प्रश्न उभा राहतो. हीं रूपे वरील रूपांमारखीं जर सर्व देशभर प्रसिद्ध असतीं, तर तींही मान्य करण्यास अडचण नव्हती. परतु यांची गोष्ट तशी नाहीं. हीं रूपें एकदेशीय होत. म्हणून सर्वमान्य रूपांच्या जोडीस तीं येऊ शकत नाहींत... ' केलेंस ', ' लिहिलींस ' इत्यादि रूपांचे व्याकरण कोणत्या रीतीनें व्हावें ? ही तर साधारण शका आहे तिचें निवारण झालें पाहिजे. ' केलेंस ', ' लिहिलींस ' इत्यादि रूपें मुळीं उत्पन्न होण्याचे कारण असें झाले कीं केलें, लिहिलीं इत्यादि क्रियापदे जरी कर्मणि आहेत, तरी त्याचा कर्ता ' तू ' हा शब्द तृतीयान्त असतांही प्रथमान्ताशीं त्याचे रूप समान असल्यामुळें व मराठीमध्ये सकर्मक क्रियापदाचीं भूतकाळीं व्यवहारोपयोगी कर्तरिरूपे बहुधा नसल्यामुळें हींच रूपें कर्तरीप्रयोगामध्यें योजण्याचा आमच्या लोकांचा हळूहळू कल होत जाऊन तृतीयपुरुषीं रूपे असतांही त्यावर पुनः द्वितिय पुरुषवाचक एकवचनी ' स ' व अनेकवचनी ' त ' हे प्रत्यय लागून कर्तरिसारखीं रूपें होऊं लागलीं. यामुळें ' तू काम केलेंस ' **यामध्यें वस्तुतः दोन प्रयोग मिसळले आहेत.** त्याचें पृथक्करण असें करतां येईल —

| **कर्मणी** | **कर्तरी** |
|---|---|
| ज्यानें काम केलें | तो तू आहेस. |
| किंवा तू काम केलें | असा आहेस. |

सारांश, ' केलेस ' हे रूप केले असा आहेस याबरोबर आहे. या गोष्टीकडे लक्ष दिलें असतां हीं रूपें अशुद्ध म्हणण्याचें कारण न पडता त्यांची व्यवस्थाही नीट होईल.'

**दामल्यांनीं** याविषयीं पुढीलप्रमाणें विवेचन केलें आहे. " या दोन्ही संकरांस दादोबा, गोडबोले इत्यादि पहिले मराठी वैयाकरण अशुद्ध म्हणतात. आणि असे प्रयोग कधींही योजू नयेत असे निषेधनियम घालतात. पण जोशीबोवादि अलिकडील वैयाकरणांचा अभिप्राय योग्य दिशेने बदललेला दिसतो ' त्यांना अशुद्ध असे जरी न म्हटलें तर चमत्कारिक असें नांव तर द्यावेच लागेल ' असें जोश्यानी आपल्या पुस्तकांत म्हटले आहे. दादोबादि आरभींच्या वैयाकरणांनीं सकीर्ण प्रयोग शिष्टजनांच्या भाषणांत येत असतांही त्यास अशुद्ध म्हटल्यामुळें त्या वैयाकरणांवर लोकमत बरेंच क्षुब्ध होऊन गेलें ( ! ) त्यामुळें अलिकडील वैयाकरणांनीं ह्या संकीर्ण प्रयोगाकडील आपला मोर्चा बदलेला हें योग्यच झालें तथापि ' हे प्रयोग मराठी भाषेची मूलभूत भाषा जी संस्कृत

भाषा तींतील वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून नसल्यामुळे × × × मराठी व्याकरण-कर्त्यांनीं त्यांचा संग्रह केला नाहीं असे दिसते ( चिपळूणकरांचे निबंध पृष्ठ २४४ ) या अवतरणावरून हे प्रयोग 'संस्कृत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून' नाहींत असें शास्त्रीबोवांचे मत दिसते. आणि हेंच मत सर्वत्र ग्राह्य झाल्यासारखेंही वाटतें तेव्हां त्यांत कितपत तथ्य आहे ते पाहू. ( १ ) **कर्तृकर्मसंकर** उदा 'तू मला लेखणी दिलीस' हा संकीर्ण प्रयोग आमच्या मते संस्कृत भाषेच्या वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरूनच आहे. 'त्वं मे लेखनी ददासि' म्हणजे 'तू मला लेखणी देतोस' हा कर्तरिप्रयोग होय 'त्वं मे लेखनीमददाः' किंवा 'त्वं मे लेखनी ददाथ' हा संस्कृतांतील भूतकाळाचा कर्तरिप्रयोग होय. परंतु **मराठी भाषेच्या प्रकृतिविशेषास** अनुसरून लाख्यातीं ( भूतकाळीं ) त्वा किंवा तू ( तृतीया ) 'मला लेखणी दिली' असा कर्मणिप्रयोग होतो. आणि तो वास्तविक 'त्वं मे लेखनीमददाः' या कर्तरिप्रयोगाचेच अर्थी येत असल्यामुळे त्यास प्रधानकर्तृक कर्मणि म्हणणे बरें, हें पूर्वी सांगितलेंच आहे हि मराठी भाषेतील अडचण का उत्पन्न झाली हें सांगणें कठीण नाहीं मराठींतील लाख्याताचे प्रत्यय ( भूतकाळाचे ) संस्कृतांतील आख्यात प्रत्ययांपासून निघाले नाहींत तर ते त प्रत्ययान्त कर्मणि व्ययी कृदंतापासून निघालेले आहेत यामुळेंच मराठींतील लाख्याताचे प्रत्यय लिंगाप्रमाणे बदलतात आणि लाख्यातात मराठींत कर्तरिप्रयोगाच्या जागीं स्वरूपतः कर्मणिप्रयोग होतो तेव्हां तू तृतीया किंवा त्वां मला लेखणी दिली हें वाक्य अर्थदृष्ट्या जरी 'त्वं मे लेखनीमददाः' किंवा 'लेखनी ददाथ' या संस्कृत कर्तरि वाक्याच्या तोलाचें आहे, तरी स्वरूपतः 'त्वया मे लेखनी दत्ता' या कर्मणि वाक्यास अनुरूप आहे. 'त्वया मे लेखनी दत्ता=त्वा मला लेखणी दिली' हें भाषादृष्ट्या अगदीं तंतोतंत आहे ( १ ) त्वया=त्वा, मे=मला, लेखनी=लेखणी, दत्ता=दिली या ठिकाणी दत्ता हे व्ययी कृदंत कर्मणि आहे. आणि त्यापासूनच दिली हें मराठींतील लाख्याताचे रूप निघालेले आहे आता 'त्वया मे लेखनी दत्ता' यांतील दत्त या व्ययी कृदंतास 'वत्' हा प्रत्यय लागून पुनः कर्तरि स्वरूप प्राप्त होतें म्हणजे दत्तवान् हे दत्त या मूढ कृदंताचें कर्तरि रूप होय. ह्याचा जर वरील वाक्यांत उपयोग केला तर ते पुन्हा 'त्वं मे लेखनी दत्तवान्' असें कर्तरि होतें. हें संस्कृत भाषाभिज्ञास माहित आहेच म्हणजे दत्त या कर्मणि कृदंतास वत् प्रत्यय लागून कर्तरि स्वरूप आल्यामुळें 'त्वया' ह्या तृतीयान्त कर्त्याच्या जागीं 'त्वम्' हा प्रथमान्त कर्ता व लेखनी या प्रथमान्त कर्माच्या जागीं लेखनी हें द्वितियान्त कर्म आलें याच संस्कृत वाक्यरचना पद्धतीस अनुसरून मराठींतील 'त्वां' किंवा 'तूं' ( तृतीया ) मला लेखणी दिली यांतील 'दिली' या कर्मणि आख्यातास स हा प्रत्यय लागून 'तू' ( या ठिकाणीं तृतीया जरी क्वचित् आढळली तरी ती प्रशस्त कां नव्हे हें यावरून कळेलच. ) मला लेखणी दिलीस असा मराठींत प्रयोग होऊं लागला. मराठींत द्वितिया व प्रथमा यांचें स्वरूप बहुधा एकच असल्यामुळें लेखणी या स्वरूपांत कांहीं बदल न होतां तो जशाचा तसाच राहिला यावरून 'तू मला लेखणी दिलीस'

हा मराठींतील संकीर्ण प्रयोग 'त्वं मे लेखनी दत्तवान्' या संस्कृत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून आहे, असें निर्विवाद सिद्ध होत नाहीं काय? आतां 'त्व मे लेखनी दत्तवान्' या प्रयोगास जर सस्कृत व्याकरणकार अशुद्ध किंवा चमत्कारिक यांपैकीं कांहींच नांव ठेवीत नाहीत, तर मराठींतील 'तू मला लेखणी दिलीस' या मराठींतील प्रयोगास दादोबांप्रमाणें अशुद्ध व जोशीबोवांप्रमाणें चमत्कारिक कां म्हणावें हें आम्हास समजत नाहीं...कर्मभाव सकर उदा. 'त्याने गोविंदाला स्टेशनावर पाठविला' हा प्रयोग मात्र वरील प्रयोगाप्रमाणें अगदीं सशास्त्र होय असें म्हणवत नाहीं. तथापि येथेंही एक विचार आहे. येथे साधारण नियमाप्रमाणे भावेप्रयोग व्हावा पण रूढीप्रमाणे कर्मणिप्रयोग होतो म्हणून यास कर्मभाव सकर असें म्हटलें आहे. **यास मात्र संस्कृत रचनेचा आधार नाहीं हें खरें आहे.** (पान ७८०–८३).

आणि कांही अशाच प्रयोगांसबधीं **दामले** पुढीलप्रमाणे अभिप्राय देतात. "कर आणि धू धातूचा कोकणस्थ लोकाचे भाषणांत कांहीं विशेष प्रसगीं मात्र कर्तरि प्रयोग होतो स्नान, सध्या, फराळ, आंघोळ हीं कर धातूचीं कर्मे असतां व अग किंवा अवयवदर्शक धू धातूचे कर असतां कर आणि धू या दोन धातूचा लाख्यातीं विकल्पानें कर्तरि प्रयोग होतो जसे —मी स्नान केलो किंवा त्यानें आघोळ केली तो हात, पाय, तोंड इ. धुतला किंवा त्यानें अग, हात, पाय इ. धुतले या प्रसगीं कर आणि धू या धातूचे हे कर्तरिप्रयोग एकदेशी होत यांत सशय नाहीं."

"(कांहीं वैयाकरणांच्या मतें कर धू धातूचे लाख्यातीं होणारें हें कर्तरिप्रयोग रूप अपवादक किंवा चुकीचें किंवा अशुद्ध होय. परतु शिष्ट सप्रदायाशिवाय शुद्धतेची दुसरी कसोटी जोपर्यंत प्रचलित भाषेच्या विषयांत सर्वसमत ठरलेली उपलब्ध नाहीं, तोपर्यंत व्याकरणाच्या साधारण नियमांच्या उल्लघनानें अशुद्धता सिद्ध होत नाहीं दुसरें असे कीं आचर धातूचा गण म्हणून एक वर्ग सर्व वैयाकरण मानीत आहेत. तर कर आणि धू धातूच्याच ते इतके विरुद्ध कां हें पाहिलें पाहिजे. त्याचें कारण कदाचित् असें असेल कीं कर आणि धू हे धातु आचरणान्त धातूप्रमाणें सर्वदा उपयोगांत नाहींत. तर त्यांत विशिष्ट प्रसगीं मात्र विशिष्ट कर्मे असतात तेव्हांच उपयोगांत येतात, हें विधान वर दिलेल्या तिसऱ्या अपवादांत सांगितल्याप्रमाणें खरें आहे. परंतु कांहीं धातु कांहीं प्रसगींच तशा प्रकारचे दिसत असले तर ते धातु त्याच प्रसगीं तशा प्रकारचे आहेत. अन्य प्रसगीं नाहींत असें म्हणण्यास वैयाकरणांची हरकत असण्याचें योग्य कारण नाहीं. तेव्हां या ठिकाणचें वैयाकरणाच्या विरोधास ह्याहूनही बलवत्तर कारण असलें पाहिजे. आणि तें असें दिसतें कीं 'कर' आणि 'धू' धातूचे हे प्रासगिक कर्तरिप्रयोग आचर गणांतील धातूच्या कर्तरिप्रयोगांप्रमाणें सर्व प्रकारच्या शिष्ट लोकांतच आढळत नाहींत तर शिष्ट कोंकणस्थांतच आढळतात. ही गोष्ट निर्विवाद आहे. परतु ते कोणत्यातरी शिष्टांस मान्य असल्यामुळें अशुद्ध या नांवास सर्वथा पात्र ठरत नाहींत. यामुळेंच या ग्रथांत त्यांस एकदेशी म्हटलें आहे.)"

प्रथम **गुंजीकरांच्या** आक्षेपांचा विचार करूं. यासंबंधीं आमचें स्वताचें मत परीक्षकांचें म्हणून जें मत **गुंजीकरांनीं** दिलें आहे त्यांत पूर्णपणें आलें आहे. याला **गुंजीकरांचें** उत्तर पुढीलप्रमाणें आहे. एखादा प्रयोग रूढींत असला तर तोच प्रयोग शुद्ध समजावयाचा. तो प्रयोग व्याकरणदृष्ट्या अशुद्ध म्हणणें अगदीं चुकीचें. कारण रूढीमध्यें जे प्रयोग असतात ते सिद्ध धरून त्यामध्यें जे अन्तर्गत नियम असतात ते उघड करणें हें व्याकरणाचें कार्य आहे. पाहिजे तर तुम्ही नवे नियम घालून व्याकरण बदला, पण रूढी बदलण्याचा अधिकार तुम्हा वैयाकरणांस नाहीं. **गुंजीक-रांचें** हे म्हणणें कितपत सयुक्तिक आहे तें पाहू.

प्रथमतः 'प्रयोग' या सञ्ज्ञेसबधीं **गुंजीकरांची** दिशाभूल झाली आहे हें सांगितलें पाहिजे. ह्या शब्दाचे दोन अर्थ आहेत ( १ ) शब्दाची योजना किंवा उपयोग ( usage ), ( २ ) व्याकरणातील कर्त्याच्या किंवा कर्माच्या लिंग, वचन, पुरुषा-प्रमाणे क्रियापदाची जुळणी असण्याची व्यवस्था **गुंजीकर** रूढींतला प्रयोगच स्वीका-रावा म्हणून सांगतात तेव्हां 'प्रयोग' ही सञ्ज्ञा ते पहिल्या अर्थानें योजतात व व्याकरणकार जेव्हां तो अशुद्ध म्हणून सांगतात तो दुसऱ्या अर्थानें. उदा० 'तू श्लोक लिहिलेस' 'त्याने मुलीला निजविली' यांतील 'लहिलेस' 'निजविली' ह्या शब्दयोजना व्याकरणांतील प्रयोग विषयक नियमान्या विरुद्ध आहेत. व म्हणून अशुद्ध व त्याज्य आहेत त्याच्या ऐवजीं 'लिहिले' 'निजविलें' अशीच कर्मणि, भावे प्रयोग यासब-धीच्या नियमास अनुसरून शब्दयोजना झाली पाहिजे या ठिकाणीं व्याकरणांतील नियम रूढीस अनुसरून बदला असें **गुंजीकरां**सारख्या शास्त्रज्ञानीं सांगावें ही आश्चर्याची गोष्ट आहे नियम बदलावयाचे ते बहुजनांच्या बोलण्यांत धेडगुजरी मिश्र किंवा सकर शब्दाच्या सोईसाठीं बदलावयाचे काय? मग गुजराथ्याकानड्याबरोबर बोलतांना आम्ही जी शब्दयोजना योजतो किंवा नाटक कादबऱ्यांत कुणबी, जगली बोलीचा किंवा गुजराथी, मद्रासी, मिशनरी बोली लिहितो तीही रूढींत आहे म्हणून व्याकरण-शुद्ध म्हणून स्वीकारली पाहिजे तसे रूढींत आहेत ते शब्द सिद्ध धरून चालावयाचे असें म्हणणेंही अयुक्तिक आहे. कारण बहुजनांचेच नव्हे श्रेष्ठजनांचेसुद्धां अनेक प्रमाद घडतात. ह्या प्रमादांचे अनुकरण 'यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेव इतरे जनाः' या न्यायानें बाकीचे सामान्य जन करतात. असें प्रयोग सिद्ध धरून चालावयाचे काय ? सामान्य नियमांस ते प्रतिकुल असले तर नियम बदलणें हें युक्त कीं तसे प्रयोग अजिबात टाकून देणें योग्य? आणि नियम बदलावयाचे ते संकराला उत्तेजन देण्यासाठीं बदला-वयाचे काय ? 'सकरो नरकायै' ही गोष्ट समाजाप्रमाणें भाषेसही लागू आहे ही गोष्ट **गुंजीकर** विसरले आहेत.

संस्कृतादि भाषेंत अपवाद विकल्पादि असतात. तसे ते मराठीमध्येंही कां असू नयेत या **गुंजीकरांच्या** कोटिक्रमास उत्तर हेंच कीं पाणिन्यादि व्याकरणकारांनीं वैदिक भाषेंतील शब्दांना धार्मिकदृष्ट्या महत्त्व देण्यासाठीं अभिजात भाषेंत ठेवून

घेतले होते, तोंच रूपें अपवाद व विकल्प म्हणून राहिलीं. त्या काळांत व्याकरणादि शास्त्रें वेदविद्येचीं केवळ अंगें उपांगें अशीं मानलीं जात. संस्कृताप्रमाणे आरबी, फारसी, ग्रीक, ल्याटिन, हेब्रू इत्यादि व्याकरणें धर्मग्रंथांच्या अर्थ व तदनुसार विधी यांच्या स्पष्टीकरणार्थ रचण्यांत आलीं होतीं. इंग्रेजी, फ्रेंच, रशियन इत्यादि आधुनिक भाषांतील व्याकरणांत असे अपवाद व विकल्प ठेवीत नाहींत. मराठीसारख्या आधुनिक भाषेंत असे अपवाद ठेवण्याची मुळींच जरूरी नाहीं आणि कोणत्या काळांतील, प्रदेशांतील, जातींतील मराठी अपवाद किंवा विकल्प ठेवावे हा प्रश्न येतोच. श्री. **चक्रधरा**पासून अगदीं **दामल्यां**पर्यंत भाषेत वरील तत्त्वानुसार नवे नवे प्रयोग आले व आजही प्रा **कोलत्यां**सारख्यांनीं नवीन प्रयोग भाषेत आणण्याची खटपट चालविली आहे. हे सर्वच प्रयोग रूढींत आहेत म्हणून सरसकट येऊ द्यावयाचे काय ? **गुंजी-करच** सांगतात कीं फलाण्या प्रकारचा लोकांचा कल आहे असा शास्त्रांत समत नसलेला बहुसंख्याकांचा कल चालू द्यावयाचा तर नियमन करणाऱ्या शास्त्रांची जरूरी काय ? आणि एकदां रूढीचेंच तत्त्व मान्य केलें तर मग फलाणा प्रयोग एकदेशी आहे असा आक्षेप घेण्यात अर्थ काय ? तो रूढींत आहे मग तो कोठेही कोणत्याही जातींत असो, घाटावर असो कीं कोकणांत असो अगर वऱ्हाडांत, गोमतकात, देशस्थांत, कोकणस्थांत, असो अगर सारस्वतात असो त्याचा स्वीकार केलाच पाहिजे त्याचप्रमाणे अनुस्वाराच्या बाबतींत **गुंजीकरांनीं** जी चर्चा केली आहे तिला कांहींच अर्थ नाहीं असें होईल. अनुस्वार घाटावर रूढ नाहींत तर कोकणात आहेत म्हणून ते वैकल्पिक रीतीनें स्वीकारले पाहिजेत. तसेंच ते आजच्या काळांतच नसून श्री. **चक्रधराच्या** काळांत ते निरर्थक रीतीनें दिले जात तसा **विष्णुशास्त्री** चिपळूणकरांनींसुद्धां 'हळू' या शब्दावर अनुस्वार दिलेला आढळतो. 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' हें तत्त्व एकदां स्वीकारल्यावर मग कोणत्याच गोष्टीची शास्त्रोक्त चर्चा करण्यास जागाच राहत नाहीं. ज्यानीं अनुस्वारादि बाबतींत अशी मनसोक्त चर्चा करण्याचा मार्ग स्वीकारला त्या **गुंजीकर दामल्यांनीं** अशीं विधानें करणे विचित्र आहे.

आणि येथे केवळ रूढींतील शब्दांसबंधींचाच प्रश्न नाहीं कांहीं पारिभाषिक शब्द रूढींत आणावयाचे असतात. त्यासाठीं सामासिक वगैरे प्रकारचे शब्द बनवावे लागतात असे पारिभाषिक शब्द व सामासिक शब्द पूर्वीं तज्ज्ञ व्याकरणकारांनीं बनविले आहेत व आजही चांगले शास्त्रज्ञ बनवीत आहेत. तसेंच हे शब्द बनवीत असतां त्यांच्या चुका झाल्या आहेत व होत आहेत. त्यांची दुरुस्ति व्याकरणादि शास्त्रांच्या नियमांनीं न करता त्या तशाच करू द्यावयाच्या काय ? अशा शब्दघटनां-वर अनुस्वार प्रकरणांत खुद्द **गंजीकर** व **दामले** यांनीं स्वतःच सपाटून कोरडे ओढले नाहींत काय ? मग सामान्य लोकांच्या बाबतींत रूढीचे समर्थन करून तिला व्याकरणादि शास्त्राच्या बोकांडीं कसें बसवतां ? प्रख्यात **मोरोपंत, वामन** इत्यादि मराठी कवींनीं ही चूक जाणूनच बहुधा अशा प्रयोगांमध्यें 'स' जोडलेला नाहीं, हा

परीक्षकांचा आक्षेप **गुंजीकरांनीं** नमूद केला आहे पण त्याची दखलगिरी आपल्या उत्तरांत मुळींच घेतली नाहीं. या कवीनीं काहीं प्रसगीं 'स' जोडलेला आहे. उदा० 'विप्रें कथिले मज कीं वसे **लिहलेस** उत्तम श्लोक' **मोरोपंत** पण पद्यरचनेसबधीं येणाऱ्या अक्षर, मात्रा इत्यादि अडचणीमुळें असे प्रयोग त्यांना करावे लागले. याशिवाय **तुकाराम, वामन, रामदास** यांनीही बोलींतील रूपें आपल्या लिखाणांत योजलीं आहेत काहीं ठिकाणीं तर एका ठिकाणी शुद्ध व काही ठिकाणीं अशुद्ध अशीं बुद्धिपूर्वक लिहिली आहेत **चक्रधर, ज्ञानेश्वर, एकनाथ** इत्यादिकांच्या लिखाणांत हाच प्रकार दिसतो व म्हणूनच **वामनादि** कवींपेक्षा **मोरोपंतां**ची रचना अधिक व्याकरणशुद्ध असा अभिप्राय टीकाकारानी दिला आहे व तो रास्तही आहे त्याची योजना निबधन, भाषा सौष्ठव ( diction ) याना अनुकूल अशी असल्यामुळें व्युत्पत्तिशास्त्र व व्याकरण यान्च्या नियमात ती बसली नाही तर तिला अशुद्ध असे कोणीही म्हणणार नाहीं तसेच ते प्रयोग त्या त्या लेखकांच्या बाबतीत आर्ष म्हणून आदरणीय मानले, तरी इतरानी त्याचे अनुकरण केले तर ते हास्यास्पद होते आणि ते प्रयोग अशुद्ध असले तर मुळात त्यासबधी कदर नजर होईल पण त्यांचे अनुकरण केलें तर त्यावर अशुद्धतेचा शिक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं एकदरीत व्याकरणादि शास्त्राचे काम केवळ नियम उघड करण्याचे नव्हें तर त्या नियमाप्रमाणे शुद्ध म्हणून ग्राह्य कोणते व अशुद्धम्हणून त्याज्य कोणतें हें दाखविण्याचेही आहे **गुंजीकरांनीं** 'केलेस' हा 'ज्याने काम केले तो तू आहेस' किंवा 'तू काम केले असा आहेस' सक्षेप आहे असे म्हटले आहे पण यापेक्षा 'त काम केले आहस' याचा म्हणजे पूर्ण वर्तमानकाळाचा सक्षेप आहे हे येथ सहज दिसून येणारें आहे. पूर्ण वर्तमानकाळांत कर्मणिप्रयोग होतो तेथे लिंग, वचन, पुरुष कृदतात दिसते साह्य क्रियापदात नाहीं हें पूर्वी दाखविलेंच आहे अर्थात येथे मिसळलेला किंवा **दामल्यांच्या** मताप्रमाणें सकर प्रयोग झाला असे मानण्याचे कारण नाहीं

**गुंजीकरांनी** 'प्रयोग शरणा वैयाकरणा' या सस्कृत वचनाच्या आधारें रूढीसच सर्वस्वी प्राधान्य दिले पण सस्कृत वैयाकरणानीं रूढीलाही जो निर्बंध घातला आहे त्याकडे त्यांचें लक्ष गेलले दिसत नाहीं हा निर्बंध वैयाकरणानी केवळ शिष्टसमतच प्रयोग मान्य करावयाचे, इतर वाटेल त्या अलबत्या गलबत्याने केलेले किंवा अमुक एका धद्यांतील अमुक अधिकार किंवा सत्ता असलेल्या व्यक्तीनें किंवा जातीने रूढ केलेल्या प्रयोगापुढें मान वांकविण्यास ते बांधलेले नाहींत असें स्पष्ट सागतो रूढींतील प्रयोग एकदेशीय म्हणून खुद्द **गुंजीकरानींच** त्यांना मान्यता दिली नाहीं आणि प्रयोग केवळ बहुसख्याकांच्या बोलींत आहे म्हणूनही स्वीकारता येणार नाहीं. बोलण्याचा व्याकरणाशीं फारसा सबध नाहीं हें आम्हीं निवेदनांत **जेस्पर्सन**च्या एतद्विषयक मताची छाननी करतांना दाखविलेंच आहे लिहिण्यांतही पद्यापेक्षां गद्यांत कादबरी, नाटक, कथा इत्यादि प्रबधापेक्षां शास्त्रीय स्वरूपात व्याकरणशुद्ध भाषा असणें आवश्यक मानलें जातें.

सारांश शिष्ट म्हणजे कोण ते ठरले पाहिजे **दामल्यांनीं** यासबधीं थोडीशी चर्चा केली आहे, पण शेवटीं तो प्रश्न तसाच सोडून दिला आहे. तेव्हा येथें जरा सक्षपानें विचार करू शिष्ट म्हणजे सभावित किंवा वजनदार माणूस. हा सभावितपणा किंवा हें वजन माणसास सपत्ति, अधिकार, निरनिराळ्या कार्यक्षेत्रातील यश इत्यादि गोष्टींनीं येते पण हे शिष्टत्व त्या त्या क्षेत्रापुरतें मर्यादित असते. डॉक्टर, वकील, पत्रपडित, निरनिराळे अधिकारी याचे शिष्टत्व त्या त्या क्षेत्रात व स्थानात मान्य होते उदाहरणार्थ एखादा वकील आपल्या धद्यात व एखाद्या विशिष्ट ठिकाणी शिष्ट मानला जाईल, पण डॉक्टरीच्या धद्यात किंवा दुसऱ्या ठिकाणच्या वकीलात सुद्धा त्याला शिष्ट म्हणून मानतील असे नाहीं प्रस्तुत आपण शब्दासबधी विचार करीत आहो. अर्थात् यासबधीं शब्दशास्त्रज्ञच म्हणजे वैयाकरणच शिष्ट होऊ शकतील, हे सागावयास नको. निव्वळ बोलण्यासाठीं वर्तमानपत्रा लिहिण्यात किंवा काव्य, नाटक, कादबरीलेखनात जे प्रयोग होतात तेही त्या त्या लोकात व क्षेत्रात मान्य होताल पण सामान्यत. अभिजात भाषा लिहावयाची असेल तर सस्कृतात **पाणिनी** किंवा मराठीत **दादोबा**सारख्या वैयाकरण शिष्टांचाच अधिकार मानला पाहिजे **कालीदा**सासारख्या कवीसबधीं त्याने 'यथा बाधति बाधते' अस सागितल्याचा जी आख्यायिका आहे तीवरून हेंच सिद्ध होते. आतां कालातराने त्या त्या शास्त्राची प्रगति होऊन तीं मते सशास्त्र चर्चेअन्ती बदलतील. पण येथे तरी हा प्रश्न शिष्टाशिष्टामधील आहे म्हणजे शास्त्राच्या आपद्वस्थेतील शिष्ट (वैयाकरण) व आधुनिक शिष्ट यामधील आहे **गुंजीकरांच्या** काळातील विचार करताना विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें तरी परीक्षक हेच शिष्ट मानल्याशिवाय गत्यतर नाहीं. आमच्याही काळात वैयाकरणाचीसुद्धा मत कांहींही असोत युनिव्हर्सिटी कमिटीतील शिष्टाची मते आम्हाला निमूटपणे मान्य करावी लागणार. पण येथे एक तडजोड करतां येईल सामान्य, मध्यम किंवा असामान्य ग्रथकारानी रूढीप्रमाणे खुशाल बोलावे किंवा लिहावे पण व्याकरणदृष्ट्या तशी योजना अशुद्ध आहे असे सागण्यास कोणताच हरकत नसावी निदान व्याकरणदृष्ट्या जे शुद्ध तेच गृहीत धरून व्याकरण सांगावे

**दामल्यांनी** आपले मत नेहमींप्रमाणे उल्लेख न करता **गुंजीकरांच्या** मतास अनुसरूनच दिले आहे, हे सहज दिसून येण्यासारखे आहे एका बाबतीत मात्र 'शिष्ट' सबंधीं सस्कृत वचनाचा फायदा घेऊन कांहीं विशिष्ट जातीतील व विशिष्ट पेशातील लोकाच्या प्रयोगांना त्यानीं उचलून धरले आहे जातिविषयक शिष्टाचे प्रयोग कितपत मानावे याविषयीं पूर्वी सागितलेच आहे पण **दामले** म्हणतात त्याप्रमाणे कोकणस्थात तरी एकवाक्यता आहे की काय याबद्दल सशयच आहे. **कृष्णशास्त्री चिपळूणकर, गोडबोले** हे वैयाकरण कोकणस्थ होते, पण त्यांनीं हे प्रयोग अशुद्ध ठरविले बिचाऱ्या **जोश्यांची** स्थिति चमत्कारिक झाली एकीकडे स्वता कोकणस्थ असल्यामुळें लोकक्षोभाच्या भीतीस्तव त्यांना **दामल्यांच्या** विरुद्ध जातां येईना तेव्हां या प्रयोगांस चमत्कारिक म्हणून त्यांनीं मार्ग काढला ! पण तेवढेंही **दामल्यास** खपलेले दिसत नाहीं. शिवाय 'मी स्नान केलो'

इत्यादि प्रयोग कोंकणस्थांत पुरुषांप्रमाणें बायकाही करतात कीं काय हा प्रश्न आहेच ! तसें नसेल तर आणखीही एकदेशियता या प्रयोगांस येईल. 'आचर' गणांच्या धातू-संबंधीं हीच गोष्ट सांगतां येईल. पुराणिक, भिक्षुक वगैरे विशिष्ट धंद्याचे लोक अशी भाषा वापरतात. तेव्हां ते प्रयोगही एकदेशीय असल्यामुळें अशुद्धच होत. तेव्हां त्याचा आधार 'आंघोळ केलों' इत्यादि क्रियापदास देतां येणार नाहीं. शिवाय या धातूंतील एकदेशीयता आतां जाती, स्थळ, स्त्री, पुरुष यापुरती न राहतां 'कर' व 'धू' हे दोन धातू स्नान, संध्यादि कर्में व आंग, हात, पाय इत्यादि कर्में यापर्यंतही पोहचली आहे ! याला उत्तर एकच आणि तें हेंच कीं **गुंजीकरां**प्रमाणें **दामल्यांनीं**ही प्रयोग या शब्दाच्या योजना ( usage ) ह्या अर्थाची व्याकरणांतील प्रयोगांशीं गल्लत केली आहे.

आतां फक्त **दामल्यांनीं विपळूणकर**शास्त्रीबोवांच्या मतासंबधीं जो आक्षेप घेतला त्याचाच विचार करावयाचा राहिला. येथें **दामल्यांनी** प्रयोग या शब्दाचा पूर्वी सांगितलेल्या दोन अर्थांशिवाय तिसऱ्याच एका अर्थानें म्हणजे मुख ( voice ) या दृष्टीनें योजला आहे हा अर्थ **दादोबां**पासून **दामल्यां**पर्यंतच्या सर्व व्याकरणकारांनीं स्वीकारला आहे ! **दादोबा** त्याला 'कर्मकर्तरि' प्रयोग म्हणतात ! तर इतर व्याकरणकार 'कर्मणिप्रयोग' म्हणतात. ! 'मुखा' विषयींचा विचार आम्हीं पुढें स्वतत्र रीतीने करणार आहो. पण येथें प्रयोग ( दुसऱ्या अर्थानें ) मुखापासून भिन्न कसा आहे ते थोडक्यांत सागितलें पाहिजे. 'मुख' ही वाक्यरूपान्तर योजना आहे. बोलणारा स्वाधीनतेने ( actively ) कार्य करतो कीं करावयाचे **कार्य** त्याच्या घडून अस्वाधीनतेनें ( passively ) होतें हें या योजनेवरून दिसते. अशा योजनेत **एका** वाक्यामधील कर्म **दुसऱ्या** वाक्यांत कर्ता होतो प्रयोगाची गोष्ट तशी नाहीं. प्रयोग एकाच वाक्यापुरता म्हणजे वाक्यांतील क्रियापद, लिंग, वचन, पुरुष या बाबतींत कर्त्याशीं, कर्माशीं किंवा स्वतत्र नपुसकलिंगी एकवचनी, तृतीय पुरुषीं असते हेंच त्या वाक्यापुरतें पहावयाचें असतें पुनः प्रयोग हा मराठींत व तत्सम हिंदी, बगाली, गुजराती भाषांतच सभवतो. कारण त्या भाषांत क्रियापदास लिंगविकार होतो. सस्कृतादि गीर्वाण भाषा व इग्रेजीसारख्या आधुनिक भाषांत क्रियापदाला लिंगविकार होत नाहीं म्हणून **दामल्यांनीं** सस्कृतांतील प्रयोगांचा जो आधार दिला आहे तो चुकीचा आहे. मुखरचना मात्र सर्व भाषांत आहे. सस्कृत ही रचना धातूस 'य' प्रत्यय लागून व आत्मनेपदी प्रत्यय लागून होते. इग्रेजींत 'to be' या साह्यक्रियापदापुढें त्या त्या काळाचीं रूपें योजून पुढें मुख्य क्रियेचें भूतकालवाचक घालतात. मराठींत 'जा' ह्या साह्यक्रियापदाचा त्या त्या काळांत उपयोग होऊन मुख्य क्रियेचें भूतकालवाचक मागें घालतात. जुन्या मराठींत 'ज' ( सस्कृतातील य चें अपभ्रष्ट रूप ) लावून हीं अशीं रूपे झालीं आहेत. 'म्हणिजेति', 'म्हणिजेलें', 'म्हणिजेल.' या ठिकाणीं **दामल्यांनीं** दुसरीही एक हातचलाखी केली आहे. म्हणजे प्रयोगासबधीं जें विधान आहे ते क्रियापदासबधीं, पण

**दामले** बोलतात धातुसाधिताविषयीं आणि तेंही संस्कृतांत धातुसाधिताविषयीं व मराठींत क्रियापदाविषयीं !!! म्हणजे कशाचा कांहींच मेळ नाहीं ! सारांश शास्त्रीबोवांविरुद्ध **दामल्यांनीं** जो आक्षेप घेतला आहे, त्यांत कांहींच तथ्य नाहीं. एका गोष्टीविषयीं संस्कृतांत आधार नाहीं हें त्यांनीं स्वतः कबूल केलें आहे. ]

---

## प्रकरण तिसरें.

# पदयोजना.

## उपोद्घात.

**१ पदयोजना** :—पदांच्या वाक्यांत योजनेसंबंधीं व्याकरणाच्या ज्या भागांत विचार होतो त्या भागास पदयोजना असे म्हणावे.

२ पदयोजनेचे ( १ ) पदसंबंध, ( २ ) पदप्रयोग व ( ३ ) पदान्तर असे तीन पोटविभाग आहेत.

**३ पदसंबंध** :—वाक्यांत नामाचा किंवा सर्वनामाचा क्रियापदाशीं जो संबंध असतो त्याला **पदसंबंध** किंवा **कारकसंबध** असे म्हणतात.

[ सबधाला व्याकरण सागताना आजतागायत 'अर्थ' असे म्हणण्याची वहिवाट आहे. 'अर्थ' हा शब्द क्रियापदाच्या अर्थ ह्या विकारासाठींच लावावा हे मागे सप्रमाण दाखविलेच आहे **दामले** असे सबध-क्रियापदाचे सहा व नामाचा एक-असे कबूल करतात. पण पुढे त्याना 'अर्थ' हे जुने नांव देऊन पाचपन्नास नव्या अर्थांची भर घालतात हे अर्थ जसे नामासंबधीं विभक्तीचे तसे क्रियापदासबधीं पांच पन्नास आख्यातार्थही त्यानीं नव्यानेच तयार केले आहेत ! एकीकडे याना **संयुक्तकाळ** असें म्हणून **दादोबादि** पूर्ववैय्याकरणांनीं इग्रेजीचे अनुकरण करून ते मराठीच्या व्याकरणाच्या माथीं मारले आहेत असा कांगावा करून व त्याची हकालपट्टीच झाली पाहिजे असे प्रतिपादून, पुन दुसऱ्या दरवाजाने त्याना विभक्तीचे व आख्याताचे अर्थ असें म्हणून गौरवपूर्वक आत आणून त्यांची मराठी व्याकरणांत कायमची स्थापना करण्याचा घाट त्यांनीं घातला आहे ! तेव्हां याना **संबंध** हें एकच नांव देऊन 'अर्थ' ही सज्ञा केवळ क्रियापदाच्या विशिष्ट विकारापूरतीच मर्यादित आहे हे बजावणें प्राप्त आहे. सबधाला 'पदसबध' असेंही शास्त्रदृष्ट्या नांव आम्हीं दिलें आहे पण पुढें 'सबध' या नांवानेच त्याचें एका स्वतत्र अध्यायात विवेचन होईल. ]

**४ पदप्रयोग** :—क्रियापदाची कर्त्याच्या किंवा कर्माच्या लिंग, वचन, पुरुषाप्रमाणें अगर स्वतंत्र रीतीने नपुंसकलिंगी, तृतीयपुरुषीं एकवचनीं अशी जी तीन प्रकारची जुळणी तिला **पदप्रयोग** किंवा **प्रयोग** असे म्हणतात.

[ पदप्रयोग हें आणखी नांव जरी आम्हीं दिले आहे, तरी **प्रयोग** या जुन्या नांवानेच त्याची चर्चा एका स्वतत्र अध्यायांत होईल येथे 'प्रयोग' ह्या शब्दाचा अर्थ

वाक्यांत उपयोग ( usage ) किंवा मुखांतर योजना हा नसून, केवळ वर सांगितल्या-प्रमाणे एक विशिष्ट प्रकारची जुळणी हें परत एकदां स्पष्ट सांगितले पाहिजे. ]

**५ कर्ता** :—ज्या पदाच्या द्वारे क्रियापदाची मधील क्रिया करणाऱ्याचा बोध होतो त्या पदास **कर्ता** असे म्हणतात.

**६ कर्म** :—ज्या पदाच्या द्वारे कृतियुक्त क्रियापदामधील क्रियेच्या द्वारे घडलेल्या कृतीचा बोध होतो त्या पदास **कर्म** असे म्हणतात.

[ कर्ता व कर्म हे संबंध नसून पदे आहेत धातु हा केवळ शब्द असल्यामुळें त्यासंबंधीं सकर्तृक किंवा अकर्तृक, सकर्मक किंवा अकर्मक असे सांगण्यांत काहीच अर्थ नाही हें पूर्वी सांगितलेच आहे कर्ता व कर्म याविषयींची चर्चा ती पदे असल्यामुळे तेथे केली नव्हती ती आतां येथे करणे युक्त होईल **दामल्यांनीं** पूर्वव्याकरणकारांच्या एतद्विषयक मतांची छाननी करून कर्त्याची एक व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे त्यानीं **दादोबा, खेर, जोशी** इत्यादिकाविषयीं घेतलेले आक्षेप बरोबर आहेत पण इतर व्याकरणकारांप्रमाणेच यासंबधीं मुख्य तीन गोष्टी त्यांच्या लक्षांत न आल्यामुळे त्याचा प्रयत्न वांया गेला आहे ( १ ) पहिली गोष्ट म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे तीं पदे असून शब्द नाहींत आणि म्हणूनच त्या पदप्रकरणात विशेषत. प्रयोगाच्या दृष्टीनच विचार करावयाचा. ( २ ) त्याचा पददृष्ट्या क्रियापदाशीच ( अर्थात् प्रयोगदृष्ट्या ) संबंध असतो क्रिया असणाऱ्या अन्य म्हणजे धातुसाधित नाम, विशेषण, क्रियाविशेषण इ बाबतींत कर्त्या-कर्माचा उल्लेख करण्याची जरूरी नाहीं व तो कोणी करीतही नाहीं. कारण तेथे प्रयोगाचा प्रश्नच उद्भवत नाहीं. ( ३ ) साऱ्याच पूर्वव्याकरणकारांनीं हे शब्द कारकसंबंध व करणारा ( कर्ता ) व कृति ( कर्म ) या दोन अर्थांनीं वापरले आहेत त्यामुळे बराच घोटाळा झाला आहे आम्हीं हे शब्द फक्त त्यांच्या दुसऱ्या अर्थानें म्हणजे करणारा ( पद ) व कृति ( पद ) या दृष्टीने व केवळ प्रयोगाच्या अनुरोधानेंच योजले आहेत कर्तृविषयक संबधाला कर्तृकारक व कर्मविषयक संबधाला कृतिकारक अशीं नवीनच नांवे देऊन आम्ही हा घोटाळा टाळला आहे यासंबधीं अधिक विचार पुढें कारकप्रकरणात होईल. ]

**७ पदरूपान्तर** :—वाक्यरचना बदलण्यास पदरूपान्तराचे जे कार्य होते त्यास **पदरूपान्तर** असे म्हणतात.

[ यात पूर्वीच्या व्याकरणांतील भेद, रूप व शिवाय मुख ज्याचा पूर्वी प्रयोगांतच अन्तर्भाव होत असे त्याचा समावेश होतो. ]

---

# अध्याय पहिला.

## पदसंबंध किंवा कारकसंबंध.

### कारकसंबध.

१ **कारकसंबंध** :—नामाचा किंवा सर्वनामाचा विभक्ति प्रत्यय किंवा शब्दयोगी याच्या द्वारे क्रियापदाशी जो संबंध जोडला जातो, त्याला **कारकसंबंध** किंवा **कारक** असे म्हणतात.

२ **कारकाचे प्रकार** :—कारकाचे सहा प्रकार आहेत. ( १ ) कर्तृकारक, ( २ ) कृतिकारक, ( ३ ) करणकारक, ( ४ ) संप्रदानकारक, ( ५ ) अपादानकारक व ( ६ ) अधिकरणकारक.

[ **दादोबां**पासून **दामल्यां**पर्यंतच्या सर्व व्याकरणकारांनीं ही कारकसंख्या मान्य केली आहे येथे आम्हीं पहिल्या दोन कारकाचीं नावे बदललीं आहेत हे अभ्यासकाच्या लक्षांत चटकन येण्यासारखे आहे व त्याचें कारणही कर्ता व कर्म ह्या संज्ञा यांच्या आम्ही उपोद्घातात केलेल्या स्पष्टीकरणावरून सहज दिसून येणारें आहे कर्ता व कर्म या संज्ञांचा प्रयोगाव्यतिरिक्त फारसा उपयोग नाहीं हें आम्हीं दाखविलेच आहे हे संबंध नाहींत. पण त्यावरून होणाऱ्या संबधांनाही तींच नांवे पडल्यामुळे सर्वच व्याकरणकारांची दिशाभूल मात्र झाली आहे यासाठीं हीं नवी नावे आम्हीं पहिल्या दोन कारकांस दिलीं आहेत कर्ता व कर्म या संज्ञांचा संबंध कायम राहील अशी योजना त्या नांवांत आहे हे अभ्यासकाच्या ध्यानीं येईलच ]

३ **कर्तृकारक** :—ज्या कारकापासून क्रियापदांतील क्रियेचा कर्ता असा संबंध प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीतीने जोडला जातो त्या कारकास **कर्तृकारक** असे म्हणतात. हें कारक फक्त तृतीया विभक्तीशींच निगडित आहे.

[ **दादोबां**नंतरच्या व्याकरणकारांनी कर्तृकारकाचा चतुर्थींशींही संबंध जोडला आहे **दामल्यां**नीं हे मत फारच कुशलतेनें खोडून काढले आहे. ते म्हणतात, 'वाक्याच्या क्रियापदाचा कर्ता शोधून काढणे फारसे कठीण आहे असें नाहीं. तथापि ह्या कामीं आमचे वैयाकरण इंग्रेजी भाषेच्या परकीय फाजील संस्काराने कसे चकले आहेत ते पाहा. 'मला तुझे करणें रुचत नाहीं.' 'विष्णूस भक्ति आवडते.' 'देवाला सर्व दिसतें' या वाक्यांतील 'रुचणे', 'दिसणे', 'आवडणें' या धातूचीं 'मला', 'विष्णूस', 'देवाला' हीं **जोशी** यांच्या भाषेंत कर्तृपदें म्हणजे कर्तेच होत. ( प्रौढबोध ५४७ ). **खेरही**

असेंच म्हणतात. 'मला वाटते त्यानें जावे' या वाक्यांत 'मला' हा वाटतें याचा कर्ता (Agent) असेच ते सांगतात. (Khers Gram. p. 410) आणि 'तुला हल्लीं बरें वाटते काय' हा जसा त्यांचे मते कर्मणिप्रयोग आहे, (पान ४१५) त्याचप्रमाणें वरील वाक्यांतही ते कर्मणिप्रयोग समजतात व **जोशी** याचेही मत तसेच दिसतें. पण आमच्या मतें हें बरोबर नाही. कारण की वर सांगितल्याप्रमाणे—रुचणारा, आवडणारा, दिसणारा, वाटणारा कोण ? असा प्रश्न जर केला तर त्याचें उत्तर ज्या मनुष्यासबधानें किंवा प्राण्यासबधाने या धातूचा उपयोग होतो तो मनुष्य किंवा प्राणी असें येत नाहीं तर ज्या पदार्थासबधी या धातूचा उपयोग होतो तो **पदार्थ** असेंच येते. वरील वाक्यात प्राकृत प्रश्नाचे उत्तर 'मी', 'विष्णु', 'देव' हे नसून 'तुझे करणे', 'भक्ति', 'सर्व' हें होय, हें उघड आहे. या वाक्याचे इग्रजींत जें भाषांतर करतात त्यांत 'मी', 'विष्णु', 'देव' हे कर्ते आहेत हें खरें आहे. पण तेवढ्यावरुन मराठींतील रुचणें, आवडणे, दिसणें यांचे तेच कर्ते आहेत असे मानणें वाजवी नाही. दुसरे असे कीं रुच, आवड, वाट इत्यादि मराठी धातूंच्या अर्थाचे जे Like, Seem, Think हे इग्रेजी धातु सकर्मक आहेत. परतु मराठीतील **रुच, आवड, दिस, वाट,** ह धातु अकर्मक आहेत. सस्कृत भाषेतही रुच धातु अकर्मकच आहे. 'मोदको बालकाय रोचते' म्हणजे मोदक बालकाला आवडतो. ह्या वाक्यांत मोदक हाच कर्ता असून धातु अकर्मक आहे हे उघड आहे. सारांश 'मला तुझे करणे रुचत नाहीं', 'विष्णूस भक्ति आवडते,' 'देवास सर्व दिसतें.' या वाक्यांत आमचे नवीन वैयाकरण म्हणतात त्याप्रमाणे कर्मणिप्रयोग नसून तो **अकर्मक कर्तरिप्रयोग** आहे. **दामल्यांचें** हें विवेचन पूर्णपणें तर्कशुद्ध आहे. रुच, आवड, वाट, दिस या धातूबरोबर 'हे त्याला पचते.', 'हे त्याला पटते.' या वाक्यांतील 'पच' व 'पट' हे धातूही याच मालिकेंत घालता येतील.

**दामल्यांनीं** हें **दादोबांचें** मत पुन प्रस्थापित करण्यांत जें कौशल्य दाखविलें त्याचे कौतुक करीत असतां, हीच विचारसरणी 'मला काम करवते', 'त्याला नांगर धरवतो,', 'रामाला लेखणी धरवते', 'त्याला जाववतें' या वाक्यांतील 'मला' 'त्याला', 'रामाला', हे वाक्यातील कर्ते असे ठरवितांना त्यांनीं लावली नाहीं. यासबधीचे त्याचें विवेचन नेहमींप्रमाणें धरसोडीचे व अयुक्तिक झाले आहे प्रथम **दादोबा, चिपळूणकरशास्त्री** व **खेर** यांच्या मताची विसगति त्यांनीं दाखविली आहे. **दादोबा** येथे 'कर' हा धातु समजतात व त्याप्रमाणे 'मला काम करवते' या पहिल्या वाक्यात करणारा जो मी (मला) हा कर्ता असा यावा पण **दादोबा** तो 'काम' असे सागतात ही त्यांची विसगति कशी ? **चिपळूणकरशास्त्री** 'करव' हा धातु घेतात. येथे करवणारे कोण तर 'काम' असें येते, तेही **दामल्यांच्या** मतें विसगत आहे. खरं म्हटले तर शास्त्रीबुवांची येथें मुख्य चूक म्हणजे 'करवतो' (प्रयोजक) व करवतो (शक्य) हीं रूपें एकच आहेत असे मानणें. म्हणून **दामल्यांनीं** 'करवतो' हें रूप

केवळ प्रयोजक अर्थानें योजून विसगतीचा दोष त्यांना चिकटविण्याचे कारण नव्हते. **खेरांनीं** दादोबांप्रमाणें ' कर ' हा धातु मानला पण **कृष्णशास्त्र्यां**प्रमाणे ' मला ' हा कर्ता मानला **खेरांचीं** दोन्हीं उत्तरें बरोबर होतीं व त्यानीं **दादोबा** व **कृष्णशास्त्री** यांची विसगती दूर केली असें **दामले** सांगतात. पण कशी ती ते सांगण्याचे टाळतात. **खेरांचे** म्हणणे बरोबर तें धातूच्या दृष्टीनें व कर्त्याच्या दृष्टीने. येथे मुख्य प्रश्न असा आहे कीं, ' कर ' या धातूपासून **करव** हे रूप सिद्ध कसे होते, हा आहे. हें **दामले** कबूल करतात. मग **खेरांचे** म्हणणें बरोबर कसे तें येथेच दाखवावयास पाहिजे होते. पण त्यासबधाचा निर्णय त्यानीं पुढे कांहींतरी लटपटपची करुन दिला आहे येथे **दामले** पुढीलप्रमाणे माहिती सागतात– " दादोबाचे मते या प्रश्नाचे उत्तर असे कीं, शक्य भेदीं ' करव ' हे अग तयार होते व त्यास वर्तमानकाळाचे प्रत्यय लागतात. म्हणजे ' कर ' यापासून ' करव ' हें शक्य भेदानुरूप बनते. भेदावस्था चिपळूणकर मानीत नसल्यामुळें ते ' करव ' हाच धातु मानतात व तो प्रयोजक धातु मानणे मूळ ' कर ' या धातूप्रमाणेच येतो असें म्हणतात. दिसण्यामध्ये प्रयोजक करव व शक्य करव यांत फरक नाहीं, हें निर्विवाद आहे (?) परतु तेवढ्यावरुन दोन्हीं रूपे एकच होत हे म्हणणे सयुक्तिक नाहीं दोहोमध्यें अर्थदृष्ट्या फारच अन्तर आहे प्रयोजक ' करव ' याचा कर्ता मूळ ' कर ' धातु या कर्त्यापासून अगदीं भिन्न, तर चिपळूणकराच्या मते शक्य करव आणि मूळ कर यांचा कर्ता एकच. मात्र त्यांची विभक्ति निराळी. परतु विभक्ति कांहीं का असेना कर्ता तो कर्ता व कर्म तें कर्म असे पूर्वी सांगण्यांत आले आहे ते विसरता कामा नये. प्रयोजक ' करव ' हा मूळ धातूप्रमाणे चालतो व त्याचे सर्व प्रयोग होतात पण **शक्य करव याचा कोठेंच व कधींच कर्तरी प्रयोग होत नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ?** " यासबधीं आम्हीं पूर्वी क्रियापदप्रकरणांत विवेचन केलेंच आहे पण येथे केवळ कर्त्याची चतुर्थी विभक्ति होत नाहीं या दृष्टीने त्यासबधों फिरून एकदा निर्णय घेतला पाहिजे. हा निर्णय थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे. आमच्या मते **दादोबां**चा निर्णय बरोबर आहे. म्हणजे येथे ' काम ' हा कर्ता असून हा अकर्मक कर्तरिप्रयोग आहे अर्थात् ह्या उदाहरणांत कर्ता प्रथमान्तच आहे व रुच, आवड इत्यादि धातूप्रमाणे ज्याला रुचते, आवडते त्याची चतुर्थी विभक्ति आहे. तेव्हां शक्य ' करव ' याचा कर्तरिप्रयोग केव्हाच होत नाहीं हें म्हणणेच चुकीचे. **दादोबांची** चूक त्याला वर्तमानकाळाचेच प्रत्यय लागतात व तो भावकर्तरिप्रयोग होतो ही होय. धरवतो, धरवले, धरवेल अशा रीतीने त्याचीं तिन्ही काळाची रूपे होतात व प्रयोग कर्तरीच होतो. त्याचप्रमाणे ' करव ' हा सकर्मक धातु आहे हे शक्य रूप **कृष्णशास्त्री** म्हणतात त्याप्रमाणे सस्कृतांतील प्रयोजक ' य ' पासून किंवा **दामले** म्हणतात त्याप्रमाणें सस्कृतांत कर्मणि व भावे मुख्य प्रत्यय ' ज ', ' य ' यांपासून झाला नसून केवळ मराठींतील ' करू ये ' या सयुक्त धातूचे ते साधित रूप आहे, हें आम्हीं पूर्वीच दाखविले आहे. अशा रीतीनें कर्तरिप्रयोगच असल्यामुळे **दामल्यांनीं** उल्लेखिलेला

शक्यभेदांत कोठेंही व केव्हांही कर्तरिप्रयोग होत नाहीं हा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. शक्य ' करव ' आणि प्रयोजक ' करव ' हे दिसण्यांत एकच आहेत, ही **दामल्यांची** कबुली बरोबर नाहीं. प्रयोजक ' करव ' याचें ' करिव ' असेंही विकल्पाने रूप होते. पण शक्य ' करवते ' याचीं करवितें, धरविलें, धरविल अशीं रूपें होत नाहींत. तसेच प्रयोजक व शक्य यांच्यामध्यें जें अर्थाचें महदतर आहे, ती उणीव ते प्रत्यय प्रयोजक प्रत्ययापासून नसून सस्कृत कर्मणि किंवा भावे प्रत्ययापासून शक्तीचा ध्वनि निघतो, असे सांगून भरून निघेल असे **दामल्यांस** वाटलें त्यालाही काहीं आधार नाहीं ]

**४ कृतिकारक** :—ज्या कारकापासून क्रियापदाच्या क्रियेचा कर्म असा संबंध प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षत: जोडला जातो, त्याला **कृतिकारक** असे म्हणतात.

[ या कारकाचा सबध द्वितिया या विभक्तीशीं असतो. ]

**५ करणकारक** :—ज्या कारकाच्या द्वारे क्रियापदाच्या क्रिये-संबंधीं साधन, सहवास इत्यादि संबंध जोडले जातात त्या कारकास **करण** असे म्हणतात. हें कारक तृतीया विभक्तीचेंच असतें.

[ तृतीया विभक्तीस याशिवाय कर्तृकारकही असतें हें वर सांगितलेंच आहे ]

**६ संप्रदानकारक** :—क्रियापदाच्या क्रियेपासून देणें, शिकविणे इत्यादि प्रकारचे दानसंबंध जोडणारे जे कारक त्यांस **संप्रदान**कारक असे म्हणतात. या कारकाचा फक्त चतुर्थी विभक्तीशींच संबंध असतो.

[ द्वितियेचे व चतुर्थीचे प्रत्यय सारखेच असल्यामुळे सशयास्पद प्रसगीं कारकावरूनच यांपैकीं कोणती विभक्ति ग्राह्य ते ठरवावयाचे असतें. उदा. ' राजानें ब्राह्मणास गाय दिली ', ' ब्राह्मणानें गायीस धरलें ' पहिल्या वाक्यांत गाय हें कर्मकारक आहे. व ' ब्राह्मणास ' हें सप्रदानकारक, तेव्हा ' गाय ' याची द्वितिया व ' ब्राह्मणास ' याची चतुर्थी विभक्ति ठरते. दुसऱ्या वाक्यात ' गाईस ' हे कर्मकारक आहे तेव्हा गाईस या शब्दाची द्वितिया विभक्ति, चतुर्थी नव्हे. **दामल्यांनीं** ' एका घावास दोन तुकडे ' यांत ' घावास ' ही करणी चतुर्थी असें म्हटले आहे. पण ते चूक आहे. येथे साधन असा अर्थ नसून दान असाच अर्थ आहे. अर्थात् तो लाक्षणिक आहे. ]

**७ अपादानकारक** :—ज्या कारकापासून क्रियापदाच्या क्रिये-संबंधी पासून घेतले, ( अप+आदान ) किंवा निघाले, वेगळे झाले असा संबंध जोडला जातो त्याला **अपादानकारक** असें म्हणतात. याचा पंचमी विभक्तीशींच संबंध असतो.

[ हें कारक चतुर्थीलाही **दामल्यांनीं** घातलें आहे. उदा० डोळ्यास गळती लागली आहे. येथें संप्रदानच आहे ]

**८ अधिकरणकारक** :—क्रियापदाच्या क्रिया घडण्याचें स्थान किंवा अन्तर्भाव असा व्यापक संबंध ज्या कारकाच्या द्वारे जोडला जातो त्या कारकास **अधिकरणकारक** असे म्हणावें. ह्याचा सप्तमी विभक्तीशीच संबंध आहे.

[ अधिकरणकारकाचा संबध सप्तमीशिवाय प्रथमा, तृतीया, चतुर्थी या विभक्तींशीं **दामले**प्रभृति व्याकरणकारांनी जोडला आहे उदा० दहा **कोस** हिंडला यांत **कोस** प्रथमेचें अधिकरण तृतीया-उदा० तो **रस्त्यानें** गेला. चतुर्थी-त्याने **डोक्यास** पागोटे घातले. हीं उदाहरणे बरोबर नाहीत कोस हे कर्म नव्हे कारण गेला हे क्रियापद अकर्मक आहे तरी संस्कृत भाषेच्या अनुकरणाने येथे अप्रत्यक्ष कृतिकारक संबध जोडला गेला आहे. रस्त्याने हें क्रियाविशेषण अव्यय आहे. व डोक्यास येथे संप्रदानच आहे कारके सहाच असे **दामल्यांनी** जरी सांगितले तरी पुनः विभक्तीचे उपपदार्थ अनेक आहेत. त्याची गणना आणि व्याख्या करण्याचे व्याकरण-दृष्टया महत्त्वाचे नसल्यामुळें ते ते अर्थ जेथल्या तेथे सांगण्याची चाल आहे असे **दामले** सांगतात, ही चाल कोणीं घातली ? व्याकरणदृष्टया महत्त्वाची नाहीं तर असली चाल कां चालू द्यावी ते **दामले** सांगत नाहींत. खरें पाहिले तर ही चाल **दामल्यांनीं** स्वतःच नव्याने घातली आहे व ती केव्हांच अमलात आली नाहीं. हे तथाकथित उपपदार्थ व्याकरणदृष्टया महत्त्वाचे नाहीत. हें **दामल्यांचे** म्हणणे अक्षरशः खरे आहे. म्हणजे हे अर्थ प्रबंधन ( composition ) ह्या शास्त्रांत यावयाचे, व्याकरणाशीं त्याचा संबध नाहीं हें **दामल्यांच्या** लक्षांत आले होते कारकावर विभक्ति अवलबून नाहींत, त्या प्रत्ययांवर अवलबून असतात केवळ इंग्रजीचें अनुकरण करून **दादोबा**दि व्याकरणकारांनीं कारके मराठींत आणलीं अशी टीका त्यांनीं केली आहे नंतर क्रियापद-प्रकरणांतही भविष्य भविष्य, भूत भविष्य वगैरे संयुक्तकाळाची अशाचप्रकारें टवाळी केली. परंतु पुढें आख्याताचा आपल्या नव्या थोतांडाच्या मंडणार्थ एका स्वतंत्र अध्यायांत विभक्तीचे व आख्याताचे अर्थ घालून एक नवाच अध्याय त्यांनीं सजविला आहे ! आख्यातार्थ पुष्कळ व विभक्तीचीं कारकें सहा म्हणून त्यांची येनकेन प्रकारेण संख्या फुगविण्याकरितां हा त्यांचा सारा उपद्व्याप आहे ! तसे पाहिले तर कारकाचा-सुद्धां व्याकरणाशीं काय संबध आहे तें सांगणें कठीणच आहे. उद्यां एखाद्या व्याकरणकारानें हा भाग पूर्ववैयाकरणानीं निष्कारण व्याकरणअभ्यासकाच्या बोकांडीं बसविला आहे, असें म्हणून तो रद्द करण्याचा आग्रह केला तर त्याचें समाधान कसें करावे हा प्रश्नच आहे. ]

---

# अध्याय दुसरा.

## पदप्रयोग.

१ **प्रयोगप्रकार** :—प्रयोगाचे (पदप्रयोगाचे) तीन प्रकार आहेत—(१) कर्तरि, (२) कर्मणि व (३) भावे.

[**दामल्यांनीं** संकीर्ण प्रयोग असा आणखी एक प्रकार सांगितला आहे. 'प्रयोग' ह्या शब्दाचा बोलताना उपयोग (usage) असा अर्थ घेऊन त्यांनीं हा संकर विभाग सजविला आहे. याविषयीं आम्ही पूर्वीं 'काळ व अर्थविकरण' अध्यायांत सांगितलेंच आहे. हे त्यांचे प्रयोगप्रकार मुळांत चुकीचे आहेत हें त्या विवेचनावरून स्पष्ट होईल.]

२ **कर्तरिप्रयोग** :—कर्त्याच्या लिंग, वचन, पुरुषाप्रमाणेच जेथें क्रियापदाचें लिंग, वचन व पुरुष ही असतात त्या प्रयोगास **कर्तरिप्रयोग** असे म्हणतात.

[कोणत्या काळात व अर्थात कोणते प्रयोग होतात तें मागे सांगितलेंच आहे. त्यावरून कर्तरिप्रयोग केव्हा होतो ते कळून येईल. तथापि पुनः एकदा पुढील कलमांत त्यासंबधीं विस्तारानें सांगितले आहे.]

३ कर्तरिप्रयोगांत कर्ता व कर्म ही नेहमीं प्रथम स्वरूपी असतात. कवितेंत कर्माची कधीं कधी द्वितिया विभक्ति असते. जसे :— 'धनिक वेची **धनातें**.'

४ वर्तमानकाळांत, सर्व अपूर्णकाळांत व रीतिकाळांत कर्तरिप्रयोग असतो. आज्ञार्थातही कर्तरिप्रयोग असतो. मुख रचनेत 'जा' हा अकर्मक धातु आल्यामुळें सर्वत्र कर्तरिप्रयोगच असतो.

५ पढ गणाच्या पढ, शिक, उमज इत्यादि धातूंत कर्तरिप्रयोग होतो. कारण हे धातू मूलतः अकर्मक असे मानले आहेत.

[अकर्मक म्हणण्याचें कारण त्यांची क्रियापदे दोन्ही प्रकारचीं होतात. जसें 'तो उमजला', 'तो ते उमजला', 'गाय व्याली', 'गाय गोऱ्हा व्याली', 'मी त्यांच्याकडे पढलों', 'मी व्याकरण पढलो' इ. **दामल्यांनीं** आचर गणाचे धातू कर व धू धातूचे कोंकणस्थानीं केलेले प्रयोग (usages) यांचा कर्तरिप्रयोगाशीं संबंध नसून ते केवळ अपप्रयोग (wrong usages) आहेत, हें मागें दाखविलेंच आहे. यावरून

अमूक धातूचा कर्तरि किंवा कर्मणि किंवा भावेप्रयोग झालाच पाहिजे ही दामल्यांची विचारसरणी चुकीची कशी हें दिसून येईल ]

**६ कर्तरिप्रयोगाचे प्रकार** :—कर्तरिप्रयोगाचे ( १ ) सकर्मक कर्तरि व ( २ ) अकर्मक कर्तरि असे दोन प्रकार आहेत. ज्या कर्तरिप्रयोगांत कर्म असते तो **सकर्मक कर्तरिप्रयोग,** ज्यांत कर्म नसते तो **अकर्मक कर्तरिप्रयोग.**

[ कर्तरिप्रयोगांत कर्त्याचे प्राधान्य असल्यामुळे कर्माच्या अनुरोधाने अकर्मक किंवा सकर्मक असे भेद करण्याचे मुळींच कारण नव्हते पण **दामल्यांनीं** हीच शंका प्रकट करून पुन इतर वैयाकरणांप्रमाणें गतानुगतिकत्वाची कास धरली आहे ! अर्थात् मोठासा तत्त्वाचा प्रश्न नसल्यामुळें आम्हीही रूळलेला रस्ताच धरला आहे आणि त्याचाही एक उपयोग आहे **दादोबांनी** प्रथम 'मुख' ( voice ) आणि प्रयोग ( concord ) यामध्यें गल्लत गेली व त्या प्रकाराला **कर्मकर्तरि** असे नांव दिलें वास्तविक यात जो प्रयोग आहे तो केवळ अकर्मक कर्तरिप्रयोग होय. 'शिपायाकडून चोर धरला गेला ' या वाक्यांत ' धरला गेला ' हे सयुक्त क्रियापद असून ' धरला जाणारा ' जो चोर तोच कर्ता होय. येथें शिपायानें चोर धरला या अगदीं भिन्न असणाऱ्या वाक्यांतील कर्म मानणे हे अगदींच चुकीचे आहे. पण ही साधी गोष्ट कोणत्याही वैयाकरणाच्या लक्षांत आली नाही **दादोबांनीं** याला कर्मकर्तरि म्हटला, तर चोर हें कर्म आहे असेच मानून इतरानीं तो कर्मणिप्रयोग मानला आहे यासबधी अधिक विवेचन कर्मणिप्रयोगात व पुढे 'मुख' प्रकरणांत होईल. तूर्त सकर्मक व अकर्मक या भेदाचा उपयोग हा प्रयोग केवळ अकर्मककर्तरि आहे, **दादोबांच्या** म्हणण्याप्रमाणे कर्मकर्तरि नाहीं एवढें दाखविण्यापुरताच केला आहे. ]

**७ कर्मणिप्रयोग** :—ज्या प्रयोगात क्रियापदाचे लिंग, वचन व पुरुष ही कर्माप्रमाणें असतात त्या प्रयोगास **कर्मणिप्रयोग** असे म्हणतात.

[ कर्मणिप्रयोगात कर्म असलेंच पाहिजे त्यामुळें त्याचा अकर्मक असा प्रकार होणे शक्यच नाहीं. **दादोबांनीं** ज्याला कर्मकर्तरि म्हटलें त्यालाच **दामल्यांनी** नवा कर्मणि असे नांव दिले आहे त्यासबधीं वर सांगितलेच आहे या नव्या कर्मणीच्या जोडीस **दामल्यांनीं** मुखाचीं 'जे' प्रत्यय लावून जीं जुनीं रूपें होतात उदा. करिजे, जाणिजे इ. त्यांवरून जुना कर्मणि किंवा **पुराण कर्मणि** असा एक प्रकार केला आहे. अर्थात् त्याला इतर वैयाकरणांचा पाठिंबा आहे पण याही पुढें जाऊन **समापन कर्मणि व शक्य कर्मणि** हे आणखी दोन प्रकार केले आहेत पहिल्या प्रकारासबधीं त्यांनीं दिलेलीं 'त्याचा धडा शिकून झाला', 'त्यानें काम करून टाकलें' हीं उदाहरणे म्हणजे सयुक्त क्रियापदाच्या एका विशिष्ट अर्थाचीं ( पोटअर्थाचीं ) म्हणजे समापन

किंवा समाप्ति या अर्थाचीं उदाहरणें होत. अशा अर्थाची व्याकरणांत दखलगिरी घ्यावयाची नाहीं हें पूर्वीं सांगितलेंच आहे. 'मला इंग्रजी **बोलतां येतें** किंवा 'मला तो धंदा **सोडावा लागला**' हींही अशाप्रकारच्या म्हणजे शक्यता व भाग पाडणे या पोटअर्थाचीं उदाहरणें आहेत. या सर्व प्रसगीं प्रयोग अकर्मक कर्तरीच असतो हें सांगावयास नको 'मला तो धंदा **सोडावा लागला**', 'त्यानें पुस्तक **आणिलें**' या वाक्यांतील प्रयोगास 'प्रधानकर्तृक कर्मणि' असे नांव देऊन त्यांनीं आणखी एक कर्मणीचा पाचवा प्रकार निर्माण केला आहे! येथे मुख, विभक्ति वगैरेचा घोटाळा त्यांनीं नसताच उत्पन्न केला आहे. कर्ता चतुर्थीत नसतो हे आम्ही मागे **दामल्यांचा** आधार देऊनच दाखविलें आहे शिवाय प्रयोगात कर्त्याची किंवा कर्माची विभक्तिही पाहण्याची जरूरी नाहीं (मुखात ती पाहावयाची असते) तसेच मुख तिन्ही भाषात आहे. पण प्रयोग हा फक्त मराठींतच आहे. तेव्हां मख व प्रयोग यांचा घोटाळा करून सस्कृत व इंग्रेजीची येथे झालेली तुलना निरर्थक आहे सारांश कर्मणिप्रयोगाचे कोणतेही प्रकार नाहींत ]

८ कर्मणिप्रयोगांत **कर्ता** तृतीयान्त असून कर्म नेहमी प्रथमस्वरूपी असतें. हा प्रयोग भूतकाळात व सर्व प्रकारच्या पूर्ण काळांत होतो.

९ **भावेप्रयोग** :—ज्या प्रयोगात क्रियापद हें लिंग, वचन व पुरुष ह्या बाबतींत कर्ता किंवा कर्म या दोन्हींप्रमाणे नसून तें स्वतंत्र म्हणजे नपुंसकलिंगी, तृतीय पुरुषी, एकवचनी असते त्या प्रयोगास **भावेप्रयोग** असे म्हणतात.

१० **भावेप्रयोगाचे प्रकार** :—भावेप्रयोगाचे (१) **सकर्मक भावे** उदा. शिपायानें चोरास धरले. (२) **अकर्मक भावे** उदा. त्यानें शुक्रवारी निघावे व (३) **अकर्तृक भावे**. उदा. 'मला तेथे साजावलें,' 'त्याला जाववते.'

[**दामल्यांनीं** या प्रयोगाचे (१) प्रधानकर्तृक भावे, (२) गौणकर्तृक भावे व (३) अकर्तृक भावे असे तीन प्रकार केले आहेत प्रधानकर्तृक भावे याचेच त्यांनीं सकर्मक व अकर्मक असे दोन प्रकार केले आहेत 'प्रधानकर्तृक भावे' हे नाव त्यांनीं प्रधानकर्तृक कर्मणीच्या धर्तीवर दिलें आहे. पण कर्मणीचा हा भेदच चुकीचा असे आम्हीं दाखविलेंच आहे खरें म्हटले तर **दामले** प्रधानकर्तृक भावे प्रयोग म्हणतात तोच एकमेव एक भावेप्रयोग आहे त्याचे दोन प्रकार आहेत ही गोष्ट वेगळी. कारण गौणकर्तृक भावे ही रचना जी त्यांनीं सांगितली त्यांत प्रयोगाचा मुळींच संबध नसून तो मुखरचनेचा प्रकार आहे. म्हणूनच नवा कर्मणि हा जसा कर्मणिप्रयोग नव्हे

त्याप्रमाणेंच हा गौणकर्तृक भावे, भावेप्रयोगच नव्हे. येथें 'मला काम करवते' इत्यादि प्रयोग केवळ अकर्मक कर्तरि आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ]

११ भावेप्रयोगांत कर्ता तृतीयान्त असून त्याच्या सकर्मक प्रकारांत कर्म द्वितियान्त असतें. पण कधी कधीं कर्म प्रथमरूपीही असतें. उदा. 'त्याने इतिहास वाचीत बसावे' येथे 'बसावे' या अकर्मक साह्यक्रियापदाने प्रयोग निश्चित होतो हे लक्षांत ठेवले पाहिजे.

१२ सकर्मक भावेप्रयोग भूतकाळांत व सर्व पूर्ण काळांत होतो. अकर्मक भावे मुख्यतः विध्यर्थात होतो.

[ येथे प्रयोगासबधीं आतांपर्यंत मिळविलेली माहिती थोडक्यात सकलित करणे युक्त होईल प्रयोग म्हणजे लिग, वचन, पुरुष या बाबतींत कर्त्याप्रमाणे, कर्माप्रमाणे किंवा स्वतत्र नपुसकलिगी तृतीय पुरुषीं एकवचनी अशी क्रियापदाची व्यवस्था. 'प्रयोग' या शब्दाची योजना वहिवाट ( usage ) अशा अर्थी भाषेत होते हा अर्थ व्याकरणात घेता कामा नये. तसा अर्थ घेऊन **दामल्यांनी** 'सकर प्रयोग' कल्पिले आहेत ते कसे चुकीचे आहेत ते मागे दाखविलेच आहे असले चुकीचे प्रयोग ( usage ) अपप्रयोग किंवा दुष्ट प्रयोग होत त्याचे ग्राह्याग्राह्यत्व भाषाशास्त्रपारगत अशा **दादोबां**सारख्या शिष्टांनी ठरवावयाचे. स्थळ, काळ, लिग, जाति, व्यवसाय इत्यादि दृष्टींनीं पछाडलेल्या तथाकथित शिष्टांपेक्षा हेच शिष्ट अधिक मान्य ठरणार. आता तर या कामीं सरकारी युनिव्हर्सिट्या, साहित्य परिषदा यांच्या कमिट्या निवडण्यात येत आहेत त्याचे निर्णय मान्य केलेच पाहिजेत पण त्यातही वाटेल त्या उपटसुभास स्थान मिळवतां येणार नाहीं अशी तजवीज झाली पाहिजे मुख ( Voice ) म्हणजे प्रयोग नव्हे हेही आता आम्हीं सिद्ध केले आहे म्हणून **दादोबांचा** 'कर्मकर्तरि,' व **दामल्यांचा** 'कर्मणि' याचा त्याग केलाच पाहिजे यावरून 'प्रयोग' ही मराठी भाषेतील एक साधी घटना आहे ती क्रियापदाला त्या भाषेत लिंग असल्या मुळे झाली आहे, हें लक्षात ठेवले पाहिजे प्रयोग ठरीव काळात किंवा अर्थात होतात उदा कर्मणिप्रयोग भूतकाळांत किंवा पूर्णकाळात होतो, ही गोष्ट खरी असली तरी, प्रत्येक धातु कर्तरिप्रयोगांत असलाच पाहिजे अशी जी त्यांनीं 'भेद' चर्चेच्या प्रसगाने भूमिका स्वीकारली आहे ती अगदीच अशास्त्रीय आहे 'प्रयोग' ही पदविषयक घटना आहे. तेव्हां निव्वळ शब्द जो 'धातु' त्यासबधीं प्रयोगाशीं सबध जोडण्याचे कारण नाहीं खुद्द **दामलेच** कबूल करतात कीं प्रत्येक धातूचा कर्तरिप्रयोग झालाच पाहिजे, असे कुठें आहे, असे कोणी म्हणतीलही. आम्ही तर आतां साफ म्हणतो कीं असा विचार करण्याचे मुळीं कारणच नाहीं. **दामल्यांनीं** एकीकडे 'रच, वाट' वगैरे धातूंमध्यें कर्तरिप्रयोगच होतो असें सांगितलें आहे. तर दुसरीकडे 'रच, वाट' सारख

कांही धातू सोडून बाकीच्यांचा कर्तरिप्रयोग होतो असे म्हटले आहे ! यासबधीं एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवावयाची म्हटली म्हणजे 'प्रयोग' म्हणजे 'वहिवाट' (usage) हा जो प्रयोग, या शब्दाचा अर्थ आम्हीं सांगितला तो विभक्ति, काळ, अर्थ, प्रयोग (व्याकरणीय) या सर्व सज्ञात थोड्याबहुत प्रमाणांत अभिप्रेत आहे म्हणजे आरभीं विभक्त्यादिकाचे स्थलकालपरत्वे निरनिराळे प्रत्यय उपयोगांत येउन नतर काहीं एकसूत्रता आल्यावर व्याकरणाचे नियम बसले. तेव्हां हे प्रयोग (usage) आधीं व नियम नतर असा प्रकार असल्यामुळें या बाबतींत अमुक भाषेत अमुक विभक्ति किंवा काळ असलेच पाहिजेत असें, ज्याप्रमाणे म्हणता येणार नाहीं, त्याप्रमाणेच अमुक धातूचा कर्तरिप्रयोग झालाच पाहिजे असेही म्हणता येणार नाहीं प्रयोगासबधी-प्रयोग (व्याकरणीय) व प्रयोग (usage) या दृष्टीनीं एक तडजोड करता येईल. ती हीच कीं प्रयोग (usage) काहींही असो. उदा 'आघोळ केलो', असे कोणी म्हणतील ते सुखें म्हणोत, पण व्याकरण सागताना तो अशुद्ध असे समजून आघोळ केली असे समजूनच कर्मणिप्रयोग म्हणून सागितला पाहिजे यापेक्षा प्रयोगासबधीं जास्त सूचना परिस्फोट या भागांत सागितल्या आहेत ]

---

# अध्याय तिसरा.

## पदान्तर.

१ **पदान्तर** :—पदरूप बदलून वाक्यरूपान्तर करणे याला पदान्तर असे म्हणतात. याचे तीन प्रकार आहेत. ( १ ) भेदपदान्तर, ( २ ) मुखपदान्तर व ( ३ ) रूपपदान्तर.

१ **भेदपदान्तर** :—प्रयोजकभेदी व शक्यभेदी क्रियापदांच्या द्वारा जे पदान्तर होते त्याला **भेद** असे म्हणावे.

[ आम्ही प्राकृतेयांत ' प्रयोजक ' व ' शक्य ' धातूसबधीं सांगितले त्यानंतर ' वाक्येय ' ह्या भागात प्रयोजक व शक्यभेदी क्रियापदाविषयीं विचार केला आहे. आता पदान्तराच्या दृष्टीने या सर्व वादाची फेरतपासणी करणे जरूरीचे आहे **दादोबांनीं** प्रयोजकभेदी क्रियापद मानले त्यापासून या वादाला सुरुवात झाली. **दादोबांच्या** या मतास **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यानीं पुढीलप्रमाणे हरकत घेतली. ते म्हणतात, " आतां तीन प्रकारचा भेद म्हणून जो विशेष **दादोबांनीं** सांगितला आहे त्याचेही प्रयोजन दिसत नाही प्रातिपदिकास ज्याप्रमाणे नवीन प्रत्यय लागून नवीन पदे होतात, त्याप्रमाणे धातूस व नामास नवीन प्रत्यय लागून नवीन धातू होतात. परंतु प्रातिपदिकास विभक्ति लावण्याच्या विचारांत तीं स्वतंत्र आहेत कीं साधित आहेत या भेदाचा जसा उपयोग नाहीं, तसाच धातूला आख्यात प्रत्यय लावण्याच्या विचारात म्हणजे क्रियापदाच्या साधनिकेत धातु स्वतंत्र आहेत कीं साधित आहेत या विचाराचे प्रयोजन नाहीं कारण धातु सिद्ध असेल किंवा साधित असेल तरी त्यापासून होणाऱ्या क्रियापदाच्या रूपात कांहीं विशेष कार्य नसल्यामुळें काळ, वचन, पुरुष वगैरे क्रियापदरूप भेदक कारणात त्या प्रकाराची गणना आम्ही केली नाही " याला **खेर** यानीं पुढीलप्रमाणें उत्तर दिले आहे ते म्हणतात, " या आक्षेपांत कांहींच अर्थ नाहीं. व्याकरण करण्यात आम्ही केवळ विकरणाकडेच लक्ष देत नाहीं नामाचे व्याकरण करताना ते नाम सामासिक असल्यास आपण तसा निर्देश करतो. मूळरूपभेदी, प्रयोजकभेदी, शक्यभेदी क्रियापदाच्या विकरणामध्यें फरक नसेल. तथापि मूळरूपाप्रमाणें अन्यभेदात चालणारे अंग निराळे आहे म्हणून ते वेगळे सांगितलें पाहिजे कारण कीं **क्रियापदाच्या व्युत्पत्तीशीं** भेदाचा संबंध नाहीं, तर **क्रियापदाच्या रूपाच्या व्युत्पत्तीशी** भेदाचा संबध आहे " यातील शब्दाच्या संदिग्ध कार्यकारणात्मक संबधाचा फायदा घेऊन **दामल्यांनीं** त्यांच्यावर पुढीलप्रमाणें हल्ला केला आहे " दादोबांच्या पक्षास उचलून धरण्याचा खराचा प्रयत्न सर्वस्वी अस्थानीं असून त्यांनीं कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या एकाही आक्षेपाचें समाधान-

कारक खंडन केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनीं ते आक्षेप नीट समजावून घेतले असेही दिसत नाहीं." पण यापुढें बरेचसे नरमून **दामले** म्हणतात, "'कर' हे मूळ अंग व 'करव' हें नवीन अंग ह्या दोहोंचे विकरण सारखे हे खरें. पण मूळ अंगात झालेला फरक सांगितल्याशिवाय, क्रियापदाचें रूप स्पष्ट होणार नाहीं यापेक्षा त्यांच्या म्हणण्यांत कांहींच विशेष मुद्दा दिसत नाहीं पण या म्हणण्यात **थोडासा गैर-समज दिसतो**" शेवटीं परत कोलांटी घेऊन ते म्हणतात, "खेर म्हणतात कीं शब्दाचें व्याकरण करताना तो जशाचा तसा घ्यावा आता येथे 'जशाचा तसा' शब्द कोण घेतो? 'कर' या सकर्मक धातूचें असे म्हणणारे खेर कीं करव या सकर्मक धातूचें म्हणणारे कृष्णशास्त्री चिपळूणकर? तसेंच 'कर' येथून आरंभ केल्यास तें करव या नवीन अंगाच्या स्पष्टीकरणासाठीं भेद सांगणाऱ्या व्युत्पत्तीविषयक विचार करण्याची गरज पडते कीं 'करव' येथून प्रारंभ करून 'करव' हे 'कर' पासून कसें झाले हें सांगण्याची जो मुळीं भानगडच ठेवीत नाहीं, म्हणजे त्याला भेदाची आवश्यकता नाहीं, त्यास व्युत्पत्तीविषयीं विचार करण्याची जरूरी पडते? या प्रश्नांचीं उत्तरें **आमच्या मताप्रमाणेंच** वाचकांनीं आपल्या मनाशीं दिलीं म्हणजे त्यांचे त्यासच कळून चुकेल कीं खेरांची इमारत वाळूच्या भुसभुशित पायावर उभारलेली असल्यामुळे **ती क्षणभरही टिकाव धरूं शकत नाहीं.**" आमच्या मतें **खेरांस** जे दूषण त्यानीं दिलें आहे, ते स्वतः त्यांचें त्यांनाच लागू पडतें म्हणजे त्यानीं **खेरांचे** आक्षेप नीट समजावूनच घेतले नाहींत त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें देता येतील पण तीं त्यांच्या **मताप्रमाणेंच** वाचकांनी द्यावीं असा आग्रह कोण ऐकेल? पहिल्या प्रश्नाचें उत्तर दोघेही जशाचा तसा शब्द म्हणजे 'करव' हा शब्द घेतात, असे आहे फक्त **खेर** 'कर' हा धातु सांगतात आणि **कृष्णशास्त्री** 'करव' हा साधित धातु सांगतात. **खेरांचें** म्हणणें असें कीं **क्रियापदाच्या व्युत्पत्तीची** म्हणजे धातु सिद्ध किंवा साधित हे सांगण्याची जरूरी नाहीं. पण प्रयोजकत्व किंवा शक्यत्व दाखविण्यासाठीं **क्रियापदाच्या रूपाची** व्युत्पत्तीची जरूरी आहे. आणि म्हणूनच भेदरूप सांग-ण्याची आवश्यकता आहे आता **दामल्यांच्या** दुसऱ्या प्रश्नाचेंही उत्तर देता येईल. वर दिलेल्या उताऱ्यानंतर **दामले** म्हणतात, 'करवितो' याचें व्याकरण करताना 'कर' या सकर्मक धातूचें इ. **दादोबा** म्हणतात. आणि तसेंच म्हणावयाचें असें खेर गृहीत धरून चालतात. तसें गृहीत धरलें म्हणजे 'कर' यास प्रयोजकअर्थीं नवीन अंग प्राप्त होतें. त्याचा निर्देश केल्यावाचून 'करवितो' या क्रियापदाची साधना (क्रियाप-दाच्या **रूपाची** व्युत्पत्ति) पुरी होत नाहीं हे **खेरांचें** म्हणणें निर्विवाद सत्य आहे 'येथे क्रियापदाच्या रूपाची व्युत्पत्ति जरूर आहे, असे **खेरांनीं** गृहीत धरलें आहे तर्व्हा जेथे ते टाळले गेले आहे तेथे' म्हणजे दुसऱ्या पक्षीं–भानगडच नको म्हणणाऱ्या पक्षीं–जरूरी आहे असें उत्तर येतें. अर्थात् या दोन्ही उत्तरांनीं–तीं **दामल्यांच्या** मताप्रमाणें नाहींत,–**खेरांच्या** म्हणण्यास कांहींच बाधा येत नाहीं. आतां

'ही गृहीत गोष्ट स्वीकारलीच पाहिजे असे जोपर्यंत **खेरांनीं** किंवा तत्पक्षीयांनीं सिद्ध केलें तोपर्यंत त्यांचें म्हणणे केवळ निराधार होय. ' या **दामल्यांच्या** म्हणण्याचा विचार करू. आमच्या मतें हे स्पष्टीकरण **खेरांचें** म्हणणे समजून घेण्याचा प्रयत्न **दामल्यांनीं** केला असता तर त्यांना सहज झालें असतें. या वादाचा इत्यर्थ थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे **दादोबांनीं** भेदरूप हा विभक्ति, काळ, अर्थ यांप्रमाणें विकार आहे असें म्हटलें. त्यावर **कृष्णशास्त्र्यांनी** तो काळ, रूपांप्रमाणें विकार नाहीं, म्हणून आम्हीं त्याची विकारात गणना केली नाहीं **खेर** म्हणतात, ठीक आहे. तो विकार नाहीं पण व्याकरण सागताना विकरणाकडेच पाहिलें पाहिजे असे नाहीं दुसऱ्याही काहीं गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत. **शास्त्रीबोवांनीं** क्रियापदाच्या साधनिकेत धातु सिद्ध असेल किंवा साधित असेल या विचाराचें प्रयोजन नाही असे सागितले तेंही **खेरांनीं** मान्य केलें मात्र **शास्त्रीबोवांनीं** 'करवतो' या क्रियापदात धातु 'कर' कीं 'करव' हा प्रश्न उपस्थित केला व **दामल्यांनी** तो I.प्रकारण या वादात ओढला! येथे **खेरांचें** म्हणणें एवढेंच कीं आम्ही **क्रियापदाच्या** व्युत्पत्तीचा म्हणजे धातूविषयीं **शास्त्रीबोवा** म्हणतात त्याप्रमाणें विचार करीत नाहीं तर **क्रियापदाच्या रूपाचा** एका विशिष्ट दृष्टीनें म्हणजे 'प्रयोजकत्व अर्थदृष्टीने विचार करीत आहो. हा विकार नव्हे. पण हें क्रियापदाचें महत्त्वाचें अग आहे. तें सांगितले पाहिजे. म्हणून आम्हीं त्याला 'भेद' हें नाव दिलें आहे हा 'भेद' किंवा क्रियापदाचे रूपानें 'करणरूप' (affirmative), 'अकरणरूप' (Negative), 'स्वाधीन मुख' (Active Voice), 'अस्वाधीन मुख', (Passive Voice), यांसारख्या वाक्यरूपान्तरालाही मदत होते, हें त्याचें विशिष्टत्व आहे. (हें शेवटचे स्पष्टीकरण **खेरांनीं** केलें नाहीं. म्हणूनच तत्पक्षीय म्हणून आतां आम्हीं ते केले आहे.) **दामले**-पक्षीयानीं याचा बारकाईने विचार करावा हा सर्व घोटाळा 'शब्द' व 'पद' यांमधील फरक न कळल्यामुळें सर्व पूर्ववैयाकरणांकडून झाला आहे. **दामले** यांनीं वरील उतऱ्यांपैकीं एकांत पद हा शब्द वापरला आहे हें अभ्यासकाच्या लक्षात आलेच असेल. त्यांच्या मते 'क्रियापद' व 'धातु' हीं दोन्ही पदेच आतां आम्हीं ही गोष्ट आरभींच स्पष्ट केल्यामुळें 'धातू'चा 'शब्द' या दृष्टीने प्राकृतेर्यांत विचार केला आहे, त्यामुळे **कृष्णशास्त्री चिपळूणकर** व **खेर** सागतात त्याप्रमाणे क्रियापदाची व्युत्पत्ति सागण्याचे आम्हाला कारणच राहिले नाहीं **खेर** म्हणतात त्याप्रमाणे आम्हीं क्रियापदाच्या रूपाची अर्थात् प्रयोजकत्वार्थ रूपाची व्यवस्था केली आहे व त्यालाच भेद असे म्हटलें आहे ]

## भेदप्रकार

भेदाचे (१) प्रयोजक भेद व (२) शक्य भेद असे दोन प्रकार आहेत.

[ पूर्वी भेदरूप होण्यापूर्वीचें जे मूळचे क्रियापद त्याला 'मूळरूपभेद' असा प्रकार मानीत असत आतां क्रियापद प्रयोजकभेदी कीं 'शक्यभेदी' यावरच भेद ठरविल्यामुळें दोन भेदच मानले आहेत. तेव्हां व्याकरण सांगतांना मूळरूपभेद सांगण्याचें कारण नाहीं. ]

( १ ) **प्रयोजकभेद** :—ज्या भेदपदान्तरांत क्रिया दुसऱ्याकडून घडविली जाते या अर्थाने प्रयोजकभेदी क्रियापदाची योजना होते, त्या भेदपदान्तरास **प्रयोजकभेद** असे म्हणतात.

[ वर प्रयोजकभेदी क्रियापदासबधीं व भेदासबधीं स्पष्टीकरण केल्यामुळे आतां यासबधीं अधिक विवेचन करण्याची जरूरी नाही ]

( २ ) **शक्यभेद** :—ज्या भेदपदान्तरांत क्रियेची शक्यता दाखविण्यासाठी शक्यभेदी क्रियापदाची योजना होते, त्या भेदपदान्तरास **शक्यभेद** असे म्हणावे.

[ शक्यधातु, शक्यभेदी क्रियापद व भेद यासबधीं विवेचन सविस्तर झाल्यामुळें आता त्यासंबधीं अधिक सांगावयास नको. ]

२ **मुखपदान्तर** :—ज्या पदान्तरांत क्रिया स्वाधीनपणें किंवा अस्वाधीनपणे घडली हे दाखविण्याकरितां क्रियापदाच्या रूपाची योजना होते, त्या पदरूपान्तरास **मुखपदान्तर** असे म्हणतात.

[ मुखाला पूर्वी प्रयोग असें समजून **दादोबांनीं** 'कर्मकर्तरि' व **दामल्यांनीं** 'कर्मणि' प्रयोग अशी नांवे चुकून कशीं दिलीं तें पूर्वी सांगितलेंच असल्यामुळें आतां त्यासबंधीं चर्चा करण्याचें कारण नाहीं ]

**मुखपदान्तराचे प्रकार** :—मुखपदान्तराचे ( १ ) स्वाधीन मुखपदान्तर व ( २ ) अस्वाधीन मुखपदान्तर असे दोन प्रकार आहेत.

( १ ) **स्वाधीन मुखपदान्तर** :—जेथे क्रिया स्वाधीन असल्यामुळें क्रियापदही मूळ रूपांतरच असते तेव्हां त्या मुखपदान्तरास '**स्वाधीन मुखपदान्तर** असे म्हणावे.

[ सामान्यतः क्रियापदे मूळ रूपांतच असल्यामुळें स्वाधीन मुखरूप सांगण्याची आवश्यकता नाहीं व व्याकरण सांगतांना ते सांगावयाचेही नसतें. ]

( २ ) **अस्वाधीन मुखपदान्तर** :—जेथे क्रिया अस्वाधीन असते व ती तशी दाखविण्यासाठी क्रियापदाचे स्वतंत्र रूप योजावें लागतें त्या प्रकारास **अस्वाधीन मुखपदान्तर** असे म्हणतात.

[ अस्वाधीन मुखरूप प्रकार हाच व्याकरण सागतांना सांगावयाचा असतो ]

**मुखरचना** :—मुखरचनेचे दोन प्रकार आहेत. ( १ ) नवीन मुखरचना व ( २ ) जुना मुखरचना.

( १ ) **नवीन मुखरचना** :—मूळ क्रियापदाच्या भूतकृदंतापुढे 'जा' धातूचे त्या त्या काळांतील रूप घातले म्हणजे नवीन अस्वाधीन मुख सिद्ध होते. स्वाधीनमुख वाक्यांतील कर्त्यापुढें 'कडून' या शब्द-योगी अव्ययाचा उपयोग होतो. स्वाधीनमुख वाक्यांतील कर्म या वाक्यात कर्ता असतो.

नव्या अस्वाधीन मुखपदान्तराची निरनिराळ्या काळाची व अर्थाची रूपे होतात. ती पुढे दिली आहेत.

## १ काळ : कर धातु.

### अ—मुख्य काळ मुख.

| वर्तमान | भूत | भविष्य |
|---|---|---|
| केले जाते | केलें गेलें. | केले जाईल. |

### ब—अपूर्ण काळ मुख.

| अपूर्ण वर्तमान | अपूर्ण भूत | अपूर्ण भविष्य |
|---|---|---|
| केले जात आहे. | केले जात आहे | केले जात असेल |

## क–पूर्णकाळ मुख.

| पूर्णवर्तमान | पूर्णभूत | पूर्णभविष्य |
| --- | --- | --- |
| केले गेलें आहे | केले गेले होते | केले गेलें असेल. |

## ड–रीतिकाळ मुख.

| रीतिवर्तमान | रीतिभूत | रीतिभविष्य |
| --- | --- | --- |
| केले जाते, जात असते | केले जात असे, केलें जाई. | केले जात असेल. |

## २ अर्थ : कर धातु.

| विध्यर्थ मुख | संकेतार्थ मुख |
| --- | --- |
| केले जावा, वी, वें. | केला गेला असता. ( तर ) |

[ काळांत व अर्थांत तृतीय पुरुष असल्यामुळें आज्ञार्थाचीं मुखरूपें होणे शक्य नाहीं कारण आज्ञार्थ हा मुख्यत्वें द्वितिय पुरुषास अनुसरून असतो. **दामल्यांनीं** याला प्रयोग म्हणून ' तें काम करण्यांत येतें, आलें, येईल ' अशीं रूपें दिलीं आहेत. येथें करण्यांत आलें, हें सयुक्त क्रियापदसुद्धां नाहीं. असें असतांना **दामल्यांना** अशी भ्रान्ति कां पडावी ते कळत नाहीं. करण्यांत हें करणें या धातुसाधित नामाचें सप्रत्यय रूप ' तिकडे जाण्यांत अर्थ नाहीं ' यांत जाण्यांत हें जसें धातुसाधित नाम आहे तसें करण्यांत हे आहे. ]

( १ ) **जुनी मुखरचना :**—हे रूप धातूंस ' जे ' प्रत्यय लागून होतें. हे प्रयोग जुन्या पद्यांत व गद्यांत आढळतात. येथे बहुधा ' आ ' किंवा ' ए ' प्रत्ययान्त तृतीया येते.

| वर्तमान | भूत | भविष्य | रीतिभूत |
|---|---|---|---|
| सांगिजे | म्हणिजले | म्हणिजेल. | करिजे |

[ हा प्रत्यय संस्कृत ' य ' प्रत्ययापासून आला आहे जसे ' क्रियते ', ' किजते.' मुखाशीं प्रयोगाशीं जी भ्रान्ति झाली ती या रूपांमुळे सध्या प्रयोगाला जीं कर्तरि, कर्मणि, भावे ही नांवे पडली तीं प्रयोग व मुख यांच्याशीं **दादोबां**पासून **दामल्यां**-पर्यंत सर्व व्याकरणकारांनी घोटाळा केला त्यामुळे. संस्कृतात व इंग्रेजीत मुखरचना आहे जसें ' व्याघ्रो म्रियति, ' ' व्याघ्रेण म्रियते, ' ' स किं करोति ? ' ' तेन किं क्रियते ? ' ही कर्तरि, भावे, कर्मणि मुखाचीं उदाहरणें आहेत. संस्कृतात क्रियापदास लिंग नसल्यामुळे त्या भाषेत प्रयोग नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे यासबंधीं **राजवाड्यांनी** आपल्या नेहमींच्या सवयीप्रमाणे पुढीलप्रमाणें विचित्र विधानें ठोकून दिलीं आहेत. " वर्तमान मराठींत विधि लिङ् चांगला राहिला आहे उदा जाईन ज्जा, खाईन ज्जा इ अलिकडील दादोबादि वैयाकरण विधि लिङ्चा हा जा कल्पून सहाय्यक्रियापद समजत मराठी उच्चा-रांत सदा द्वित्त ' जा ' येतो हे त्यांनीं लक्षांत घेतले नाहीं वर्तमान मराठीच्या अनुकरणाने, जाईन, जातील अशी रूपें जा हा स्वतंत्र धातु कल्पून होतात. त्यानेंही दादोबांदिकाची दिशाभूल झाली. जाज्जा, खाज्जा यांचे उच्चार सध्यां जात्‌जा, खात्‌जा, असेही करतात. मध्यम पुरुषाच्या एकवचनी करिज–जसु, करी, देई, ठेवी, करिजे, जाणिजे इत्यादि शेकडो रूपें ज्ञानेश्वरींत आहेत. हा लिङ्, बीम्स व हॉर्न्ले यांना ओळखतां आला नाहीं." याला उत्तर म्हणजे ' विधि लिङ् ' अशी कांही चिजच नसून मराठींतच नव्हे तर **राज-वाड्यां**च्या सुपीक डोक्याशिवाय ती कोठेंही नाहीं जाईन जा व खाईन जा यांत द्वित्त उच्चार नाहीं. व ती मुलांची किंवा बालकांची लाडिकपणाची भाषा आहे. हे सर्वच वाक्य केवलप्रयोगी होईल. उदा. ' मी खेळणार ज्जा, ' ' मा जाइन ज्जा नाटकाला ' ( आपट्यांच्या ' मधल्या स्थितीं'तले एक प्रकरण.) अर्थात् जा चा द्वित्त उच्चार मराठींत होत नाहीं. जात् जा. खात् जा येथे काहीं तसा उच्चार होतो. पण त्यावेळीं ' ज्जा ' होऊन संधि होतो. मात्र तसा उच्चार करणें शिष्टपणाचें नाहीं. सारांश येथे **दादोबा-दि**कांची दिशाभूल झाली नाहीं किंवा **भांडारकर, बीम्स्** आणि **हॉर्न्ले** हेही चुकले नाहींत. तर हा **राजवाड्यां**चाच लीलाविलास आहे ]

**३ रूपपदान्तर :**—अस्तिरूप वाक्याचे न, ना, नाही, नको, नये इत्यादिकांच्या द्वारें नास्तिरूप असें जे रूपान्तर होतें त्याला **रूपपदान्तर** किंवा **अकरणरूप** असें म्हणतात. हें अकरणरूप सर्व काळ, सर्व अर्थ व मुखरूपांचेंही होतें.

[ अकरणरूपाचीं रूपें बरींच अनियमित असल्यामुळे तीं काळ-अर्थ-मुखवार दे दिलीं आहेत. निरनिराळ्या संयुक्तकाळातही तीं बदलतात. पण तीं सर्व देता णे शक्य नाहीं ]

## १ काळ अकरणरूप.

### १ मुख्य काळ (अकरणरूप).

| धातु | वर्तमानकाळ | भूतकाळ | भविष्यकाळ |
|---|---|---|---|
| पड | पडत नाहीं. | पडलो नाहीं. | पडणार नाहीं. |
| कर. | करीत नाही | केले नाहीं, नव्हतें | करणार नाही. |

| धातु | वर्तमानकाळ | भूतकाळ | भविष्यकाळ |
|---|---|---|---|
| अस् | असत नाही | असलो नाहीं. | असणार नाही. |
| नस् | नसतो. | नसलो. | नसेन. |
| हो. | होत नाही | नव्हतो. | होणार नाहीं |

## २ अपूर्णकाळाचें अकरणरूप.

| धातु | अपूर्णवर्तमान | अपूर्णभूत | अपूर्णभविष्य |
|---|---|---|---|
| पड. | पडत नाही | मी पडत नव्हतो. | मी पडत नसेन. |
| कर. | करीत नाहीं | मी करीत नव्हतो. | मी करीत नसेन. |

## ३ पूर्णकाळाचें अकरणरूप.

| धातु | पूर्णवर्तमान | पूर्णभूत | पूर्णभविष्य |
|---|---|---|---|
| पड. | पडलो नाहीं. | पडलो नव्हतो. | पडलो नसेन. |
| कर. | केले नाहीं. | केलें नव्हतें. | केलें नसेन. |

## ४ रीतिकाळाचें अकरणरूप.

| धातु | रीतिवर्तमान | रीतिभूत | रीतिभविष्य |
|---|---|---|---|
| पड. | पडत नसतो | पडत नसे. | पडत नसणार. |
| कर. | करीत नसतो. | करीत नसें. | करीत नसणार |

## ५ अर्थ: अकरणरूप.

| धातु | आज्ञार्थ | विध्यर्थ | संकेतार्थ |
|---|---|---|---|
| पड. | पडू नको, नका. | पडू नये. | न पडतो. |
| कर | करू नको, नका | करू नये | न करतो. |

अस्वाधीन मुखरूपाचेही त्या त्या काळाचे व अर्थाचें अकरणरूप होतें. उदा. मारला जात नाहीं, मारला जात नव्हता, मारला जात नसेल, मारला जाऊं नये, मारला न जाता ( तर ).

[ आज्ञार्थांत मुखरचना नाहीं म्हणून त्यासबधींचे मुखरूप दिलें नाहीं. जुन्या मुखरूपाचे **न** किंवा **ना** या क्रियाविशेषण अव्ययांनी मुखरूप होते जसें -न म्हणिजे, ना म्हणिजे. **न** व **ना** प्रत्यय हे कवितेत इतर सर्व काळअर्थांसबधीही योजतात. या शिवाय, बोलण्यांत, पद्यात निरनिराळे रूपप्रयोग होतात. ते सर्वच येथे देणे शक्य नाहीं. आजपर्यंत मराठी व्याकरणांत ' रूप ' प्रकरणाची उपेक्षाच झाली होती. आम्हीं कसे-बसे त्याला रूढीच्या चाकोरींतून काढून व्याकरण नियमाच्या कक्षेंत आणले आहे. अन्य ठिकाणांप्रमाणें या ठिकाणींही सुधारणेस पुष्कळ वाव आहे. ]

## प्रकरण तिसरें.

# परिस्फोट.

### ( व्याकरणकथन )

## उपोद्घात.

**१ परिस्फोट** :—शब्दाची, पदाची किंवा दोहींची मिश्र अशी व्याकरणविषयक माहिती सांगणे, याला **परिस्फोट** किंवा **व्याकरणकथन** असे म्हणतात.

[ पूर्वीं याला ' पदच्छेद ' किंवा ' व्याकरण सांगणे ' असें म्हणत **दामल्यांनीं** ' पदपरिस्फोट ' अशी सञ्ज्ञा [illegible]. आम्हीं ती सञ्ज्ञा, शब्द व पद या दोन्ही बाबतीत सामान्यत योजली आहे ]

**२ परिस्फोटाचे प्रकार** :—( १ ) शब्दपरिस्फोट, ( २ ) पदपरिस्फोट व ( ३ ) मिश्रपरिस्फोट, असे परिस्फोटाचे तीन प्रकार आहेत.

**( १ ) शब्दपरिस्फोट** :—ज्या परिस्फोटांत शब्दाचा त्याच्या बाह्य व अन्तर्घटना या दृष्टींनी विचार होतो त्या परिस्फोटास **शब्दपरिस्फोट** असें म्हणतात.

**( २ ) पदपरिस्फोट** :—ज्या परिस्फोटांत पदाचा वर्गीकरणविकरण पदसंबंध व पदयोजना या दृष्टीनी विचार होतो त्या परिस्फोटास **पदपरिस्फोट** असे म्हणतात.

**( ३ ) मिश्रपरिस्फोट** :—ज्या परिस्फोटांत शब्द व पद यांचा मिश्र रीतीनें विचार करून माहिती सागावी लागते त्या परिस्फोटास **मिश्रपरिस्फोट** असें म्हणावे.

[ आतांपर्यंत व्याकरणाच्या या भागास ' व्याकरण सांगणें ' किंवा ' पदच्छेद ' असें नांव होतें अर्थात् तो बहुतेक पदपरिस्फोट होता. व म्हणूनच **दामल्यांनीं** त्याला हेंच नांव दिलें होतें. आम्हीं **दामल्यांचीच** सञ्ज्ञा व्यापक अर्थानें स्वीकारली आहे. यापुढे ' शब्दपरिस्फोट ' ही सञ्ज्ञा पहिल्या प्रकारासबधीं वापरली आहे व **शब्दांवर** व्याकरणविषयक टिपणें, स्फुटें या असे नुसतेंच सागितले आहे. तरी हा **सर्व** एकाच प्रकारचा परिस्फोट म्हणून समजावा. येथें अन्तर्घटनेचा व बाह्यघटनेचा

पुन्हां एकवार सक्षेपानें विचार झाला आहे, हें अभ्यासकाच्या ध्यानांत येईलच. यासबधीं जे प्रश्न दिले आहेत ते विवेचनक्रमासच धरून दिले आहेत. प्रथम वर्ण, अक्षरे, सधि याविषयीं स्फुटें यावयास सांगून नतर शब्दात होणारें पूर्वीचे व सामान्यरूपादि फेरफारांचा विचार झाला आहे. त्यानतर प्रत्यय, उपसर्ग, साधित शब्द व त्यातील सयुक्त व सामासिक शब्द यावर प्रश्न आहेत प्रश्न मुख्यतः विद्यार्थ्यांनी अभ्यास करण्यासाठीं आहेत. पण टीकाकारांनींही त्यांकडे बारीक रीतीनें पाहिले तर प्राकृतेय या व्याकरणाच्या भागाविषयीं आमचीं मते व **दामले**प्रभृति व्याकरणकारांशी असलेला आमचा मतभेद त्याना स्पष्ट होईल ]

---

# अध्याय पहिला.

## शब्दपरिस्फोट.

**१ शब्दपरिस्फोट प्रकार** :—शब्दपरिस्फोटाचे मुख्य दोन प्रकार आहेत. ( १ ) अन्तर्घटनाविषयक परिस्फोट व ( २ ) बाह्यघटनाविषयक परिस्फोट.

**( १ ) अन्तर्घटनाविषयक परिस्फोट** :—यांत वर्ण, त्याचे पोटप्रकार, बिंदु, विसर्ग व वर्णसंधि यांविषयीं खुलासा होतो.

**( २ ) बाह्यघटनाविषयक परिस्फोट** :—यांत प्रत्यय, घटक शब्द, प्रत्यय व घटक शब्दापूर्वी आदेश, आगम, सामान्यरूपादि फेरफार व संयुक्त व सामासिक शब्द यांविषयी खुलासा होतो.

**( ३ ) बिकट शब्दपरिस्फोट** :—पुढे बिकट शब्द परिस्फोटाचे नमुनेदार प्रश्न देऊन ते सोडवून दाखविले आहेत.

**प्रश्न १ ला :—( १ ) अक्षर, ( २ ) तज्ज्ञ, ( ३ ) आईक, (४) अंजली, (५) ऋकार, (६) पुनः, (७) तारूं या शब्दांचा वर्णदृष्ट्या परिस्फोट करा.**

**( १ ) अक्षर** :—यातील ‘ क्ष ’ हा वर्ण स्वतत्र व एकाकी आहे कारण याला इतर वर्णांप्रमाणें स्वतत्र आकार व उच्चार आहे. याला सयुक्तवर्ण, असें **दामले**प्रभृति व्याकरणकार म्हणतात. पग वर्ण म्हणजे साधा मूळचा एकाकी ध्वनि अर्थात्, सयुक्तवर्ण ही सज्ञाच एक प्रकारचा वदतोव्याघात आहे. ‘क्ष’ मधील क्, ष् हे मानलेले वर्ण कोठेही फुटीर स्थितींत दिसत नाहींत. पुढील किंवा मागील वर्णावर त्यांचा सांधिक परिणाम झाल्याचें उदाहरणही नाहीं. ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

**( २ ) तज्ज्ञ** :—हा शब्द तत्+ज्ञ या शब्दांपासून झालेला सयुक्त शब्द आहे यांत ‘ज्ञ् ’ हा वर्ण आहे. तो ज् व ञ् या वर्णांचा झाला आहे असे मानून त्याला सयुक्तवर्ण असे कोणी म्हणतात पण वर्ण म्हणजे एकाकी साधा ध्वनि. तेव्हां सयुक्त वर्ण ही सज्ञाच एक प्रकारचा वदतोव्याघात आहे. या सयुक्त शब्दांत ‘ ज्ञ् ’ चा जरी मागील वर्णावर साधिक परिणाम झाला आहे म्हणजे ‘ त् ’ चा ‘ च ’ होऊन नतर ‘ ज ’ झालेला दिसतो, तरी ‘ ज् ’ च्या पुढील शब्दावर सांधिक परिणाम झाल्याचें उदाहरण नाहीं. याचा खुलासा ‘ ज्ञ् ’ हें मृदु व्यजन मानून व त्याचा वर्ग ‘ च ’ वर्ग कल्पून होण्यासारखा आहे. **दामल्यां**सारखे वैयाकरणसुद्धां हा शब्द ‘ तज्ञ ’ असा लिहितात. ते अर्थातच चुकीचें आहे.

( ३ ) **आईक** :—हें 'ऐक' या शब्दाचे वर्णवृद्धि होऊन उच्चारसौकर्यासाठीं व कवितेंत वृत्ताच्या सोईसाठीं योजलेले रूप आहे ( उदा०, ब्राह्मण, बिरामण ) यावरून **दामले**प्रभृति व्याकरणकार 'ऐ' हा स्वर 'आ' व 'ई' या स्वरांपासून बनलेला आहे, असे मानून त्याला सयुक्त स्वर अर्थात् सुयुक्तवर्ण असे म्हणतात. तें चुकीचें आहे. खरें म्हटले तर वर्ण, मग तो स्वर असो वा अक्षर असो, म्हणजे साधा, एकाकी असा ध्वनि, तेव्हां सयुक्त हें विशेषणच त्याला लावणे बरोबर नाही

( ४ ) **अंजली** :—येथे 'अ' वर जो बिदु आहे त्याचें यथार्थ स्वरूप काय, याविषयीं प्रश्न आहे. असला बिंदु ङ्, ञ्, ण्, न्, म्, या अनुनासिकांबद्दल आल्यामुळें, तो व्यजन म्हणजे एक वर्ण आहे असे काहीं व्याकरणकार म्हणतात. पण बिदु हा अनुनासिकाशिवाय इतर वर्णाबद्दलही असतो उदा० उष्ट्र, उट्ट, उण्ट येथे 'प् व र्' याबद्दल 'ट' आला व त्या 'ट' बद्दल त्याचे अननासिक येऊन 'ट्' चा 'ण्' होतो व त्याचा एक विशिष्ट उच्चार बिंदु दाखवतो कधीं कधी म्हणजे त्याचा उच्चार नाकातून होतो, तेव्हा त्यापासून कोणत्याच वर्णाचा बोध होत नाही. याचा अर्थ हाच कीं, बिदु हा वर्ण नसून तो एक उच्चार आहे. कधीं कधी तो विशिष्ट वर्णाचा किंवा अनुस्वार अनुनासिकाचा उच्चार असतो. अशावेळीं त्याला 'परसवर्ण' असें म्हणतात व त्याचा उच्चारही वेगळा म्हणजे खणखणीत असतो. ज्यावेळीं तो केवळ उच्चार असतो, त्यावेळीं तो नाकातून होतो, म्हणून त्याला अनुनासिक असे म्हणतात.

( ५ ) **ऋकार** :—ऋ ( अर्थात ऌ व ॡ सुद्धा ) सस्कृताप्रमाणे मराठींत आहे, हे या शब्दावरून सिद्ध होईल. सस्कृतात सुद्धा 'ॡ' हा वर्ण प्रत्यक्ष असा नाही त्यासाठीं तव + ऌकार = तवल्कार यासारखा सधि मुद्दामच केलेला दिसतो. "**दामल्यांनीं** ॠ व ऌ ॡ हे स्वर मानले नाहींत" अशा वाक्यांत तो दिसून येतोच. 'पितॄण' या शब्दातच ॠ दिसून येतो, असे **दामले** म्हणतात. पण 'भ्रातॄण', 'मातॄण', नेतॄण ( नेतृ+ऋण ) असे नवे शब्द मराठींत योजावयास हरकत नाहीं. बगाली, गुजराती भाषांत तर हे वर्ण कायम ठेवलेले दिसतात. तेव्हा मराठीत ते मानण्यास हरकत असू नये.

( ६ ) **पुन** :—येथे विसर्गाचे स्वरूप काय आहे असा प्रश्न आहे. **खेर** या व्याकरणकारांनीं विसर्गाचें तो 'स्' 'श्' 'ह्' याचें रूपान्तर आहे म्हणून व्यजनांत ( वर्णमालिकेत ) केली आहे. पण बिंदूसारखा हाही एक उच्चार आहे. तो सस्कृतांत 'स्' 'र्' 'ह्' या वर्णांचा असतो. पण निव्वळ मराठींत 'थु:' 'उ:' असाही केवळ वर्णव्यतिरिक्त उच्चार असतो. त्याला विसर्ग म्हणतां येणार नाहीं. कारण विसर्गाचा काहीं ठरीव नियमांप्रमाणें 'सधि' होतो. मराठींतील 'थुः' इत्यादि शब्दांतील उच्चारासबंधीं असा संधि सभवत नाहीं म्हणून तेथें विसर्गच नाहीं असे म्हणणे प्राप्त आहे. अर्थात् तो विसर्गासारखा उच्चार आहे एवढेंच. विसर्ग हाही स्, र् यांचें

रूपान्तर असतां परसवर्ण होऊ शकतो. पण बिंदूप्रमाणें तो निव्वळ उच्चार असतो, तेव्हा त्याला ' परसवर्ण ' असें म्हणतां येणार नाहीं.

(७) **तारूं** :—या शब्दांत जो बिंदु आहे त्याचें स्वरूप काय असा प्रश्न आहे येथें बिंदूचा उच्चार नाकांतून असल्यामुळें, त्याला अनुनासिक असें म्हणावयाचें. या ठिकाणीं बिंदू हा उच्चार कोणत्याच वर्णाचा उच्चार नाहीं हें स्पष्ट आहे आणि म्हणून बिंदूचा वर्णाशीं कधीं कधीं संबध असला तरी तो स्वतः उच्चारच आहे. वर्ण नव्हे हेंही सिद्ध होतें

**प्रश्न २ रा :—(१) कवीच्छा, (२) स्वैर, (३) सूर्योदय, (४) राजर्षि, (५) बिंबोष्ठ, (६) अधरोष्ठ, (७) कांहीसा, (८) एकेक (९) मन्वंतर, (१०) गवीश्वर या शब्दांचा संधिदृष्ट्या परिस्फोट करा.**

(१) **कवीच्छा** :–हा स्वर सधिशब्द आहे. विग्रह कवी + इच्छा. एका जातीचे स्वर मागें पुढें आले असतां त्यांचा सधि त्यांच्या दीर्घस्वरात होतो, या नियमाचे हें उदाहरण आहे

(२) **स्वैर** :—हा स्वर सधिशब्द आहे. विग्रह स्व + ईर. हें अपवादात्मक सधीचें उदाहरण आहे. नियमाप्रमाणें ' गुण ' होऊन ' स्वैर ' असें रूप व्हावयाचे

(३) **सूर्योदय** :—हा स्वरसधि. विग्रह सूर्य + उदय. अ किंवा आ यांच्या पुढें इ, उ, ऋ, लृ हे स्वर किंवा दीर्घस्वर आले तर त्यांचा गुण होतो, या नियमास अनुसरून हा सधि आहे

(४) **राजर्षि** :–हा स्वरसंधि आहे. विग्रह राजा + ऋषि. येथें नियमाप्रमाणें ' आ ' पुढें ' ऋ ' आल्यामुळें ' ऋ ' चा ' अर् ' हा गुण झाला आहे.

(५) **बिंबोष्ठ** :–विग्रह बिंब + ओष्ठ. ' अ ' किंवा ' आ ' या स्वरांपुढें ' ए, ' ' ऐ ', ' ओ ', ' औ ', हे स्वर आले तर त्यांचा संधि पुढील स्वराप्रमाणें होतो. या स्वरसधीचे ' बिंबौष्ठ ' असेंही अपवादात्मक वैकल्पिक रूप होते.

(६) **अधरोष्ठ** :–विग्रह अधर + ओष्ठ. सधिनियमाप्रमाणें ' अधरोष्ठ ' असें म्हणावयाचें. पण ' अधरौष्ठ ' असेंही त्याचें अपवादात्मक वैकल्पिक रूप आहे.

(७) **कांहींसा** :–हें पूर्वरूप स्वरसधीचें उदाहरण आहे. विग्रह कांहीं + असा. येथे पहिल्या शब्दांतील स्वरच सधींत कायम राहिला आहे. म्हणून याला ' पूर्वरूप ' स्वरसधि असें म्हणतात. हा सधि मराठींतच आढळतो.

(८) **एकेक** :—हें पररूप सधीचें उदाहरण आहे विग्रह एक + एक. येथें पुढील शब्दांच्या स्वरांशीं सधि झाला आहे. म्हणून त्याला ' पररूप सधि ' म्हणतात. हा सधि मराठींतच आढळतो. ' एक ' हा शब्द सस्कृतांतील आहे. त्या भाषेंत ' एकैक ' असा सधि होतो

(९) **मन्वंतर** :–हा 'यणादेश' स्वरसंधि आहे. विग्रह मनु + अंतर. 'इ', 'उ', 'ऋ', 'लृ', या ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वरापुढे कोणताही विजातीय स्वर आला म्हणजे जो संधि होतो त्याला 'यणादेश' संधि असे म्हणतात.

(१०) **गवीश्वर** :–ए, ऐ, ओ, औ, या स्वरापुढे इतर ऱ्हस्व किंवा दीर्घ स्वर आले असता जो संधि होतो त्याचें हे उदाहरण आहे विग्रह. गो + ईश्वर = गवीश्वर. अशावेळीं 'ए', 'ऐ', 'ओ', 'औ' च्या जागीं अनुक्रमे 'अय्', 'आय्', 'अव्', 'आव्', असे संधि होतात व त्याचे शेवटचे 'य्', 'व्', पुढील स्वरात मिळतात.

**प्रश्न ३ रा :—(१) दिग्विजय, (२) शरत्काल, (३) षण्मास, (४) भगवल्लीला, (५) तरुच्छाया, (६) अहोरात्र, (७) अहर्गण, (८) उद्धरण, (९) वाक्पति, (१०) चिच्छक्ति, या शब्दांवर व्याकरणविषयक स्फुटें द्या.**

(१) **दिग्विजय** :—हा व्यंजनसंधि आहे. विग्रह दिश् + विजय. येथे प्रथम 'श्' च्या जागी 'क्' आदेश होऊन नंतर कठोर व्यंजनापुढें मृदु व्यंजन आल्यामुळे त्या वर्गाच्या पहिल्या व्यंजनाच्या जागीं तिसरें व्यंजन आले आहे.

(२) **शरत्काल** :—हा एक प्रकारचा व्यंजनसंधि आहे विग्रह शरद् + काल. अनुनासिकाशिवाय कोणत्याही मृदु व्यंजनापुढे कठोर व्यंजन आले असता त्या मृदु व्यंजनाच्या जागीं त्या वर्गातील पहिले अक्षर येते, असा येथे संधिनियम आहे.

(३) **षण्मास** :—हा व्यंजनसंधि आहे. विग्रह षट् + मास, नियम – कोणत्याही वर्गीय व्यंजनापुढे अनुनासिक व्यंजन आलें असता वर्गीय व्यंजनाच्या जागीं त्या वर्गाचे अनुनासिक विकल्पाने येते. येथे 'षड्मास' असाही संधि विकल्पाने होतो.

(४) **भगवल्लीला** :—हा व्यंजनसंधि आहे. विग्रह भगवत् + लीला नियम – **त** वर्गाच्या व्यंजनापुढे **च** वर्गातील किंवा **ट** वर्गातील व्यंजन किंवा 'श्' 'व्' 'ल्' ही व्यंजने आलीं, तर पहिल्याच्या जागीं दुसरे येते.

(५) **तरुच्छाया** :—हा व्यंजनसंधि आहे विग्रह तरु + छाया नियम – ऱ्हस्व स्वरापुढे 'छ्' आल्यास 'छ्' चा 'च्छ' होतो. हा षष्ठी तत्पुरुष समासही आहे. विग्रह तरूची छाया.

(६) **अहोरात्र** —हें व्यंजनसंधीचे उदाहरण आहे विग्रह अहन् + रात्र. नियम–अहन् (दिवस) यांतील 'न्' पुढे 'र्' आरंभीं आलेला शब्द आला तर 'र्' चा विसर्ग होतो व पुढें मृदु व्यंजन असल्यामुळें विसर्गाचा 'ओ' होतो.

(७) **अहर्गण** :—हें एका व्यंजनसंधीचे उदाहरण आहे. विग्रह अहन् + गण. नियम–अहन् (दिवस) यांतील 'न्' पुढें 'र्' शिवाय कोणताही वर्ण आला तर 'न्' चा 'र्' होतो.

( ८ ) **उद्धरण** :—हा एक व्यंजनसंधि आहे विग्रह उत् + हरण. नियम—वर्गीय कठोर किंवा मृदु व्यंजनापुढें ' ह् ' आला तर त्या ' ह् ' च्या जागीं कठोर व्यंजनाच्या वर्गातील चौथे व्यंजन विकल्पाने येतें. हा संधि ' उद्हरण ' असाही करतात.

( ९ ) **वाक्पति** —हा व्यंजनसंधि आहे विग्रह वाच् + पति. येथें ' श्,' ' ज्,' ' त् ' चा प्रथम ' क् ' होतो व मग संधि होतो.

( १० ) **चिच्छक्ति** :—हा व्यंजनसंधि आहे विग्रह चित् + शक्ति. नियम— अनुनासिकाशिवाय कोणत्याही वर्गीय व्यंजनापुढे ' श् ' आला तर त्या ' श् ' चा ' छ् ' होतो व मागील व्यंजनाचा ' च् ' होऊन त्याला मिळतो.

**प्रश्न ४ था :—( १ ) प्रत्यङ्गात्मा, ( २ ) संताप, ( ३ ) संगम, ( ४ ) संलग्न, ( ५ ) शनैश्चर, ( ६ ) निश्शेष, ( ७ ) अधोवधन, ( ८ ) अधःपतन, ( ९ ) निष्फळ, ( १० ) दुरात्मा, ( ११ ) नीरस.**

( १ ) **प्रत्यङ्गात्मा** :—हें अनुनासिक संधीचें उदाहरण आहे. विग्रह प्रत्यग् + आत्मा यांत प्रथम ' ग् ' चा ' ङ् ' झाला आहे व पुढें ' आ ' हा स्वर आल्यामुळें अनुनासिकाचें द्वित्त झालें आहे.

( २ ) **संताप** :—हे अनुस्वारसंधीचे उदाहरण आहे. विग्रह स + ताप नियम— ' म् ' पुढें कोणतेही व्यंजन आलें तर म् चा अनुस्वार होतो. किंवा त्याच्या जागी पुढील व्यंजनातील अनुनासिक येतें याचें ' सन्ताप ' असेंही वैकल्पिक रूप होते.

( ३ ) **संलग्न** :—हा अनुस्वार संधि आहे विग्रह सम् + लग्न. नियम— अनुस्वारापुढे ' य् ', ' व् ', ' र् ', ' ल् ', ' श् ', ' स् ', ' ह् ', हीं व्यंजने आलीं तर त्याचा उच्चार अनुक्रमें ' यँ् ', ' वँ् ', इ असा होतो. संस्कृतांत हा उच्चार व त्याचे लेखन विकल्पाने होते पण मराठींत तसे नाहीं लेखन अनुस्वार देऊन होते व उच्चार वरीलप्रमाणें होतो

( ४ ) **शनैश्चर** :—हा विसर्गसंधि आहे विग्रह शनैः + चर नियम— विसर्गापुढे ' च् ', ' छ् ', ' त् ', ' ट् ', ' ठ् ', हीं व्यंजने आलीं तर विसर्गाच्या जागीं स् होतो. व यांपैकीं ' च् ', ' छ् ' नतर ' स् ' चा ' श ' होतो

( ५ ) **निश्शेष** :—हा विसर्गसंधि आहे. विग्रह निः + शेष. नियम— विसर्गापुढे ' स् ', ' श् ', ' ष् ', आल्यास त्याचे ' स् ', ' श् ', ' ष् ', होतात किंवा विसर्ग तसाच राहतो.

( ६ ) **अधोवदन** .—हें विसर्गसंधीचे उदाहरण आहे. विग्रह अधः + वदन. नियम— विसर्गापुढें ' अ ' किंवा मृदु व्यंजन आलें तर विसर्गाचा ' ओ ' होतो.

( ७ ) **अधःपतन** :—हा विसर्गसंधि आहे. विग्रह अधः + पतन. नियम— विसर्गापुढें ' क् ', ' ख् ', ' प् ', ' फ् ', आले तर विसर्ग कायम राहतो.

(८) **निष्फळ** :—हा विसर्गसंधि आहे. विग्रह निः + फळ. नियम — विसर्गाच्या मागें 'इ','उ' असल्यास विसर्गाबद्दल 'ष्' होतो. अपवाद दुःख, निःपक्ष.

(९) **दुरात्मा** :—हा विसर्गसधि आहे. विग्रह दुः + आत्मा. नियम – विसर्गाच्या मागें 'अ', किंवा 'ह' यांच्याशिवाय इतर स्वर असून पुढें मृदु व्यजन आले तर त्या विसर्गाचा 'र्' होतो. अपवाद, पुनर्जन्म.

(१०) **नीरस** :—हा विसर्गसधि आहे. विग्रह निः + रस, नियम – विसर्गापुढे 'र' हें व्यजन आलें तर विसर्गाचा 'र' होऊन त्याचा लोप होतो. व मागील स्वर दीर्घ होतो

**प्रश्न ५ वा :—पुढील शब्दांवर व्याकरणविषयक स्फुटें द्या :— (१) मीठ, (२) सिंहीण, (३) चाहूल, (४) परीट, (५) कुलुप, (६) रेशीम, (७) बेडूक, (८) सोयरीक, (९) रजपूत, (१०) मासा, (११) शिसा, (१२) मांस.**

(१) **मीठ** :—हा दोन उपान्त्य वर्ण दीर्घ असलेला दोन अक्षरीं शब्द आहे सामान्यरूपापूर्वी यांतील दीर्घ उपान्त्य स्वर ऱ्हस्व झाला आहे

(२) **सिंहीण** :—अनुस्वाराचा या शब्दांत 'व्' सारखा उच्चार होतो सामान्यरूपापूर्वी उपान्त्य दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो जसे–सिंहिणीस

(३) **चाहूल** :—हा अकारान्त तीन अक्षरीं शब्द आहे अशा शब्दांत दीर्घ उपान्त्यस्वराचा ऱ्हस्व उपान्त्य स्वर होतो. जसे—चाहुलीस

(४) **परीट** :—अकारान्त तीन अक्षरीं शब्दांतील द्वितियाक्षरात 'ह्' नसला व त्यात जोडाक्षर नसलें तर त्यांतील 'ई' उपान्त्याबद्दल विकल्पेकरून 'इ' किंवा 'अ' होतात. जसें–परिटास, परटास.

(५) **कुलुप** :—अकारान्त तीन अक्षरीं शब्दांतील द्वितीयाक्षर जोडाक्षर नसले व त्यांत 'इ'कार नसला तर त्यातील उपान्त्य 'ऊ' च्या जागीं विकल्पानें 'अ' किंवा 'उ' येतो जसे–कुलपास, कुलुपास

(६) **रेशीम** :—अकारान्त तीन अक्षरीं शब्दांच्या 'ई'कारान्त उपान्त्याच्या मागील म्हणजे शब्दाचे पहिले अक्षर दीर्घ असेल तर उपान्त्य अक्षराचा ऱ्हस्व स्वर न होतां 'अ' असाच आदेश होतो जसे - रेशीम, रेशमास

(७) **बेडूक** :—अकारान्त तीन अक्षरीं शब्दाचा ऊकारान्त उपान्त्याच्या मागील म्हणजे शब्दाचे पहिलें अक्षर दीर्घ असले तर उपान्त्य अक्षराचा 'ऊ' चा ऱ्हस्व स्वर न होतां 'अ' असाच आदेश होतो जसें –बेडूक, बेडकास

(८) **सोयरीक** :—चार किंवा चारांपेक्षा अधिक अक्षरीं 'अ'कारान्त शब्दांच्या उपान्त्य अक्षरांतील दीर्घ 'ई' च्या जागीं ऱ्हस्व 'इ' येते जसें – सोयरीक, सोयरिकेस.

( ९ ) **रजपूत** :—चार किंवा चारांपेक्षां अधिक अक्षरीं 'अ'कारान्त शब्दांच्या उपान्त्याक्षरांतील दीर्घ 'ऊ' चा ऱ्हस्व 'उ' होतो. जसें—रजपूत, रजपुतास. याला कोथबीर व इटकूर हे शब्द अपवाद आहेत. त्यांचीं वैकल्पिक दोन्हीं रूपें होतात. कोथिंबीरीस, कोथबीरीस, इटकुरास, इटकरास.

( १० ) **मासा** :—'रू'कारांत शब्दाच्या विकारी रूपांत ज्या ठिकाणी 'स्या' किंवा 'इया' अक्षर यावयाचें त्या ठिकाणीं 'शा' असेच अक्षर येते. जसें—मासा, माशास

( ११ ) **शिसा** :—मराठींत अन्त्याक्षरांतील 'स्' ह्या व्यजनापुढें 'ई' स्वर आला असता 'स्' चा 'श्' होतो. जसें—शिसा, शिशी.

( १२ ) **मांस** :—फेरफारासबधीं सर्व नियम मराठी शब्दांस असतात. ते सस्कृत शब्दास लागू नाहींत जसे—मास, मांसास ( माशास नाहीं. ) तसेच 'दीन' 'शरीर', व इतर दोन, तीन अक्षरीं सस्कृतास फेरफारांचे नियम लागू नाहीत. जसे—दीनास ( दिनास नाहीं )

**प्रश्न ६ वा .—पुढील शब्दांवर व्याकरणविषयक टिपणें द्या :—**
**( १ ) भिंत, ( २ ) वाट, ( ३ ) तेली, ( ४ ) घोडा, ( ५ ) नदी, ( ६ ) स्त्री, ( ७ ) बी, ( ८ ) तारूं, ( ९ ) सासू, ( १० ) लाडू, ( ११ ) धू, ( १२ ) पिसू, ( १३ ) बायको.**

( १ ) **भिंत** :—हा शब्द 'ई' आदेश सामान्यरूपाचें उदाहरण आहे. जसें :—भिंतीस – भिंतींस इ.

( २ ) **वाट** :—हा शब्द 'ए' आदेश सामान्यरूपाचें उदाहरण आहे. अनेकवचनांत 'आ' आदेश होतो. जसे – वाटेस, वाटास.

( ३ ) **तेली** :—या इकारान्त पुल्लींगी शब्दाचें 'या' आदेश सामान्यरूप होते जसे—तेल्यास, तेल्यांस मशालजी, काजी, असे कांहीं शब्द या नियमास अपवाद आहेत. जसें—मशालजीनें, काजीचा.

( ४ ) **घोडा** :—हा शब्द सामान्यतः आकारांत सामान्यरूपाचें उदाहरण आहे. येथे 'या' आदेश सामान्यरूप होतें जसें—घोड्यास, घोड्यांस. आजोबा, दादा यासारखे नात्याचे शब्द अपवाद आहेत जसे—आजोबास, आजोबांस. लहान, लाडका किंवा अपमानअर्थी. दादा, दाद्या, नाना, नान्या. अशीं सामान्यरूपें होतात.

( ५ ) **नदी** :—ईकारात स्त्रीलिंगी शब्दाच्या सामान्यरूपाचें उदाहरण. येथे एकवचनी अविकृत रूप व अनेकवचनी 'या' आदेश होतो. जसें—नदीचा, नद्यांचा.

( ६ ) **स्त्री** :—ईकारांत सामन्यरूपाचें अपवादात्मक उदाहरण. येथे 'इया' आदेश विकल्पानें सामान्यरूप होतें. जसे—स्त्रीस, स्त्रियेस, स्त्रीस, स्त्रियांस. असाच दुसरा शब्द बी.

( ७ ) **बीं** :—हे ईकारात नपुसकलिंगी शब्दाच्या सामान्यरूपाचे उदाहरण या शब्दाचेंही ' इया ' असें सामान्यरूप होते जसे–बियास, बियास.

( ८ ) **तारूं** :—या शब्दाचे, वा किंवा ' अवा ' असे दोन सामान्यरूप आदेश होतात जसे – तार्वास, तारवास, याचें अनेकवचनही तारवे, तार्वे असें वैकल्पिक होते

( ९ ) **सासू** :—या शब्दाचे एकवचनीं ' वे ' अवे, असे व अनेकवचनीं वा, ' अवा ' असे सामान्यरूप आदेश होतात शिवाय अविकृत ' सास ' हे रूपही बदलते. जसे—सास्वे, सास्वेस, सास्वास, सासवांस, सासूस या शब्दांचें अनेक-वचनही सास्वा, सासवा असे होते

( १० ) **लाडू** :—ऊकारांत पुल्लिंगी शब्दाचा सामान्यरूप आदेश ' वा ' किंवा ' अवा ' होतो, त्याचे हा शब्द उदाहरण आहे. जसे—लाड्वास, लाडवांस

( ११ ) **धू** :—या स्त्रीलिंगी ऊकारात शब्दाचा सामान्यरूप आदेश ' उवे ' असा होतो. अनेकवचन ' धुवा ' असे होते

( १२ ) **पिसू** :—या ऊकारात शब्दाचे सामान्यरूप ' वे, ' ' अवे ' असें होते तर कधीं कधीं हा शब्द अविकृतांग असतो जसें—पिस्वे, पिसवे, पिसू

( १३ ) **बायको** :—या ओकारांत स्त्रीलिंगी शब्दाचे एकवचन अविकृतांग असतें अनेकवचनीं ' आ ' असा आदेश होतो

**प्रश्न ७ वा :—पुढील जाड टाइपांतील शब्दांवर व्याकरणविषयक स्फुटें द्या :—**

( अ ) ( १ ) **वाचितो**, ( २ ) **घेतलें**, ( ३ ) **फोडवितो**, ( ४ ) **म्हणिजे**, ( ५ ) **जाईजे.**

( ब ) ( १ ) **रामा**प्रत, ( २ ) **करीत** आहे, ( ३ ) **केलें** आहे, ( ४ ) **करीत** असे, ( ५ ) **करावयास** लावलें, ( ६ ) **केलें** जाईल, ( ७ ) **जाऊं** दिले, ( ८ ) **जेवूं** घातलें, ( ९ ) **द्यावें** लागलें, ( १० ) **करावयाचें** आहे

( १ ) **वाचितो** :—हें सकर्मक क्रियापद असल्याकारणाने वर्तमानकाळाच्या रूपास ' इ ' आगम विकल्पानें आला आहे. ' वाचतो ' असेही दुसरे रूप होते

( २ ) **घेतलें** :—भूतकाळांत धातूमध्ये कांहीं क्रियापदापुढे निराळेच आगम येतात त्याचे हें उदाहरण आहे. येथे ' त ' हा आगम दुसरें उदाहरण जा—गेला. ' गे ' हा आगम.

( ३ ) **फोडवितो** :—प्रयोजक प्रत्ययाच्या मागें ' इ ' असा आदेश होतो. पण ' फोड ' हा धातु मात्र कांहीं व्याकरणकार म्हणतात त्याप्रमाणे ' फुट ' या धातूचा प्रयोजक भेद नाही.

( ४ ) **म्हणिजे** :—' म्हण ' धातूला ' जे ' हा मुखप्रत्यय लागण्यापूर्वी ' इ ' असा आगम होतो

( ५ ) **जाईजे** —'जा' धातूला 'जें' असा मुखप्रत्यय लागण्यापूर्वी 'इ' असा आगम येतो.

( ब ) ( १ ) **रामा**प्रत :—'प्रत' या विभक्तिक शब्दयोगीच्या योगानें सामान्यरूप झाल्याचें उदाहरण आहे.

( २ ) **करीत** आहे :-अपूर्ण वर्तमान करण्याकरिता 'इ' आगम कृदत रूपाचे उदाहरण.

( ३ ) **केलें** आहे '—पूर्ण वर्तमानकाळ करण्यासाठी 'ले' कृदत

( ४ ) **करीत** असे —रीतिभूतकाळ करण्यासाठीं 'इ' आगमासह वर्तमान कृदताचें उदाहरण

( ५ ) **करावयास** लावलें —भाग पाडणे अशा अर्थी सप्रत्यय कृदत

( ६ ) **केलें** जाईल '—कृ धातूचे भविष्यकाळीं तृतीय पुरुषी मुखरूप कृदत

( ७ ) **जाऊं** दिलं —परवानगी किंवा अनुज्ञादर्शक साद्य कृदत

( ८ ) **जेवूं** घातलें '—हेतुदर्शक कृदत. या कृदताच्या ऐवजी सप्रत्यय येतें. जेवावयास घातलें.

( ९ ) **द्यावें** लागलें :—'भाग पडणें' या अर्थी कृदंत.

( १० ) **करावयाचें** आहे '—उद्देशार्थीचे प्रत्यय कृदत

**प्रश्न ८ वा :—पुढील जाड टाइपांतील शब्दांवर व्याकरणविषयक स्फुटें द्या :—**

( १ ) **करण्या**जोगा, ( २ ) **हाता**पायांचा, (३) **मळे**करी, (४), **दारो**दार, ( ५ ) **जेवते**समयीं, ( ६ ) **रात्र**भर, ( ७ ) **कामा** नये, ( ८ ), **येई**पर्यंत, ( ९ ) **गेल्या**मुळें.

( १ ) **करण्या**जोगा '—जोगा या शब्दयोगी विशेषणाच्या योगाने सामान्यरूप.

( २ ) **हाता**पायांचा :—पहिल्या शब्दाचें सामान्यरूप सयुक्त शब्दास विभक्ती प्रत्यय लावल्यामुळें. दुसरे शब्द खरेंखोटें, पानपत्रावळी.

( ३ ) **मळे**करी :—सयुक्तशब्दांतील पहिल्या मळा या शब्दांतील 'आ' बद्दल 'ए' हा आदेश.

( ४ ) **दारो**दार :—सयुक्त शब्दांतील पहिल्या शब्दाच्या 'अ'ला 'ओ' असा आदेश.

( ५ ) **जेवते**समयीं :—समयीं, वेळीं या कालवाचक शब्दाचेपूर्वी एकारांत सामान्यरूप. हा सर्व मिळून सयुक्त शब्द.

( ६ ) **रात्रभर** :—येथे रात्र या शब्दाचे सामान्यरूप झालें नाहीं तें योग्यच आहे. कारण पूर्वी मानीत त्याप्रमाणें 'भर' हा शब्द शब्दयोगी नव्हे.

(७) **कामा** नये :—येथे कामा हा शब्द प्रचाराचा भाग असून स्वतंत्र शब्द नाहीं. म्हणून येथे सामान्यरूप किंवा प्रत्ययाभाव समजावयाचा नाहीं. **खेर, दामले** इत्यादिकांनीं हा शब्द चालवून व्याकरण केले आहे, ते बरोबर नाहीं.

(८) **येई**पर्यंत :—सयुक्त शब्दांतील पहिल्या 'ये' शब्दापुढें 'ई' आगम आला आहे.

(९) **गेल्या**मुळे :—सयुक्त शब्दांतली पहिल्या क्रियापद जातीच्या शब्दास शब्दयोगीनें सामान्यरूप झाले आहे.

**प्रश्न ९ वा :—पुढील निरनिराळ्या प्रकारच्या प्रत्ययोपसर्गावर स्पष्टीकरणात्मक टिपणें द्या** (१) च, ही, ना, (२) चा, चि, चें, (३) ने, हून, आं, स, (४) ने (केल्या**नें**), चा (रात्री**चा**) (५) इक, आवळ, पणा, (६) इत – ताना, (७) दुरात्मा, (८) **बे**वकूफ, (९) अति, '( **अति** तेथे माती ) (१०) अतिक्रांत, (११) माझ्याने, (१२) अतरींचा.

(१) **च, ही, ना** :—याना **दादोबांनीं** शुद्ध असें नांव दिलें होते व अजूनही तेंच नांव आहे. हे निव्वळ प्रत्यय आहेत ते विभक्ति व आख्यात प्रत्ययानतरही येतात.

(२) **चा, ची, चें** :—षष्ठी विभक्ति काढून टाकल्यामुळे हे स्वामित्वसबध दाखविणारे तद्धित प्रत्यय समजावयाचे. याच्यापासून झालेले शब्द विशेषण जातीचे शब्द होतात. कधीं कधीं याच्यानतर विभक्ति प्रत्यय लागतात.

(३) **नें, हून, आं** :—हे अनुक्रमें तृतीया, पचमी, सप्तमी व चतुर्थी विभक्तीचे प्रत्यय आहेत. यांच्यापूर्वी सामान्यरूप होतें. हे अतीम प्रत्यय आहेत.

(४) ने (केल्या**नें**), चा (रात्री**चा**) :—हे विभक्ति प्रत्ययासारखे दिसतात. पण ते नामालाच लागतात असें नाहीं तर क्रियापदासमुद्धां लागतात. त्यांपासून क्रियाविशेषण जातीचा सयुक्त शब्द तयार होतो.

(५) **इक, आवळ, पणा** :—हे तद्धित प्रत्यय आहेत. हे आदिम प्रत्यय आहेत. यांपासून साधित शब्द होतात.

(६) **इत, ताना** :—हे कृदत प्रत्यय आहेत. यापासून कालवाचक क्रियाविशेषणें होतात.

(७) **दुरात्मा** :—दुः हा उपसर्ग आहे. उपसर्गाला पूर्वी मागें लागणारा प्रत्यय असें समजत. पण तो एक प्रकारचा म्हणजे इषदर्थ शब्द आहे. कारण त्याच्या-पासून सयुक्त व सामासिक शब्द होतो. येथें सधीही झाला आहे.

(८) **बेवकूफ** :—'बे' हा फारशी उपसर्ग आहे. उपसर्ग म्हणजे प्रत्यय नव्हे. तर एक इषदर्थ शब्द आहे.

(९) **अति** (**अति** तेथें माती) :—या ठिकाणीं 'अति' ह्याचा नाम शब्दासारखा उपयोग झाला आहे. येथें तो उपसर्ग नाहीं. उपसर्ग दुसऱ्या शब्दाच्या मागें जोडूनच आला पाहिजे.

( १० ) **अतिक्रांत** :—येथें ' अति ' हा उपसर्ग आहे. हा क्रांत या शब्दास जोडून आला आहे

( ११ ) **माझ्यानें** :—' ने ' हा विभक्तिसारख्या दिसणाऱ्या प्रत्ययाने बनलेला क्रियाविशेषण शब्द.

( १२ ) **अंतरींचा** '—सयुक्त शब्द. सप्तमी विभक्तीचा प्रत्यय लागला असताही पुढें ' चा ' हा तद्धित प्रत्यय लागला आहे.

**प्रश्न १० वा :—पुढील प्रत्ययवजा शब्दांसंबंधीं खुलासा करणारीं टिपणें द्या.** ( १ ) तुझ्या**स्तव**, ( २ ) त्या**विना**, ( ३ ) **केलें** आहे, ( ४ ) **करीत** होतो ( ५ ) **तेणें** पाडें, ( ६ ) **बोलतां** येईल, ( ७ ) **जाऊं** देतो, ( ८ ) **करूं** नको, ( ९ ) **केलें** जाईल, ( १० ) **करावयास** लावील, ( ११ ) **करणार** नाहीं

( १ ) **तुझ्यास्तव** :—' स्तव ' हा शब्दयोगी जातीचा विभक्तिविकारक शब्द आहे. हा द्वितिया विभक्तीचे कार्य करतो

( २ ) **त्याविना** :—' विना ' हा शब्दयोगी जातीचा शब्द विभक्तिविकारक प्रत्यय शब्द आहे. येथे तो पचमी प्रत्ययाचे कार्य करतो.

( ३ ) **केलें** आहे '—' केलें ' हा कालविकारदर्शक कृदत प्रत्ययशब्द आहे याचा उपयोग ' आहे ' ह्या साह्यक्रियापदाशीं जोडून पूर्ण वर्तमानकाळाचें रूप करण्यासाठीं येथे झाला आहे.

( ४ ) **करीत** होतो '—' करीत ' कालविकारदर्शक कृदत प्रत्यय शब्द. याचा उपयोग येथें ' होता ' या साह्य क्रियापदास जोडून अपूर्ण भूतकाळाचें रूप करण्यासाठीं झाला आहे.

( ५ ) **बोलतां** येईल :—' बोलतां ' हा अर्थविकारदर्शक कृदत प्रत्यय शब्द आहे. ' येईल ' या साह्यक्रियापदास जोडून याचा उपयोग शक्यार्थी रूप बनविण्यासाठीं झाला आहे.

( ६ ) **जाऊं** देतो :—' जाऊ ' हा अर्थविकारदर्शक कृदत प्रत्यय शब्द आहे. ' देतो ' या साह्यक्रियापदास जोडून वर्तमानकाळी अनुज्ञा किंवा परवानगी हा अर्थ दाखविण्यासाठीं याचा उपयोग झाला आहे.

( ७ ) **करूं** नको :—' करू ' हा अर्थविकारदर्शक प्रत्यय शब्द आहे. याचा उपयोग ' नको ' या साह्यक्रियापदास जोडून आज्ञार्थाचें अकरणरूप करण्याकरितां झाला आहे.

( ८ ) **केलें** जाईल .—' केलें ' हा मुखरचनादर्शक कृदत प्रत्यय आहे. याचा उपयोग ' जाईल ' या साह्यक्रियापदास जोडून भविष्यकाळीं मुखरूप करण्यासाठीं झाला आहे.

(९) **करावयास** लावील '—' करावयास ' हा अर्थदर्शक कृदत प्रत्यय शब्द आहे. ' लावील ' या साह्यक्रियापदाशीं जोडून याचा उपयोग प्रयोजक किंवा भाग पाडणें अशा अर्थी झाला आहे.

(१०) **करणार** नाहीं :—' करणार ' हा कालदर्शक कृदत प्रत्यय आहे. उपयोग ' नाहीं ' या साह्यक्रियापदाशीं जोडून भविष्यकाळाचे अकरणरूप करण्यासाठीं झाला आहे

**प्रश्न ११ वा :—पुढील शब्दांवर साधनेच्या दृष्टीनें व्याकरण-विषयक टिपणें द्या.**

**(१) अध्यात्म, (२) गैरशिस्त, (३) लघुतम, (४) सौदागर, (५) करून टाकलें, (६) (** खोटें **) बोलणें, (७) लिहविलें (८) येववतें, (९) सांजावलें, (१०) फोडलें.**

(१) **अध्यात्म** :— ' अधि ' उपसर्गानें बनलेला संयुक्तशब्द , संधि–अधि + आत्मन् (संप्रसारण)

(२) **गैरशिस्त** :—गैर ह्या फारशी उपसर्गानें बनलेला संयुक्त शब्द

(३) **लघुतम** :—तम परमोच्चांशदर्शक तद्धित प्रत्यय महत् + तम = महत्तम (साधारण विभाज्य) या शब्दाच्या उच्चारास अनुसरून लघुत्तम (साधारण विभाज्य) असा उच्चार करण्याची चुकीची प्रवृत्ति. पण येथें मुळांत ' त ' नाहीं हे लक्षांत ठेवले पाहिजे.

(४) **सौदागर** :—' गर ' (करणारा) फारसी तद्धित प्रत्यय. सौदा करणारा व्यापारी

(५) **करून टाकलें** .—' करून ' कृदत (धातुसाधित) हातावेगळे केले अशा अर्थी टाकणे या साह्य धातूबरोबर योजले आहे.

(६) (खोटे) **बोलणें** :—**बोलणें**, कृदत धातुसाधित नाम. ' णें ' प्रत्यय अन्यच, केवळ क्रियेचा दर्शक म्हणून योजतात. जसे बोलला या क्रियापदात बोलणें ही क्रिया.

(७) **लिहविलें** '—' लिहव ' प्रयोजक धातु असा साधित धातु अव किंवा इव प्रत्यय लागून होतो. संस्कृतांतील ' अव ' या प्रयोजक प्रत्ययापासून हा अव, किंवा इव प्रत्यय आला आहे.

(८) **येववलें** :—शक्यार्थदर्शक धातु. येथें प्रयोजकाप्रमाणें ' इव ' असा विकल्प नाहीं. पूर्वीचे व्याकरणकार म्हणतात त्याप्रमाणे हा प्रत्यय संस्कृतात ' अव ' या प्रयोजक प्रत्ययापासून आला नाहीं. तर धरू येते, धरू ये, धरवले, धरवते, अशा रीतीची त्याची निव्वळ मराठी घटणा आहे.

(९) **सांजावलें** '—' साजाव ' हा अकर्तृक साधित धातु आहे. यापासून झालेल्या क्रियापदास कर्ता नसतो व वाक्यांत अकर्तृक भावेप्रयोग होतो येथे प्रयोजकाचा किंवा शक्याचा ' अव ' प्रत्यय नाहीं.

(१०) **फोडलें** —हा धातु पूर्वीचे व्याकरणकार म्हणतात त्याप्रमाणे फुट धातूचे प्रयोजक रूप नव्हे तर विशिष्ट अर्थानें ( परकृत ) विशिष्टप्रकारे ( गुण किंवा वृद्धि होऊन ) स्वतत्ररीतीने बनलेला शब्द आहे. याचे प्रयोजक रूप फोडविलें असे होते असेच दुसरे धातू पाडणे ( मूळ पड ), मारणे, ( मर ), जाळणे, ( जळ ), इत्यादि.

**प्रश्न १२ वा :—पुढील शब्दांवर संयुक्तत्वाच्या दृष्टीनें व्याकरण-विषयक टिपणें द्या.**

**(१) शेटसावकार, (२) जो कोणी, (३) हातावेगळा, (४) पानपत्रावळी, (५) तोंडीं लावणें, (६) घरापाशीं, (७) दादोबा पांडुरंग, (८) करावें लागलें, (९) कोण जाणे, (१०) इ. स. १९५०, (११) डोंगरचे डोंगर, (१२) झाल्यामुळें.**

(१) **शेटसावकार** :—पुनरूच्चारित सयुक्त शब्द. शेट म्हणजेच सावकार ( **दादोबा** याला समाहार द्वंद्व असे म्हणतात. पण येथें शब्द किंवा प्रत्यय याचा लोप नाहीं )

(२) **जो कोणी** ,—संयुक्तसंबधीं सर्वनाम. हा निव्वळ संयोगात्मक सयुक्त शब्द आहे.

(३) **हातावेगळा** :-संयुक्त वैशेषणिक शब्दयोगी. पहिल्या शब्दाचें सामान्यरूप.

(४) **पानपत्रावळी** :—पुनरुच्चारित सयुक्तशब्द. हा कांहीं व्याकरणकार म्हणतात त्याप्रमाणे द्वंद्व समास नव्हे. येथे ' आणि ' किंवा ' व ' या शब्दांचा लोप होत नाहीं. विभक्ति प्रत्यय लावला म्हणजे पहिल्या शब्दाचें सामान्यरूप होते जसें '— 'पानापत्रावळींचा'. हा समास मानला तर **दामले** म्हणतात त्याप्रमाणें मराठी भाषेचा विचित्र प्रचार आहे असे म्हटलें पाहिजे. पण संयुक्त शब्द मानला तर त्यात काहींच वावगे नाहीं. कारण काहीं सयुक्त शब्दांतील विशेषत. शब्दयोगी झालेल्या सयुक्त शब्दांतील पहिल्या शब्दास सामान्यरूप होतेच.

(५) **तोंडीं लावणें** :—सयुक्त शब्द. येथे विभक्ति प्रत्ययाचा लोप झाला नाहीं याला कोणी अलुक् समास असे म्हणतात. पण समासाच्या व्याख्येप्रमाणे मराठींत ' अलुक् ' समास होणे शक्य नाही, हें सहज दिसून येणारे आहे.

(६) **घरापाशीं** :—घर या शब्दास ' पाशीं ' शब्दयोगी जोडून सयुक्त शब्द झाला आहे. येथें शब्दयोगी ' शी ' या तृतीयेच्या विभक्ति प्रत्ययाचें कार्य करतो.

(७) **दादोबा पांडुरंग** :—हा द्वंद्व समास आहे. शब्द वेगळा लिहिल्यामुळें समास दिसत नाहीं. तथापि येथे 'बिन' किंवा 'वल्लद' या शब्दाचा लोप झाला असे समजावयाचे

(८) **करावें लागलें** :—प्राचारिक सयुक्त शब्द. 'लाग' हा साह्य धातु व मुख्य धातु. 'कर' याचे कृदत यापासून झालेला.

(९) **कोण जाणे** —प्राचारिक सयुक्त शब्द. या शब्दाला एक स्वतत्रच प्राचारिक अर्थ आहे.

(१०) **इ० स० १९५०** :—हा सयुक्त शब्द 'इसवी सन एकोणीसशे पन्नासांत' असा लिहिला म्हणजे हा सरळ सयुक्त कसा आहे ते लक्षांत येईल

(११) **डोंगरचे डोंगर** :—प्राचारिक सयुक्त शब्द याला **दामले** अभ्यस्त शब्द असे म्हणतात. पण 'अभ्यस्त' असा प्रकार व्याकरणदृष्ट्या संभवतच नाहीं.

(१२) **झाल्यामुळें** :—सयुक्त शब्द. येथे 'मुळें' हा शब्दयोगी नामास न लागता क्रियापदास लागला आहे. आता 'शब्दयोगी' हा शब्द नामासच लागावा असा नियम नाहीं. तो प्रातिपदिक नाहीं तर नाम किंवा दुसऱ्या क्रियापद वगैरे जातीच्या शब्दांसही तो लागतो व त्यामुळें सयुक्तपद बनतें सामान्यरूप होणें हाच शब्दयोगी निरर्थक शब्दाचा उपयोग आहे.

**प्रश्न १३ वा :—पुढील शब्दांवर समासघटनेच्या दृष्टीनें स्फुटें द्या :—(१) स्त्रीपुरुष, (२) भाजीभाकरी, (३) चारपांच, (४) पुरणपोळी, (५) काळमांजर, (६) खऱ्याखोट्याचा, (७) रत्नागिरी, (८) कमलमुख, (९) द्रव्यसाध्य, (१०) शूलपाणी, (११) मृगनयना, (१२) लांबटांग्या.**

(१) **स्त्रीपुरुष** :—हा दोन शब्द जोडणारा **द्वंद्व** समास. विग्रह स्त्री व पुरुष. दोन्ही शब्दांस प्राधान्य. मधील 'व' या शब्दाचा लोप.

(२) **भाजीभाकरी** :—**दादोबादो** पूर्ववैयाकरणानुसार समाहार द्वंद्व, पण वस्तुत. सयुक्त शब्द. येथे प्रत्यय किंवा शब्द लोप नाहीं म्हणून हा समास नव्हे. दोन्ही शब्द मिळून अर्थ होतो म्हणून हा सयुक्त शब्द.

(३) **चारपांच** :—हा **इतरेतर द्वंद्व समास.** विग्रह 'चार किंवा पांच' दोन्ही शब्दांस प्राधान्य. किंवा या जोडणाऱ्या शब्दाचा लोप.

(४) **पुरणपोळी** :—**मध्यमपदलोपी समास.** विग्रह पुरणानें **युक्त** अशी पोळी दोन्ही शब्दास प्राधान्य **युक्त** या मधल्या शब्दाचा लोप.

(५) **काळमांजर** :—हा सयुक्त शब्द. येथे काळें व मांजर या दोन शब्दांचा सयोग आहे. 'असें' हा शब्द मध्यें धरला तर, तो मध्यमपदलोपी समास होतो. एवच पूर्वीप्रमाणें कर्मधारय म्हणून स्वतत्र समास मानण्याची जरुरी नाहीं.

( ६ ) **खरेंखोटें** :—हा **इतरेतर द्वंद्व समास.** विग्रह खरें किंवा खोटें. दोन्ही शब्दांस प्राधान्य. मधील 'किंवा' या जोडणाऱ्या शब्दाचा लोप झाला आहे. ह्या शब्दाचे विभक्त्यंत पद झालें असतां ( उदा० खऱ्याखोट्याचा ) पहिल्या शब्दास सामान्यरूप होतें. हा या सामासिक शब्दाचा विशेष आहे.

( ७ ) **रत्नागिरी** :—सयुक्त शब्द. षष्ठी विभक्ति नसल्यामुळे आतां विग्रह रत्नांचा गिरी असा विग्रह करावयाचा सामान्यरूप दिनानाथ शब्दाप्रमाणें.

( ८ ) **कमलमुख :—मध्यमपदलोपी समास.** विग्रह कमला**सारखें** मुख. दोन्ही शब्दास प्राधान्य. या समासास पूर्वी कर्मधारय ( तत्पुरुषाचा एक प्रकार ) असे नाव होतें पण कर्मधारय म्हणजे मध्यमपदलोपी किंवा निव्वळ सयुक्त शब्द असें स्पष्ट झाल्यामुळें आतां तो प्रकार मानण्याचें कारण नाहीं.

( ९ ) **द्रव्यसाध्य :—तृतीया तत्पुरुष समास.** विग्रह—द्रव्यानें साध्य. 'नें' या तृतीयेच्या प्रत्ययाचा लोप. दोन्ही पदास प्राधान्य.

( १० ) **शूलपाणी —सप्तमी बहुव्रीहि समास.** विग्रह—शूल आहे पाणी-मध्यें ज्याच्या तिसराच बाहेरचा शब्द जो 'शंकर' त्याला प्राधान्य. समासांतील कोणत्याच शब्दास प्राधान्य नाहीं.

( ११ ) **मृगनयना —मध्यमपदलोपी बहुव्रीहि समास.** विग्रह—मृगाच्या नयना**सारखे** नयन आहेत जिचे. हा बहुव्रीहि समास असून शिवाय त्यात **सारखें** या पदाचा लोप झाला आहे.

( १२ ) **लांबटांग्या** :—हा **दामले**प्रभृति व्याकरणकार सांगतात त्याप्रमाणें बहुव्रीहि समास नव्हे. तर लांबटांग्या सयुक्त शब्दास 'या' हा तद्धित प्रत्यय लागून झालेला शब्द आहे **दादोबांचें** असेंच मत आहे

**प्रश्न १४ वा :—पुढील शब्दांवर व्याकरणविषयक स्फुटें द्या :— ( १ ) निधर्मी, ( २ ) देशान्तर, ( ३ ) तज्ज्ञ, ( ४ ) झाडपेड, ( ५ ) पळून जातांना ( ६ ) जावव, ( ७ ) ज्यांतत्यांत, ( ८ ) फोडव, ( ९ ) फाव, ( १० ) पिसू, ( ११ ) कशाला, ( १२ ) सोयरीक, ( १३ ) सिंहासन, ( १४ ) अहोरात्र, ( १५ ) वसिष्ठ ऋषि, ( १६ ) अंतरीचा.**

( १ ) **निधर्मी** :—ह्यांतील 'निधर्म ( निर्गत + धर्म ) हा सयुक्त शब्द. याला 'ई' हा तद्धित प्रत्यय लागून 'निधर्मी' हा शब्द होतो ( **कृष्णशास्त्री चिपळूणकर, दामले** याच्या मतें हा बहुव्रीहि. पण ते बरोबर नाहीं. )'

( २ ) **देशांतर** :—हा सप्तमी तत्पुरुष समास. विग्रह—देशांत अन्तर ( फरक ). संस्कृतांत याला 'सुप्सुपा' समास असे नांव आहे व विग्रह—अन्य देश, देशान्तरम् असा करतात.

( ३ ) **तज्ज्ञ** :—हा संयुक्त शब्द. ( तत्+ज्ञ ). संधि त् चा द् व नंतर ज् पुढील मृदु व्यंजनामुळें झाला. ज् असा फरक होण्याचें कारण ज्ञ् मध्यें ज् व ञ् असे दोन वर्ण आहेत. असा समज. त्यांपैकीं ज् मुळे मागील द् चा ज् झाला.

( ४ ) **झाडपेड** :—हा संयुक्त शब्द. **दादोबादि** पूर्व व्याकरणकारांच्या मताप्रमाणें हा समाहार द्वंद्व समास पण मधल्या पदाचा किंवा प्रत्ययाचा लोप नसल्यामुळें हा समासच नव्हे यांतील दुसरा शब्द ' पेड ' हा हिंदी शब्द आहे मराठींत तो स्वतंत्र रीतीनें वापरीत नाहींत. ह्या संयुक्त शब्दाचा दुसरा विशेष हा कीं, तो विभक्त्यंत असताना पहिल्या शब्दास सामान्यरूप होतें. जसे—झाडापेडास.

( ५ ) **पळून जातो** :—प्राचारिक संयुक्त शब्द. हा शब्द कृदंत व साह्य क्रियापद यांच्या संयोगाने झाला आहे.

( ६ ) **जावव** :—शक्यार्थ धातु 'जाऊ ये' यापासून झालेला. अव प्रत्यय लागून झालेला धातु नाहीं. यापासून जाववतें हे अकर्तृक क्रियापद तयार होतें व अकर्तृक भावे प्रयोग होतो.

( ७ ) **ज्यांतत्यांत** :—सार्वनामिक प्राचारिक संयुक्त शब्द. संबंधीं व दर्शक सर्वनाम यांनीं बनलेला. दोन्ही शब्द विभक्त्यंत हा विशेष.

( ८ ) **फोडविणें** :—हा 'फोड' या मूळ धातूपासून 'अव' प्रत्ययाने होणारा असा क्रियादर्शक शब्द. ' फोड ' हा धातु मात्र 'फुट' याचे पूर्व वैयाकरण म्हणतात, त्याप्रमाणें प्रयोजक रूप नव्हे.

( ९ ) **फाव** :—हा अकर्तृक धातु. यापासून अकर्मक क्रियापद व अकर्तृक भावे प्रयोग होतो.

( १० ) **पिसू** :—या शब्दाचीं पिसवे, पिस्वे व पिसू अशीं तीन सामान्यरूपे होतात.

( ११ ) **कशाला** :—काय ह्या शब्दाचे चतुर्थ्यंत रूप 'काय' याचें 'कसा' असें सामान्यरूप विभक्ति प्रत्यय लागण्यापूर्वीं होते. कसा यांतील 'स' चा प्रत्यय लागण्यापूर्वी 'श' होतो.

( १२ ) **सोयरीक** :—उपान्त्य 'ई' असलेला चारअक्षरी शब्द. विभक्ति प्रत्यय लावण्यापूर्वी 'ई' ऱ्हस्व जसें—'सोयरिकेस.'

( १३ ) **सिंहासन** :—मध्यमपदलोपी समास. विग्रह—सिंहांनीं युक्त असें आसन. या ठिकाणीं 'सिंह' यांतील अनुनासिकाच्या उच्चारांत 'व' चा उच्चार होतो. म्हणजे 'सिंव्हासन' असा उच्चार करावयाचा. लिहितांना 'सिंहा' असेंच लिहावयाचें.

( १४ ) **अहोरात्र** .—द्वंद्व समास. विग्रह—अहन् ( दिवस ) आणि रात्र, या ठिकाणीं संधि होतांना 'अहन्' यामधील 'न्' चा 'र्' होऊन 'र्' चा विसर्ग झाला आहे. विसर्गापुढें 'र' हें मृदुव्यंजन आल्यामुळे विसर्गाबद्दल 'ओ' असा आदेश झाला आहे.

( १५ ) **वसिष्ठ ऋषि** —रायुक्त शब्द. **दामले** म्हणतात त्याप्रमाणे कर्मधारय समास नव्हे. समासांत पदलोप किंवा प्रत्ययलोप झाला पाहिजे.

---

# अध्याय दुसरा.

## पदपरिस्फोट.

**उपोद्घात :**—पदपरिस्फोटांत निव्वळ पदविषयक माहिती सांगावयाची असते. ही माहिती वर्गीकरण, विकरण, पदसंबंध, पदप्रयोग व पदयोजना एवढयाच बाबतींत सांगावयाची. साहजिकच या प्रकारच्या परिस्फोटांत अर्थाला अधिक महत्त्व असते. हा अर्थ वाच्यदृष्टीने घ्यावयाचा असतो.

[ शब्दविषयक माहिती म्हणजे वर्ण, संधि, सामान्यरूपादि फेरफार, अन्तर्घटना व बाह्यघटना यासंबंधाची माहिती, जी शब्दपरिस्फोटात सांगावयाची, ती पदपरिस्फोटात सांगू नये वाच्यार्थ म्हणजे व्याकरणाच्या नियमाप्रमाणे सिद्ध झालेल्या रूपापासून निघणारा सरळ अर्थ उदा — ' हा मी आलोच ' येथे ' लो ' या प्रत्ययापासून क्रिया मागे घडली असा बोध होतो. येथ व्याकरणाच्या नियमाप्रमाणे भूतकाळीं प्रथम पुरुषाच्या एकवचनाचे रूप होते तसेंच व्याकरण सांगावयाचे या क्रियापदापासून मी येईन, असा एक लाक्षणिक अर्थ येतो तो घेऊ नये **दामल्यांनी** असे लाक्षणिक अनेक आख्यातार्थ कल्पून त्यांना निरनिराळीं नावे दिलीं आहेत पूर्वोक्त ' हा मी आलोच ' या वाक्यातील ' आलो ' चा ते ' येईन ' असा अर्थ करून तो सन्निहित भविष्यकाळ असा आख्यातार्थ सांगतात ! पदाचें व्याकरण सांगताना त्या पदाचे अर्थविषयक कार्य व पदाचे वाक्यातील स्थान यांसबधी विचार झाला पाहिजे उदा :— ' म्हणजे ' हा शब्द एका ठिकाणीं निराळ्या अर्थानें ' उभयान्वयी अव्यय ' ( तो आला म्हणजे तू जा ) असते अनेकवचनीं येणारी विशेषनामें व भाववाचकनामें जातिवाचक समजून सामान्यनामें मानावीं लागतात ' वर, ' ' खाली ' इत्यादि पदें स्थळवाचक क्रियाविशेषणें आहेत हेच शब्द दुसऱ्या शब्दाला जोडून एक संयुक्त पद तयार झाले म्हणजे क्रियाविशेषण जातीचें एक संयुक्त पद तयार होते. नियमाप्रमाणें प्रत्येक पदाचें वाक्यांतील स्थान ठरलेलें असते. उदा - विशेषण नामामागें येते सर्वनाम नामाच्या गैरहजेरीत त्याच्या ऐवजी येते बरोबर येत नाहीं सर्वनामासारखा दिसणारा शब्द नामामागे आला तर त्याला विशेषण असेच म्हटले पाहिजे. क्रियाविशेषण क्रियेच्या आधी येते कर्ता आधीं, मग कर्म व मग क्रियापद असा मराठी भाषेंतील सामान्य क्रम आहे. अर्थात् हा प्रौढलिखित भाषेचा क्रम आहे बोलण्याचे भाषेत, पद्याची भाषा, नाटकांतली भा इत्यादिकांत पदाचें स्थान बदललेले दिसेल. पण व्याकरण सांगताना नियमाप्रमाणें असेल तेंच स्थान गृहीत धरून त्याप्रमाणें व्याकरण सांगितलें पाहिजे. व्याकरणासाठी पद्याची ओळ दिली तर,

आधी अन्वय करणें चांगले त्याचप्रमाणें जुनीं रूपें असलीं तर नवीं रूपेच गृहीत धरून चालणें बरे व्याकरणासाठीं एखाद्या पद्याची ओळ दिली तर आधीं अन्वय केला असतां व्याकरण करणे सोपें होतें. व्याकरण करताना पुष्कळ प्रसगीं अध्याहृत शब्द घ्यावे लागतात अर्थात् जरूर तेव्हांच ते घ्यावे त्याचप्रमाणे कांहीं पूरक शब्दही सयुक्त क्रियापद पुरें करण्यासाठीं घ्यावे लागतात शब्द जोडून किंवा तोडून लिहिण्या-सबधी गोष्टीस अलिकडे फार महत्त्व देण्यांत येत आहे व्याकरणदृष्ट्या ह्या गोष्टीस फारसे महत्त्व देण्याचे कारण नाहीं शब्द, वाक्य हे भाग तोडून लिहिण्याची पद्धति पाश्चात्यांकडून आम्हीं अलिकडेच स्वीकारली आहे तेव्हा त्या बाबतींत प्रमाद झाला तर, तो व्याकरणविषयक प्रमाद असे मानण्याचें कारण नाहीं तसेच त्या बाबतींत लेखकाला व मुद्रकाला थोडी मोकळीक दिली तर व्याकरणाच्या दृष्टीने फारसे नफा-नुकसान नाहीं सामान्यत परिस्फोटासबधानें हे सागावयाचे आहे कीं आम्हीं यासबधी कांहीं ठराविक क्रम किवा नमुना आखला नाहीं क्वचित प्रसगी आमच्या नियमाकडे दुर्लक्ष झाले असेल क्वचित् प्रसगीं उल्लघनही झाले असेल. म्हणून विद्यार्थ्यास ह्यासबधी बरीच मोकळीक आहे. ]

**२ प्रातिपदिक :**—परिस्फोटासाठी ( १ ) नाम, ( २ ) सर्वनाम, ( ३ ) विशेषण, ( ४ ) क्रियापद, ( ५ ) क्रियाविशेषण, ( ६ ) क्रिया-विशेषण अव्यय, ( ७ ) उभयान्वयी अव्यय, ( ८ ) केवलप्रयोगी अव्यय असे प्रातिपदिकाचे आठ प्रकार सांगावयाचे.

[ आतां व्याकरण सांगताना 'मूळशब्द' असें पूर्वीप्रमाणें न सागतां 'प्रातिप-दिक सांगावे' अर्थात् ते सांगण्याचे निरनिराळे प्रकार आहेत नामाच्या बाबतींत त्या नामाचें एकवचनी मूळरूप सांगावे. जसे :–'गायींस' येथे प्रातिपदिक 'गाय' असे सागावे सर्वनामापैकी 'मी', 'तू' हीं मूळरूपीं एकवचनी सागावीं 'तो', 'हा,' 'जो' हीं पुलिगी एकवचनी सागावीं. बाकीच्यासबधी फारसा प्रश्न नाही. विशेषण असलेल्या लिगात एकवचनी सागावे क्रियापद ( भावेप्रयोगांतील क्रियापदाशिवाय ) वर्तमानकाळी, तृतीय पुरुषी एकवचनी सांगावे भावेप्रयोग असतां, प्रातिपदिकही तृतीय पुरुषीं, नपुसकलिंगी एकवचनीच सागावे ]

**३ नाम प्रातिपदिक :**—प्रातिपदिक सांगितल्यावर, त्याची जाती—पोटजाती व नंतर लिग, वचन, विभक्ति व तिचा कारकसंबंध सांगावा.

[ प्रथमा व षष्ठी या विभक्ति आता गाळल्या गेल्या आहेत. पूर्वीची षष्ठ्यत नामें आतां केवळ गुणविशेषणें म्हणून सागावयाचीं. म्हणून त्यांचा नाम प्रातिपदिक या दृष्टीनें विचार करावयाचा नाहीं. प्रथमा विभक्ति गेल्यामुळें आतां ती विभक्ति न

सांगतां 'प्रथमरूपीं' असे म्हणून जाती, वचन, लिंग सांगितल्यावर, असेल त्या 'क्रिये'चे कर्ता किंवा कर्म सांगावें.]

**४ नाम प्रातिपदिक परिस्फोट :**—पुढे कांहीं वाक्ये घेऊन, नाम प्रातिपदिक परिस्फोट स्पष्ट करून दाखविला आहे:—

(१) **हरीनें गाईस दोरीनें** बांधून **गांवाहून घरीं** आणले व तिला **खांब्यास** बांधिले आणि तिचे **दूध** काढले.

१ **हरीनें** :—प्रातिपदिक 'हरी' विशेषनाम, पुल्लिंगी, तृतीयेचे एकवचन, कर्तृकारक

२ **गाईस** :—प्रातिपदिक 'गाय' सामान्यनाम, स्त्रीलिंगी, द्वितियेचे एकवचन, कृतिकारक.

३ **दोरीनें** :—प्रातिपदिक 'दोरी' सामान्यनाम, स्त्रीलिंगी, तृतीयेचे एकवचन, करणकारक

४ **गांवाहून** :—प्रातिपदिक 'गांव' सामान्यनाम, पुल्लिंगी, पचमीचे एकवचन, अपादानकारक.

५ **घरीं** :—प्रातिपादक 'घर' सामान्यनाम, नपुसकलिंगी, सप्तमीचे एकवचन, अधिकरणकारक.

६ **खांब्यास** :—पातिपदिक 'खाबा' सामान्यनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे एकवचन, सप्रदानकारक.

७ **दूध** :— प्रातिपदिक 'दूध' पदार्थवाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपी कर्म काढणें या क्रियचे

(२) **शौर्य, धैर्य,** इत्यादि **गुणांत** तो कमी नसल्यामुळे, त्याची फार **कीर्ति** झाली व त्याला **पैसाही** मिळाला.

१ **शौर्य** :—प्रातिपदिक 'शौर्य' भाववाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, गुणांत या नामाशीं सहयोगी.

२ **धैर्य** :—प्रातिपदिक 'धैर्य' भाववाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं गुणांत या नामाशीं सहयोगी

३ **गुणांत** :—प्रातिपदिक 'गुण' सामान्यनाम, पुल्लिंगी, सप्तमीचे अनेकवचन, अधिकरणकारक

४ **कीर्ति** :—प्रातिपदिक 'कीर्ति' भाववाचक नाम, स्त्रीलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता 'होणें' या क्रियेचा.

५ **पैसाही** :—प्रातिपदिक 'पैसा' पदार्थवाचक नाम, पुल्लिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता 'मिळणें' या क्रियेचा.

( ३ ) **शहाण्यास** शब्दांचा **मार, मूर्खास** छड्याचा.

१ **शहाण्यास** :—प्रातिपदिक ' शहाणा ' विशेषणात्मक सामान्यनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे एकवचन, सप्रदानकारक

२ **मार** :—प्रातिपदिक ' मार ' भाववाचकनाम, पुल्लिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' मिळणे ' या क्रियेचा.

३ **मूर्खास** :—प्रातिपदिक ' मूर्ख ' विशेषणात्मक सामान्यनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचें एकवचन, सप्रदानकारक.

( ४ ) हजार **पान** पडलें सर्वांस **अन्न** भरपूर मिळाले. हजार **माणूस** जेवून तृप्त झाले.

१ **पान** :—प्रातिपदिक ' पान ' समुदायवाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपी, कर्ता ' पडणें ' या क्रियेचा.

२ **अन्न** —प्रातिपदिक ' अन्न ' पदार्थवाचकनाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपी, कर्ता ' मिळणें ' या क्रियेचा.

३ **माणूस** :—प्रातिपदिक ' माणूस ' समुदायवाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' होणे ' या क्रियेचा.

( ५ ) **भिक्षापात्र अवलंबणें,** जळो **जिणें** लाजिरवाणें ॥ १ ॥

१ **भिक्षापात्र** :—प्रातिपदिक ' भिक्षापात्र ' सामान्यनाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्म, अवलबणे या क्रियेचे.

२ **अवलंबणें** :—प्रातिपदिक ' अवलबणे ' धातुसाधित भाववाचक नाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' असणें ' या क्रियेचा

३ **जिणें** :—प्रातिपदिक ' जिणें ' भाववाचकनाम, नपुसकलिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' असणें ' या क्रियेचा.

**५ सर्वनाम प्रातिपदिक :**—नामाप्रमाणें जाती, वचन, विभक्ति सांगावी. लिंग विशेषत: प्रथम व द्वितीय पुरुषवाचक सर्वनामांत व सामान्य सर्वनामांत अनिश्चित व बरेंचसे संदर्भावर अवलंबून असल्यामुळें व बाकीच्या सर्वनामाच्या बाबतींत स्पष्ट असल्यामुळे न सांगणे बरे.

[ प्रातिपदिक सर्वनाम आहे किंवा विशेषण आहे ते आधीं ठरवले पाहिजे. सर्वनामासारखे दिसणारें पद नामाच्या मागे आले किंवा चा, ची, चे प्रत्ययानीं युक्त असलें तर ते विशेषणच समजावें. ]

**६ ' सर्वनाम प्रातिपदिक परिस्फोट :**—सर्वनाम प्रातिपदिकासंबंधीं परिस्फोटाची उदाहरणें पुढें दिलीं आहेत :—

( १ ) **मी** तेथे गेलो, पण **मला** गरिबाला **कोण** विचारतो ?

१ **मी** :—प्रातिपदिक ' मी ' प्रथम पुरुषवाचक सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' जाणे ' या क्रियेचा

२ **मला** :—प्रातिपदिक ' मी ' प्रथम पुरुषवाचक सर्वनाम, द्वितीयेचें एकवचन, कर्मकारक.

३ **कोण** :—प्रातिपदिक ' कोण ' प्रश्नार्थक सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपी, कर्ता विचारणे या क्रियेचा.

( २ ) **जो** चढेल **तो** पडेल, **हें तुला** ठाऊक नाहीं काय ?

१ **जो** —प्रातिपदिक ' जो ' सबधीं सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपी, कर्ता ' चढणें ' या क्रियेचा

२ **तो** —प्रातिपदिक ' तो ' दर्शक सर्वनाम, पुल्लिंगी, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' पडणे ' या क्रियेचा

३ **हें** —प्रातिपदिक ' हें ' दर्शक सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' नसणे ' या क्रियेचा.

४ **तुला** :—प्रातिपदिक ' तू ' द्वितिय पुरुषवाचक सर्वनाम, चतुर्थीचे एकवचन, सप्रदानकारक.

( ३ ) **आपण** आपलें वर्तन चोख ठेवावें मग **कोण काय** वाटेल **तें** म्हणो

१ **आपण** —प्रातिपदिक ' आपण ' सामान्य सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपी, कर्ता ' ठेवणे ' या क्रियेचा.

२ **कोण** .—प्रातिपदिक ' कोण ' सामान्य सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' म्हणणे ' या क्रियेचा.

३ **काय** —प्रातिपदिक ' काय ' सबधीं सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपीं, कर्ता ' वाटणे ' या क्रियेचा

४ **तें** :—प्रातिपदिक ' ते ' दर्शक सर्वनाम, एकवचन, प्रथमरूपीं कर्म ' म्हणणे ' या क्रियेचे

**७ विशेषण प्रातिपदिक** :—प्रातिपदिक, जाती, पोटजाती ( गुण व संख्या ) लिंग, वचन व असेल तेथे विभक्ति सांगावी. संख्याविशेपणाचे लिंग सांगू नये. असेल तेथें तरतमभाव सांगावा.

[ विशेषण सार्वनामिक ( सर्वनामासारखे दिसणारे, सर्वनामापासून झालेलें नव्हे ) असले तर, सार्वनामिक गुणविशेषण म्हणून सांगावें. पूर्वीच्या षष्ठ्यंत शब्दास ( नामास किंवा सर्वनामास आता नुसतें गुणविशेषण म्हणून सांगावें. ) गद्य भाषेंत विशेषणाची प्रत्ययाभाव विभक्तीच असते. पुढें विभक्तिक नाम असता मागील नामाची

( किंवा सर्वनामाची ) प्रत्ययाभाव विभक्ति सांगावी पूर्वीप्रमाणें पुढील सविभक्तिक शब्दांच्या योगाने सामान्यरूप असें सांगू नये. अर्थात षष्ठ्यंत विशेषणास हा नियम नाही. पद्यात संस्कृत पद्धतीप्रमाणे विशेष्याप्रमाणे विशेषणासही प्रत्यय लागतात, असल्यास तसे सांगावे पुढे विशेष्य नसल्यास विशेषण नाम होते. अशा वेळी ते विशेषण म्हणून सांगू नये

**८ विशेषण प्रातिपदिकाचा पदपरिस्फोट** :—विशेषण प्रातिपदिकाच्या पदपरिस्फोटाची उदाहरणे पुढे दिली आहेत :—

( १ ) **त्या आंधळ्या** माणसाने **त्या हुशार लंगड्याची** मदत घेतली. व **ते** दोघे **ती बिकट** वाट चालू लागले

१ **त्या** :—प्रातिपदिक ' तो '. सार्वनामिक गुणविशेषण, पुल्लिंगी, प्रत्ययाभाव तृतीयेचे एकवचन, विशेष्य ' माणसाने '

२ **आंधळ्या** :—प्रातिपदिक ' आंधळा ' गुणविशेषण, पुल्लिंगी, प्रत्ययाभाव तृतीयेचे एकवचन, विशेष्य ' माणसाने. '

३ **त्या** :—प्रातिपदिक ' तो '. सार्वनामिक गुणविशेषण, पुल्लिंगी, पुढील षष्ठ्यंत विशेषणाच्या योगाने सामान्यरूप, ' विशेष्य ' ' लंगडा. '

४ **हुशार** :—प्रातिपदिक ' हुशार '. गुणविशेषण, विशेष्य ' लंगडा '

५ **लंगड्याची** :—प्रातिपदिक ' लंगड्याचा '. गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचन, विशेष्य ' मदत '

६ **ते** :—प्रातिपदिक ' तो '. सार्वनामिक गुणविशेषण, पुल्लिंगी, अनेकवचन, विशेष्य ' दोघे '

७ **ती** :—प्रातिपदिक ' तो '. सार्वनामिक गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचन, विशेष्य ' वाट. '

८ **बिकट** :—प्रातिपदिक ' बिकट ' गुणविशेषण, विशेष्य ' वाट. '

( २ ) मामाने विनायकास **दोन मातीचीं सुंदर, पाहण्याजोगीं** चित्रें दिलीं

१ **दोन** :—प्रातिपदिक ' दोन '. विशेषण, अनेकवचन, विशेष्य ' चित्रें ' संख्या. वि.

२ **मातीचीं** :—प्रातिपदिक ' मातीचा '. गुणविशेषण, नपुसलिंगी, अनेकवचन, विशेष्य ' चित्रे.'

३ **सुंदर** :—प्रातिपदिक ' सुंदर '. गुणविशेषण, नपुसकलिंगी, अनेकवचन, विशेष्य ' चित्रे '

४ **पाहण्याजोगीं** :—प्रातिपदिक ' पाहण्याजोगा '. गुणविशेषण, नपुसकलिंगी, अनेकवचनी, विशेष्य ' चित्रे. '

( ३ ) तों वसिष्ठ वदला भरतातें **रामपादनिजलाभरतातें** । पाळीं **समस्त** धरा **हे** । राजनि त करीं सावध राहे ॥ १ ॥

१ **रामपादनिजलाभरतातें** :—प्रातिपदिक 'रामपादनिजलाभरत'. गुण-विशेषण, पुल्लिंगीं, द्वितीयेचे एकवचन, विशेष्य ' भरताते '

२ **हे** ( **हीं** ) :—प्रातिपदिक ' हा ' सार्वनामिक गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एक-वचन, विशेष्य ' धरा '

३ **समस्त** :—प्रातिपदिक ' समस्त '. गुणविशेषण, एकवचन, विशेष्य ' धरा '

४ ( अ ) **त्या** जेणे मानसाते त्यजुनि वरियले **पंकिला** पल्वलाते, । ( **ब** ) **अत्युच्चि** पदि थोरही बिघडतो **हा** बोल आहे खरा ।

१ **त्या** :—प्रातिपदिक ' तो '. सार्वनामिक गुणविशेषण, नपुसकलिंगी, प्रत्यया-भाव द्वितियेचे एकवचन, विशेष्य ' मानसाते '

२ **पंकिला** —प्रातिपदिक ' पंकिल '. गुणविशेषण, नपुसकलिंगी, प्रत्ययाभाव द्वितियेचें एकवचन, विशेष्य ' पल्वलातें '

३ **अत्युच्चि** :—प्रातिपदिक ' अत्युच्च '. गुणविशेषण, नपुसकलिंगी, सप्तमीचे एकवचन, विशेष्य ' पदि ' संस्कृतप्रमाणे विशेष्याची विभक्ति.

४ **हा** :—प्रातिपदिक ' हा '. सार्वनामिक विशेषण, पुल्लिंगी, एकवचन, विशेष्य ' बोल.'

९ **क्रियापद प्रातिपदिक** :—प्रातिपदिकासाठी वर्तमानकाळी तृतीय पुरुषी एकवचन सांगावे. नंतर जात, काळ किंवा अर्थ, लिंग, वचन, पुरुष व ठळकपणे असल्यास प्रयोग, प्रयोजक किंवा शक्यभेद, अस्वाधीन मुख इत्यादि रचनाप्रकार सांगावे. गौण क्रियापद असतां, आज्ञार्थ, भविष्यकाळ वगैरे असतां, म्हणजे जेथे क्रियापदाचे लिंग स्पष्ट दिसत नाही, तेथे प्रयोग सांगूं नये. प्रयोगासाठी भलतेच क्रियापद घेण्याची रीत क्वचित् आढळते ती चुकीच आहे. उदा :—' पाहिजे ' असें क्रियापद वाक्यांत असले तर त्याच्या ऐवजी ' हवे ' असे क्रियापद गृहीत धरतात व कर्मणि प्रयोग सांगतात हें चुकीचे आहे हे सांगावयास नको. बोलभाषेत कोणताही प्रयोग ( उपयोग ) असो, व्याकरणांत नियमाप्रमाणे सिद्ध होणारें पदच मानून व्याकरण सांगितलें पाहिजे. उदाहरणार्थ ' मी स्नान केलों किंवा ' त्याने मुलीला निजविली ' या

वाक्यांत अनुक्रमें ‘ केलें ’ व ‘ निजविले ’ अशी क्रियापदे गृहीत धरूनच ‘ कर्मणि ’ व ‘ भावे ’ प्रयोग सांगावे. संकर प्रयोगाच्या भानगडीत पडू नये.

**१० क्रियापद प्रातिपदिकाचा पदपरिस्फोट** :—पुढे कांही वाक्यांत **क्रिया**पदाचा स्फोट करून दाखविला आहे. –( १ ) मी आज तेथे **जातों**. काल **गेलों**. उद्यां **जाईन.**

**१ जातों** '—प्रातिपदिक ‘ जातो ’ अकर्मक क्रियापद, वर्तमानकाळीं, पुल्लिंगी, प्रथम पुरुषाचें एकवचन अकर्मक कर्तरिप्रयोग. कर्ता ‘ मी. ’

**२ गेलों** '—प्रातिपदिक ‘ जातो ’ अकर्मक क्रियापद, भूतकाळीं, पुल्लिंगी, प्रथम पुरुषाचे एकवचन. अकर्मक कर्तरिप्रयोग

**३ जाईन** —प्रातिपदिक ‘ जातो ’. अकर्मक क्रियापद, भविष्यकाळी, पुल्लिंगी, प्रथम पुरुषाचे एकवचन.

( २ ) मी आता हे पुस्तक **वाचीत आहें.** काल मी ते **वाचीत होतों.** उद्यां यावेळी ते **वाचीत असेन.**

**१ वाचीत आहें** :—प्रातिपदिक ‘ वाचतो ’. सकर्मक क्रियापद, पुल्लिंगी, अपूर्ण वर्तमानकाळीं, प्रथमपुरुषाचे एकवचन. सकर्मक कर्तरिप्रयोग. कर्ता ‘ मी ’, कर्म ‘ पुस्तक ’

**२ वाचीत होतों** —प्रातिपदिक ‘ वाचतो ’ सकर्मक क्रियापद, अपूर्ण भूत– काळी, पुल्लिंगी प्रथमपुरुषाचे एकवचन. सकर्मक कर्तरिप्रयोग कर्ता ‘ मी,’ कर्म ‘ ते ’

**३ वाचीत असेन** —प्रातिपदिक ‘ वाचतो ’. सकर्मक क्रियापद, अपूर्ण भविष्यकाळ, प्रथम पुरुष, एकवचन

( ३ ) मी हे पुस्तक **वाचलें आहे**. मीं ते काल **वाचलें होतें**. उद्या मी ते **वाचलेलें असेल.**

**१ वाचलें आहे** .—प्रातिपदिक ‘ वाचतो,’ सकर्मक क्रियापद, पूर्ण वर्तमान- काळीं, नपुसलिंगी प्रथम पुरुषाचे एकवचन, कर्मणिप्रयोग, कर्ता ‘ मी, ’ कर्म ‘पुस्तक ’

**२ वाचलें होतें** '—प्रातिपदिक ‘ वाचतो ’. पूर्ण भूतकाळ इ. इ. कर्मणि- प्रयोग.

**३ वाचलेलें असेल** :—प्रातिपादिक ‘ वाचतो ’. पूर्ण भविष्यकाळ इ. इ कर्मणिप्रयोग.

( ४ ) **वाचीत असतों – असें – राहीन—**

**१ वाचीत असतों** ( किंवा वाचतो ) :—प्रातिपदिक ‘ वाचतो ’. सकर्मक क्रियापद, रीति वर्तमानकाळीं, प्रथम पुरुषीं एकवचन. सकर्मक कर्तरिप्रयोग. कर्ता ‘ मी,’ कर्म ‘ पुस्तक. ’

२ **वाचीत असें** :—प्रातिपदिक ' वाचतो '. रीतिभूतकाळीं, प्रथमपुरुषीं, एक-वचन. सकर्मक कर्तरिप्रयोग. कर्म ' मी ', कर्म ' पुस्तक '.

३ **वाचीत राहीन** :— प्रातिपदिक ' वाचतो '. रीतिभूतकाळीं, प्रथमपुरुषीं, एकवचन. समर्पक कर्तरिप्रयोग, कर्ता ' मी ' कर्म, ' पुस्तक '

( ५ ) धर्मानें अभिमन्यूस युद्धावर **पाठविलें** त्याच्या आईनें त्याला **जाऊं नको** म्हणून **सांगितलें**. पण तो **गेला** व रणांगणात **मारला गेला**

१ **पाठविलें** :—प्रातिपदिक ' पाठवितो '. सकर्मक क्रियापद, भूतकाळीं, नपुसक-लिंगीं, तृतीय पुरुषाचें एकवचन ' भावे ' प्रयोग. कर्ता ' धर्मानें ', कर्म ' अभिन्यूस '

२ **जाऊं नको** —प्रातिपदिक ' जातो '. अकर्मक क्रियापद, आज्ञार्थीं अकरण-रूपीं, द्वितिय पुरुषाचे एकवचन.

३ **सांगितलें** :—प्रातिपदिक ' सांगतो ', सकर्मक क्रियापद, भूतकाळी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन. भावे प्रयोग. कर्ता ' आईनें ', ' कर्म त्याला '

४ **गेला** .—प्रातिपदिक ' जातो '. अकर्मक क्रियापद, भूतकाळी, पुल्लिंगी, एकवचनीं, तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्मक कर्तरिप्रयोग, कर्ता ' तो '.

५ **मारला गेला** :—प्रातिपदिक ' मारला जातो '. अस्वाधीन मुखी अकर्मक सयुक्त क्रियापद, भूतकाळीं, तृतीय पुरुषाचें एकवचन. अकर्मक कर्तरिप्रयोग. कर्ता ' तो '

( ६ ) मला त्या दिवशींच तिकडे **गेलें पाहिजे होतें**, पण जेवल्यावर **कळमळून आलें**, म्हणून रात्रीं तेथेंच **निजून राहिल** व दुसऱ्या दिवशीं **उजाडलें** तेव्हां पुढें जाण्यास **निघालों**.

१ **गेलें पाहिजे होतें** :—प्रातिपदिक ' गेला पाहिजे आहे ' प्राचारिक सयुक्त अकर्मक क्रियापद, भूतकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्तृक भावे-प्रयोग

२ **कळमळून आलें** :—प्रातिपदिक ' कळमळून येते ', अकर्तृक सयुक्त क्रिया-पद, भूतकाळीं, नपुसकलिंगीं, तृतीय पुरुषाचे एकवचन. अकर्तृक भावेप्रयोग.

३ **निजून राहिलों** :—प्रातिपदिक ' निजून राहतो '. सयुक्त अकर्मक प्राचा-रिक क्रियापद, भूतकाळीं, पुल्लिंगीं प्रथम पुरुषाचे एकवचन अकर्मक कर्तरिप्रयोग. कर्ता मी ( अध्याहृत. )

४ **उजाडलें** :—प्रातिपदिक ' उजाडते '. अकर्तृक क्रियापद, भूतकाळीं, नपुस-कलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन. अकर्तृक भावे प्रयोग.

५ **निघालों** .—प्रातिपदिक ' निघतो '. भूतकाळीं, पुल्लिंगीं, प्रथम पुरुषाचे एक वचन. अकर्मक कर्तरि प्रयोग. कर्ता ' मी ' ( अध्याहृत. )

( ७ ) मला **करवलें** तेवढें मीं **केलें**. **राहिलें** तें कोणाकडून तरी **करवीन**.

१ **करवलें** :—प्रातिपदिक 'करवते' अकर्तृक क्रियापद, भूतकाळीं, तृतीय
पुरुषीं, नपुसकलिंगी एकवचन अकर्तृक भावे.

२ **केलें** —प्रातिपदिक 'करतो' सकर्मक क्रियापद भूतकाळीं, नपुसकलिंगी,
तृतीय पुरुषाचे एकवचन कर्मणिप्रयोग कर्ता 'मीं', कर्म 'तेवढें'

३ **करवीन** :—प्रातिपदिक 'करवतो'. प्रयोजकभेदी सकर्मक क्रियापद, भविष्य-
काळीं, प्रयोजकभेदी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन

(८) तो **येता** तर, तें काम सहज **होतें**. आता तरी त्याने **यावें** व तें
काम **करावें**

१ **येता** —प्रातिपदिक 'येतो' अकर्मक क्रियापद, संकेतार्थी, पुल्लिंगी, तृतीय
पुरुषाचे एकवचन अकर्मक कर्तरिप्रयोग, कर्ता 'तो'.

२ **होतें** .—प्रातिपदिक 'होता' अकर्मक क्रियापद, संकेतार्थी, नपुसकलिंगी,
तृतीय पुरुषाचें एकवचन अकर्मक कर्तरिप्रयोग

३ **यावें** —प्रातिपदिक 'येतो' अकर्मक क्रियापद, विध्यर्थी, नपुसकलिंगी,
तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्मक भावप्रयोग कर्ता 'त्याने'

**करावें** —प्रातिपदिक 'करतो' सकर्मक क्रियापद, विध्यर्थी, नपुसकलिंगी,
तृतीय पुरुषाचे एकवचन. कर्मणिप्रयोग कर्ता 'त्याने', कर्म 'काम'.

(९) (अ) त्या काय कर्म **करिजे** लघुलेकराने (ब) सोळा आणे **म्हणजे**
रुपया

१ **करिजे** :—प्रातिपदिक 'करिजे' अस्वाधीन मुखरूपी गौण क्रियापद, कर्ता
'कर्म'.

२ **म्हणजे** (म्हणिजे) —प्रातिपदिक 'म्हणजे' अस्वाधीन मुखरूपी गौण
क्रियापद, कर्ता 'सोळा आणे'

(१०) मला अंगात घालावयास एक कुडतें **पाहिजे** व पांघरावयास एक
घोंगडीही **हवी**.

१ **पाहिजे** :—प्रातिपदिक 'पाहिजे' अकर्मक प्राचारिक गौण क्रियापद,
कर्ता 'कुडतें'

२ **हवी** —प्रातिपदिक 'हवा'. अकर्मक क्रियापद, वर्तमानकाळीं, स्त्रीलिंगी,
तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता 'घोंगडी'.

(११) तसें **झालें** तर त्याला हा धंदा **सोडावा लागतो** व मग त्याला
देवाळें **काढून बसावें लागेल**.

१ **झालें** —प्रातिपदिक 'असतें' अकर्तृक क्रियापद, भूतकाळीं, नपुसकलिंगी,
तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्तृक भावेप्रयोग

**२ सोडावा लागतो** :—प्रातिपदिक 'सोडावा लागतो'. अकर्मक सयुक्त क्रियापद, वर्तमानकाळी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन

**३ काढून बसावें लागेल** —प्रातिपदिक 'काढून बसावे लागते' अकर्मक सयुक्त क्रियापद, भविष्यकाळी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन. अकर्मक कर्तरी प्रयोग, कर्ता 'दिवाळे'

१० माझे **लिहून झालें** म्हणजे मी **येतों**, तोपर्यंत तू तेथे **थांबून राहा.**

**१ लिहून झालें** —प्रातिपदिक 'लिहून होते' अकर्तृक क्रियापद, भूतकाळी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्तृक भावेप्रयोग

**२ येतों** :—प्रातिपदिक 'येतो'. अकर्मक क्रियापद, वर्तमानकाळीं, पुल्लिंगी, प्रथम पुरुषाचें एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग

**३ थांबून राहा** —प्रातिपदिक, 'थाबून राहतो' अकर्मक सयुक्त क्रियापद, आज्ञार्थी द्वितिय पुरुषाचे एकवचन

( १२ ) इकडे **फीर**, तिकडे **फीर,** अशा रीतीनें तो आपला वेळ फुकट **घालवीत होता**

( १ ) फीर ( फिरावें ) :—प्रातिपदिक 'फिरावें' अकर्तृक क्रियापद, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन. अकर्तृक भावेप्रयोग

( २ ) **घालवीत होता** —प्रातिपदिक 'घालवणें'. सकर्मक क्रियापद, अपूर्ण भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, सकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता 'तो', कर्म 'वेळ'

( १३ ) त्याने तसें करावयाचें **नव्हतें**, पण तू असा कसा **फसला गेलास** ?

**१ नव्हतें** :—प्रातिपदिक 'करावयाचें आहे' अकर्मक क्रियापद, अकरणरूपी, भूतकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्मक भावेप्रयोग, कर्ता 'त्याने'

**२ फसला गेलास** --प्रातिपदिक 'फसला जाणे'. प्राचारिक अकर्मक सयुक्त क्रियापद, भूतकाळीं, पुल्लिंगी, द्वितिय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता 'तू'.

( १४ ) हे मला **खपावयाचें नाहीं.** तुम्हीं असे **करतां कामा नये.**

**१ खपावयाचें नाहीं** :—प्रातिपदिक 'खपावयाचे नाहीं'. प्राचारिक सयुक्त अकर्तृक क्रियापद, नपुसकलिंगी, वर्तमानकाळीं, एकवचन, अकर्तृक भावेप्रयोग

**२ करतां कामा नये** :—प्रातिपदिक 'करतां कामा नये'. प्राचारिक अकर्मक सयुक्त क्रियापद, विध्यर्थी, अकरणरूपीं, नपुंसकलिंगी, द्वितिय पुरुषाचे अनेकवचन, कर्मणिप्रयोग, कर्ता 'तुम्हीं', कर्म 'असे.'

( १५ ) त्याने तो रोगी पहिल्यानें बरा **केला** व मग त्या दुसऱ्या रोग्यासही बरें **केलें**.

१ **केला** :—प्रातिपदिक ' करतो ' सकर्मक क्रियापद, भूतकाळी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, कर्मणिप्रयोग, कर्ता ' त्याने ', कर्म ' रोगी '

२ **केलें** :—प्रातिपदिक ' करतो '. सकर्मक क्रियापद, भूतकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, सकर्मक भावेप्रयोग, कर्ता ' त्याने ', कर्म ' रोग्यास '.

**११ क्रियाविशेषण प्रातिपदिक :**—असल्यास लिंग व वचन सांगून ज्या क्रियेचे ते विशेषण ती क्रिया सांगावी. विशेषणाचे विशेषण, किंवा क्रियाविशेषणाचे विशेषण ते क्रियाविशेषण ही गोष्ट ध्यानांत ठेवावी. अर्थात् क्रियेविशेषण क्रियेचेच पण ते विशेषणाच्या किंवा अन्य क्रियाविशेषणाच्या द्वारे असे सागावे.

**१२ क्रियाविशेषण प्रातिपदिकाचा स्फोट :**—क्रियाविशेषण प्रातिपदिकाच्या स्फोटाची कांही उदाहरणें पुढे दिली आहेत :—

( १ ) हे चित्र मला **अतिशय चांगलें** दिसते तेंच तुम्ही **पसंत** करा

१ **अतिशय** :—' अतिशय ' क्रियाविशेषण दिसणे या क्रियेचें. ' चागले ' या क्रियाविशेषणाच्या द्वारें.

२ **चांगलें** :—प्रातिपदिक ' चागला '. क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, एकवचनी, ' दिसणें ' या क्रियेचे

३ **पसंत** :—प्रातिपदिक ' पसत '. क्रियाविशेषण, ' करणें ' या क्रियेचें पूरक.

( २ ) ती दोरी **बरीच आखुड** होती. तिची लाबी **अवघी पांच हात** भरली.

१ **बरीच** :—प्रातिपदिक ' बरा '. क्रियाविशेषण, ' आखुड ' या क्रियाविशेषणाच्या द्वारे ' होणें ' या क्रियेचें.

२ **आखुड** :—प्रातिपदिक ' आखुड '. क्रियाविशेषण, ' असणें ' या क्रियेचे.

३ **अवघी** :—प्रातिपदिक ' अवघा '. क्रियाविशेषण, ' पांच हात ' ह्या क्रियाविशेषणाच्या द्वारें ' भरणे ' या क्रियेचे

४ **पांच हात** :—प्रातिपदिक ' पाच हात '. सयुक्त क्रियाविशेषण, ' भरणे ' या क्रियेचे.

( ३ ) देऊळ बांधण्याचें कांम **पांच वर्षें चालू** होते नतर ते **पुरें** झाले.

१ **पांच वर्षें** :—प्रातिपदिक ' पांच वर्ष '. सयुक्त क्रियाविशेषण, ' असणे ' या क्रियेचें.

२ **चालू** .—प्रातिपदिक ' चालू '. क्रियाविशेषण, ' करणे ' या क्रियेचे पूरक

३ **पुरें**—प्रातिपदिक ' पुरे '. क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, एकवचनी, 'होते ' या क्रियेचे पूरक.

( ४ ) **बरें सत्य** बोला, **यथातथ्य** चाला, **बहू** मानिती लोक येणे तुम्हाला.

१ **बरें** .—प्रातिपदिक ' बरें '. क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, एकवचनी, ' बोलणे ' या क्रियेचे

२ **सत्य** ( खरं ) —प्रातिपदिक ' सत्य '. क्रियाविशेषण, ' बोलणे ' या क्रियेचे

३ **यथातथ्य** —प्रातिपदिक ' यथातथ्य '. सयुक्त क्रियाविशेषण अव्यय, क्रियाविशेषण, ' चालणे ' या क्रियेचें.

**१३ क्रियाविशेषण अव्यय प्रातिपदिक** :—प्रातिपदिक सांगून स्थळ, काळ, कारण, रीति इ. प्रकार सागावे. क्रियाविशेषणाप्रमाणेच क्रियाविशेषण अव्ययाचा ' क्रिये'शी असलेला संबध सागावा. ज्याना पूर्वी ' वाक्यालंकारार्थक क्रियाविशेषण अव्यये म्हणून सागत असत ती आतां आम्ही ' केवलप्रयोगी ' या प्रकारांत घातली आहेत. शब्दयोगी लागून झालेली सयुक्त क्रियाविशेषणे त्याच्या जात्यनुसार सांगावी. जसे :— घरावर, स्थळवाचक इ.

**१४ क्रियाविशेषण अव्यय प्रातिपदिकाचा पदपरिस्फोट** :— या स्फोटाची उदाहरणे पुढे दिली आहेत.

( १ ) तो **रस्त्यावरून धांवतधांवत तेथें** गेला पण **उशीरां पोहोंचल्यामुळें दुधाशिवाय** त्याला **परत** यावे लागलें

१ **रस्त्यावरून** .—प्रातिपदिक ' रस्त्यावरून '. सयुक्त स्थळवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' जाणें ' या क्रियेचे

२ **धांवत धांवत** —प्रातिपदिक ' धावत धावत ' रीतिवाचक सयुक्त क्रियाविशेषण अव्यय, जाणे या क्रियेचे

३ **तेथें** :—प्रातिपदिक ' तेथें '. स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' जाणें ' या क्रियेचे

४ **उशीरां** :—प्रातिपदिक ' उशीरां '. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय

५ **पोंहचल्यामुळें** :—प्रातिपदिक ' पोहचल्यामुळे ' सयुक्त कारणबोधक क्रियाविशेषण अव्यय ' यावे लागणे ' या क्रियेच

६ **दुधाशिवाय** .—प्रातिपदिक ' दुधाशिवाय '. सयुक्त रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' यावे लागणे ' या क्रियेचें.

**७ परत** :—प्रातिपदिक ' परत '. रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' यात्रें लागणें ' या क्रियेचे.

( २ ) तो **रात्रीं रस्त्यानें जात असतां** ठेच **लागून** पडला. व त्यामुळें त्याला **लवकर** येतां आले नाही.

**१ रात्रीं** :—प्रातिपदिक ' रात्रों '. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' जात असणें ' या क्रियेचें

**२ रस्त्यानें** :—प्रातिपदिक ' रस्त्याने ' स्थळवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**३ जात असतां** —प्रातिपदिक ' जात असता '. अपूर्ण कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' पडणे ' या क्रियेचे.

**४ लागून** :—प्रातिपदिक ' लागून '. पूर्वकालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' पडणें ' या क्रियेचें

**५ लवकर** :—प्रातिपदिक ' लवकर '. रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' येणे ' या क्रियेचें

( ३ ) शाळेसि **जातांना** मुलानीं वाटेत तमाशा **पहात** राहू नये

**१ जातांना** —प्रातिपदिक ' जाताना '. अपूर्ण कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' राहणें ' या क्रियेचे.

**२ पहात** – प्रातिपदिक ' पहात ' अपूर्ण कालवाचक क्रियाविशेपण अव्यय.

**१५ उभयान्वयी अव्यय प्रातिपदिक** :—प्रातिपदिक सागून नंतर समुच्चयबोधक, कारणबोधक, विकल्पबोधक, न्यूनत्वबोधक, संकेतबोधक इत्यादि प्रकार सांगावे. संकेतबोधकाचे पूर्वयोगी व उत्तरयोगी सांगावे. कोणते शब्द किंवा वाक्ये जोडलीं ते सांगावे. ' जर–तर ' इ.

**१६ उभयान्वयी प्रातिपदिकाचा पदपरिस्फोट** :—उभयान्वयी प्रातिपदिकाच्या पदपरिस्फोटाची उदाहरणें पुढे दिली आहेत :—

( १ ) रामा **किंवा** गोविंदा इकडे येणार **म्हणून** मी इकडे आलो होतो **पण** त्यापैकीं कोणीही आला नाही. **तेव्हां** मी परत जातो **कारण** मला घरी जेवावयास गेले पाहिजे **व** तेथून लवकर शाळेत गेले पाहिजे. **जर** कोणी आला **तर** त्याला शाळेत पाटवून द्या.

**१ किंवा** :—प्रातिपदिक ' किंवा ' विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय, ' रामा ' गोविंदा हे शब्द विकल्पाने जोडते

**२ म्हणून** :—प्रातिपदिक ' म्हणून ' कारणबोधक उभयान्वयी अव्यय, ' रामा–येणार ', ' मी–आलो ' हीं दोन वाक्ये जोडते.

**४ पण** :—प्रातिपदिक ' पण '. न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्यय, ' त्यांपैकीं नाहीं ', ' मी जातो ' हीं दोन वाक्यें जोडते.

**५ कारण** :—प्रातिपदिक ' कारण '. कारणबोधक उभयान्वयी अव्यय, ' मी–जातो ' व ' मला–पाहिजे ' हीं दोन वाक्यें जोडते.

**६ व** :—प्रातिपदिक ' व '. उमुच्चयबोधक क्रियाविशेषण अव्यय.

**७ जर** .—प्रातिपदिक ' जर '. संकेतबोधक उभयान्वयी अव्यय, ' कोणी आला ', ' ( तुम्ही ) या ' ही दोन वाक्ये जोडते पुढील ' तर ' या उभयान्वयीचे ' पूर्वयोगी ' वाक्याच्या आरभीं येतें

**८ तर** :—प्रातिपदिक ' तर ' संकतबोधक उभयान्वयी अव्यय, ' कोण आला ' ' ( तुम्ही ) या ' हीं दोन वाक्ये जोडते आरभींच्या ' जर ' या उभयान्वयी अव्ययाचे ' प्रतियोगी '.

१७ केवलप्रयोगी प्रातिपदिक :— प्रातिपदिक सांगून आनंद, दु:ख, आश्चर्य इत्यादि विकारांनुसार प्रकार सांगावे. पूर्वी वाक्यालंकारार्थक, वाक्यपूरक इत्यादि क्रियाविशेषण अव्ययाचे म्हणून प्रकार सांगत, आतां ही ' केवलप्रयोगी ' प्रातिपदिके म्हणून सांगावी.

१८ केवलप्रयोगी प्रातिपदिकांचा पदपरिस्फोट :—केवलप्रयोगी प्रातिपदिकांचीं कांही उदाहरणे पुढें दिली आहेत :-

१ **पाहा** ! आता **नायडू** खेळावयास आला **छान** ! कसा टोला हाणला त्याने ! **शाबास** ! नायडू ! **अबब** ! किती उच चेंडू उडविला यानें ! **अरेरे**, झेलचित होणार हा आता ! **ओहो** ! सुटला झेल !

**१ पाहा** .—प्रातिपदिक ' पाहा '. अवधानवेधक केवलप्रयोगी अव्यय.

**२ छान** :—प्रातिपदिक ' छान '. पसतीप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

**३ शाबास** :—प्रातिपदिक ' शाबास '. तारीफप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

**४ अबब** :—प्रातिपदिक ' अबब '. आश्चर्यप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

**५ अरेरे** :—प्रातिपदिक ' अरेरे '. खेदप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय

**६ ओहो** :—प्रातिपदिक ' ओहो ' आनदप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

( २ ) ( अ ) पोर **बेटी** भारी खोल ! ( ब ) जा **परते**, मला **किनई** तुमचा फार राग आला आहे. ( क ) धरू ये सुखें **चित्त पैं** जाण त्याचें ॥

**१ बेटी** :—प्रातिपदिक ' बेटी '. वाक्यलकारार्थक केवलप्रयोगी.

**२ किनई** :—प्रातिपदिक ' किनई '. वाक्यपूरक केवलप्रयोगी अव्यय.

**३ परते** :—प्रातिपदिक वाक्यालंकारार्थक केवलप्रयोगी अव्यय.

**४ पैं** :—प्रातिपदिक 'पे'. वाक्यपूरक केवलप्रयोगी अव्यय.

**१९ बिकट व नमुन्याचा परिस्फोट** :—पुढे कांही विशेष भानगडीची वाक्ये घेऊन त्यांचा पदशः परिस्फोट केला आहे.

**( १ ) असें बोलणें म्हणजे आपला गुन्हा आपणच कबूल करण्यासारखं आहे.**

**१ असें** —प्रातिपदिक 'असे' विशेषणात्मक सर्वनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपी, एकवचन, 'बोलणें' या क्रियेचें कर्म

**२ बोलणें** —प्रातिपदिक 'बोलणे' सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपी, एकवचन, 'म्हणणें' या क्रियेचा कर्ता

**३ म्हणजे** —प्रातिपदिक 'म्हणजे' ( म्हणिजे ) अस्वाधीनमुखी गौण क्रियापद.

**४ आपला** :—प्रातिपदिक 'आपला'. गुणविशेषण, विशेष्य 'गुन्हा'

**५ गुन्हा** :—प्रातिपदिक 'गुन्हा' सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, कर्म करणे या क्रियेचे.

**६ आपणच** :—प्रातिपदिक 'आपणच'. प्रथम पुरुषवाचक सर्वनाम, प्रथमरूपी, कर्ता 'करणें' या क्रियेचा

**७ कबूल** :—प्रातिपदिक 'कबूल'. क्रियाविशेषण, 'करणे' या क्रियेचे पूरक.

**८ करण्यासारखें** :—प्रातिपदिक 'करण्यासारखा'. सयुक्त क्रियाविशेषण, 'असणे' या क्रियेचे पूरक.

**९ आहे** --प्रातिपदिक 'आहे'. गौण क्रियापद, वर्तमानकाळीं, तृतीय पुरुषीं.

**( २ ) आज फारच उकडतें. पाऊस पडेलसें दिसतें.**

**१ आज** —प्रातिपदिक 'आज'. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'उकडणे' या क्रियचे

**२ फारच** —प्रातिपदिक 'फारच' क्रियाविशेषण, 'उकडणे' या क्रियेचे

**३ उकडतें** :—प्रातिपदिक 'उकडते' अकर्तृक क्रियापद, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषीं, एकवचनीं, 'अकर्तृक' भावेप्रयोग

**४ पाऊस** .--प्रातिपदिक 'पदार्थवाचक नाम' पुल्लिंगी, एकवचन, अकर्तृक.

**५ पडेलसें** '--प्रातिपदिक 'पडेलसें'. सयुक्त रीतिवाचक क्रियाविशेषण, 'दिसणे' या क्रियेचें

**६ दिसतें** :--प्रातिपदिक 'दिसतो' वर्तमानकाळी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्तृक भावेप्रयोग.

**( ३ ) शाळेसी जातांना मुलांनीं वाटेंत तमाशा पहात राहूं नये.**

**१ शाळेसी** :—प्रातिपदिक 'शाळा' सामान्यनाम, स्त्रीलिंगी, चतुर्थीचे एकवचन, सम्प्रदानकारक.

**२ जातांना** —प्रातिपदिक 'जातांना' वर्तमानकालवाचक क्रियाविशेषण अव्यय

**३ मुलांनी** :—प्रातिपदिक 'मूल'. सामान्यनाम, नपुसकलिंगी, तृतीयेचे अनेकवचन, कर्तृकारक

**४ वाटेंत** —प्रातिपदिक 'वाट'. सामान्यनाम, स्त्रीलिंगी, सप्तमीचे एकवचन, अधिकरणकारक

**५ तमाशा** .—प्रातिपदिक 'तमाशा' सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, एकवचनी, 'कर्म' पाहणे या क्रियेचे.

**६ पहात** —प्रातिपदिक 'पहात' वर्तमानकालवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**७ राहूं नये** —प्रातिपदिक 'राहतो' विध्यर्थी, अकरणरूपी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, अकर्मक भावेप्रयोग

**( ४ ) तिच्यानें राहवेना. तिनें त्याला जेवूं घातलें व मग जाऊं दिलें न जाणों भुकेनेंच त्याचा प्राण जावयाचा.**

**१ तिच्यानें** —प्रातिपदिक 'तिच्यानें' क्रियाविशेषण अव्यय, 'राहवणें या क्रियेचे.

**२ राहवेना** —प्रातिपदिक 'राहवते' अकर्तृक शक्यार्थी क्रियापद, भूतकाळी, अकरणरूपीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्तृक भावेप्रयोग

**३ तिनें** —प्रातिपदिक 'ती' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, स्त्रीलिंगी, तृतीयेचे, एकवचन, कर्तृकारक

**४ त्याला** —प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुलिंगी, द्वितीयेचे एकवचन, कृतिकारक

**५ जेवूं घातलें** —प्रातिपदिक 'जेवू घालतो' सकर्मक संयुक्त क्रियापद, भूतकाळी, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन सकर्मक भावेप्रयोग कर्ता 'तिने', कर्म 'त्याला.'

**६ व** —प्रातिपदिक 'व' 'समुच्चयबोधक' उभयान्वयी अव्यय, 'तिने घातले' व '(तिने)-दिले' हीं दोन वाक्ये जोडतें

**७ मग** :—प्रातिपदिक 'मग' कालवाचक क्रियाविशेषण अव्यय 'जाऊ देणे' या क्रियेचे

**८ जाऊं दिलें** —प्रातिपदिक 'जाऊ देतो'. सकर्मक क्रियापद, भूतकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, सकर्मक भावेप्रयोग, 'तिने' अध्याहृत कर्ता, कर्म 'त्याला'

**९ न जाणो**.—प्रातिपदिक ' न जाणो '. सदेहद्योतक केवलप्रयोगी अव्यय.

**१० भुकेनें** —प्रातिपदिक ' भूक ' भाववाचकनाम, पुलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, ' करण ' कारक.

**११ प्राण** —प्रातिपदिक ' प्राण '. सामान्यनाम, पुलिंगी, प्रथमरूपीं, अनेकवचन, कर्ता जाणे या ' क्रियेचा '

**१२ जावयाचा** —प्रातिपदिक ' जावयाचा '. अकर्मक प्राचारिक गौण क्रियापद.

**( ५ ) भरत जवळी नाहीं राम जातां वनासी, भरतजननी धाडी कानना राघवासी.**

**१ भरत** —प्रातिपदिक ' भरत ' विशेषनाम, पुलिंगी, प्रथमरूपीं, कर्ता 'नसणें' या क्रियेचा.

**२ जवळी** —प्रातिपदिक ' जवळ ', स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**३ नाहीं** —प्रातिपदिक ' नाहीं ' गौण क्रियापद, अकरणरूपीं, वर्तमानकाळी, तृतीय पुरुषाचें एकवचन. ( येथे अर्थाप्रमाणे भूतकाळ सागितला आहे )

**४ राम**.—प्रातिपदिक ' राम '. विशेषनाम, पुल्लिगी, प्रथमरूपीं, एकवचन, ' जाणें ' या क्रियेचा कर्ता

**५ जातां** —प्रातिपदिक ' जातां '

**६ भरतजननी** —प्रातिपदिक 'भरतजननी' विशेषनाम, मूळस्वरूपीं, एकवचन कर्ता ' धाडणे ' या क्रियेचा. वर्तमानकाळी, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, कर्तरीप्रयोग, ' भरतजननी ' कर्ता, ' राघवासी ' कर्म.

**७ धाडी** —प्रातिपदिक धाडी ( धाडिले ).

**८ कानना**.—प्रातिपदिक 'कानन'. सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रत्ययाभाव, चतुर्थीचे एकवचन, सप्रदानकारक

**९ राघवासी** —प्रातिपदिक ' राघव ' विशेषनाम, पुलिंगी, द्वितियेचे एकवचन, कृतिकारक

**( ६ ) आपला धंदा सोडावा लागतो, असें पाहून, त्यानें ती नोकरी सोडून दिली व तो धंद्याच्याच मागें लागला.**

**१ आपला** :—प्रातिपदिक ' आपला '. गुणविशेषण, पुल्लिंगी, विशेष्य धदा.

**२ धंदा**.—प्रातिपदिक ' धदा ' सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमस्वरूपी एकवचन, कर्ता ' सोडावा लागणें ' या क्रियेचा

**३ सोडावा लागतो** '—प्रातिपदिक ' सोडावा लागतो '. सुयुक्त क्रियापद, वर्तमानकाळीं, पुल्लिगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता ' धदा '.

**४ असें** :—प्रातिपदिक 'असा' दर्शक सर्वनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्म 'पाहणें' या क्रियेचे

**५ पाहून** :—प्रातिपदिक 'पाहून' पूर्वकालवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'सोडून देणें' या क्रियेचे.

**६ त्यानें** :—प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, तृतीयेचे एकवचन, कर्तृकारक.

**७ ती** --प्रातिपदिक 'तो' सार्वनामिक गुणविशेषण, विशेष्य 'नोकरी'

**८ नोकरी** :—प्रातिपदिक 'नोकरी'. सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्म 'सोडून देणे' या 'क्रियेचें

**९ सोडून दिली** —प्रातिपादिक 'सोडून देतो' सकर्मक सयुक्त क्रियापद, भूतकाळीं, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, कर्मणिप्रयोग, कर्ता 'त्याने', कर्म 'नोकरी'

**१० व** :—प्रातिपदिक 'व' समुच्चयबोधक उभयान्वयी अव्यय 'आपला धदा सोडून दिली' व 'तो...लागला'.

**११ तो** :—प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्ता 'लागणे' या क्रियेचा

**१२ धंद्याच्या मागें** —प्रातिपदिक 'धद्यान्या मागे' रीतिवाचक सयुक्त क्रियाविशेषण अव्यय, 'लागणें' या क्रियेचे

**१३ लागला** —प्रातिपदिक 'लागतो' अकर्मक क्रियापद, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन. अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता 'तो'.

**(७) त्याला बक्षीस मिळवावयाचें होतें, म्हणूनच त्याची ही सारी धडपड चाललेली होती.**

**१ त्याला** :—प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे एकवचन, सप्रदानकारक

**२ बक्षीस** —प्रातिपदिक 'बक्षीस'. सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन कर्ता 'होणे' या क्रियेचा

**३ मिळवावयाचें** :—प्रातिपदिक 'मिळवावयाचे'. क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, 'होणे' या क्रियेचे पूरक.

**४ होतें** :—प्रातिपदिक 'आहे' अकर्मक क्रियापद, भूतकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन कर्ता 'बक्षीस', अकर्मक कर्तरीप्रयोग.

**५ म्हणूनच** :—प्रातिपदिक 'म्हणून' कारणबोधक उभयान्वयी अव्यय. 'त्याला...होते' व 'त्याची ही...होती.' हीं दोन वाक्ये जोडते

**६ त्याची** :—प्रातिपदिक 'त्याचा'. गुणविशेषण, विशेष्य 'धडपड.'

**७ ही** :—प्रातिपदिक ' हा ' सर्वनामात्मक गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचन, विशेष्य ' धडपड '

**८ सारी** :—प्रातिपदिक ' सारा '. गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचनीं, विशेष्य ' धडपड '

**९ धडपड** :—प्रातिपदिक ' धडपड '. भाववाचकनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन. कर्ता ' चालली असणें ' या क्रियेचा

**१० चालली होती** —प्रातिपदिक ' चालली आहे ' अकर्मक संयुक्त क्रियापद, पूर्णभूतकाळीं, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता ' धडपड '.

**(८) गेल्याचा शोक वृथा, न करावा. वित्त सर्व जायाचें, वित्ताची काय कथा ? शाश्वत टिकणें नसेच कायाचें ॥ १ ॥**

**१ गेल्याचा** —प्रातिपदिक ' गेल्याचा ' गुणविशेपण, विशेष्य ' शोक '.

**२ शोक** —प्रातिपदिक ' शोक ' भाववाचकनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं एकवचन ' असणे ' या ' क्रियेचा ' ( अध्याहृत ) कर्ता.

**३ वृथा** —प्रातिपदिक ' वृथा ' क्रियाविशेषण, ' असणें ' या अध्याहृत क्रियेचे.

**४ न करावा** —प्रातिपदिक ' करतो ' सकर्मक क्रियापद, विध्यर्थी, अकरणरूपीं, तृतीय पुरुषाचे एकवचन. कर्मणि प्रयोग. कर्म ' शोक '

**५ वित्त** :—प्रातिपदिक ' वित्त '. पदार्थवाचकनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं एकवचन. कर्ता ' जाणें ' या क्रियेचा.

**६ सर्व** :—प्रातिपदिक ' सर्व ' गुणविशेषण, विशेष्य ' वित्त '.

**७ जायाचें** —प्रातिपदिक ' जायाचे ' क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, एकवचनीं, ' असणें ' या अध्याहृत क्रियेचे

**८ वित्ताची** :—प्रातिपदिक ' वित्ताची '. गुणविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचनीं, विशेष्य ' कथा '.

**९ काय** :—प्रातिपदिक ' काय '. सर्वनामात्मक गुणविशेषण, विशेष्य ' कथा '.

**१० कथा** :—प्रातिपदिक ' कथा ' सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपीं एकवचन. ' असणे ' या अध्याहृत क्रियेचा कर्ता

**११ शाश्वत** :—प्रातिपदिक ' शाश्वत '. क्रियाविशेषण, ' असणे ' या क्रियेचें.

**१२ टिकणें** :—प्रातिपदिक ' टिकणे ' भाववाचकनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन कर्ता ' नसणें ' या क्रियेचा.

**१३ नसेचि** —प्रातिपदिक ' नसतो '. रीतिवर्तमानकाळीं, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता ' टिकणें '.

**१४ कायाचें** :—प्रातिपदिक ' कायाचा '. गुणविशेषण, विशेष्य ' टिकणें '.

**(९) त्यावेळीं त्यांचा ग्रंथ लिहून झाला होता, पण पैशाच्या अभावीं त्यांना तो प्रसिद्ध करतां आला नाहीं.**

**१ त्यावेळीं** :—प्रातिपदिक 'त्यावेळी'. सयुक्तकालवाचक क्रियाविशेषण अव्यय.

**२ त्यांचा** —प्रातिपदिक 'त्याचा'. गुणविशेषण, पुल्लिंगी एकवचन.

**३ ग्रंथ** :—प्रातिपदिक 'ग्रथ'. सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं एकवचन. कर्ता 'लिहून होणें' या क्रियेचा

**४ लिहून झाला होता** .—प्रातिपदिक 'लिहून झाला आहे' प्राचारिक अकर्मक सयुक्त क्रियापद, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग. ग्रथ हा 'कर्ता'.

**५ पण** :—प्रातिपदिक 'पण'. पक्षांतरबोधक उभयान्वयी अव्यय. 'त्यावेळीं होता व पैशाच्या...आला नाहीं.' हीं दोन वाक्ये जोडतो.

**६ पैशाच्या** :—प्रातिपदिक 'पैशाचा'. गुणविशेषण, विशेष्य 'अभावीं'.

**७ अभावीं** —प्रातिपदिक 'अभाव'. भाववाचकनाम, पुल्लिंगी, सप्तमीचे एकवचन, अधिकरणकारक.

**८ त्यांना** —प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे अनेकवचन, सप्रदानकारक.

**९ तो** —प्रातिपदिक 'तो' तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं एकवचन, कर्ता 'करता येणे' या क्रियेचा

**१० प्रसिद्ध** —प्रातिपदिक 'प्रसिद्ध'. प्राचारिक क्रियाविशेषण. करणें या क्रियेचे पूरक

**११ करतां आला नाहीं** :—प्रातिपदिक 'करता येतो'. अकर्मक अकरणरूपीं शक्यभेदी क्रियापद, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें एकवचन कर्तरीप्रयोग, कर्ता 'तो'.

**(१०) त्वां काय कर्म करिजे लघुलेकरानें**

**१ त्वां** —प्रातिपदिक 'तू' द्वितीय पुरुषवाचक सर्वनाम, नपुसकलिंगी तृतीयेचे एकवचन, कर्ता 'करणे' या क्रियेचा

**२ काय** .—प्रातिपदिक 'काय'. सर्वनामात्मक गुणविशेषण, विशेष्य 'कर्म'.

**३ कर्म** :—प्रातिपदिक 'कर्म'. सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्ता 'करणे' या क्रियेचा.

**४ करिजे** —प्रातिपदिक 'करिजे'. अकर्मक सयुक्त गौण क्रियापद, अस्वाधीन मुखी, कर्तरीप्रयोग. कर्ता 'कर्म'.

**५ लघुलेकरानें** :—प्रातिपदिक 'लघुलेकरू'. सयुक्त सामान्यनाम, नपुंसकलिंगी, तृतियेचें एकवचन कर्तृकारक.

**( ११ ) त्याच्यानें तेवढी रक्कम देववली नाही. मालक किंमत थोडी कमी करता तर तें घर त्याला मिळतें.**

**१ त्याच्यानें** :—प्रातिपदिक 'त्याच्याने'. क्रियाविशेषण 'देववणे' या क्रियेचें

**२ तेवढी** :—प्रातिपदिक 'तेवढा'. गुणविशेषण विशेष्य 'रक्कम'

**३ रक्कम** :—प्रातिपदिक 'रक्कम'. सामान्यनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपी, एकवचन, कर्ता 'देववणे' या क्रियेचा.

**४ देववली नाही** :—प्रातिपदिक 'देववतो' अकर्मक अकरणरूपी शक्यभेदी क्रियापद, भूतकाळीं, स्त्रीलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, कर्तरीप्रयोग कर्ता 'रक्कम'

**५ मालक** :—प्रातिपदिक 'मालक'. सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्ता 'करणे' या क्रियेचा.

**६ किंमत** :—प्रातिपदिक 'किंमत'. पदार्थवाचकनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपी, एकवचन, कर्म 'करणे' या क्रियेचे

**७ थोडा** :—प्रातिपदिक 'थोडा'. क्रियाविशेषण, स्त्रीलिंगी, एकवचनीं, कमी या क्रियाविशेषणाच्या द्वारें 'करणे' या क्रियेचे

**८ कमी** :—प्रातिपदिक 'कमी'. क्रियाविशेषण, पूरक 'करणे' या क्रियेचें

**९ करता** :—प्रातिपदिक 'करतो' सकर्मक क्रियापद, संकेतार्थी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग, कर्ता 'मालक', कर्म 'किंमत'

**१० तरी** :—प्रातिपदिक 'तर' संकेतबोधक उभयान्वयी अव्यय. 'मालक... करता' व 'तें. .मिळतें' ही दोन वाक्यें जोडतें

**११ तें** :—प्रातिपदिक 'तो' सार्वनामिक गुणविशेषण, विशेष्य 'घर'.

**१२ घर** :—प्रातिपदिक 'घर'. सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्ता 'मिळणे' या क्रियेचा

**१३ त्याला** :—प्रातिपदिक 'तो'. तृतीय पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे एकवचन, संप्रदानकारक.

**१४ मिळतें** :—प्रातिपदिक 'मिळता'. अकर्मक क्रियापद, नपुसकलिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता 'घर'

**( १२ ) तूं नित्य थोडे थोडे श्रम करीत जा. म्हणजे आपोआपच तुझी प्रकृति सुधरेल.**

**१ तूं** :—प्रातिपदिक 'तू' द्वितिय पुरुषवाचक सर्वनाम, प्रथमरूपीं एकवचन, कर्ता 'करणे' या क्रियेचा

**२ नित्य** :—प्रातिपदिक 'नित्य'. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'करणे' या क्रियेचे.

**३ थोडे थोडे** —प्रातिपदिक 'थोडे थोडे'. सयुक्त गुणविशेषण विशेष्य 'श्रम'.

**४ श्रम** :—प्रातिपदिक 'श्रम' सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, अनेकवचन, कर्म 'करणें' या क्रियेचे

**५ करीत जा** —प्रातिपदिक 'करतो' सकर्मक सयुक्त क्रियापद, रीति आज्ञार्थी द्वितिय पुरुषाचें एकवचन, सकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता 'तू', कर्म 'श्रम'.

**६ म्हणजे** :—प्रातिपदिक 'म्हणजे' परिणामबोधक उभयान्वयी अव्यय. 'तू करीत जा' व 'आपोआपच.. .. सुधरेल' हीं दोन वाक्यें जोडते

**७ आपोआपच** —प्रातिपदिक 'आपोआप' रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय, 'सुधारणें' या क्रियेचे

**८ तुझी** :—प्रातिपदिक 'तुझा' सार्वनामिक गुणविशेषण विशेष्य 'प्रकृति'.

**९ प्रकृति** :—प्रातिपदिक 'प्रकृति'. भाववाचकनाम, स्त्रीलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन, कर्ता 'सुधारणे' या क्रियेचा.

**१० सुधरेल** :—प्रातिपदिक 'सुधरतो'. अकर्मक क्रियापद, पुल्लिंगी, भविष्य-काळी, तृतीय पुरुषाचें एकवचन

---

# अध्याय तिसरा.

## मिश्र परिस्फोट.

**१ उपोद्घात** :—मिश्र परिस्फोट हा तत्त्वतः परिस्फोटाचा स्वतंत्र असा प्रकार नाहीं. यांत वाक्यांतील पदांचा शब्ददृष्ट्या व पददृष्ट्या परिस्फोट सांगावयाचा असतो. अर्थात् तो वाक्यातील प्रत्येक पदाचा करावयाचा नसतो. शब्दासंबंधी व पदासंबंधी माहिती सांगावयाची तीही ठळक ठळक माहितीच सांगावयाची. येथेही विद्यार्थ्यास आपली स्वतंत्र बुद्धि चालविण्यास पूर्णपणे वाव असून आम्ही केवळ मार्गदर्शनार्थ हा भाग लिहिला आहे.

**२ बिकट मिश्र परिस्फोट** :—पुढे कांहीं वाक्ये घेऊन त्यांतील **अधोरेखित** भागांचा शब्दपदपरिस्फोट दाखविला आहे. पहिल्याने ठळक शब्दविषयक म्हणजे अन्तर्घटना व बाह्यघटनाविषयक माहिती सांगावयाची व नंतर पदविषयक अगदी जरूर ती माहिती द्यावयाची असा क्रम ठेवला आहे.

**( १ ) हिंदु कायद्यासंबंधीं तेलंग हे तज्ज्ञ असल्यामुळें त्याचें त्याविषयींचे निर्णय बाकीच्या युरोपियन जज्जांस मान्य करावे लागत.**

**१ हिंदु कायद्यासंबंधीं** :—सयुक्त शब्द ( हिंदूचा कायदा ) तद्धित प्रत्यय हिंदु कायद्यासबधीं. सबधीं याच्या योगाने सामान्यरूप. हें सयुक्त क्रियाविशेषण अव्यय, ‘ असणें ’ या क्रियेचें.

**२ तज्ज्ञ** :—घटना. तत् + ज्ञ येथे ‘ त् ’ आणि ‘ ज्ञ ’ यांचा सधि होताना ज्ञ मध्ये असलेल्या ज् मुळे मागील ‘ त् ’ चा प्रथम ‘ द् ’ होऊन नतर द् चा ज् होतो पण ‘ ज्ञ ’ मध्ये कांहींच फेरफार होत नाहीं यामुळे ‘ ज्ञ ’ हा एक स्वतत्र वर्ण आहे असें दिसून येते. हे क्रियाविशेषण, असणे या क्रियेचे

**३ असल्यामुळें** :—सयुक्त शब्द. ‘ मुळे ’ या शब्दयोगीच्या योगाने सामान्यरूप. क्रियाविशेषण ‘ करावें लागणे ’ या क्रियेचें

**४ मान्य** :—तत्सम मराठी शब्द, क्रियाविशेषण, करावे लागणें या क्रियेचे पूरक.

**५ करावे लागत** :—प्राचारिक सयुक्त शब्द अकर्मक क्रियापद, पुल्लिंगी, रीतिभूतकाळीं, तृतीय पुरुषाचें अनेकवचन. अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता ‘ निर्णय.’

**( २ ) हें पांखरूं मजसि येईल काय कामा ऐसें नृपा न वद पूरित-लोककामा**

**१ पांखरूं** —' उकारान्त ' नपुसकलिंगी शब्द म्हणून सामान्यरूप ' आ ' व अनेकवचन ' ऐ ' सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं, एकवचन कर्ता 'येणें' या क्रियेचा

**२ मजसि** .—' मी ' या सर्वनाम शब्दाचा विभक्तिपूर्व फेरफार ' मज. ' पुढे ' सि ' हें ' स ' या चतुर्थीच्या प्रत्ययाचे जुने रूप ' मी ' पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, चतुर्थीचे एकवचन ' सम्प्रदानकारक '

**३ कामा** —प्रत्ययाभाव विभक्तीमुळे सामान्यरूप ' काम ' सामान्यनाम, नपुसकलिंगी, प्रत्ययाभाव चतुर्थीचे एकवचन ' सम्प्रदानकारक '

**४ न वद** —' वद तत्सम मराठी शब्द. ' न ' आणि ' वद ' हे दोन्ही शब्द संस्कृतांतून जसेच्या तसेच घेतले आहेत ते तसे कवितेतच येतील गद्यात ' बोलू नको ' असेच बोलावयाचे किंवा लिहावयाचे अकरणरूपीं, सकर्मक क्रियापद, आज्ञार्थी, द्वितिय पुरुषाचें एकवचन

**५ पूरितलोककामा** —संयुक्त बहुव्रीहि सामासिक शब्द विग्रह–लोककाम–लोकाचे काम ( संयुक्त शब्द ) पूरित आहेत, लोककाम ज्याने ( बहुव्रीहि ) गुण-विशेषण, विशेष्य ' नृपा ' संस्कृताप्रमाणे विशेष्याची संबोधन विभक्ति, विशेषणाला

**( ३ ) आपण मोठे शहाणे दिसतां मुकाट्यानें चालते व्हा. नाहीं तर योग्य तो मार्ग स्वीकारणें भाग पडेल.**

**१ आपण** :—सर्वनाम शब्द ' तू ' या अर्थी हेटाळणीच्या अर्थी, अनेक-वचनीं, द्वितिय पुरुषवाचक सर्वनाम, प्रथमरूपीं अनेकवचन. कर्ता ' दिसणे ' या क्रियेचा.

**२ मोठे** —प्रातिपदिक ' मोठा ' क्रियाविशेषण, पुल्लिंगी, अनेकवचन.

**३ शहाणे** —प्रातिपदिक ' शहाणा '. क्रियाविशेषण, पुल्लिंगी अनेकवचन ( उपरोधी ) ' दिसते ' या क्रियेचे

**४ दिसतां** —प्रातिपदिक 'दिसतो'. अकर्मक क्रियापद, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे अनेकवचन अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता आपण

**५ मुकाट्यानें** .—प्रातिपदिक ' मुकाट्याने ' क्रियाविशेषण अव्यय. ' चालता होणें ' या क्रियेचे.

**६ चालते** :—प्रातिपदिक ' चालता '. प्राचारिक क्रियाविशेषण, पुल्लिंगी अनेकवचन. होणे या क्रियेचे पूरक.

**( ४ ) बरें सत्य बोला यथातथ्य चाला, बहू मानिती लोक येणें तुम्हाला**

**१ बरें** .—प्रातिपदिक ' बरें '. क्रियाविशेषण, नपुसकलिंगी, ' बोलणें ' या क्रियेचे.

**२ सत्य** :—' सत्य ' तत्सम शब्द ( सत्य = खरें ) क्रियाविशेषण, ' बोलणें ' या ःयेचें.

**३ यथातथ्य** :—सयुक्त शब्द ( यथा + तथ्य ) ( अव्ययीभाव समास नव्हे ). ःयाविशेषण, ' चालणे ' या क्रियेचें

**४ बहु** —तत्सम शब्द क्रियाविशेषण, ' मानणें ' ह्या क्रियेचें

**५ मानिती** .—तत्सम शब्द. पुल्लिंगी, वर्तमानकाळीं, तृतीय पुरुषाचे अनेकवचन.

**६ लोक** .—तत्सम शब्द समुदायवाचक नाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं अनेकवचन.

**७ येणें** —तत्सम ( येन ). कारणबोधक क्रियाविशेषण अव्यय. ' मानणे ' ा क्रियेचे

**( ५ ) सर्वज्ञें म्हणितलें एथौनि जैसे किजैल, तैसें तुम्ही कराल.**

**१ सर्वज्ञें** :--सयुक्त शब्द ( सर्व + ज्ञ ) विशेषनाम, पुल्लिंगी तृतीयेचे एक-चन कर्तृकारक सर्वज्ञ हे **श्री चक्रधराचें** जवळजवळ दुसरें नावच आहे.

**२ म्हणितलें** —म्हण ( भण् ) धातूचे जुने रूप. सध्याचे रूप ' म्हटले ' तकाळीं, नपुसकलिंगी तृतीय पुरुषाचे एकवचन कर्मणीप्रयोग. कर्ता ' सर्वज्ञ ', कर्म एस ' अध्याहृत.

**३ एथौनी** .--सयुक्त शब्द ( एथ + ऊनी ) ' औ ' सधि महानुभाव भाषा-द्धतीप्रमाणे क्रियाविशेषण अव्यय, ' किजणें ' या क्रियेचे.

**४ किजैल** .--' कर ' धातूपासून, अस्वाधीनमुखी ' किज ' धातु, अकर्मक, स्वाधीनमुखी क्रियापद, भविष्यकाळीं, तृतीय पुरुषीं, एकवचन. अकर्मक कर्तरीप्रयोग. र्ता ' जैसे ' हें जुने मुखरूप.

**( ६ ) दुसरे दिवशी दत्ताजी शिंदे यांनीं कूच करून मजल-रमजल कुंजपुऱ्यानजीक येऊन, यमुना उतरून अलीकडे आले. ो गिलचा कुरुक्षेत्रावर येऊन पोंहचला.**

**१ दुसरे दिवशी** :—प्राचारिक सयुक्त शब्द, क्रियाविशेषण अव्यय, ' येणें ' ा क्रियेचे.

**२ दत्ताजी शिंदे** :—प्राचारिक सयुक्त शब्द, विशेषनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं कवचन. कर्ता ' येणे ' या क्रियेचा

**३ यांनी ( हे )** .--' यानीं ' ' हे ' याबद्दल चुकीचें रूप. प्रातिपदिक हा, र्शकसर्वनाम, पुल्लिंगी, बहुमानार्थी, प्रथमरूपीं अनेकवचन.

[ प्रचलित रूढीप्रमाणें चूक काय याविषयीं अशा प्रसगीं व्याकरण निर्णय देते. यांनीं कूच केलें. आणि ' असे वाक्य असतें, तर ' यानीं ' हें रूप बरोबर झालें. ासतें. ]

**४ तों** :—तावत्पासून तद्भव शब्द. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' येणें ' या क्रियेचे.

**५ गिलचा** :—फारसी तद्भव शब्द, समुदायवाचकनाम, पुल्लिंगी, प्रथमरूपीं, कर्ता ' पोह्चणे ' या क्रियेचा

**६ कुरुक्षेत्रावर** :—सयुक्त शब्द कुरु + क्षेत्र + वर. शब्दयोगीच्या योगाने सामान्यरूप, स्थळवाचक क्रियाविशेषण अव्यय, पोह्चणे या क्रियेचे

**(७) जैसें स्वप्नामाजीं देखिजे । तें स्वप्नीच साच आपजे । मग चेऊनियां पाहिजे । तंव कांहीच नाहीं ॥**

**१ स्वप्नामाजी** :—सयुक्त शब्द, स्थलवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' देखणें ' या क्रियेचें.

**२ देखिजे** :—गौण, अस्वाधीनमुखी क्रियापद, ( पाहावें ), अकर्तृक भावेप्रयोग

**३ साच** :—तद्भव शब्द ( सत्य – सच्च – साच ), क्रियाविशेषण, आपजे या क्रियेचें

**४ आपजे** :—तद्भव शब्द ( आप – मिळणें – मिळावें ), गौण अस्वाधीनमुखी क्रियापद, विध्यर्थी ' आप ' धातु मराठींत नाहीं तो सस्कृतांतून जशाचा तसा घेतला आहे.

**५ चेऊनिया** :—तद्भव शब्द ( चेवून –जागें होऊन ), पूर्वकालवाचक धातुसाधित अव्यय. ' पाहणें ' या क्रियेचें

**६ पाहिजे** :—' पाहत ' तद्भव ( पश्य ) अस्वाधीनमुखी रूप गौण, अकर्तृक क्रियापद. भावेप्रयोग.

**७ तंव** :—तद्भव ' तावत् ' पासून. कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' नसणें ' या क्रियेचें.

**८ कांहींच** :—सामान्य सर्वनाम, नपुसकलिंगी, प्रथमरूपीं एकवचन, कर्ता ' नसणें ' या क्रियेचा.

**(८) राजकारणी मनुष्य हा सामान्यपणें प्रामाणिक माणसाला कांहीं तरी विलक्षण जातीचा मनुष्य वाटतो.**

**१ राजकारणी** :—राज्यासबधीं कारण राजकारण. मध्यमपदलोपी समास पुढें तद्धित- इत् प्रत्यय, गुणविशेषण, विशेष्य ' मनुष्य '.

**२ सामान्यपणें** :—तद्धित प्रत्यय ' पणा 'च्या योगानें बनलेला, साधित शब्द. रीतिवाचक क्रियाविशेषण अव्यय, ' वाटणे ' या क्रियेचें.

**३ प्रामाणिक** :—तद्भव. ( प्रमाण + इक ), गुणविशेषण, विशेष्य 'मनुष्याला'.

**४ कांहीं तरी** :—सयुक्त शब्द, क्रियाविशेषण, ' विलक्षण ' या विशेषणाच्या द्वारें ' वाटणे ' या क्रियेचें.

**५ विलक्षण जातीचा** :—संयुक्त शब्द, गुणविशेषण, विशेष्य ‘ मनुष्य ’

**६ वाटतो** :—अकर्मक क्रियापद, पुल्लिंगी, रीतिवर्तमानकाळीं, तृतीय पुरुषाचें एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग कर्ता ‘ मनुष्य ’, वाटतो येथें पुल्लिंगी आहे हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

**( ९ ) सदय हृदय याचें भूप हा तापहारी, म्हणुनि परिसता मी होय येथें विहारी, मजहि वध कराया पातकी पातला जो, वरूनि पति असा हा भूमि कैशी न लाजो**

**१ सदय** :—सामासिक शब्द तृतीय तत्पुरुष समास ( दयेनें सहित ) क्रियाविशेषण ‘ असणें ’ या अध्याहृत क्रियेचें ( याचें हृदय सदय ( आहे ) असा अन्वय ).

**२ तापहारी** :—सामासिक शब्द, तद्धित ‘ इन् ’ प्रत्ययान्त ( तापाला हरणारा तो तापहारी ) क्रियाविशेषण ‘ असणें ’ या अध्याहृत क्रियेचे.

**३ म्हणुनि** —कवितेंत ‘ ऊन ’ बद्दल ‘ उनि ’ हे रूप कारणबोधक उभयान्वयी अव्यय

**४ परिसता** :—गुणविशेषण, विशेष्य ‘ मी ’.

**५ विहारी** :—क्रियाविशेषण, ‘ होणें ’ या क्रियेचें.

**६ कराया पातला** —( करावयास आला. ) संयुक्त क्रियापद, भूतकाळी, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे एकवचन, अकर्मक कर्तरीप्रयोग. कर्ता पातकी ’

**७ जो** —सर्वनामात्मक विशेषण, विशेष्य ‘ पातकी.

**८ कैशी** :—‘ कशी ’ याचें कवितेंतील रूप. क्रियाविशेषण, स्त्रीलिंगी ‘ लाजणे ’ या क्रियेचें.

**९ न लाजो** :—( लाजणार नाहीं ) अकर्मक गौण क्रियापद, भविष्यकाळीं, अकरणरूपीं अकर्मक कर्तरीप्रयोग.

**( १० ) उपाधीं पासोडो बैसों घातली. देव म्हणों लागले जानोयें उसीरू कां लावला म्हणोनो पुसों लागले. येरीं अवघां म्हणितलें.**

**१ उपाधीं** :—( उपाध्यांनीं ) तृतीयेचा इ प्रत्यय. उपाध्ये विशेषनाम, पुल्लिंगी, तृतीयेचें एकवचन कर्तृकारक

**२ बैसों घातली** :—‘ ऊ ’ प्रत्ययान्त ( जुनें ओप्रत्ययान्त ) तद्धित कृदत, संयुक्त क्रियापद, स्त्रीलिंगी, भूतकाळीं, तृतीय पुरुषाचें एकवचन. कर्मणीप्रयोग. कर्ता ‘ उपाधी ’, कर्म ‘ पासोडी.’

**३ म्हणों लागले** :—संयुक्त क्रियापद, सकर्मक कर्तरी प्रयोग, कर्ता ‘ देव ’, कर्म ‘ असे ’ अध्याहृत.

**४ जानोयें** :—( जानोर्नी ) तृतीयेचा ‘ ए ’ प्रत्यय, विशेषनाम, पुल्लिंगी, तृतीयेचे एकवचन. कर्तृ कारक.

६ **कां** :--तद्भव शब्द ( संस्कृत किम् ). कारणबोधक क्रियाविशेषण अव्यय, ‘ लावणे ’ या क्रियेचें.

७ **म्हणोनि** --कवितेंत ‘ ऊन ’ साठीं ‘ ओनि ’ तद्धित प्रत्यय. कारणबोधक उभयान्वयी अव्यय. उसीरु...लावला व पुसो लागले हीं दोन वाक्यें जोडतें.

८ **पुसों लागले** --संयुक्त क्रियापद, सकर्मक कर्तरीप्रयोग.

९ **येरीं** --‘ येरू ’ जुना सर्वनाम शब्द, तृतीयेचें ‘ ई ’ प्रत्ययान्त रूप तृतीय-पुरुषवाचक सर्वनाम, पुल्लिंगी, तृतीयेचें अनेकवचन. कर्तृकारक अवघा ( अवघ्यांना ) विशेषणात्मक समुदायवाचक नाम, ( विशेषणात्मक ) अनेकवचनीं प्रत्ययाभाव द्वितीया-कृतिकारक

**( ११ ) म्हणति सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त झालें । अमृत परमरुग्णा वांचवायास आलें ॥ सुभगिनि चवदा कीं कल्पसे अब्द गेले । स्वसम सखि निजेनें निष्ठुर स्वप्न केले ॥**

१ **म्हणति** --येथें भूतकाळासाठीं वर्तमानकाळाच्या रूपाची योजना झाली, आहे सकर्मक क्रियापद, वर्तमानकाळी, तृतीय पुरुषाचे अनेकवचन सकर्मक कर्तरी-प्रयोग कर्ता ‘ त्या ’ अध्याहृत कर्म ‘ असे ’ म्हणाल्या

२ **सुदिन** :—दिन संस्कृत पुल्लिंगीं येथे नपुंसकलिंगी संयुक्त शब्द ( सु + दिन ), सामान्यनाम, नपुंसकलिंगी, प्रथमरूपीं एकवचन. कर्ता होणे या क्रियेचा.

३ **भाग्यें** .--क्रियाविशेषण अव्यय होणें या क्रियेचे.

४ **प्राप्त** --क्रियाविशेषण ‘ होणे ’ ह्या क्रियेचे पूरक.

५ **झालें** :--झालें अकर्मक क्रियापद नपुंसकलिंगी, भूतकाळीं, तृतीय पुरुषाचें एकवचन. अकर्मक कर्तरीप्रयोग. कर्ता ‘ सुदिन ’.

६ **परमरुग्णा** .--संयुक्त शब्द ( परम रुग्ण ) सामान्यनाम, पुल्लिंगी, प्रत्ययाभाव द्वितीया. कृतिकारक.

७ **वांचवायास** :--हेतुबोधक क्रियाविशेषण ‘ येणें ’ या क्रियेचें.

८ **सुभगिनि** :—संयुक्त शब्द ( सु + भगिनी ) सामान्यनाम, स्त्रीलिंगी संबोधनाचें एकवचन.

९ **कीं** .— कारणबोधक उभयान्वयी अव्यय. ‘ अमृत...आलें ’ व ‘ कल्पसे... गेले ’ हीं दोन वाक्यें जोडतें.

१० **स्वप्न** :—सामान्यनाम, पुल्लिंगी प्रथमरूपीं अनेकवचन. कर्म—‘ करणें ’ या क्रियेचे. येथे संस्कृत मूळ शब्दाप्रमाणें पुल्लिंग आहे. मराठींत ‘ स्वप्न ’ नपुंसकलिंगी.

११ **केले** :—सकर्मक क्रियापद, भूतकाळीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचे अनेकवचन. कर्मणीप्रयोग. कर्ता ‘ निजेनें ’, कर्म ‘ स्वप्न. ’

— समाप्त —